# तत्त्वमसि

अर्थात

## तें तूं आहेस



चैतन्य आश्रम, आळंदी (देवाची)



# तत्त्वमसि

अर्थात

## तें तूं आहेस

ब्रह्मीभूत सद्गुरू श्रीअनाप महाराज यांचे शिष्य
ह.भ.प. श्रीसंदीप महाराज कथित

लेखक
ह.भ.प. श्रीउन्मेष महाराज

स यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳसर्वं तत्सत्यꣳस आत्मा तत्त्वमसि
श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविती।।

छान्दोग्योपनिषद् ६.१६.३

चैतन्य आश्रम, आळंदी (देवाची)

॥ ॐ तत्सत् ॥

**ग्रंथाचे शीर्षक** : तत्त्वमसि अर्थात तें तूं आहेस

**आवृत्ती** : दुसरी

**चिंतनकार** : ह.भ.प. श्रीसंदीप महाराज

**लेखक** : ह.भ.प. श्रीउन्मेष महाराज

**पृष्ठसंख्या** : ४७६

**कागदाची प्रत** : ५८ जी.एस.एम.

**ग्रंथाचा आकार** : डेमी ओक्टाव्हो

**प्रकाशक** : चैतन्य आश्रम
वसाहत क्र. १, इन्द्रायणी नगर, मोशी रस्ता
आळंदी (देवाची)–४१२१०५

**प्रकाशन तिथी** : गीता जयंती, मोक्षदा एकादशी
मार्गशीर्ष शु. एकादशी, शके १९४२
(२५/१२/२०२०)

**संगणकीय अक्षर जुळवणी** : ह.भ.प. गिरीश प्रल्हाद जोशी, गोपाळ जोध,
सोनल नामदेव कळमकर

**संगणकीय आकृती रेखणी** : गोविंद अरुण कामत

**वैय्याकरणीय शोधन प्रतिनिधी** : अलका प्रल्हाद जोशी

**मुखपृष्ठ चित्रकार** : सौरभ सावंत

**संपर्क प्रतिनिधी** : ह.भ.प. गिरीश प्रल्हाद जोशी
९८६०५७०२२०
agpj108@gmail.com



**मुद्रक** : एम. के. एंटरप्रायजेस, पुणे

**प्रतींची संख्या** : २०००

**मूल्य** : रूपये २००/–



भगवान श्रीज्ञानदेव महाराज समाधी

आळंदी (देवाची)

करतळावरी वाटोळा । डोलतु देखिजे आवळा ।

तैसें ज्ञान आम्हीं डोळां । दाविलें तुज ॥६५२॥ अध्याय १३

– श्रीज्ञानेश्वरी



ब्रह्मीभूत सद्गुरू श्रीअनाप महाराज

# श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ सद्गुरु श्रीअनाप महाराज – अल्पचरित्र

ज्यांच्यासाठी वेदांतशास्त्राची अनुभूती श्वासोच्छ्वासापेक्षाही सहज, बोधाची प्रखरता सूर्याप्रमाणे, मुमुक्षुंना बोध करण्याची तीव्रता सिंहाप्रमाणे – ते महापुरुष म्हणजे श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ सद्गुरु श्रीअनाप महाराज.

त्यांचा आविर्भाव नगर जिल्ह्यातील सोनगांव येथे एका सधन शेतकरी कुटुंबात झाला. बालवयापासूनच परमार्थाची तीव्र आवड असल्यामुळेच सहजच लौकिक शिक्षणाकडे त्यांचे दुर्लक्ष झाले. त्यांचे शिक्षण म्हणजे केवळ तिसरी नापास असे ते अनेक वेळा गंमतीने सांगत. त्यांच्या परमार्थ करण्याला घरातील सर्वांचाच विरोध. परंतु, परमार्थाची गोडी इतकी की स्मशानात जाऊन, ऊसाच्या पाचोटाची कोपी करून, मिणमिणत्या दिव्याच्या प्रकाशात संतांनी रचलेल्या ग्रंथांचा अभ्यास ते करीत. विवाह होऊन मुलंबाळं झाल्यानंतर काही काळ त्यांनी प्रपंच सांभाळला. प्रपंच नेटका करून सोबतच, आळंदी, पंढरपूर, पैठण इत्यादी तीर्थक्षेत्रांसाठी दिंडीत ते सहभागी होत. राहुरी साखर कारखाना, वि.वि.सह. सोसायटी सारख्या संस्थांची पदे त्यांनी यशस्वीरीत्या भूषविली. परंतु, मूळचा पिंड विरक्तिचाच असल्यामुळे प्रपंचापासून कायमच ते विन्मुख असत. सरलाबेटावरील सद्गुरु कोंडे बाबा ह्यांच्याकडून योगमार्गाची दीक्षा घेऊन त्याचा अभ्यास त्यांनी केला. वेदांत विचार अंतःकरणात अनेक जन्मांपासून रुजलेला असल्याने योगमार्गात ते रमले नाहीत. वारकरी सांप्रदायातील सोनं, वेदांत पारंगत, सोनपेठचे परमपूज्य सद्गुरु श्रीरंगनाथ महाराज परभणीकर ह्यांना ते शरण गेले. 'ब्रह्मज्ञानासाठी काय करू?' अशी प्रार्थना करून, सद्गुरुंच्या आज्ञेने घरी जाणे नाही आणि आळंदी, पंढरीत राहणे नाही याचे त्यांनी पालन करायचे ठरविले. सरळ बद्रिनाथाचा रस्ता धरून उत्तर दिशेने ते चालू लागले. सातपुडा पर्वतामध्ये साक्षात भगवंतानी एक संपूर्ण रात्र त्यांच्याशी परमार्थविषयावर अनुवाद केला.

आता, खरेतर काहीही करायचे शिल्लक राहिले नव्हते. परंतु, त्यांनी जवळपास ४० वर्षे भटकंती व अरण्यवास केला. मानसरोवरावरून परततांना जोशी मठाधिपती

शंकराचार्य यांच्याशी त्यांचा अनुवाद झाला. 'तुम्हें वेद की कोई विधी नही' या शिक्कामोर्तबाने त्यांचे ज्ञान पुन्हा मुद्रांकित झाले. उत्तर भारत/ महाराष्ट्र राज्यातील वेदांत परिक्षांमध्ये त्यांनी विशेष प्राविण्य मिळविले. उत्तर भारतासह महाराष्ट्रात, ज्या ठिकाणी आजही मनुष्य जाण्यास घाबरेल अशा अत्यंत दुर्गम जंगलात वाघ, सिंह, सर्प इत्यादी हिंस्त्र प्राण्यांच्या सान्निध्यात ते राहिले. नंतर, जंगलातून पुढे ते पुणे शहर, आळंदी (देवाची) या ठिकाणी अनेक जिज्ञासू साधकांच्या आग्रहास्तव उर्वरित काळ राहिले. या कालावधीत अनेक मुमुक्षु जनांना एका विशिष्ट हातवटीने त्यांनी वेदांताचा बोध केला. त्या बोधामृताने अनेक साधक तृप्त झाले. श्रावणाच्या पहिल्या दिवशी इ.स. २००५ मध्ये त्यांनी आपला देह पंचतत्त्वात विलीन केला. त्यांच्याच आज्ञेप्रमाणे, त्यांच्या उरलेल्या स्थूलदेहाला सोनगांव येथेच समाधीस्थ करण्यात आले.

सद्गुरूंच्या आशीर्वादावर, बोधावर आणि आठवणींवर आजही त्यांचा साधक परिवार अद्वैत वेदांताच्या मार्गावर चालण्याचा प्रयत्न करित आहे.

❄❄❄

# प्रस्तावना

श्री क्षेत्र आळंदी देवाची येथील चैतन्य आश्रमाचे आद्यप्रणेते महापुरुष ब्रह्मीभूत परम पूज्य सद्‌गुरू श्रीअनाप महाराज (महासमाधी इ.स. २००५) होत. सद्‌गुरूंच्या चैतन्य संप्रदायाचे आणखी दोन ठिकाणी आश्रम आहेत. श्री क्षेत्र सोनगाव (नगर जिल्हा) येथे सद्‌गुरूंचे समाधी मंदिर असून तेथील आश्रम श्रीविठ्ठलचैतन्य आश्रम या नावाने ओळखला जातो. श्री क्षेत्र आपटी (जुने नाव – अमरावती) (पुणे जिल्हा) येथे श्रीव्यासचैतन्य आश्रम भीमा नदीच्या काठावर आहे.

आतापर्यंत चैतन्य संप्रदायातर्फे लिखितरूपात चार प्रकाशने वाचकांसमोर आलेली आहेत. 'सांप्रदायिक प्रार्थना' या पुस्तिकेत अभंग, आरती, स्तोत्र आणि श्लोक यांचे संकलन आहे. 'पंचविवेक' हा पद्यरूपातील ग्रंथ आश्रमाचे द्वितीय प्रकाशन आहे. या ग्रंथामध्ये ब्रह्मीभूत सद्‌गुरू श्रीअनाप महाराजांचे शिष्य श्रीसंदीप महाराज ह्यांना आयुष्याच्या एकविसाव्या वर्षी स्फुरलेले १७८ अभंग आहेत. 'तत्त्वमसि अर्थात तें तूं आहेस' हा गद्य रूपातील ग्रंथ आश्रमाचे तृतीय प्रकाशन असून तो श्रीसंदीप महाराजांच्या चिंतनांवर आधारित आहे. वयस्कर व्यक्तिंनाही पारायणासाठी उपयोगी आणि अभ्यासकांसाठी सुबोध सरळ अर्थासह असणारा 'श्रीअमृतानुभव आणि श्रीचांगदेवपासष्टी' हा ग्रंथ आश्रमाचे चतुर्थ प्रकाशन होय.

'तत्त्वमसि अर्थात तें तूं आहेस' ग्रंथाची द्वितीय आवृत्ती वाचकांसमोर आणतांना आम्हांला अत्यंत समाधान वाटत आहे. प्रथम आवृत्तीच्या तुलनेत या द्वितीय आवृत्तीत अनेक बदल वाचकांना आढळतील–

(अ) शब्दांची निवड आणि वाक्यांची पुनर्रचना यासंबंधी सुमारे ८०० सुधारणा.

(आ) पाच नवीन आकृत्यांचा समावेश करण्यात आलेला आहे. आकृत्यांची संख्या ७५ वरून ८० झालेली आहे.

(इ) वेदांतदर्शनातील सुमारे २४८ पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या असलेले परिशिष्ट जोडण्यात आलेले आहे.

(ई) ग्रंथाची पृष्ठसंख्या ४४८ वरून ४७६ अशी झालेली आहे.

वेदांतशास्त्राचे अनुशीलन करणाऱ्या लोकांमध्ये साधारणपणे तीन वर्ग दिसून येतात – (१) विद्यापीठातून तत्त्वज्ञान विषयात एम.ए., पी.एच.डी. अशा पदव्या प्राप्त करण्याचा उद्देश, (२) शास्त्री, पंडित बनून वेदांतशास्त्रावर प्रवचने सांगण्याचा उद्देश आणि (३) शास्त्र–सद्‌गुरूंना शरण जाऊन सांप्रदायिक पद्धतीने वेदांतशास्त्राचा अभ्यास करून जन्ममरणाच्या चक्रातून नेहमीसाठी सुटण्याचा उद्देश. या तिन्ही वर्गातील लोक धन्य आहेत. वेदांतशास्त्राचा

सिद्धांत अनुभवात आला, तर मनुष्याला व्यवहारातील आणि परमार्थातील कोणतेही कर्तव्य शिल्लक राहत नाही. अशा महापुरुषांचा परत कधीही कोठेही जन्म होत नाही. कोणत्या ना कोणत्या कारणाने मनुष्याला वेदांतशास्त्राचा अभ्यास करावा वाटणे हे मोठे भाग्याचे लक्षण आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या तिसऱ्या वर्गातील मनुष्याला 'साधक' असे म्हणतात. साधकाने 'मुमुक्षु' व्हावे याला महत्त्व आहे. सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत ज्याला 'माझ्या ठिकाणी प्रतीत होणारे आत्म्याचे अज्ञान केव्हा निवृत्त होईल' हीच काळजी लागलेली असते, त्याला मुमुक्षु म्हणतात. ज्याला स्वतःचे नाम–रूपात्मक अस्तित्व नेहमीसाठी मिटवायची इच्छा आहे, तो मुमुक्षु म्हटला जातो.

वेदातांचा सिद्धांत हा अनुभवात आणि आचरणात आणण्याचा विषय आहे. त्यासाठी साधकाने संप्रदायपूर्वक अभ्यास करायला हवा. केवळ स्वतंत्रपणे शास्त्राचे अध्ययन केले, तर सिद्धांताचे यथार्थ आकलन होत नाही. श्रीगुरूंच्या श्रीमुखातून शास्त्राचे निरूपण ऐकले, तर शिष्याला स्व–स्वरूपाची खात्री होऊ लागते. वेदातील चार महावाक्यांपैकी सामवेदातील तत्त्वमसि हे एक महावाक्य आहे. जगात महावाक्यापेक्षा श्रेष्ठ अन्य कोणतेही वाक्य नाही. श्रीगुरूमुखातून महावाक्य निरूपणाचे श्रवण घडले असता शिष्याचा जन्ममरणाचा फेरा चुकतो. शास्त्रात तत्त्वमसि महावाक्यावर केवळ पाच–सहा छोटे परिच्छेद आढळतात. ते वाचल्याने बहुतेक साधकांना परोक्षरूपानेही महावाक्याचा अर्थ कळत नाही. श्रीसंदीप महाराजांनी तत्त्वमसि महावाक्य समजण्यासाठी जी पार्श्वभूमी साधकाला माहिती असणे गरजेचे आहे, त्यावर २४ चिंतने सांगितली आहेत आणि तत्त्वमसि महावाक्य निरूपण त्यांनी ३६ चिंतनामध्ये केले आहे. या ६० चिंतनाची लिखित प्रतिकृती म्हणजेच हा ग्रंथ होय. साधकांसाठी हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे. आमच्या माहितीमध्ये संस्कृत, मराठी, हिंदी भाषांमध्ये एवढे विस्तृत महावाक्य निरूपण असलेला अन्य ग्रंथ नाही.

### १. ग्रंथकथनकर्त्याचा अधिकार :

आयुष्याच्या एकवीसाव्या वर्षी श्रीसंदीप महाराजांची जेव्हां प्रथमच सद्गुरू श्रीअनाप महाराजांशी भेट झाली, तेव्हां 'मी तुमचीच वाट बघत होतो. माझे कार्य तुम्ही पूढे चालविणार आहात' असे सद्गुरूंनी त्यांना सांगितले. महाराजांचा उत्तम अधिकार सिद्धच असल्यामुळे भगवान श्रीतुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणे – 'तुका म्हणे कानी ऐकिली मात । तोचि झाला घात जीवपणा ।।' अशी त्यांची तत्काळ स्थिती झाली.

### २. ग्रंथरचनेची पार्श्वभूमी :

इ.स. २००३ मध्ये सद्गुरूंनी श्रीसंदीप महाराजांना व्यासपीठावर बसण्याचा अधिकार प्रदान केला आणि श्रीअमृतानुभव ग्रंथावर चिंतने सांगण्यास आज्ञा केली. सद्गुरूंनी स्वतः श्रीअमृतानुभव प्रकरण १ वरील चिंतने श्रवण केली. तसेच, श्रीज्ञानेश्वरी व

श्रीचांगदेवपासष्टी या ग्रंथातील ओव्यांवरील चिंतनेदेखील सद्गुरूंनी श्रवण केलीत. शास्त्रातील ओवी, श्लोक अथवा मंत्र घेऊन त्यावर एक ते दीड तास सद्गुरू चिंतन सांगत असत. याच सांप्रदायिक रीतीचे अनुगमन महाराज करीत आहेत. सद्गुरूंसारखाच, महाराजांचा शास्त्रग्रंथांवर समान अधिकार आहे. इ.स. २००६ ते इ.स. २०११ या कालावधीत महाराजांनी बाणेर येथे श्रीपंचीकरण या शास्त्रग्रंथावर सुमारे २४० चिंतने सांगितली. यापैकी काही चिंतने ही तत्त्वमसि महावाक्याची पार्श्वभूमी व महावाक्य निरूपणावर आहेत. या चिंतनांचे लिखित टिपण करण्यात आले आणि हा ग्रंथ म्हणजे या चिंतनांचे संकलन होय.

### ३. ग्रंथकथनकर्त्याची विवरणशैली :

सद्गुरूंसारखेच, महाराज ओवी अथवा श्लोकावर चिंतन सांगण्याच्या आधी त्यावर अभ्यास करीत नाहीत. चिंतनाची वेळ झाली की ते व्यासपीठावर बसतात, ग्रंथ उघडतात, साधकांनी निवडून दिलेली ओवी अथवा श्लोक वाचतात आणि पुढे एक ते दीड तास त्यांच्या श्रीमुखातून शब्दरूपी ज्ञानगंगा धाराप्रवाह वाहते. निर्भिड विवेचन पद्धती, सिंहसदृश आवेश, खणखणीत आवाज, कार्य–कारणात अडकलेल्या लोकांबद्दल कळवळा, लोकांनी संसार धर्मातून बाहेर पडावे या उद्देशाने केलेली त्यांची कान–उघडणी, मनुष्याच्या आद्य कर्तव्याची जाणीव करून देणे, क्वचित् विनोदाचे तुषार असे त्यांच्या विवरणरूपी हिऱ्याचे अनेक पैलू आहेत. सोबत त्यांचे प्रत्येक चिंतन हे उपक्रमोपसंहारादि षड्लिंगांमध्ये बसलेले आहे, असेही लक्षात येते. साधकांनी वेदांतशास्त्रात प्रवेश होण्यास आवश्यक असलेल्या अधिकार लक्षणांची वृद्धी करण्याकडे लक्ष द्यावे, अशी आठवण श्रोत्यांना महाराज चिंतनाच्या आरंभी करून देतात. विवरणास घेतलेल्या ओवीमध्ये दृष्टांत असेल, तर तो दृष्टांत साधारणपणे अर्धा तास सविस्तरपणे समजावून सांगतात. साधकाला दृष्टांत स्पष्टपणे कळणे गरजेचे असते. त्यानंतर महाराज दृष्टांतावर आधारित असलेला सिद्धांत कथन करतात. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या 'अद्वैत कुसरी विरळा जाणे ।' हे वचन महाराजांविषयी सार्थ ठरते.

जीवन्मुक्त महापुरुष अनेक असतात. परंतु, त्यांच्यापैकी एखादेच सद्गुरू पदावर आरूढ असतात. यासाठी अत्यंत थोर आध्यात्मिक अधिकार लागतो. त्यांच्याच शब्दांनी साधकाचे सर्व मायिक पदार्थांवरचे सत्यत्व निघून जाते आणि परमार्थात त्यांची झपाट्याने गती होऊन भवबंधनाचे खंडन होते. साधकाने स्वबुद्धीने करोडो जन्म साधना करीत राहिल्यानेही जे सिद्धांत कळत नाहीत तेच सिद्धांत सद्गुरूंच्या कृपेने साधकाच्या मनावर, बुद्धीवर, जीवावर ठसत जातात. 'मी ब्रह्म नाही', 'मी ब्रह्म कसा असू शकेन?', 'पदार्थ हे ब्रह्मस्वरूप कसे असतील?' इत्यादी संशय साधकाचे निघत जातात. पंडिताचे वेदांतशास्त्रावर बोलणे आणि जीवन्मुक्त महापुरुषाचे वेदांताच्या सिद्धांताचे निरूपण करणे यात पृथ्वी–आकाश असे अंतर आहे. पंडित हा अनेक ग्रंथातील उताऱ्याचे पाठांतर करून, अनेक ग्रंथाचा बहुकाळ अभ्यास करून प्रयत्नपूर्वक वेदांतशास्त्रावर प्रवचन सांगतो.

प्रमाण –

पैं व्याकरणीं चोखडा । तर्कीं अतिगाढा ।
परी एक आत्मज्ञानीं फुडा । जात्यंध जो ।।८३४।। अध्याय १३

– श्रीज्ञानेश्वरी

पंडित प्रवचन सांगतांना सिद्धांताच्या दोन गोष्टी बरोबर सांगतो आणि पाच गोष्टी चुकीच्या सांगतो. पंडिताचा शब्द श्रोत्याच्या कारणदेहापर्यंत (अविद्या देहापर्यंत) पोहचतच नाही. पंडिताचे शब्द श्रोत्याच्या चित्तात (सूक्ष्मदेहात) काही काळ राहतात व नंतर विसरले जातात. परंतु, ब्रह्म हाच ज्यांचा स्वभाव आहे, अशा जीवन्मुक्त महापुरुषांच्या श्रीमुखातून सिद्धांताचे शब्द सहजच येतात. त्यांना विचार करावा लागत नाही. इच्छा, अनिच्छा व परेच्छा या तीन प्रकारच्या प्रारब्धाने जीवन्मुक्त महापुरुषांचा व्यवहार घडतो. त्यांच्यासमोर बसलेल्या श्रोतृवृंदाच्या मनोवृत्तीप्रमाणे जीवन्मुक्त महापुरुषांच्या निरूपणाचे शब्द येतात. त्यांचे चिंतन ऐकण्यास बसलेल्या प्रत्येक साधकाच्या मनात परमार्थाविषयी विविध संशय असतात. सद्गुरूंचे चिंतन श्रवण केल्याने त्या साधकांच्या मनांतील त्या विशिष्ट संशयाचे निरसन होते. याचे कारण असे की सद्गुरूंचे शब्द हे साधकाच्या कारणदेहाला स्पर्श करतात. त्यामुळे, सूक्ष्मदेहात योग्य तो बदल होतो व स्थूलदेहाच्या पातळीवरील व्यवहारातही योग्य ती सुधारणा होते. देश–काल–पात्र बदलले की सद्गुरूंचा बोधही बदलतो. एकच साधक त्यांच्यासमोर असेल, तर बोधाचे विशिष्ट शब्द त्यांच्या श्रीमुखातून येतात. जर, साधकांचा समूह त्यांच्यासमोर असेल, तर त्याच विषयावरील भिन्न शब्द सद्गुरूंच्या श्रीमुखातून येतात. सद्गुरू ज्या शास्त्रवाक्यावर निरूपण सांगतात त्या शास्त्रवाक्याचा लक्ष्यार्थ सूर्याप्रमाणे स्पष्ट होतो. सद्गुरूंचे माहात्म्य असे की, जरी मंद वा मध्यम अधिकारी साधक त्यांच्या सान्निध्यात आला, तरी त्या साधकामध्ये विवेक–वैराग्यादि अधिकार लक्षणांची तीव्रतेने वृद्धी होते.

महाराज दृष्टांतासह पारिभाषिक शब्दांच्या अर्थासह मराठी भाषेत सोप्या पद्धतीने सिद्धांत कथन करतात. त्यांचे शब्द शास्त्रातलेच असतात असे नाही, पण शास्त्रबाह्यही नसतात. त्यांच्या चिंतनांमध्ये साधकांना अपूर्वता जाणवते म्हणजे पूर्वी कधीही न ऐकलेले शब्द, वाक्य, त्यांचे अर्थ आणि दृष्टांत श्रवण करण्यास मिळतात. सद्गुरूंप्रमाणेच, महाराज अंगीभावाने वेदांत सांगतात. एकमेव ज्ञानमार्गानेच परमार्थ–प्रतिपादन करणे म्हणजे अंगीभावाने वेदांतशास्त्राचा स्वीकार करणे होय. कर्म, उपासना इत्यादी क्रियात्मक मार्ग ज्ञानासाठी साहाय्यकारी आहेतच असा भाव नाही.

प्रमाण –

वांचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुके ।।
तिही गुंफिसी अधिकें । रुखीं इये ।।२४९।। अध्याय १५

–श्रीज्ञानेश्वरी

इतर मतांचे खंडन करण्यापेक्षा अद्वैत वेदांताच्याच सिद्धांताचे मंडन करणे हे त्यांच्या चिंतनांचे एक वैशिष्ट्य आहे. साधकाने अद्वैत वेदांताचा दृढ बोध करून घेण्याकडेच लक्ष द्यावे असे महाराजांचे मनोगत असते. विवेक, वैराग्य, षट्संपत्ती आणि मुमुक्षुत्व ही वेदांतशास्त्रात प्रवेश घेण्यासाठी लागणारी अधिकार लक्षणे आहेत. सर्वच साधक उत्तम अधिकारी नसतात. ज्या साधकामध्ये अधिकार लक्षणे पूर्णत्वास गेलेली नाहीत, त्या साधकाला वेदांतश्रवण घडल्यावर 'मी ज्ञानी आहे', 'मी सिद्ध आहे' असा भ्रम होऊन त्याचा अहंकार वाढू शकतो. अशा साधकांना महाराज सावध करतात की 'माझे शब्द तुम्ही ऐकलेले आहेत. ऐकणे म्हणजे सिद्ध होणे नव्हे. माझ्या शब्दातून तुम्हाला सिद्धांताची माहिती मिळत आहे. श्रवणाच्या पुढची पायरी 'कळणे' आहे. ते कळणे देखील सांगणाऱ्याच्या मनोगताप्रमाणे असायला पाहिजे. पुढची पायरी 'पटणे' आहे. त्यापुढे, सिद्धांत वृत्तीवर 'बाणायला' पाहिजे. नंतर, सिद्धांत 'अनुभवात' यावा आणि 'आचरणात' यावा. यासाठी जे गरजेचे आहे ते करा.'

### ४. ग्रंथकथनकर्त्याची सिद्धांत प्रतिपादनशैली :

विराट, हिरण्यगर्भादि समष्टी पातळीपासून सुरुवात करून वेदांताचा सिद्धांत सांगितला, तर बहुसंख्य साधकांना तो कळणार नाही. व्यष्टीने जीवाच्या चार देहांपासून सुरुवात करून महाराज सिद्धांताचा बोध करतात. वेदांतशास्त्र सर्वप्रथम मनुष्याचा पदार्थभ्रम काढते. बहुतेक लोक बाह्य पदार्थांमध्ये इतके गुंतलेले असतात की 'स्थूलदेह आहे' याकडे त्यांचे कमी लक्ष असते. मनुष्य थोडा हुशार झाला, तर सूक्ष्मदेहाच्या मन, बुद्धी, अहंकार इत्यादी तत्त्वांची त्याला जाणीव होते. परंतु, कारणदेह आणि महाकारणदेह यांची माहिती असणारा साधक अत्यंत दुर्मिळ होय. कारण–महाकारणदेहांचे वर्णन शास्त्रात अल्प शब्दांमध्ये दिलेले आहे. महाराजांच्या चिंतनामधील अपूर्वता ही की ते व्यष्टीने जड आणि चित् यांचा विवेक साधकाच्या जीवावर आरूढ करतात. व्यष्टीने साधकाचा परमार्थ सहज सूटतो. सिद्धांत कळायला सोपा झाल्यामुळे त्याची गोडी लागून साधकाची जिज्ञासा वृत्ती तीव्र होते आणि विचार मंथनाने सिद्धांत स्पष्ट होऊ लागतो.

महाराज चिंतनांमध्ये अवतार महापुरुषांची प्रमाणे देतात. अद्वैत वेदांताचा सिद्धांत अनादी काळापासून आहे आणि पुढे अनंत काळ सद्गुरु–सत्शिष्य परंपरेने सुरु राहील. हाच सिद्धांत भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी प्रस्थानत्रयावर संस्कृत भाषेत भाष्य रचून साधकांसाठी सुलभ करून दिला आणि याच सिद्धांताचे प्रतिपादन भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांनी श्रीअमृतानुभव, श्रीचांगदेव पासष्टी, श्रीज्ञानेश्वरी या मराठी भाषेतील प्रस्थानत्रयीतून केलेले आहे. ही खेदाची गोष्ट आहे की बहुतेक लोक श्रीज्ञानेश्वर महाराजांना विठ्ठलपंत आणि रुक्मिणीबाई यांचा मुलगा समजतात. लोक श्रीज्ञानेश्वर महाराजांना 'संत' म्हणतात. श्रीज्ञानेश्वर महाराज हे ब्रह्मावतार आहेत. कोणताही दोष नसलेल्या स्थानातून त्यांचे प्रकटीकरण झाले होते. जणूकाही ब्रह्मालाच श्रीज्ञानेश्वर महाराजांचा आकार आला

होता. श्रीज्ञानदेव म्हणजे 'ज्ञान हाच देव'. परंतु, हा लक्ष्यार्थ न जाणता अनेक लोक त्यांच्या समाधीवर डोके टेकवतात आणि बहुतेकांचा त्यामागे संसारातील गोष्टी सिद्ध होण्याचा सकाम भाव असतो. सद्गुरूंसारखाच, भगवान श्री आद्य शंकराचार्य आणि भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज प्रतिपादित सिद्धांतैक्याचा अनुभवरूप निश्चय महाराजांचाही आहे. त्यांच्या चिंतनांमध्ये श्रीअमृतानुभवादि प्राकृत शास्त्रग्रंथातील आणि उपनिषदादि संस्कृत शास्त्रग्रंथातील प्रमाणे ओघानेच येतात.



**५. ग्रंथाची वैशिष्ट्ये :**

या ग्रंथाचा विषय तत्त्वमसि महावाक्य निरूपण हा आहे. हे परमार्थाचे शेवटचे साधन आहे. व्यष्टीने ज्या तत्त्वाला 'आत्मा' म्हणतात, तोच समष्टीने 'ब्रह्म' आहे, याची सिद्धी करणे हे या ग्रंथाचे प्रयोजन आहे. भगवान श्रीव्यासांची परंपरा असलेल्या संप्रदायाच्या सिद्ध महापुरुषांचे शब्द असल्यामुळे जो कोणी या ग्रंथाचे श्रद्धा-विश्वासपूर्वक अध्ययन करेल, त्याला जन्माभाव मोक्षरूपी फल प्राप्त होईल. प्रत्यक्षात महावाक्य निरूपणाच्या आधी साधकाला पारिभाषिक शब्द आणि वेदांताच्या प्रक्रियांची माहिती असणे आवश्यक असते. ही पार्श्वभूमी पहिल्या काही चिंतनामध्ये सांगितली आहे. पुढील चिंतनांमध्ये तत्त्वमसि महावाक्याचे विस्तृत विवेचन महाराजांनी केलेले आहे.

**क) महावाक्य निरूपण प्रक्रियाः**

तत्त्वमसि महावाक्याच्या निरूपणाच्या दोन प्रक्रिया आहेत – (१) संबंधत्रय (२) व्यष्टी-समष्टीने जडाचा व्यतिरेक आणि चिद्चा अन्वय. विशेषण-विशेष्यभावसंबंध, लक्ष्यलक्षणभावसंबंध आणि सामानाधिकरण्यसंबंध यांना मिळून संबंधत्रय म्हणतात. या प्रक्रियांमध्ये अनेक पारिभाषिक शब्द येतात. शास्त्रात हा विषय अल्प शब्दातच दिलेला आढळतो. महाराजांनी सर्वप्रथम संबंधत्रयातील विशेषण-विशेष्यभावसंबंध स्पष्ट केलेला आहे. यामध्ये अपूर्वता अशी की उपाधी-उपधेयभावसंबंध आणि उपलक्षण-उपलक्ष्यभाव संबंधाचेही वर्णन आढळते. याच्याआधारे मनुष्याने चार प्रपंचाचा व्यतिरेक कसा करावा हे सांगितलेले आहे. साधकाचा दैनंदिन व्यवहारात अनेक लोकांशी आणि पदार्थांशी संबंध येतो. त्याच्या सभोवतालची परिस्थिती केव्हा कशी बदलेल हेही सांगता येत नाही. या अवस्थेतूनही साधकाने क्रमाक्रमाने चार प्रपंचाचा व्यतिरेक कसा करावा, त्या कलेचे साधकास उपयुक्त ठरणारे वर्णन महाराजांनी केलेले आहे. याप्रकारे, त्यांनी त्वम्पदाची ओळख साधकांना करून दिलेली आहे. त्वम् म्हणजे जीव आणि तत् म्हणजे शिव (ईश्वर) असा वाच्यार्थ सांगितलेला आहे. पुढे लक्ष्य-लक्षणभावसंबंध कथन करतांना जहती, अजहती आणि जहताजहती लक्षणांद्वारा तत्त्वमसि महावाक्याचा वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थाचा निर्णय होतो की होत नाही? कोणत्या लक्षणेने लक्ष्यार्थाचा निश्चय होतो? हे सांगितले आहे. प्रथम जहती लक्षणेची व्याख्या आणि त्या लक्षणेची स्पष्टता येण्यासाठी 'गंगेवर गवळ्यांचा गौळवाडा आहे'

हा दृष्टांत विस्तारपूर्वक कथन केला आहे. जहती लक्षणा महावाक्याला वापरली तर कोणता अर्थ लागतो, हे स्पष्ट केले आहे. अजहती लक्षणा सांगतेवेळी 'लाल धावतो' हा दृष्टांत घेऊन ती लक्षणा समजावून सांगितलेली आहे. जहताजहती लक्षणेसाठी 'तो राजा हा गोसावी' या दृष्टांताचे सुंदर वर्णन करून महावाक्याचा तात्पर्य निश्चय केलेला आहे. सामानाधिकरण्य संबंध मुख्य आणि गौण (बाध) असा दोन प्रकारचा असतो. मुख्य समानाधिकरणाप्रमाणे कूटस्थ आणि ब्रह्म यांचे ऐक्य आणि बाध समानाधिकरणानुसार चिदाभासाचा बाध होऊन ब्रह्माशी ऐक्य असा निर्णय लावलेला आहे.

तत्त्वमसि महावाक्य निरूपणाच्या दुसऱ्या प्रक्रियेत व्यष्टी प्रपंचाचा व्यतिरेक आणि कूटस्थाचा अन्वय सिद्ध केलेला आहे. जीवाचे तीन देह आणि तीन आभास यांना मिळून व्यष्टी प्रपंच म्हणतात. ईश्वराचे तीन देह आणि तीन आभास यांना मिळून समष्टी प्रपंच म्हणतात. समष्टी प्रपंचाचा व्यतिरेक आणि ब्रह्मचैतन्याच्या अन्वयाचा निर्णय दिलेला आहे. हे स्पष्ट करण्यासाठी तापवलेल्या लोखंडाच्या दृष्टांताचे विस्तृत वर्णन आहे. मंथन होण्यास सहाय्य व्हावे म्हणून दृष्टांत वेगवेगळ्या पद्धतीने सांगून, सोबतच त्याप्रमाणे सिद्धांतातील सूक्ष्म तत्त्वांचा बोध केला आहे. तापवलेल्या लोखंडाच्या गोळ्यात सर्वत्र अग्नीचा अन्वय असतो. लोखंडाच्या गोळ्याचा व्यतिरेक आणि अग्नीचा अन्वय असतो. महाराजांनी 'तत् त्वम् असि' प्रमाणेच 'त्वम् तत् असि', 'त्वम् असि', 'तत् असि' असे विविधरित्या विवेचन केलेले असल्यामुळे साधकाला महावाक्याचा वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ सहजपणे कळू लागतो.

**ख) वेदांतशास्त्राची पार्श्वभूमी :**

'माया', 'अध्यास', 'प्रमाता' यासारखे पारिभाषिक शब्द वापरून वेदांत सांगायला सुरूवात केली, तर मध्यम आणि मंद अधिकाऱ्यांना सिद्धांत कळणार नाही. वेदांतशास्त्राच्या ग्रंथातील पहिल्याच प्रकरणात पारिभाषिक शब्द आले तर साधकांना सिद्धांत समजण्यास अनेक अडचणी येतात. व्यवहारचतूर मनुष्याच्या हाती असा ग्रंथ आला, तर त्याला विषयाचे आकलन होणे कठीण झाल्याने तो निरुत्साहीत होईल. मनुष्य परमार्थाकडे केव्हा व कसा वळतो ? व्यवहारात गुरफटलेल्या कोणत्या मनुष्याला जर असे प्रश्न त्रास देऊ लागले – 'मी दिवस–रात्र राब राब राबतोय ते कशासाठी? यातून मला शेवटी काय मिळणार? खाणे, पिणे, झोपणे यापलीकडेही कोणती सुखकारक गोष्ट आहे का? भगवंत कसा आहे? मी कोण आहे?' तर यावरून तो मनुष्य अंतर्मुख होत आहे, असे लक्षात येते. केवळ कर्म करीत राहण्यात फल नाही, असे लक्षात येऊ लागले की मनुष्य परमार्थाकडे वळतो. स्व–स्वरूपाच्या अज्ञानामुळे मनुष्याला पदार्थ प्राप्त करण्याची इच्छा होते. इच्छित पदार्थ प्राप्त करण्यासाठी तो कर्म करतो. त्यामुळे तो कर्ता ठरतो. कर्माच्या फलाचा भोग मिळाला, तर तो भोक्ता ठरतो. यामुळे मनुष्य अनंतकाळापासून स्वर्ग–पृथ्वी–नरक या कक्षेत फिरत राहतो. हे ज्याच्या लक्षात येते त्याने विधीपूर्वक श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंना शरण जावे असा बोध श्रुतीमाता करते.

प्रमाण –

**परिक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ।**
**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ।।**

– मुण्डकोपनिषद् १–१२

यावरून हे लक्षात येते, की साधकाने सर्वप्रथम कर्माची मीमांसा जाणून घ्यावी. वेदविहीत नित्य–नैमित्तिकादि कर्म आणि जीवाच्या कर्माचे संचित, प्रारब्ध, क्रियमाण या वर्गीकरणाची माहिती महाराजांनी सांगितलेली आहे. अज्ञानी जीवाची कर्मगती आणि जीवन्मुक्त महापुरुषांची कर्मगती सोबत मांडलेली असल्यामुळे साधकाला त्याच्या जीवनाचे उद्दीष्ट काय असावे हे कळणे सुलभ होते. बहुतेक लोकांना वेद म्हणजे काय ? याचीच माहिती नसते. कोण्या साधकाला वेदाबद्दल विचारले, तर एवढेच उत्तर देतो 'मला माहिती आहे. सामवेद, ऋग्वेद, यजुर्वेद आणि अथर्ववेद हे चार वेद आहेत.' यापलीकडे त्याला काही माहिती नसते. ईश्वर वेदाला प्रकट करतो. वेद ही मनुष्याची कृती नसल्यामुळे वेदाला 'अपौरुषेय' म्हणतात. वेद अनादी आहे. म्हणजे, मोजताच येणार नाही इतक्या मोठ्या कालावधीपासून वेदाचे अस्तित्व आहे आणि पुढेही राहिल. परंतु, पाश्चिमात्य देशातील अभ्यासक, 'ऋग्वेदाची रचना सहा हजार वर्षापूर्वी करण्यात आली' असे हास्यास्पद व्यक्तव्य करतात. खेदाची गोष्ट ही की त्या पाश्चिमात्य अभ्यासकांचे अंधानुकरण काही भारतीय अभ्यासक करतात. जे लोक स्वबुद्धीने असंप्रदायपूर्वक शास्त्राभ्यास करतात त्यांना शास्त्राचा योग्य अर्थ कळत नाही. अनेक साधकांना शास्त्रग्रंथांची माहिती नसते. याकारणासाठी वेदांगे, षट्दर्शने, पुराणे इत्यादी आस्तिक शास्त्रांची माहिती दिलेली आहे. यापैकी वेदांताचे प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रग्रंथांचीही माहिती आहे. जीवाच्या संस्काराप्रमाणे त्याचे पामर, विषयी इत्यादी वर्गीकरण समजून घेणे गरजेचे आहे. पामर ते सिद्ध असा जीवाचा प्रवास कसा होतो हेही जाणून घेतले पाहिजे.

### ग) जड आणि चित् यांचा विवेक :

सच्चिदानंद पदवी घेण्यासाठी, म्हणजे स्व–स्वरूपातच स्थित असल्याच्या संशयरहित दृढ निश्चयासाठी, चार देह आणि त्यांच्या तत्त्वांचा अभ्यास साधकाने करावा, असा बोध अवतार महापुरुष आपल्याला करतात. स्थूलदेह आणि सूक्ष्मदेह कशापासून बनलेले आहेत ? चार देहांचे तत्त्व आणि धर्म कोणते ? आत्मा चेतन असून असंग कसा आहे ? मनुष्य स्वतःला कोण समजतो ? प्रत्यक्षात तो काय आहे ? या प्रश्नांची दृष्टांतासह उत्तरे या ग्रंथात मिळतात.

### घ) वृत्ती संबंधी अभ्यास :

मनुष्याला पदार्थांचा दाट परिचय आहे. दैनंदिन व्यवहारात तो पाहतो, ऐकतो, चाखतो, स्पर्श करतो, वास घेतो. पदार्थ मनुष्याला कसा कळतो याची माहिती पाहिजे. वृत्ती

आणि वृत्तीवाटे वाहत जाणाऱ्या चिदाभासामुळे पदार्थज्ञान होते. साधकाने ही प्रक्रिया समजून घेणे फार महत्वाचे आहे. त्यामुळे वृत्तीगत ब्रह्मज्ञान कसे होते हे कळणे त्यास सुलभ होईल.


**च) जन्म आणि मृत्यूसंबंधी दिव्यता :**

मनुष्य मरतांना किंवा मेलेल्या मनुष्याचा स्थूलदेह अनेकांनी पाहिलेला आहे. परंतु, 'मनुष्य मरतो' म्हणजे नेमके काय होते? त्यामागची दिव्यता काय? वासनेची गाठ म्हणजे काय? याची स्पष्टता या ग्रंथात करण्यात आलेली आहे. नुकतेच जन्मलेले बाळ, मग ते मनुष्याचे असो अथवा मनुष्येतर प्राण्याचे असो, अनेकांनी पाहिलेले आहे. 'जन्म होणे' म्हणजे काय? जीवाला स्थूलदेह कसा प्राप्त होतो? याचे विवेचन या ग्रंथात आलेले आहे. वेदांताचा सिद्धांत अनुभवात आला, तरच जन्म-मरण चक्र खंडित होते. यासाठी जन्म-मरणाची मीमांसा साधकाला स्पष्ट असावी. अज्ञानी मनुष्य मेल्यावर त्याच्या चार देहांची गती काय होते? आणि 'जीवन्मुक्त महापुरुषांचा देह पडणे' म्हणजे काय? याची अत्यंत स्पष्ट समज साधकाला असणे गरजेचे आहे.

**ज) आकृत्या आणि कोष्टके यांची उपयुक्तता :**

ग्रंथाचे एक वैशिष्ट्य म्हणजे यात अनेक आकृत्या आणि कोष्टके आहेत. मनुष्य एखादा विषय पहिल्यांदाच शिकत असेल आणि जर तो विषय आकृत्यांच्याआधारे समजाविण्यात आला, तर विषयाची स्पष्टता होण्यास फार मदत होते. शिक्षणतज्ञांचे मत आहे की 'शंभर शब्दांनी वर्णन करूनही जो विषय समजत नाही, तोच विषय त्यासंबंधीची आकृती पाहिल्याने चटकन कळतो'. उदाहरणार्थ - विद्युत अभियांत्रिकी शिकणाऱ्या विद्यार्थ्याला विद्युत प्रवाहाचे गुणधर्म समजावून सांगायचे आहेत. तारेतून वाहणारा विजेचा प्रवाह डोळ्यांनी तर दिसत नाही. पण, त्याचे गुणधर्म तर समजावून सांगायचे आहेत. मग उपाय काय? तर, त्यासंबंधी आकृती काढून विद्युत प्रवाह, वाहण्याची दिशा इत्यादी समजावले, तर विद्यार्थ्यांना लवकर कळते. विद्युत प्रवाहाचे गुणधर्म समजाविण्यासाठी केवळ लक्षणं आणि प्रमाणं सांगितली, तर सर्वांनाच तो विषय कळेल असे नाही. परंतु, आकृत्या आणि कोष्टके यांसह विषय समजावून सांगितला, तर विद्यार्थ्यांना कळण्यास सुलभ होते. धर्म आणि अध्यात्म हे शब्दप्रमाणाचे विषय आहेत, प्रत्यक्षप्रमाणाचे नाहीत. ब्रह्म, माया, वृत्ती, प्रारब्ध, क्रियमाण इत्यादी प्रत्यक्षप्रमाणाचे विषय नाहीत. हे समजावून सांगतांना लक्षण आणि प्रमाणांसोबत आकृत्यांचाही उपयोग केला, तर साधकांना विषयाचे आकलन सहजपणे होते. उदाहरणार्थ - या ग्रंथात अज्ञानी जीवाची कर्मगती आणि जीवन्मुक्त महापुरुषांच्या कर्मगतीसंबंधी आकृत्या दिल्या आहेत. संचित-प्रारब्ध-क्रियमाण यांचे शब्दानेही वर्णन आहे आणि आकृत्याही आहेत. पदार्थज्ञानाची रीत समजावून सांगतांना सोबत आकृती दाखविलेली आहे. त्यामुळे, चिदाभास अंतःकरणवृत्तीवाटे पदार्थांपर्यंत कसा वाहत जातो हे समजण्यास सोपे जाते. देहांचे तत्त्व कोष्टकांमध्ये दाखविलेले आहेत. आकृत्यांची आणि कोष्टकांची अशी ही उपयुक्तता लक्षात घेऊन त्यांचा समावेश या ग्रंथात करण्यात आलेला आहे.

## त) पारिभाषिक शब्दांची क्रमाक्रमाने ओळख :



वेदांतशास्त्राकडे नव्यानेच वळलेल्या साधकांसाठी किंवा अभ्यासकांसाठी पारिभाषिक शब्दांची ओळख क्रमाक्रमाने करून देणे कल्याणकारक ठरते. जर, वेदांतशास्त्रावरील कोण्या ग्रंथातील पहिल्याच प्रकरणात 'मिथ्या', 'अनिवर्चनीय' असे शब्द आले, तर विषय कळणार नाही. सर्वप्रथम कर्म, प्रारब्ध, क्रियमाण, संचित इत्यादी शब्दांची ओळख पाहिजे. त्यानंतर विश्व, तैजस, प्राज्ञ, वृत्ती, त्रिपुटी, प्रमाण, प्रमेय हे शब्द समजाविले पाहिजेत. पुढे सत्तात्रय, माया, जीव, ईश्वर, कूटस्थ, ब्रह्म यांची ओळख करून घ्यावी. त्याहीपुढे उपादानकारण, निमित्तकारण, आरंभ, परिणाम, विवर्त, अध्यास, तटस्थलक्षण, स्वरूपलक्षण, महावाक्यासंबंधी संबंधत्रय यांचा परिचय करून घ्यावा. ग्रंथामध्ये पारिभाषिक शब्दांचा असा क्रम आढळतो. साधक आणि अभ्यासक यांना बोधाची स्पष्टता येण्यासाठी अविद्या, अविद्याकार्य, माया आणि मायाकार्य यांचे सूक्ष्म विवेचन केलेले आहे.

## द) ब्रह्मावतार आणि ईश्वरावतार :

भगवान श्रीव्यास, भगवान श्री आद्य शंकराचार्य, भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज हे ब्रह्मावतार आहेत. राम-कृष्णादि दहा अवतार हे ईश्वरावतार आहेत. ब्रह्मावतार आणि ईश्वरावतार हे वर्गीकरण सूक्ष्मरित्या समजाविले आहे. अवतारांचे प्रकटीकरण, त्यांचे कार्य आणि त्यांचे लीलासवरण यासंबंधीची दिव्यता सांगण्यात आली आहे. ईश्वर आणि जीव यांच्या शक्तीत आणि ज्ञानात कसा फरक आहे तेही या ग्रंथाद्वारे कळून येते.

## ध) देश-काल-पदार्थ विवेचन :

'सृष्टी ही देश-काल-पदार्थात्मक आहे' हे वाक्य ऐकूनच साधकाला सृष्टी अचिंत्य आणि अफाट आहे, हे कळेलच असे नाही. ज्या श्वेतमार्ग नावाच्या आकाशगंगेत सूर्यमाला आहे, त्या आकाशगंगेचा व्यासच एक लाख प्रकाशवर्ष असून त्यात ४०० अब्ज तारका आहेत. श्वेतमार्ग आकाशगंगेसारख्या असंख्य आकाशगंगा ब्रह्मांडात आहेत. 'पृथ्वीपासून ब्रह्मलोकापर्यंत सर्व भोगांचा त्याग म्हणजे वैराग्य' या एका वाक्याने साधकाला काय बोध होणार ? ब्रह्मलोक कशाला म्हणतात, हेच त्याला माहिती नसते. ब्रह्मलोकाचे सविस्तर वर्णन करून, नंतर तो लोक आणि इतर लोक कसे अनित्य आहेत, हे समजावून सांगितलेले आहे. त्याचप्रमाणे, ज्याला 'काळ' म्हणतात तो काळ मोजण्याचे कल्प आणि महाकल्प हे परिमाण किती मोठे आहेत यांचे वर्णन आले आहे. सोबतच देश-काल-पदार्थ मिथ्या आहेत हेही सिद्ध करण्यात आलेले आहे. जिज्ञासू साधकांसाठी गरजेपुरती माहिती ग्रंथात आहे.

## न) त्याग करण्याची कला :

त्याग हा शब्द ऐकला की 'भगवे कपडे घातलेला, जटाधारी, जंगलात राहणारा' अशी बहुसंख्य लोकांची कल्पना असते. महाराज सांगतात की त्याग करणे परमार्थासाठी

आवश्यक आहे, पण त्याग कसा करायचा ही एक कला आहे. साधक जेथे ज्या परिस्थितीत आहे त्या परिस्थितीत त्याने परमार्थाचे साधन करावे. त्याग म्हणजे कपडे बदलणे अथवा परिस्थिती बदलणे नव्हे. स्थूल–सूक्ष्म–कारण–महाकारण प्रपंचांचा त्याग कसा करायचा याचे अनेक दृष्टांतासह आणि प्रमाणांसह वर्णन महाराजांनी केलेले आहे.

**प) विवर्ताची सिद्धी :**

विवर्त हा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे. 'ब्रह्म सत्य जगत् मिथ्या' म्हणजे विवर्त. विवर्ताच्या सिद्धीसाठी प्रथम जगत् हे कार्य, ब्रह्म या कारणाशी एकरूप कसे आहे ते पूर्वपक्ष–सिद्धांतपक्ष पद्धतीने सांगितलेले आहे. त्यानंतर, अध्यास म्हणजे काय याचे वर्णन आहे. अध्यासनिरास होण्यासाठी श्रीगुरुंच्या श्रीमुखातून महावाक्य निरूपण श्रवणाची गरज साधकाला आहे.

**६. ग्रंथाची उपयुक्तता :**

ग्रंथाचा विषय, ग्रंथाचे प्रयोजन आणि ग्रंथाच्या अनुशीलनाचे फल हे पूर्वी पाहिलेच आहे. व्यवहारचतुर मनुष्याने हा ग्रंथ वाचला, तर त्याला परमार्थाची गोडी लागेल. साधकाने श्रद्धा–विश्वासपूर्वक या ग्रंथाचे अनुशीलन केले, तर त्याला जन्माभाव मोक्ष प्राप्त होईल. अभ्यासक आणि शास्त्री–पंडित ह्यांच्या बुद्धीत वेदांताचा सिद्धांत आणखी स्पष्ट होईल. जीवन्मुक्त महापुरुषांनी हा ग्रंथ वाचला, तर सुखावतील.

**७. ऋणनिर्देश :**

ब्रह्मीभूत सद्गुरू श्रीअनाप महाराज आणि ह.भ.प. श्रीसंदीप महाराज ह्यांच्या अमूल्य आणि दुर्लभ शब्दांचे श्रवण आम्हांला घडले नसते, तर परमार्थाच्या क्षेत्रात आम्ही इतस्तत: भटकत फिरलो असतो आणि आमचे हाल झाले असते. त्यांच्या अनंत उपकारांची परतफेड करण्यास आम्ही असमर्थ आहोत. ते या ग्रंथाचे उपादान आहेत. ग्रंथाला मूर्तरूप देण्यास, सेवारूपाने अनेक साधकांचे विविध प्रकारे सहाय्य झालेले आहे. संगणकावर टंकलेखन, आकृत्या, शुद्धलेखन इत्यादी कामांत सर्वोतोपरी मदत करणाऱ्या सोनल नामदेव कळमकर, गिरीश प्रल्हाद जोशी, अलका प्रल्हाद जोशी, प्रभु परिवार, गोविंद अरुण कामत, गोपाळ जोध (शेगांव) यांचे विशेष आभार मानावे वाटते. तसेच, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरित्या सहकार्य करणाऱ्या सर्वांचेच मन:पूर्वक आभार.

भगवंत सर्वांवर कृपा करोत अशी प्रार्थना!

ॐ तत् सत्!

ह. भ. प. उन्मेष महाराज
आळंदी (देवाची)



# भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज

|| ॐ तत् सत् ||



## तत्त्वमसि अर्थात तें तूं आहेस

### अनुक्रमणिका

## चिंतन क्रमांक – १
## शरीराचे अनित्यत्व

वेदातील 'तत्त्वमसि' या महावाक्याचा विचार करण्यासाठी आपण येथे जमलो आहोत. तत्पूर्वी, त्यासाठी लागणारी पार्श्वभूमी समजून घेणे आपल्यासाठी गरजेचे आहे. संसारिक मनुष्याची अवस्था, कर्माची मीमांसा म्हणजेच कर्माचा सखोल विचार, शास्त्र, साधना, परमार्थाचे मार्ग, मनुष्याचे चार देह, चार देहांच्या अवस्था, जीव, जगत्, ईश्वर इत्यादी कळले तरच 'तत्त्वमसि' महावाक्याचा योग्य अर्थ बुद्धीत प्रकाशित होईल. म्हणून प्रथम आपण या सर्वांचा थोडासा विचार करणार आहोत.

जगातील लोक व्यवहार कसा करतात याचे अवलोकन केले, विचार केला तर आपल्याला काय आढळते? जो तो नको इतकी धावपळ करतांना दिसतो. कोणासाठी? कशासाठी? आणि कुठपर्यंत? प्रत्येकजण सकाळ ते रात्र राब राब राबतो. नोकरी–व्यवसायानिमित्त घरापासून दूर ये–जा करणाऱ्यांची अवस्था बघा. सकाळी चार वाजता उठतो. घाईने तयारी करून बस, रेल्वे इत्यादी साधनांनी कामाच्या ठिकाणी जातो. रात्री आठ–नऊ वाजता घरी परततो. घरच्यांनाही नीट वेळ देऊ शकत नाही आणि साधं स्वतःही व्यवस्थित जगू शकत नाही. जवळपास संपूर्ण आयुष्यभर त्याची हीच दिनचर्या असते. असे करता करता एक दिवस तो मरतो. 'काही गोष्टी करायच्या राहून गेल्या', 'आपल्याकडे अमुक काही वस्तू असत्या तर बरे झाले असते', असे त्याचे विचार मरताना देखील प्रबळ असतात. असेच जगणे जवळ जवळ सर्वांचेच दिसते.

तुम्हांला एक दृष्टांत सांगतो. एक म्हातारा मनुष्य होता. त्याच्या वाड्यातच गाईचा गोठा होता. खरे पाहता गाईचा गोठा त्याची सून किंवा मुले साफ ठेऊ शकत होती. परंतु, म्हातारा स्वतःच सकाळी लवकर सगळ्यांच्या आधी उठून झाडू घ्यायचा. बूड खरडत खरडत गोठ्यात जाऊन गोठा साफ करायचा. एक दिवस आजारी अवस्थेत तो त्याच्या वाड्यातील पडवीत खाटेवर पडला होता. म्हाताऱ्याची शेवटची घटका जवळ आली. तुम्हांला माहीतच आहे की म्हातारपणी सर्व इंद्रिये शिथिल पडतात. म्हाताऱ्याच्या तोंडून धड आवाजही निघत नव्हता. 'म्हातारा मरणार' असे जाणून शेजारी आणि नातेवाईक त्याच्याजवळ येऊन बसले. सर्वांना पाहून म्हातारा काहीतरी म्हणू लागला. म्हाताऱ्याच्या तोंडून नीट न कळणारे 'वा', 'वा' असे शब्द लोकांना ऐकू आले. लोकांना वाटले म्हाताऱ्याला 'देवाचे नाव घ्या' असे म्हणायचे असेल. म्हणून सर्वजण 'वासुदेव' 'वासुदेव' असे मोठ्याने नामस्मरण करू लागले. हे पाहून म्हातारा वैतागला. ते पाहून सर्वजण शांत झाले. काही वेळाने म्हाताऱ्याच्या तोंडून नीट न कळणारे 'के', 'के' असे अक्षर लोकांना ऐकू आले. वासुदेव हे नाव कदाचित् म्हाताऱ्याला आवडत नसावे, कारण शेजारच्या वासुदेवाशी म्हाताऱ्याचे अजीबात पटत

नव्हते. परंतु, शेवटच्या घटकेला लोकांनी नामस्मरण करावे असे म्हाताऱ्याला म्हणायचे असेल असे समजून उपस्थित लोक 'केशव' 'केशव' असे नाव घेऊ लागले. हे पाहून म्हातारा आपले तोंड आणि कपाळ हाताने बडवून घेऊ लागला. लोकांना नक्की काय करावे हे कळेना. म्हातारा मात्र फारच अस्वस्थ होऊ लागला. तो विचार करू लागला, 'काय मुर्ख माणसं आहेत. मला नेमके काय सांगायचे आहे हे ह्यांना नीट कळतच नाही'. सर्व शक्ती एकवटून म्हातारा एका कुशीवर वळला आणि गोठ्याकडे हात दाखवून खूणेनेच म्हणाला, 'वासरू केरसुणी खातंय'. हे पाहून लोकांनी कपाळाला हात लावला. म्हातारा मरायला टेकला. परंतु, त्याचा जीव केरसुणीतून निघत नाही. निघेल तरी कसा? आणि मरतांना तरी देवाचे नाव घ्यावे एवढी अक्कल तरी त्याला येणार कशी? कारण आयुष्यभर मनुष्यदेहाचा उपयोग त्याने फक्त अन्न, धन, मान इत्यादी ऐहिक गोष्टींसाठीच केला होता. त्याचा जीव सदैव त्यातच राहिला. अशाप्रकारे, म्हाताऱ्याप्रमाणेच अनेक लोक आपल्या संपूर्ण आयुष्याचे वाटोळे करून घेतात. विविध पदार्थ आणि नातलग व मित्रांमध्येच गुंतून राहतात. मनुष्यदेहाचे सार्थक कशात आहे हे त्यांना साधूसंतांनी कितीही सांगितले असले तरी कळत नाही.

पुण्यात एक दिवस मी एका बस स्थानकावर उभा होतो. समोरून एक बैलगाडी जाताना दिसली. बैलगाडीत अंदाजे १ टनापेक्षा जास्त वजनाचा ओंडका ठेवला होता. एकच हडकूळा बैल गाडीला जुंपलेला. गाडीवर त्याचा मालक हातात चाबूक घेऊन बसला होता. चढावरून तो बैलगाडी हाकत होता. वजन ओढण्यामुळे बैलाचे शरीर थरथर कापत होते. डोळ्यांतून अश्रू गळत होते. बैलामध्ये शक्ती कमी असल्याने त्याला वजन पेलवत नव्हते. मोठ्या कष्टाने तो एक एक पाऊल पुढे टाकत होता. एका ठिकाणी बैलाला पुढे चालता येईना. त्याचा उचललेला पाय तसाच हवेत होता. आता, तो बैल खाली पडेल अशी स्थिती निर्माण झाली. हे पाहून मालकाने चाबूक उगारून जोरात बैलाच्या पाठीवर मारला. बैलाच्या पार्श्वभागातून वेगाने पातळ शेण बाहेर पडू लागले. संपूर्ण ताकद एकवटून बैलाने पाय पुढे टाकला. बैलाचे असे हाल झाले. आणि हे कदाचित् त्याच्यासाठी रोजचेच असावे.

बैल पूर्वजन्मी जेव्हा कधी मनुष्य होता, तेव्हा त्याने भगवद्प्राप्ती करून घेतली नाही. परमार्थ केला नाही. जन्म–मरणाच्या फेऱ्यातून नेहमीसाठी सुटका करून घेतली नाही. म्हणून आता त्याला अनेक जन्मे अशाच दुःखातून जावे लागेल.

प्रमाण –

**अज्ञानी आंधळा कैसा हा दुःखी जीव ।**
**चौऱ्यांशी लक्ष योनीत भाकितो कीव ।।१।।**
**अरे! मुक्तिद्वार हा बघ शुद्ध मनुष्य देह ।**
**पण, दुर्दैव कैसे रे! हा विषय सुख ।।२।।**
**मी दुःख काय वर्णू ह्या लक्षावधी योनी ।**
**बैल, घोडा, गाढव महादुःखांचे प्राणी ।।३।।**

बघ केवळ दुःख अन दुःखच कपाळी ।

अरे ! कशी रे ! करुणामय ही पश्वादी भूपाळी ।।४।।
मग आता तरी ज्ञान सदैवच तुका तो सांगे ।
या मनुष्य देहीच शोध परमानंद धागे ।।५।।
दीप अनाप म्हणे सद्गुरू ज्ञानदेव राजे ।
ना आत्मज्ञान होता, पुनः जन्ममरण ओझे ।।६।। अभंग क्रमांक – ८

– पंचविवेक

अन्न, धन, मान इत्यादी मिळविण्यातच मनुष्यजन्म वाया जातो. व्यवहारात उच्च पद, अधिकार म्हणजे सत्ता मिळविण्यासाठी मनुष्य प्रयत्न करीत असतो. व्यवहारात फसवणूक होऊ नये म्हणून दिवस–रात्र व्यावहारिक ज्ञान संपादन करीत राहतो. देहाला सुख मिळावे म्हणून धन, बायको, पोरं, चमचमीत खाद्यपदार्थ आणि इतर अनेक पदार्थ गोळा करीत राहतो आणि त्यांच्यातच रमतो. भगवान श्रीज्ञानदेव महाराज, श्रीनामदेव महाराज यांच्या प्रमाणेच श्रीतुकाराम महाराजांचे एक वचन आहे – **'एक एक योनी कोटी कोटी फेरा । तेव्हा लागे मानवाचा वारा ।'** याचे गणित केले तर ते पुढील प्रमाणे होते.

१ X १ = १,

योनी म्हणजे जीवांचे प्रकार ८४ लक्ष आहेत.

म्हणजे १ X १ X ८४ X $१०^{५}$ = ८४ X $१०^{५}$,

कोटी X कोटी = $१०^{७}$ X $१०^{७}$ = $१०^{१४}$,

म्हणजे ८४ X $१०^{५}$ X $१०^{१४}$ = ८४ X $१०^{१९}$,

अशाप्रकारे, ८४ X $१०^{१९}$ एवढ्या वेळा जन्मल्या–मेल्यानंतर, मनुष्य जन्म मिळतो. परमार्थ करून मनुष्य जन्माचे सार्थक केले नाही, तर, परत अनेक वेळा विविध योनींमध्ये जन्म–मरणाचे दुःख भोगत बसावे लागेल. जन्म–मरण चक्र हे अत्यंत दुःखदायक आहे.

या चक्रातील जन्म या प्रक्रियेचा थोडासा विचार करू. मनुष्याचा जन्म मातेच्या उदरात होतो हे सर्वांना माहीत आहे. पण मातेच्या उदरात काय भोगतो याचा विचार सहसा कोणी करत नाही.

प्रमाण –

मातेच्या उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं ।
जठरीं नवमासवरीं । उकडला जो ।।७३३।। अध्याय १३

– श्रीज्ञानेश्वरी

मनुष्य मातेच्या उदरात विष्ठा, मल, मूत्र, रक्त, कफ, पित्त, वात अशा घाणेरड्या पदार्थांमध्ये अंदाजे नऊ महिने राहतो. अधिक उदरात उष्णता असते. शरीराचे तापमान ३७ डिग्री सेल्सियस असते. त्यांमध्ये मनुष्य देह नऊ महिने उकडला जातो. परंतु, जन्म होऊन बाहेर पडल्यावर हळुहळू मनुष्याला या व्यथांचा विसर पडतो.



प्रमाण –

ते गर्भींची जे व्यथा । कां जें जालें उपजतां ।
तें कांहींचि सर्वथा । नाठवी जो ।।७३४।। अध्याय १३

– श्रीज्ञानेश्वरी

स्त्रीची प्रसूती नीट पार पडली तर तिचा पुनर्जन्म झाला असे समजतात. म्हणजे प्रसूती ही प्रक्रिया अत्यंत कष्टदायक आहे हे लक्षात येते.

प्रमाण –

नवमास कष्टलासी दहाव्यानें प्रसूत जाली ।
येतांचि कर्मजाड तुझी मान अडकली ।
आकांतु ते जननीये दुःखें धाय मोकली ।
स्मरे त्या हरिहरा ध्यायीं कृष्णमाउली ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

प्रसूतीच्या वेळेस मातेला असह्य वेदना होतात. या प्रक्रियेत मातेचा 'आकांत' होतो. तिचे शरीर तर धडधाकट असते. परंतु, उदरातून बाहेर पडणाऱ्या बाळाचे अंग लुसलुशीत असते. मातेपेक्षा त्या बाळाला खूप जास्त वेदना होतात. ते भयंकर दुःख त्याला वाणीने व्यक्त करता येत नाही. म्हणून तो फक्त रडत राहतो. कालांतराने हे सगळे तो विसरत जातो. त्यानंतर बाळाचे आई, वडील आणि नातलग त्याला व्यवहार शिकवायला सुरूवात करतात. बारसे करून त्याचे नाव ठेवतात. 'ही तुझी आई', 'हे तुझे बाबा' असे नाते संबंधाचे संस्कार त्याच्यावर टाकतात. थोडा मोठा झाल्यावर, 'तू शाळा शिकला पाहिजे, मोठा होऊन पैसे कमविले पाहिजेत' असे वळण त्याला लावतात. पुढे तारुण्यात त्याला सांगतात, 'तू लग्न कर'. हा देखील पाहतो की त्याचे शेजारी, मित्र, नातेवाईक तसेच करीत आले आहेत. त्यामुळे त्या तरुण मुलाची अशी पक्की समज होते की 'हे असेच असते. असेच करावे लागते'. म्हणून तोही तसेच वागतो आणि त्याचे संसारबंधन दृढ होत जाते. तो आयुष्यभर सुख–दुःखांचा भोग घेतो. जगातील लोक त्याला आपल्यासारखेच बनवतात.

त्याला प्राप्त होणारे सुख हे फसवे सुख असते. ते सुख बहुकाल टिकणारे नसते. ते सुख शुद्ध सुख नाही. ते दुःख मिश्रित सुख आहे. पुढे म्हातारपणी हात–पाय दुखायला

लागतात. डोळ्यांनी नीट दिसत नाही, कानाने ऐकू येत नाही. शरीरातील शक्ती कमी होते.

शरीर जर्जर होते. शरीर सोडायचे आहे हे नक्की. पण कोणाला वाटते का मरावे? कोणालाही वाटत नाही. तुम्ही जरी या देहाचा हट्ट धरून बसलात, 'मी देह सोडणार नाही' असा आग्रह धरून बसलात, तरी ज्याचा देह आहे तो हा देह घेऊन जाईलच. हा देह काळाचा आहे, यमाचा आहे. कोणत्याही क्षणाला मृत्यू मनुष्यावर झडप घालतो. यमदूत अचानकपणे मनुष्याचा जीव घेऊन जातात. 'बायकोची नीट व्यवस्था केली का? इस्टेटीची कागदपत्रे तयार केलीत का?' असे कोणतेही प्रश्न तो विचारत नाही. तो अचानकपणे ठोका देतो आणि शरीरातला जीव काढून नेतो.

स्थूल शरीर हे गू-मूताचे बनलेले आहे. ते मांस, रक्त, हाडे यांचा चिखल आहे. कातडीचा पापुद्रा काढला तर आतमध्ये असंख्य जंतू आहेत. एवढेच काय कातडीवरच्या एक चौरस इंच क्षेत्रफळावर अंदाजे एक लाख सूक्ष्म जंतू असतात. ते डोळ्यांनी दिसत नाहीत. असा अत्यंत घाणेरडा आणि दुःखकारक देह घेऊन मनुष्य फिरतो आहे. वरवर भासणाऱ्या सर्व सुखाच्या आत दुःखाचाच साठा लपलेला आहे. तो न कळता एक प्रकारे सर्व जगाचा त्याने छळच सुरू ठेवलेला आहे.

प्रमाण –

जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं ।
दुःख लेऊनि सुखाची आंगी । सळित जगातें ।।५०२।। अध्याय ९

– श्रीज्ञानेश्वरी

दुःखरूप असलेल्या जगात वरवर सुख दिसते. परंतु, विचार केल्यावर जगत् दुःखरूप आहे हे लक्षात येते. या विचित्र जगतापासून, पुन्हा पुन्हा मरण्यापासून नातलग आपल्याला वाचवू शकत नाहीत.

प्रमाण –

नको नको मना गुंतू मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ।।
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ।।
सोडविना बंधू पाठिची बहिण । शेजेची कामिन दूर राहे ।।
सोडविना राजा देशींचा चौधरी । आणिक सोइरी भली भली ।।
तुका म्हणे तुला सोडवीना कोणी । एका चक्रपाणिवाचूनियां ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

या जन्म-मरणाच्या चक्रातून आपल्याला कोणीही वाचवू शकत नाही. एक चक्रपाणि म्हणजे संसाररूपी चक्र ज्याच्या हाती आहे तो – म्हणजे भगवंतच वाचवेल.

स्थूलशरीरातून आत्ताच जर प्राण आणि जीव वजा केले तर काय राहते? प्रेत राहते.

खरे तर आत्ताच हा देह प्रेत आहे, मुड्दा आहे. यमाने जीव काढलेला नाही म्हणून देह चालतो–फिरतो आहे. यम प्राण, जीव वजा करणार आहे. तो सूचना न देता अचानकपणे प्राण, जीव घेऊन जातो. 'अन्न, धन, मान इत्यादी किती कमवायचे राहिले?' असे प्रश्न तो विचारत नाही.

आपल्याला पाप–पुण्य म्हणजे काय? हे माहीत नाही. धर्म–अधर्म कशाला म्हणतात? माहीत नाही. ज्याला आपण पाप–पुण्य समजतो कदाचित् ते पाप–पुण्य नव्हे.

भगवान श्रीज्ञानदेव महाराज म्हणतात, **'मी देह म्हणता ब्रह्महत्या कोटी । येऊनिया पाठी थापटती ।।'** स्वतःला देह समजले की कोटी ब्राह्मणांच्या हत्येचे पाप लागते.

मनुष्य देह भगवंताने कशासाठी दिला आहे? तर भगवान श्रीतुकाराम महाराज म्हणतात, **'जेणे तू जोडशी नारायण ।'**.

भगवंत म्हणजे काय? भगवंत कसा आहे? भगवंत कुठे आहे? मी कोण आहे? इत्यादी सर्व प्रश्नांवर विचार करण्यासाठी, ते सोडविण्यासाठी आणि पारमार्थिक अनुभव घेण्यासाठी भगवंताने मनुष्य देह दिलेला आहे.

आता परमार्थ मार्गावर प्रवास करावा कसा? त्यासाठी आपल्या समोर आदर्श पाहिजे. शास्त्र आणि सद्गुरू हे ते आदर्श होत. अनेक शास्त्र कुठून आले? तर वेदातून आलेत. वेद म्हणजे काय? 'वेद' या शब्दाचा सरळ सरळ अर्थ म्हणजे 'जाणीव'. वेद एकच आहे. परंतु, मनुष्यमात्रांना समजण्यास सुलभ व्हावा म्हणून वेदाची चार भागात विभागणी केली आहे.

जगातील विविध देशातील लोकांचे आचार–विचार यांचा अभ्यास केल्यानंतर भारत हा देश सर्वश्रेष्ठ ठरतो. अगणित संत, महात्मे, अवतार भारत भूमीवर आले व पुढेही येतील. आणखी एका कारणामुळे भारत सर्वश्रेष्ठ ठरतो. ते कारण म्हणजे 'वेद'. वेद कोणी निर्माण केला? वेद ईश्वराने निर्माण केला. ज्यावेळेस ईश्वर सृष्टी निर्माण करतो, त्याचवेळेस तो वेदांना प्रकट करतो.

वेदाची उत्पत्ती ईश्वराच्या श्वासापासून झाली आहे. श्वासोच्छवास ही क्रिया सर्वात सहज आणि निष्काम असते. कोणी मनुष्य असे म्हणताना आढळत नाही, 'हे ईश्वरा, मी श्वासोच्छवासरूपी कर्म करतो त्याचे फळ म्हणून मला अमुक वस्तू दे'. श्वासोच्छवास इतका सहज आहे की त्या क्रियेची जाणीवही बहुदा कोणाला नसते. मनुष्याचा श्वासच इतका सहज आणि निष्काम तर मग ईश्वराचा श्वास किती सहज असेल?

मनुष्यामध्ये अगणित दोष दिसून येतात. ईश्वर दोषरहित आहे. इतर लोकांना फसवण्याची इच्छा, भौतिक स्वार्थ, राग, द्वेष, काम, क्रोधादिक असंख्य विकार, स्वस्वरूपाचे अज्ञान असे अनेक दोष मनुष्यात आहेत. ते दोष ईश्वरामध्ये नाहीत आणि अशा दोषरहित ठिकाणाहून वेद प्रकट झाला आहे. जगातील प्रत्येक व्यक्तिसाठी वेद कल्याणकारकच आहे. वास्तविक पाहता सर्वांना वेद जीव की प्राण असावा. कमीतकमी जे

वैदिक आहेत त्यांना तरी वेद म्हणजे सर्वकाही असावा. दोषरहित ठिकाणाहून आलेल्या वेदात जे वाक्य आहेत त्यावर आपण अनन्य श्रद्धा ठेवून त्या वाक्यांप्रमाणे आचरण करायला हवे.

वेद आपल्याला कोणता बोध करतो? वेद हे ईश्वराचेच शब्द आहेत. वेद ही मनुष्याला ईश्वराची आज्ञा आहे. 'ब्रह्मज्ञान प्राप्त कर' ही ती 'अंतिम' आज्ञा आहे. परंतु, या आज्ञेचा अर्थ बहुसंख्य लोकांना समजणार नाही, हे जाणून ईश्वराने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण निर्माण केले. प्रत्येक वर्णाच्या मनुष्याचे आचरण कसे असावे हे वेदाने सांगितलेले आहे. 'ब्रह्मज्ञान प्राप्ती' या आज्ञेप्रमाणे मनुष्याचे चालणे व्हावे म्हणून क्रमाक्रमाने ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास या चार आश्रमांचे नियम ईश्वराने मनुष्याला घालून दिले. जो मनुष्य निष्ठेने, श्रद्धापूर्वक वेदाज्ञेप्रमाणे व्यवहार आणि परमार्थ करेल त्याला शेवटी स्वस्वरूपाचा अनुभव येऊन तो जन्म–मरणाच्या चक्रातून नेहमीसाठी मुक्त होईल.

बहुसंख्य लोक ज्यांची व्यवहार करण्याचीच प्रवृत्ती आहे, त्यांना सर्वज्ञ ईश्वराचे सांगणे आहे, 'वेद ही माझीच वाणी आहे, त्याप्रमाणे व्यवहार करशील तर तुझे कल्याण होईल'. परमार्थरूपी निवृत्तीकडे वळलेल्या लोकांना सर्वज्ञ ईश्वर म्हणतो, 'वेदोक्त पद्धतीप्रमाणे परमार्थ केला तरच तो यथार्थ ठरेल'. आता मनुष्याला असा प्रश्न पडतो, 'वेदाने अनेक क्रिया करण्यास सांगितले आहे. मग मी नेमके काय करावे?' म्हणून अवतार आणि संत यांच्या वचनांप्रमाणे आचरण करीत जावे. पुढे साधकाला श्रीगुरू प्राप्त होतील. श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणेच का वागावे? तर जगत्‌गुरू या पदावर असलेले भगवान श्रीतुकाराम महाराज म्हणतात, **'वेदांचा अर्थ तो आम्हांसी ठावा । येरांनी वाहावा भार माथा ।।'**. यामध्ये श्रीगुरूंचे वेदाचे यथार्थ ज्ञान ध्वनित होते.

परंतु, सर्व लोक शास्त्र आणि संतांच्या वचनांप्रमाणे वागतात काय? नाही. जगातील लोकांच्या आचार–विचारांच्या आधारे त्यांचे चार प्रकार पडतात. पामर, विषयी, जिज्ञासू आणि मुक्त असे ते प्रकार आहेत.

मनात येईल त्याप्रमाणे वागणे, स्वैर भोग घेणे, व्यवहार कसा करायचा हे माहीतच नाही आणि परमार्थाचा तर गंधच नाही, अशा माणसाला 'पामर' म्हणतात.

शास्त्राने सांगितल्याप्रमाणे जो विधीयुक्त भोग घेतो, ज्याच्यामध्ये सकाम भाव प्रबळ असतो, जो पूजा, अर्चा करून भौतिक पदार्थ प्राप्त करण्याच्या पाठीमागे लागलेला असतो, त्याला 'विषयी' म्हणतात.

ज्याचे भौतिक स्वार्थाकडे अल्प प्रमाणात लक्ष आहे, परमार्थ कळून घेण्यासाठी जो शास्त्राभ्यास करतो, संतांची सेवा करतो, त्याला 'जिज्ञासू' असे म्हणतात.

ज्यांना व्यवहार आणि परमार्थ यांचे कोणतेही कर्तव्य शिल्लक राहत नाही, जे वेदविधीच्या पलीकडे गेलेले आहेत, जे स्वस्वरूपात दृढपणे आणि निःसंदेहपणे प्रतिष्ठित आहेत, त्यांना 'मुक्त' म्हणतात. अशा महापुरुषांची संख्या फारच कमी असते. करोडो लोकांपैकी एखादे त्या स्थितीत असतात. त्यांचा परत कधीही कुठेही जन्म होत नाही.

★★★★★

॥ ॐ तत् सत् ॥


## चिंतन क्रमांक – २
## कर्माची मीमांसा

मनुष्य काही ना काही कर्म करताना दिसतो. तो स्थूलदेहाचे हात, पाय इत्यादी कर्मेंद्रिय व डोळे, नाक, कान इत्यादी ज्ञानेंद्रिय यांच्या सहाय्याने कर्म करतो. कर्म करण्यासाठी एवढीच सामुग्री असते काय? नाही. स्थूलदेहाच्या आतमध्ये 'सूक्ष्मदेह' आहे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे सूक्ष्मदेहाचे मुख्य अवयव आहेत. 'अमुक गोष्ट करू की नको करू?' असे संकल्प–विकल्प करणे मनाचे काम. विचार करून निर्णय देणे हे बुद्धीचे काम. चित्तामध्ये अनंत जन्मांचे संस्कार साठवलेले असतात. 'अमुक गोष्ट माझी आहे' असा अहं धरणे किंवा एखाद्या क्रियेवर अहं धरणे म्हणजे अहंकार.

कर्म कसे घडते? प्रथम 'मी अमुक गोष्ट करीन' असा संकल्प मन करते. त्यावर बुद्धी विचार करून 'तसेच कर' असा निर्णय देते. हे 'संकल्प करणे' आणि 'निर्णय देणे' याचे मूळ चित्तातले संस्कार होत. नंतर 'मी ती क्रिया करणार' असा अहं धरला जातो. म्हणून स्थूलदेहाची हालचाल करून मनुष्य त्याप्रमाणे क्रिया करतो व त्यातूनच कर्म तयार होते. कर्माची सोपी व्याख्या म्हणजे, 'हेतुपुरस्सर केलेली सूक्ष्म व स्थूल देहांची हालचाल'.

मनुष्याची कर्मे वेदांनी सांगितल्याप्रमाणे असतात काय? तर कदाचित् नाही. मनुष्याने कोणती कर्मे करावीत व कोणती कर्मे करू नयेत – असे दोन प्रकार वेदाने सांगितले आहेत. जी कर्मे करू नयेत त्यांना 'निषिद्ध कर्मे' म्हणतात. ती कर्मे मनुष्याने करूच नयेत. मदिरापान, परस्त्रीहरण, परद्रव्यहरण ही 'निषिद्ध' कर्मांची काही उदाहरणे आहेत. 'जी कर्मे करावीत' अशा वेदबोधित कर्मांना 'विहित कर्मे' म्हणतात. 'विहित कर्मे' चार प्रकारची आहेत. ती म्हणजे नित्य, नैमित्तिक, काम्य आणि प्रायश्चित्त ही होय. पूजा करणे, प्रार्थना करणे, श्लोक म्हणणे, संध्या–वंदन करणे ही रोज करायची कर्मे म्हणजे 'नित्य कर्मे' म्हणून ओळखली जातात. ग्रहण, श्राद्ध, श्रीकृष्णजन्माष्टमी या निमित्ताने जी कर्मे केली जातात ती नैमित्तिक कर्मे होत. मानाने, वयाने मोठी असलेली अथवा शास्त्रज्ञानसंपन्न व्यक्ती आपल्या घरी आल्यास त्यांचा सत्कार करणे, बसण्यास आसन देणे, त्यांना भोजन देणे ही देखील 'नैमित्तिक कर्मे' आहेत.

नित्य, नैमित्तिक कर्मे केलीत तर काय फल मिळते? नाही केलीत तर कोणते फल मिळते? नित्य, नैमित्तिक कर्मे करणाऱ्या मनुष्यास स्वर्गप्राप्ती हे फल मिळते. परंतु, त्याचा जन्म–मरणाचा फेरा चुकत नाही. पूर्वकर्मांनुसार लोकांना नित्य, नैमित्तिक कर्मे करण्याची सहजच प्रवृत्ती होते. साधकाच्या वाट्याला ही कर्मे आली तर त्याचा भाव काय असावा? स्वर्गप्राप्ती हे तर साधकाचे उद्दिष्ट नसते. साधकाच्या वाट्याला ही कर्मे आली तर त्याने त्या कर्मांच्या फळाची इच्छा न ठेवता ती कर्मे करावी.

प्रमाण –



आणि नित्यादिक जें असे । तें येणें फळत्यागें नासे ।
शिर लोटलिया जैसें । येर अंग ।।१२८।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

एखाद्या प्राण्याचे मस्तक तोडून बाजूला केले तर त्याचे बाकीचे शरीर असून नसल्यासारखे होते. त्याप्रमाणे कर्मफल त्यागाने नित्य, नैमित्तिक कर्म नष्ट होते.

काम्य कर्मे कशाला म्हणतात? 'फळ मिळावे' अशी इच्छा ठेवून कर्मे केली जातात, त्यांना 'काम्य कर्मे' म्हणतात. उदाहरणार्थ – ज्योतिष्टोम यज्ञ केल्याने स्वर्गप्राप्ती होते. श्येन यज्ञ केल्याने शत्रूचा नाश होतो. अश्वमेध यज्ञ चक्रवर्ती सम्राट होण्यासाठी केला जातो. अशा विविध प्रकारच्या कामना करून ही काम्य कर्मे केली जातात. त्याचप्रमाणे, लोकांवर भौतिक उपकार करण्यासाठी विहीर, जलाशय तयार करणे, धर्मशाळा बांधणे, विद्यालय बांधणे, अन्नछत्रे चालविणे यांनाही काम्य कर्म म्हणतात. काम्य कर्माचे फळ हे आज नाही तर उद्या मिळतेच. 'मला त्याचे फल भोगायचे नाही' असे कोणाला वाटले तरी उपयोग नाही. त्याचे फळ हे त्याला भोगावेच लागते. मुमुक्षु साधकासाठी काम्य कर्म हे घातक आहे. साधनेमध्ये काम्य कर्म ही एक प्रकारची बाधाच होय. साधकाने प्रयत्नपूर्वक काम्य कर्म करू नये.

प्रमाण –

काम्यकर्मीं हें एक । सामर्थ्य आथी स्वाभाविक ।
म्हणोनि नको कौतुक । मुमुक्षु एथ ।।१०६।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

ईश्वर नामोच्चारण, गंगास्नान, चांद्रायण व्रत इत्यादी कर्मांना 'प्रायश्चित्त कर्मे' म्हणतात. साधकाने निष्काम भावाने ही कर्मे केली तर त्याचे अंतःकरण शुद्ध होत जाते आणि ती कर्मे पुढे ज्ञानप्राप्तीच्या साधनांकडे जाण्यासाठी उपयोगी ठरतात.

नित्य, नैमित्तिक, काम्य आणि प्रायश्चित्त कर्मांची मीमांसा म्हणजे सखोल विचार केल्यानेच साधकाचा परमार्थ सुटेल असे नाही. कर्म, उपासना, योग आणि ज्ञान हे चार परमार्थांचे मार्ग प्रसिद्धच आहेत. परमार्थाच्या या चार मार्गांची संपूर्ण माहिती मिळवून कोणत्या मार्गाचे आचरण केल्याने जन्माभावरूपी मोक्ष होतो? या प्रश्नाचे उत्तर साधकाने शोधावे.

दैनंदिन व्यवहारात अनेक लोकांशी आपला संबंध येतो. समाजावर दृष्टी टाकली तर मनुष्यांच्या अवस्थेत वैचित्र्य आढळून येते. एखादा मनुष्य श्रीमंत तर दुसरा अत्यंत गरीब. त्या गरीबाने आयुष्यभर श्रीमंत व्हायचा कितीही प्रयत्न केला तरी सफल होत नाही. काही माणसे दिसायला सुंदर असून त्यांची शरीरेही सुदृढ असतात. परंतु, काही जणांना अनेक

असाध्य रोग झालेले दिसून येतात. काही जणांना व्यवहारात अल्प परिश्रम केल्याने यश प्राप्त होते. हे पाहून आस्तिक मनुष्य विचार करतो, 'ईश्वराने काहींना सुखात ठेवले आहे. तर काहींना दुःखात ठेवले आहे'. खरेतर, मनुष्याला मिळणाऱ्या सुख–दुःखांसाठी ईश्वर जबाबदार नाही. ईश्वर निःपक्ष आहे. मनुष्याने 'मी आणि माझे' अशा दृढ भावनेने केलेल्या पूर्वकर्मांमुळे त्याला सध्या चालू असलेल्या विविध कर्मांद्वारे सुख–दुःखांचे धक्के बसतात.

कर्माची उत्पत्ती ही क्रियेच्या पोटात होते. म्हणजे ज्या क्रिया केल्या जातात त्यातून कर्म तयार होते. देह आणि इंद्रियांचा वापर करून मनुष्य क्रिया करतो. जशी क्रिया तशी प्रतिक्रिया प्राप्त होते. आपण जर सोडीयम आणि क्लोरीन एकत्र मिसळले तर आपल्याला सोडीयम क्लोराईड (मीठ) मिळेल, गंधक किंवा आम्ल मिळणार नाही. एखाद्याने जर क्रिया चांगली केली तर त्याला प्रतिक्रियाही चांगली मिळेल. हे ऐकून कोणी म्हणतो, 'मी तर दररोज नियमाने पूजा करीत आलो आहे. मग माझे चांगले का होत नाही ?' हे लक्षात घ्या की क्रिया केल्यानंतर लगेचच प्रतिक्रिया येईल असे नाही. प्रत्येक प्रतिक्रियेसाठी एक विशिष्ट काळ–वेळ द्यावी लागते. भुईमूग पेरल्या पेरल्या दुसऱ्या दिवशी पिक मिळत नाही. चार महिने वाट पाहावी लागते. काही आंब्याची झाडे सहा वर्षांनी फळ देतात. गावरान आंब्याची कोय पेरल्यावर अंदाजे दहा वर्षांनी फळे लागतात. परंतु, काही क्रियांचे फळ नेमके केव्हा मिळेल हे सांगता येणे हे फार कठीण आहे.

आपण असेही पाहतो की सतत पापकर्मे करणारा मनुष्य खाऊन पिऊन सुखी आहे. त्याचे शरीरही निरोगी असते. त्या मनुष्याने पूर्वजन्मी केलेल्या पुण्यकर्माचे फळ म्हणून त्याला सुख, सुविधा प्राप्त आहेत. दुसरा एखादा मनुष्य रोज पूजा, ध्यान, जप करतो. परंतु, त्याच्यावर एकापाठोपाठ एक दुःखे कोसळत राहतात. पूर्वी केलेल्या पापाचे ते फळ आहे. अशीच संगती लावणे जास्त योग्य ठरते. कधी सुख तर कधी दुःख प्रत्येक मनुष्याच्या वाट्याला येते. पूर्वी कधीतरी केलेल्या पापाचे फळ दुःख, पुण्याचे फळ सुख आज नाही तर उद्या हे भोगावेच लागते. कोणी म्हणेल, 'पापाचे फळ मिळू नये म्हणून पुण्य करून मी दुःख येऊ देणार नाही'. पण, असे होत नसते. पुण्य उत्पन्न करून पाप क्षालन होत नाही. दोन्हींचा भोग हा त्या त्या प्रमाणात होईलच.

ध्यानीमनी नसताना अचानक सुख अथवा दुःख मिळते. कोणी सकाळी उठून शांत बसला आहे. अचानक घरातील सदस्य त्याला शिवी देतो. रस्त्याने चालत असताना अचानक पायात काटा रूततो. कधी ठेच लागते. अशाप्रकारे, विविध प्राणी आणि पदार्थांपासून मनुष्याला सुख किंवा दुःख मिळते. परंतु, यासाठी तो स्वतःच जबाबदार आहे. परिस्थिती, माणसे, पदार्थ यांना दोष देण्यात अर्थ नाही. ते तर केवळ निमित्त होतात.

प्रामुख्याने भौतिक पदार्थांपासून सुख मिळेल या अपेक्षेने मनुष्य क्रिया करतो. त्यातूनच कर्माची उत्पत्ती होऊन तो पुढे कर्मफळाचा भोग घेतो. त्यातून सुख मिळाले तर परत सुखाच्या मागे लागून परत क्रिया करतो. दुःख मिळाले तर ती क्रिया टाळण्याचा प्रयत्न करतो. पण त्या क्रिया टाळल्याच जातील असे नाही. ही साखळी अनंत जन्मांपासून सुरू आहे.

माझे एक मित्र आहेत. ते रोज पूजा–पाठ, ध्यान इत्यादी करतात. त्यांचा स्वभाव शांत आहे. कोणाला त्रास देत नाहीत. एक दिवस ते त्यांच्या दुचाकी वाहनाने पुणे शहरातून जात होते. दुसऱ्या एका दुचाकी वाहनावर दोन मुले बसली होती. ती मुले त्यांच्या बाजूने वेगाने कट मारून पुढे निघून गेली. का माहीत नाही पण ती मुले पुढे जाऊन थांबली. त्यांनी माझ्या मित्राची गाडी थांबवली आणि माझ्या मित्राला गाडीवरून उतरायला सांगितले. त्यानंतर एकाने माझ्या मित्राच्या तोंडात दोन लगावून दिल्या. त्या मुलांशी माझ्या मित्राचा काहीही संबंध नव्हता. मित्राने त्यांना कोणत्याही प्रकारे कधीही त्रास दिलेला नव्हता. सत्त्वगुणी मनुष्याला अशी वागणूक का मिळावी ? मी यावर खूप विचार केला. कदाचित् माझ्या मित्राने पूर्वी कधीतरी केलेल्या पापकर्माचे फळ मिळण्याची तशी वेळ आलेली होती. म्हणूनच तसे घडले. ती अनोळखी मुले केवळ निमित्त झाली होती. कदाचित् ओव्हरटेक करणे किंवा चुकून नजरानजर होणे हे निमित्तकारणही या ठिकाणी असू शकेल. परंतु, प्रमुखकारण पूर्व पाप हेच धरणे योग्य आहे.

पूर्व पूर्व क्रियांच्या प्रतिक्रिया उत्तर उत्तर योग्य काळात सुख–दुःखरूपात मिळतात. हा न्यायच या ठिकाणी जास्त योग्य वाटतो.

क्रियेचे मूळ काय ? 'अमुक क्रिया करावी' असे मनुष्य आणि मनुष्येतर प्राण्यांना का वाटते ? पूर्व संस्कार हे क्रियेचे मूळ आहे. पूर्वी अनुभवलेल्या विषयांची छाप अंतःकरणात उमटते. त्याला संस्कार म्हणतात. जिलेबीचा संस्कार चित्तात असेल तर जिलेबी पाहिल्याबरोबर 'ही जिलेबी' असे मनुष्य ओळखेल आणि जिलेबी खाण्याची त्याला इच्छा होईल. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांना अंतःकरणे म्हणतात. अंतःकरणे म्हणजे आतली इंद्रिये. ही चार अंतःकरणे सूक्ष्मदेहाचे अवयव आहेत. हे अवयव डोळ्यांनी दिसत नाहीत. व्यवहारात मनुष्य जे करतो, पाहतो, ऐकतो, ज्याचा विचार करतो त्या सर्व अनुभवाचे ज्ञान सूक्ष्म रूपात 'चित्त' नावाच्या अवयवामध्ये साठत राहते. धान्य अथवा अन्य पदार्थ साठविण्यासाठी गोदामांचा उपयोग होतो. त्याप्रमाणेच चित्तरूपी गोदामामध्ये अनंत जन्मांचे असंख्य संस्कार साठलेले असतात. कुत्रा, मांजर, मनुष्य इत्यादी लक्षावधी योनीतून जीवाचे असंख्य जन्म होतात. जीव प्रत्येक क्षणाला संस्कार गोळा करीत राहतो. चित्तातून जे संस्कार व्यक्त होतात त्यांचा पाठपुरावा मन, बुद्धी आणि अहंकार करतात. ते सर्व प्राण, ज्ञानेंद्रिय आणि कर्मेंद्रियांना चालना देतात आणि देहाची हालचाल होऊन क्रिया घडते. क्रियेतून कर्म होते आणि कर्मांमुळे संस्कार दृढ होत जातात. कर्मफळ अनुकूल वाटले तर त्याच क्रिया परत परत कराव्याशा वाटतात. प्रतिकूल वाटले तर त्या क्रिया नकोशा होतात. मनुष्य मेल्यानंतर तो संस्काराचे गाठोडे दुसऱ्या देहात घेऊन जातो. अशाप्रकारे, चित्तात साठलेल्या संस्कारांमुळे जीव असंख्य वेळा वेगवेगळे देह घेत राहतो व त्या त्या देहात त्या संस्कारांप्रमाणे भोग भोगतो.

संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण अशा तीन प्रकारेही शास्त्राने कर्माचे वर्गीकरण केलेले आहे. चौऱ्यांशी लक्ष योनींमध्ये केवळ मनुष्य देहातच कर्म करण्याचा अधिकार प्राप्त

आहे. इतर योनींमध्ये केवळ कर्माचा भोग होतो. गाढव, कुत्रा, मुंगी इत्यादी मनुष्येतर योनीमध्ये तमोगुणाच्या अधिक्यामुळे विचारशक्ति अत्यंत मंद असते. त्यामुळे भगवंताचा विचार करणे त्यांच्यासाठी अशक्यच होय. खाणे, पिणे, प्रजनन, देहरक्षण यापलीकडे त्यांची बुद्धी काम करत नाही. काम, क्रोधादिक विकार त्यांच्यामध्येही आढळतात.

अनंत मनुष्यजन्मात जी असंख्य कर्मे केलेली आहेत, त्या सर्व कर्मांच्या संस्काराचा साठा जो चित्तात आहे, त्याला 'संचित कर्म' म्हणतात. अफाट अशा संचितातून सध्या प्राप्त झालेल्या देहात ज्या कर्मांचा भोग सुरू आहे आणि देह असे पर्यंत होणार आहे, त्याला 'प्रारब्ध कर्म' म्हणतात. अज्ञानी मनुष्य प्रारब्ध कर्माचा भोग तर घेतोच आणि सोबत नवे अनुभवही गोळा करतो, त्याला 'क्रियमाण कर्म' म्हणतात. क्रियमाण कर्माचे संस्कार चित्तात साठत जातात. म्हणजे क्रियमाणाने संचितात भर पडते. जन्मोजन्मी याप्रकारे संचिताचे गाठोडे वाढत जाते. त्या संचितातून असंख्य देह प्राप्त होऊन त्यात प्रारब्धाचा भोग होत राहतो आणि त्यातूनच क्रियमाण कर्म घडून पुढे संचितात भर पडत जाते. ही श्रृंखला अनंत जन्मांपासून सुरू आहे. जो ज्ञानमार्गाचा अवलंब करून ब्रह्मप्राप्ती करतो, केवळ त्याच मनुष्याचे संचित कर्म नष्ट होते आणि मग त्याचा कुठेही कधीही जन्म होत नाही.

समजा, एका गोदामात धान्याची हजारो पोती साठवलेली आहेत. याला संचिताच्या ठिकाणी समजावे. गोदामातून काही पोती बाहेर काढून त्यातील धान्य विकले. याला प्रारब्धाच्या ठिकाणी घ्यावे. विकलेल्या पैश्यातून पुन्हा बाहेरगावाहून काही पोती धान्य आणून गोदामात जमा केली याला क्रियमाण समजावे. क्रियमाणाची भर संचितात पडते व संचितातून प्रारब्ध येते. प्रारब्धातून पुन्हा क्रियमाण तयार होते. हा खेळ असाच सुरू राहतो. काही कारणाने गोदामाला आग लागली तर गोदामातील सर्व धान्य संपूर्णपणे जळून जाईल. फक्त बाहेर दुकानात विक्रीसाठी काढलेले धान्य शिल्लक राहील. त्याप्रमाणेच, ब्रह्मज्ञानरूपी अग्नीने संचित भस्म होते व फक्त प्रारब्ध शिल्लक राहते.

अज्ञानी जीवाला कर्माचे फल भोगावेच लागणार, असा संकल्प ईश्वराचाच आहे. 'केलेल्या कर्माचे फळ मला मिळू नये' अशी कितीही इच्छा मनुष्याने केली तरी त्याचा काही उपयोग नाही. प्रारब्ध कर्म भोगूनच संपते. फलाची इच्छा ठेऊन कर्म केले अथवा फलेच्छारहित कर्म केले तरी कर्मफळाचा भोग निश्चितपणे होतोच. जो मनुष्य फलाची इच्छा न ठेवता कर्म करतो त्याचे अंतःकरण शुद्ध होत जाते. तो पवित्र होत जातो. पुढे शास्त्र, सद्गुरूंच्या कृपेने तो कर्मबंधनातून मुक्त होतो. जो मनुष्य सकाम भाव ठेऊन शुभ कर्म करतो त्याला स्वर्गप्राप्ती होते. परंतु, त्याचा पुनर्जन्म टळत नाही. स्वर्गभोग संपल्यावर त्याला पुन्हा मृत्युलोकांत यावेच लागते. परंतु, पुढील जन्म मनुष्याचाच होईल का नाही ते सांगता येत नाही.

प्रारब्ध भोगावेच लागते, असे असले तरी त्यामागे एक सूक्ष्म सिद्धांत आहे. प्रारब्धाच्या अल्प अंशामध्ये पुरुष प्रयत्नाने फेरबदल करता येतो. मनुष्याने सत्संग केला तर वाईट वासनांचे अंकुर नष्ट होतात आणि परमार्थास पोषक संस्कार दृढ होतात. परंतु,

प्रारब्धाचा बहुतांश भाग भोगून अथवा त्यागूनच संपतो. म्हणून, शहाण्या मनुष्याने, 'परमार्थ माझ्या नशीबातच नाही. मला जमणारंच नाही' असा विचार करून निष्क्रिय बसून राहू नये.

साधकासाठी प्रारब्धाचे आणखी सूक्ष्म विवेचन करणे कल्याणकारक ठरेल. प्रारब्धाचे तीन भाग असतात. इच्छा, अनिच्छा आणि परेच्छा. यांचे प्रमाण प्रत्येकी ३३.३३ टक्के असते. तिघांची बेरीज १०० टक्के येते.

अनिच्छा प्रारब्ध हे भोगावेच लागते. अचानकपणे एखाद्या संकटात सापडणे, रस्त्याने चालत असताना शेणात पाय पडणे, झोपण्याची इच्छा असताना झोपच न येणे इत्यादी अनिच्छा प्रारब्धाची अनेक उदाहरणे सांगता येतील.

इच्छा प्रारब्धाचा उपयोग अनेक इच्छा पूर्ण करण्यासाठी करता येतो. साधारण माणसाला इच्छा प्रारब्धाचा उपयोग व्यवहारातील विविध इच्छा पूर्ण करण्यासाठी करता येतो. उदाहरणार्थ – पदवी प्राप्त करणे, नोकरी मिळविणे, मनोरंजन करणे इत्यादी. तसेच, साधकाला परमार्थात गती होण्यासाठी इच्छा प्रारब्धाचा उपयोग करता येतो. नामस्मरण करणे, शास्त्रांचा अभ्यास करणे, श्रवण, मननादि साधन करणे हे इच्छा प्रारब्धाने करता येते.

परेच्छा म्हणजे दुसऱ्याची इच्छा. संसारामध्ये संसारातील लोकांच्या इच्छेप्रमाणे वागावे लागते. संसारातील लोक एकमेकांना संसारासाठी पोषक ठरतात. संसारातील बराचसा भाग हा परेच्छेवर अवलंबून आहे. जर आपण सद्गुरूंच्या सानिध्यात राहू तर त्यांची इच्छा आपल्यासाठी परेच्छा असल्याने आपले कल्याण होते. कारण सद्गुरू सदैव साधकाचा उद्धार व्हावा अशी इच्छा ठेवतात. साधकाने परेच्छा प्रारब्धाचा उपयोग करून सद्गुरूंच्या आज्ञेप्रमाणे वागावे. सद्गुरू चालवतील त्याप्रमाणे चालावे. अशाप्रकारे, इच्छा आणि परेच्छा मिळून ६६.६६ टक्के प्रारब्धाची दिशा परमार्थाकडे वळवावी. मग उरलेल्या ३३.३३ टक्के अनिच्छा प्रारब्धात काही होवो, डळमळू नये.

**आकृती क्रमांक १** मध्ये कर्माची विभागणी दाखवलेली आहे.

जन्म–मरण अभावरूपी मोक्ष हा कर्माने होत नाही. असा मोक्ष ज्ञानानेच होतो. फक्त कर्म करीत राहिल्यानेच कर्मबंधनातून सुटका होत नाही. मग ते कर्म कितीही श्रेष्ठ असले तरीही तसे होत नाही. मनुष्य जन्म हा जीवन्मुक्त स्थितीत प्रतिष्ठित होण्यासाठी मिळालेला आहे. ज्ञानमार्गातील शास्त्र आणि सद्गुरू यांचे सहाय्य मनुष्याने घेतले तर ती स्थिती प्राप्त होते.




**आकृती क्रमांक १ – कर्माचे वर्गीकरण**

अज्ञानी मनुष्याची कर्मगती आकृती क्रमांक २ मध्ये दाखवलेली आहे. अज्ञानी मनुष्याचे संसारबंधन कायम राहण्याचे कारण म्हणजे संचित शिल्लक असते व त्यात क्रियमाणाची भर पडत राहते. अनंत जन्म देण्याचे सामर्थ्य संचितात आहे. भवबंधनातून मुक्त होण्यासाठी संचित कर्म नष्ट होणे गरजेचे आहे. कर्म, उपासना आणि योग या उपायांनी संचित नष्ट होत नाही.




आकृती क्रमांक २ – अज्ञानी मनुष्याची कर्मगती

भगवान श्रीव्यास, भगवान श्री आद्य शंकराचार्य, भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज यांच्या परंपरेप्रमाणे 'ज्ञान' या उपायाने भवबंधनाचे खंडन होते. संचित राहत नाही. ज्ञानमार्ग पूर्वापार चालत आला आहे आणि पुढेही राहिल. जीवन्मुक्त महापुरुषांचा अनुभव हे ब्रह्मज्ञानाचे श्रेष्ठ प्रमाण आहे. याज्ञवल्क्य, उद्दालक, शुकदेव, राजा जनक, राम–कृष्णादि दशावतार, अष्टावक्र, वामदेव हे काही अनुभवी महापुरुष होत. ब्रह्मसूत्रे, श्रीमद्भगवद्गीता आणि दहा उपनिषदे हे ग्रंथ ज्ञानमार्गाचे प्रतिपादक आहेत. ब्रह्मज्ञानाचे प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रास 'वेदांतशास्त्र' असे म्हणतात.

ब्रह्मज्ञानी महापुरुषांना जीवन्मुक्त म्हणतात. त्यांना संचित नसते आणि क्रियमाणाची बाधा होत नाही. त्यांचा देह प्रारब्धाने हालतो. संचित कर्मबीजेच जळून गेल्यामुळे त्यांचा परत जन्म होत नाही. 'मी देह आणि त्यांचे धर्म नाही. चराचर सृष्टीत व्यापलेले आणि त्याही पलीकडे निर्गुण, निराकार ब्रह्म मी आहे' असा निःसंदेह आणि दृढ बोध जीवन्मुक्त महापुरुषांचा असतो. क्रियमाण कर्माचे फळ जीवन्मुक्तांना लागत नाही. **आकृती क्रमांक ३** पहा.




आकृती क्रमांक ३ – जीवन्मुक्त महापुरुषांची कर्मगती

जे लोक जीवन्मुक्त महापुरुषांना शरण राहून त्यांची सेवा करतात, त्यांना जीवन्मुक्तांच्या शुभ क्रियमाण कर्मांचे फळ मिळते आणि जे लोक जीवन्मुक्तांची निंदा करतात, त्यांना जीवन्मुक्तांच्या अशुभ क्रियमाण कर्मांचे फळ भोगावे लागते.

आतापर्यंत आपण मनुष्याची सद्यस्थिती आणि त्याच्या जीवनाचा उद्देश काय असावा ते थोडक्यात पाहिले. त्याचप्रमाणे, कर्म मीमांसा करून अज्ञानी आणि जीवन्मुक्त महापुरुषांच्या कर्मगतीचा अभ्यास केला. पुढे आपण शास्त्रविचार, परमार्थाचे विविध मार्ग, जीवन्मुक्त स्थिती प्राप्त करण्यासाठी साधकाला कोणती सामग्री लागते इत्यादींचा अभ्यास करणार आहोत.

★★★★★

## चिंतन क्रमांक – ३
## शास्त्राचा विस्तार

मनुष्य संसार चक्रात का अडकलेला आहे? तो शरीराला मी समजतो आणि आवडणाऱ्या गोष्टीला 'माझे' म्हणतो म्हणून. जेव्हा तुम्ही श्रवण करण्यासाठी येथे आलात, तेव्हा शरीराला 'मी' समजून 'मी येथे आलो' असा तुमचा भाव होता आणि आताही आहे. आपण म्हणतो 'हे घर माझे आहे', 'ही जमीन माझी आहे'. संत सांगतात, 'सब भूमी गोपाल की'. 'अमुक स्त्री माझी बायको आहे' अशी एखादा ओळख करून देतो. ज्या ठिकाणी अनेक वर्षे नोकरी करतो त्या जागेला पण आपण 'माझे' म्हणतो. अशारितीने अनेक पदार्थांना आपण 'माझे माझे' म्हणतो. 'मी' आणि 'माझे' अशी भावना ठेवणे व्यवहारात जरी योग्य वाटत असले तरी परमार्थात येऊन सखोल विचार करू लागल्यास ते चुकीचे आहे हे लक्षात येते.

प्रमाण –

**मुक्त होतां परि बळें झाला बद्ध । घेउनिया छंद माझें माझें ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

एक दिवस यम ठोका देऊन आपल्याला देहापासून वेगळे करेल. मग हे 'मी' आणि 'माझे' राहणार नाहीत. 'मी' आणि 'माझे' ही समज केवळ मनुष्य देहातच राहत नसून कुत्रा, मांजर इत्यादी योनीतही तशीच आढळते. पशुपक्षांच्या योनीत, 'आपण कोणत्या देहांत आलो आहोत' याचे ज्ञानही त्यांना नसते. प्रामुख्याने अन्नासाठी भटकत राहणे आणि प्रजनन करणे यापलीकडे त्यांना समज नसते. ते केवळ जगतात. या योनी पाप–योनी म्हणून ओळखल्या जातात. उदाहरणार्थ – कुत्र्यांचा व्यवहार कसा होतो याचा विचार केला की कुत्र्याची योनी ही पाप योनी आहे असे लक्षात येते. कुत्रा हा द्विधा मनःस्थितीत असतो. गाड्यांची रहदारी असणारा रस्ता ओलांडताना कुत्र्याला, 'इकडे जाऊ की तिकडे जाऊ?' असा प्रश्न पडतो आणि एखाद्या गाडीखाली सापडून तो केविलवाण्या मरणाला प्राप्त होतो. 'हे करू की ते करू' अशी मनःस्थिती ज्या मनुष्याची कायमच राहते, त्याला पुढे कुत्र्याचा जन्म मिळण्याची शक्यता जास्त असते. बऱ्याच लोकांची अशी अवस्था नेहमी असते.

समजा, एखादा श्रीमंत मनुष्य मेला. त्याला कुत्र्याचा जन्म मिळून, तो पूर्वजन्मीच्या घरात गेला. आता तेथील लोक, 'तू आमचा आहेस. तूच हे घर बांधले होते' असे म्हणतील काय? नाही. कारण त्याची ओळख त्यांना असणार नाही आणि याला त्यांची ओळख राहणार नाही. कदाचित् तेथील लोकांची 'हाड –हाड' त्याला नको असतानाही सहन करावी लागेल. काही दुर्दैवी माणसांना स्वतःच कमविलेल्या संपत्तीमध्ये, या जन्मातच अशी 'हाड –हाड'

सहन करावी लागते. विचार केला तर लक्षात येते की जगामध्ये आपले काहीही नाही. मानलेच तर एका जन्मापुरतेच आहे. परंतु, आपण दृढपणे माझे माझे म्हणत राहतो व अडकत जातो. असे करू नये. सावध व्हावे.



पाप–पुण्य समसमान असेल तर मनुष्य देह मिळतो. हा देह मिळणे फार दुर्लभ आहे. त्यातही पुण्य थोडेसे अधिक व पाप थोडे न्यून असेल तर पुरुष देह मिळतो. पुण्य थोडे न्यून व पाप थोडे अधिक असेल तर स्त्री देह प्राप्त होतो. देह कुठलाही असो, हा विचार करण्याचा अधिकार तर नक्कीच सर्वांना आहे. म्हणून सर्वांनी हा विचार करावा.

पृथ्वीवर मनुष्य देहात पुण्य संपादन करून मृत्यूनंतर स्वर्गलोकी जाणाऱ्या जीवाला देवशरीर मिळते. पुण्यवान असलेल्या देवांची तेथील विषयसुख भोगण्यामध्ये प्रवृत्ती दिसते. म्हणून त्यांचे परमार्थाकडे लक्ष जात नाही. हा विचार ते करू शकत नाही. मनुष्यदेहातच हा विचार करता येतो. इतर देहात करता येत नाही. म्हणून मनुष्यदेह सर्वश्रेष्ठ आहे.

मनुष्य काबाड–कष्ट करून संपत्ती जमवतो, असलेली संपत्ती वाढवतो, टिकवतो. पण पुढे तो जर्जर झाल्यानंतर, मरण्याच्या आत ती संपत्ती त्याची मुले, आप्त मंडळी घेण्याचा प्रयत्न करतात. मग त्याची संमती असो अथवा नसो. नाहीतर तो मेल्यावर संपत्तीसाठी नको ते वाद होतात. प्रसंगी एकमेकांच्या जीवावरही हे लोक उठतात. आयुष्यभर, 'ही माझी मुले', 'ही माझी नातवंडं', 'ही माझी संपत्ती' इत्यादी आवश्यक वाटणाऱ्या आणि आवश्यक नसलेल्याही ओझ्याखाली मनुष्य दबतो. मग शरीर जर्जर झाल्याने तेही आठवण करून देते की मी पण तुझेच आहे, मला पण माझे म्हण. अरे! साधका! तुझ्या देहासह कुठलेही बाह्य पदार्थ हे तुझे नाहीतच. हे तू निःसंदेहपणे कळून घे. 'अहं' आणि 'मम' म्हणजे 'मी' आणि 'माझे' यांचा विचारांद्वारे प्रयत्नपूर्वक अंतःकरणातून त्याग कर. तसाच दृढ निश्चय कर.

विषयात सुख आहे असे समजून मनुष्य बाह्य पदार्थांच्या मागे लागतो. बाह्य पदार्थात सुख नाही असे नाही. तसे असते तर त्यांच्यापाठीमागे कोणी धावलाच नसता. ते दुःख–मिश्रित सुख असते. परंतु, त्यांचे मिश्रण सहजपणे लक्षात येत नाही. तसेच, ते सुख काही काळच टिकते. साधूसंतांच्या सांगण्याप्रमाणे एखाद्याने जर परमार्थ सिद्ध केला तर त्याला दुःखसंबंधरहित, निरंतर सुख मिळेल. परंतु, साधारणपणे मनुष्याची प्रवृत्ती, 'माझ्या मनात येईल त्याप्रमाणेच वागेन' अशी असते आणि साधूसंतांची वचने ऐकण्याची प्रवृत्ती नसते. अनेक वेळा नको नको त्या दुःखाला प्राप्त होऊनही मनुष्याच्या वागण्यात असे वैचित्र्य का आढळते? त्याचे कारण म्हणजे सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या कमी–अधिक मिश्रणाने त्याचा देह बनलेला आहे.

खरेतर, मुंगीपासून ते ब्रह्मदेवापर्यंत विविध योनींत तीन गुणांचाच खेळ आहे. मनुष्याच्या बाबतीत विचार करायचा ठरल्यास सोप्या पद्धतीने सांगायचे तर चांगले वागणे, बोलणे, खाणे इत्यादी ज्याचे असते त्याला सात्त्विक मनुष्य म्हणतात. सात्त्विक माणसांची संख्या जगात कमी आढळते. रजोगुणी मनुष्य हा दिवस–रात्र व्यवहारात मग्न राहून अन्न, धन आणि मान कमवण्याच्या प्रयत्नात असतो. चांगले वागणे, बोलणे, खाणे इत्यादींवर तो जास्त

लक्ष देत नाही. राजसी माणसांचा भरणा जगात प्रचंड प्रमाणात पाहायला मिळतो. निषिद्ध कर्म करीत राहणे, तसेच जास्त काळ आळस आणि झोप घेण्यात ज्याचा वेळ जातो तो मनुष्य तामसी असतो. अशा प्रकारच्या लोकांची संख्याही फारच कमी असते.

जो सात्त्विक असतो त्याच्यामध्ये रजोगुण आणि तमोगुण नसतातच असे नाही. त्याच्यामध्ये रजोगुण आणि तमोगुण हे अल्प प्रमाणात असतात. एका विशिष्ट परिस्थितीत त्याच्यातील रजोगुण आणि तमोगुण यांचा उद्रेक होऊ शकतो. जो राजसी असतो त्याच्यामध्ये सत्त्वगुण आणि तमोगुण हे नसतातच असे नाही. त्याच्यामध्ये सत्त्वगुण आणि तमोगुण हे अल्प प्रमाणात असतात. त्याच्यातीलही सत्त्वगुण आणि तमोगुण यांचा स्फोट होऊ शकतो. तसेच, जो तामसी असतो त्याच्यामध्ये सत्त्वगुण आणि रजोगुण नसतातच असे नाही. त्याच्यामध्ये सत्त्वगुण आणि रजोगुण हे अल्प प्रमाणात असतात. त्याच्यातील सत्त्वगुण आणि रजोगुण हे सुद्धा उफाळून येऊ शकतात. परंतु, अल्प प्रमाणात असलेल्या गुणांचा उद्रेक हा जास्त काळ टिकणारा नसतो. प्रामुख्याने असलेल्या गुणातच ती व्यक्ती जास्त काळ जगताना दिसते.

सत्त्वगुणी मनुष्यामध्ये अंदाजे ८० टक्के सत्त्वगुण, १५ टक्के रजोगुण आणि ५ टक्के तमोगुण असतो. रजोगुणी मनुष्यामध्ये ८० टक्के रजोगुण, १५ टक्के सत्त्वगुण आणि ५ टक्के तमोगुण असे मिश्रण असू शकते. त्याचप्रमाणे, तमोगुणी मनुष्यामध्ये ८० टक्के तमोगुण, १५ टक्के रजोगुण आणि ५ टक्के सत्त्वगुण असे एकत्रीकरण असू शकते. हे प्रमाण थोडे फार बदलेल पण तीन गुणांची बेरीज ही १०० टक्के येते. ही टक्केवारी फक्त विषय समजण्यासाठी आपण गृहीत धरलेली आहे.

**आकृती क्रमांक ४** मध्ये या तिन्ही प्रकारच्या मनुष्यांच्या गुणांचे प्रमाण दाखवलेले आहे.




आकृती क्रमांक ४ – सत्त्वगुणी मनुष्यातील त्रिगुणांचे प्रमाण

सात्त्विक मनुष्याचे आचरण कसे असते? 'देवाची पूजा करणारा, मानसिक, बौद्धिक आणि शारीरिक बल वाढेल असे मधुर, सुपक्व, सकस व ताजे अन्न खाणारा, फलाची इच्छा सोडून कर्म करणारा' – असा त्याचा व्यवहार असतो. नित्य स्नानादि करून

शुचित्व पाळणे, सरळपणा, प्राण्यांची हिंसा न करणे इत्यादी चांगल्या वागण्यातून एक प्रकारे त्याचे शारीरिक तप घडते. तो खरे बोलतो. परंतु, मनुष्यांना दुःख होईल असे बोलत नाही. तो मनाची स्वच्छता, सर्वांचे भले व्हावे अशी भावना ठेवतो. त्याच्या अंतःकरणात निष्कपटता असते. दान देण्यास ज्या व्यक्ती योग्य आहेत त्यांना प्रत्युपकाराची अपेक्षा न ठेवता दान देतो. तो वेदविहीत नित्य कर्म आदरपूर्वक करतो.

राजसी मनुष्य यक्ष, राक्षस यांची पूजा करतो. त्याला कडू, तिखट, आंबट, फार उष्ण, रुक्ष असे दुःख आणि रोग निर्माण करणारे अन्न सहजच आवडते. 'मी धार्मिक आहे' असे लोकांना कळावे या उद्देशाने आणि मृत्यूनंतर स्वर्गातील भोग मिळविण्याच्या लालसेने तो यज्ञ करतो. लोकांनी आपल्याला मान द्यावा, आपल्याला प्रणाम करावा, आपली पूजा करावी या उद्देशाने तो तप करतो. समोरच्या व्यक्तीला दान दिले तर तो पुढे माझ्या कामाला येईल, असा विचार करून मोठ्या कष्टाने दान देतो. वेदोक्त नित्यकर्मांसंबंधी त्याला माहिती जरी असली तरी ती कर्मे करणे क्लेशकारक आहेत, या भीतीने तो नित्य कर्मांचा कंटाळा करतो अथवा त्यागच करतो.

तामसी मनुष्य भूत, प्रेतांची पूजा करतो. शिळे, उष्टे, करपलेले, व्यवस्थित न शिजलेले, जे माणसांनी खाऊ नये असेही अन्न तो बिनधास्त खातो. जारण, मारण, उच्चाटन या प्रकारच्या अघोरी क्रिया करून इतर लोकांना त्रास देणे, त्यांचा विनाश करणे अशी त्याची प्रवृत्ती असते. तो मूर्ख लोक, चोर यांना दान देतो. परंतु, कोणी 'सत्पात्र' असले तर त्यांना त्यांचा तिरस्कार करून दान देतो. नित्यकर्म चित्त शुद्ध करणारे आहे याचेच अज्ञान त्याला असल्याकारणाने ते कर्म करण्याची त्याची प्रवृत्ती होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

मनुष्याचे असे व्यवहार वैचित्र्य जाणूनही शेवटी 'मनुष्याच्या हितासाठी काय योग्य आहे ?' हा प्रश्न राहतोच. श्रीमद्भगवद्गीतेत भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला बोध करतात,

प्रमाण –

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ।।२४।। अध्याय १६**

– श्रीमद्भगवद्गीता

काय करावे आणि काय करू नये हे ठरविण्यासाठी शास्त्रच मनुष्याला प्रमाण आहे. शास्त्र मनुष्यासाठी परम हितकारक आहेत. म्हणून शास्त्राप्रमाणेच मनुष्याने आचरण करायला हवे. शास्त्र जे सोडायला सांगते त्याचा त्याग करावा. एखाद्याला राज्य तृणाप्रमाणे मानण्यास सांगितले तर ते तृणवत मानावे. एवढेच नव्हे तर विष घे म्हटले तरी त्या विषाचाही स्वीकार करावा. इतकी प्रबळ वेदनिष्ठा एखाद्याची झाल्यास कुठल्याही प्रकारचे अनिष्ट त्याच्या पदरी पडणार नाही.

प्रमाण –



शास्त्र म्हणेल जे सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।
जें घेववी तें न म्हणावें । विषही विरुद्ध ।।४६०।।
ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।
तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ।।४६१।। अध्याय १६

– श्रीज्ञानेश्वरी

परंतु, शास्त्रग्रंथ कोणते? त्या ग्रंथांचे कर्ते कोण? कोणते शास्त्र मनुष्याच्या उद्धारासाठी योग्य आहे? असे अनेक प्रश्न निर्माण होतात.

'वेद' हे सर्वश्रेष्ठ प्रमाण मनुष्यासाठी आहे. वेदांवर आधारीत शेकडो शास्त्र ग्रंथ आहेत आणि त्याप्रमाणे साधना करणारे करोडो साधक आहेत. वेद सर्वज्ञ ईश्वराने निर्माण केला आहे. साधारण मनुष्याच्या मलिन बुद्धीतून वेद तयार झालेला नाही. म्हणून वेदाला 'अपौरुषेय' म्हणतात. वेद प्रमाणरूप आहे म्हणजेच अत्यंत विश्वसनीय आहे. व्यवहार आणि परमार्थ मनुष्याने कसा करावा याचे प्रतिपादन करणाऱ्या व ईश्वराचे मनोगत असलेल्या 'शब्दराशी' म्हणजेच वेद होय.

खरेतर, एकच असलेला वेद मनुष्यास समजायला सुलभ व्हावा म्हणून लिखित रूपात वेदाचे चार भाग करण्यात आले. ते म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे होत. प्रत्येक भागाचे आणखी चार विभाग करण्यात आले आहेत. ते म्हणजे संहिता, ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषद् हे होय. वेदातील एक अक्षर काय, अर्धे अक्षर काय, एक टिंब देखील मागेपुढे करण्याचा अधिकार कोणालाही नाही. त्याचप्रमाणे वेदाचे पठण करताना विशिष्ट प्रकारचे उच्चार आणि स्वरांतील उतार–चढाव असणे अपेक्षित असते. तसेच, वेदातील शब्दांचा योग्य अर्थही कळायला हवा. वेदातील शब्दांचे उच्चार योग्य व्हावेत व शब्दार्थ नीट कळावेत यासाठी वेदाची सहा अंगे–शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष ही आहेत. यांचे ज्ञान नसल्यास वैदिक कर्म सदोष होतात. त्यामुळे अनर्थ होऊ शकतो.

शिक्षा या वेदांगात स्वरांचे विभाग दिलेले आहेत. प्रत्येक विभागात कोणते सूर असतात याची माहिती त्यात आहे. शब्दांचा उच्चार करतांना मान हालवणे, अडखळणे, अस्पष्ट उच्चार इत्यादी दोष यात सांगितले आहेत.

कल्प या वेदांगात यज्ञामध्ये ऋत्विजांची कामे कोणती व त्यांनी कोणते मंत्र म्हणायचे यासंबंधी माहिती आहे.

व्याकरण या वेदांगाने वाक्याचा अर्थ जाणण्यास मदत होते. पाणिनी मुनींनी व्याकरणावर अष्टाध्यायी हे शिर्षक असलेला ग्रंथ रचला आहे.

निरुक्त या वेदांगात वेदातील एका शब्दाचा जो अर्थ आहे तोच अर्थ असणारे पर्यायी शब्द कोणते याची माहिती आहे. निरुक्त या वेदांगाचा प्रतिनिधी श्री आचार्य यास्क यांचा निरुक्त हा ग्रंथ आहे.

वेदातील कर्मानुष्ठान विधिपूर्वक होण्यासाठी छंद या वेदांगाचा अभ्यास हवा. वेदांतील मंत्र छंदबद्ध असतात आणि त्यांना वृत्त असते. गायत्री, वृष्णिक, अनुष्टुप इत्यादी सात वृत्ते आहेत. पिंगल मुनी यांनी 'छंदोनिवृत्ती' हा अष्टाध्यायी ग्रंथ रचलेला आहे.

ज्योतिष या वेदांगात कोणती कर्मे किती काळ करावीत, केव्हा आरंभावीत याची माहिती आहे. त्यासाठी ऋतू, नक्षत्रांची स्थाने, ग्रहांची गती, ग्रहणे यांचे ज्ञान आवश्यक आहे. ते या वेदांगात आहे. आदित्य मुनी आणि गर्ग मुनींनी ज्योतिषावर ग्रंथ रचले आहेत. **आकृती क्रमांक ५ पहा.**




आकृती क्रमांक ५ – वेद आणि आस्तिक शास्त्रे

वेगवेगळ्या स्वभावाची भावंडे त्यांच्या आईच्या दृष्टीने सारखीच असतात. वेद आईसारखे आहे. सात्त्विक, राजसी अथवा तामसी अशा सर्वच प्रकारच्या मनुष्याने शास्त्रांचे अनुसरण येन केन प्रकारेण करावे व उद्धाराच्या दिशेने पुढे जावे हे वेदाचे प्रयोजन आहे. तिन्ही प्रकारची प्रवृत्ती असणाऱ्यांना वेद बोध करतो. जो मनुष्य सात्त्विक आहे त्याला कर्म,

उपासना, योग आणि ज्ञानाचा बोध करतो. जो मनुष्य राजसी आहे त्याला विहीर–तलाव खोदणे, अन्नछत्र चालविणे इत्यादींनी स्वर्गप्राप्तीचा मार्ग दाखवितो. तामसी मनुष्याला वेद म्हणतो, 'अन्यायपूर्वक शत्रूला मारू नको. विधीवत् श्येन यज्ञ करशील तर शत्रूचा नाश होईल'. शेवटी निवृत्तीकडे म्हणजे उद्धाराकडे घेऊन जाणे हेच वेदाचे मनोगत आहे. राजसी आणि तामसी लोकांनी विधीवत् वेदानुरूप कर्मानुष्ठान केले तर त्यांचे अंतःकरण शुद्ध होत जाईल व पुढे तेही परमार्थाकडे वळतील.



प्रामुख्याने व्यवहारच सांगणारे चार उपवेद आहेत. आयुर्वेद, धनुर्वेद, गंधर्ववेद आणि अर्थवेद हे चार उपवेद आहेत. शरीराला जडलेल्या व्याधींची प्रामुख्याने औषध सेवनाने निवृत्ती हा विषय आयुर्वेदात आहे. अश्विनीकुमार, धन्वंतरी, चरक, सुश्रुत, वाग्भट इत्यादी आयुर्वेदाचे प्रवर्तक आहेत. क्षत्रियांसाठी धनुर्वेद हा उपवेद आहे. विश्वामित्र ऋषींनी तो रचला असून त्यात चार पाद आहेत. शस्त्रे आणि अस्त्रे चालविण्याची माहिती या उपवेदात आहे. भारत मुनींनी गंधर्ववेद प्रकट केला. गीत, स्वर, नृत्य, ताल इत्यादींचे सविस्तर वर्णन त्यात आहे. धनप्राप्तीचे उपाय अर्थवेद या उपवेदात सांगितले आहेत. व्यवहारात पैसा हा मुख्य मानला जातो. पैसा असेल तर इतर अनेक पदार्थ विकत घेऊन त्यांचा संग्रह करता येतो. अर्थवेदात अर्थप्राप्तीचे अनेक उपाय सांगितले आहेत. त्यापैकी एक म्हणजे नीतीशास्त्र. राजा, मंत्री, सैन्य आणि प्रजा यांचे योग्य आचरण कसे असावे व आपापसातील संबंध याविषयी नियम नीतिशास्त्रात आढळतात. नीतिशास्त्रावर आचार्य चाणक्य यांनी ग्रंथ लिहिला आहे. राजा भर्तृहरीकृत नीतिशास्त्रावरील शंभर श्लोकही प्रसिद्ध आहेत. नीतिशास्त्राप्रमाणे चालणारा मनुष्य देवाला मानेलच असे नाही.

उपलब्ध असलेल्या १८ पुराणांतील मजकूर जो अस्तव्यस्त झालेला होता, त्याला भगवान श्रीव्यासांनी संदर्भ आणि विषयांनुसार व्यवस्थित रचला. विष्णू, शिव, भागवत इत्यादी अठरा पुराणांमध्ये देवाला नाव व रूप आहे असे मानून त्यांची उपासना करण्यास सांगितले आहे. विष्णू, शंकर, देवी, गणपती आणि सूर्य यांची उपासना प्रामुख्याने केली जाते. चिंतन करून उपास्य देवतेजवळ जाऊन अखंड तेलाच्या धारेप्रमाणे उपास्य देवतेकडेच बहुकाल लक्ष लावणे, याला उपासना असे म्हणतात. हृदयात देवता प्रतिष्ठित आहे अशी कल्पना करून उपासना केली जाते. तसेच, वैदिक मंत्रांनी प्राणप्रतिष्ठा केलेल्या प्रतिमा, दगड अथवा धातूच्या मूर्तिकडे पाहातही उपासना करतात. उपास्य देवतेबद्दल निष्काम, अत्यंत प्रेम म्हणजे द्वैत–भक्ती. त्यामुळे उपास्य देवतेचे चिंतन व ध्यान करणे सहज होते. उपासना करणाऱ्याला उपासक म्हणतात. उपास्य देवतेविषयी प्रेमभावाच्या तीव्रतेनुसार उपासकाला मृत्यूनंतर चार मुक्तींपैकी एक मुक्ती मिळते. सार्ष्टि, सारूप्य, सामीप्य आणि सालोक्य या उपासकाच्या चार मुक्ती आहेत. उपास्य देवतेचे प्रमुख कार्य सोडून बाकीचे उपास्य देवतेचे सर्व ऐश्वर्य प्राप्त होणे म्हणजे सार्ष्टि मुक्ती होय. उदाहरणार्थ – श्रीब्रह्मदेवाच्या किंवा श्रीविष्णूच्या उपासकाला जगाची उत्पत्ती, स्थिती इत्यादी सोडून बाकीचे त्यांचे सर्व ऐश्वर्य प्राप्त होणे म्हणजे सार्ष्टि मुक्ती होय. उपास्य देवतेच्या रूपाची

प्राप्ती झाली तर त्यास सारूप्य मुक्ती म्हणतात. देवतेच्या सतत जवळ राहण्यास मिळाले तर

त्यास सामीप्य मुक्ती म्हणतात आणि उपास्य देवतेच्या लोकांत एक सदस्य म्हणून राहणे म्हणजे सालोक्य मुक्ती होय. उदाहरणार्थ – श्रीविष्णूच्या उपासकाला वैकुंठलोक आणि श्रीशंकराच्या उपासकाला कैलासलोक प्राप्त होतो. उपासनेने जन्ममरणाचा फेरा टळत नाही. ज्याप्रमाणे पृथ्वीवरचे पदार्थ सतत बदलत असतात म्हणजे अनित्य आणि नाशवंत आहेत, त्याप्रमाणेच वैकुंठ, कैलास इत्यादी लोकही अनित्य आहेत. उपासकाने काही काळ वरील एखादी मुक्ती भोगल्यावर परत त्याचा जन्म पृथ्वीवर होतोच. तो जन्म मनुष्याचाच मिळेल असे नाही. पशुपक्षांचाही जन्म मिळू शकतो. ज्ञानमार्गाचा अवलंब करून ब्रह्मज्ञानप्राप्तीनेच जन्म–मरण चक्र खंडित होते.

आतापर्यंत आपण चार वेद, सहा वेदांगे, चार उपवेद आणि अठरा पुराणांचे प्रयोजन थोडक्यात पाहिले. आता धर्मशास्त्र कशाला म्हणतात ते जाणून घेऊ. धर्मशास्त्राला 'स्मृती' असेही म्हणतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चातुर्वर्णीयांची तसेच ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी या चतुराश्रमीयांची शारीरिक, वाचिक आणि मानसिक कर्मे कशी असावीत याचे प्रतिपादन धर्मशास्त्रात आहे. चार वर्ण ईश्वराने निर्माण केलेले आहेत. माणसात स्वभावतःच असलेल्या त्रिगुणांच्या प्रमाणांचा प्रभाव व त्याप्रमाणे होणारे कर्म यांच्या आधारावर तशी रचना करण्यात आलेली आहे.

प्रमाण –

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परन्तप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ।।४१।। अध्याय १८**

– श्रीमद्भगवद्गीता

ज्याच्यात सत्त्वगुण प्रमुख असून जो इंद्रियनिग्रह करतो, शुचित्व पाळतो व शास्त्राभ्यास करतो, त्याला ब्राह्मण म्हणावे. ज्याच्यात रजोगुण प्रमुख असून जो शूर, तेजस्वी व आश्रितांचे पालनपोषण करतो, त्याला क्षत्रिय म्हणावे. अधिक रजोगुण आणि कमी प्रमाणात तमोगुण असून जो शेती, व्यवसाय असा व्यवहार करतो, त्याला वैश्य म्हणावे. शूद्रवर्णियांमध्ये तमोगुण प्रमुख असून कमी प्रमाणात रजोगुण असतो. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांची सेवा करणे हा त्याचा सहज स्वभाव असतो. या चार वर्णांचे लोक नाहीत असा एकही देश या जगात नाही. मनु, याज्ञवल्क्य, आपस्तंब, पराशर इत्यादी अनेक सर्वज्ञ मुनींनी स्मृती ग्रंथाची रचना केली आहे. रामायण आणि महाभारत हे देखील स्मृतीग्रंथ आहेत.

जो मनुष्य वरीलप्रकारे प्राप्त असलेल्या वर्णाश्रमाप्रमाणे 'मला प्राप्त झालेले कर्म करणे माझे कर्तव्य आहे' असे समजून, निष्ठेने कर्माचरण करतो त्याचे चित्त शुद्ध होऊन त्याची परमार्थात गती होते.

अनेक श्रेष्ठ मुनींनी वेदांचा सखोल अभ्यास व चिंतन करून तत्त्वदर्शन मांडले आहे.

दर्शन सहा आहेत. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा यांना

षट्दर्शन म्हणतात. प्रत्येक दर्शनात चार गोष्टींचा प्रामुख्याने विचार करण्यात आला आहे. 'तत्त्व कशाला म्हणावे?', 'जगत् कसे आहे?', 'बंध म्हणजे काय?', 'मोक्ष कशाने मिळतो?' ही सहा शास्त्रे वेदाला मानतात, म्हणून त्यांना आस्तिक शास्त्रे म्हणतात. जी शास्त्रे वेद मानत नाहीत, त्यांना नास्तिक म्हणतात. मग त्यांनी ईश्वर मानो अथवा न मानो.

न्यायशास्त्राचे कर्ते गौतम मुनी आहेत. न्यायदर्शनात सात पदार्थ, चोवीस गुण व एकवीस दुःखे मानण्यात आलेली आहेत. एकवीस दुःखांच्या नाशाला ते मोक्ष म्हणतात.

कणाद मुनी हे वैशेषिक दर्शनाचे प्रणेते आहेत. पूर्वी दोन अणु होते. त्यांच्या संयोगातून तीन अणु होऊन पुढे क्रमाने अनेक अणु झाले व अशाप्रकारे जगातील सर्व पदार्थ झाले आहेत, असे ते मानतात.

सांख्यदर्शन कपिल मुनींचे आहे. त्यांच्या मते तत्त्वाला पुरुष असे म्हणतात व पुरुष अनेक आहेत. सत्त्व, रज, तम या त्रिगुणांच्या साम्य अवस्थेला प्रकृती म्हणतात. ते पंचवीस पदार्थ मानतात. ते ईश्वराला मानत नाहीत.

योगशास्त्र पतंजलि मुनींचे आहे. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा आणि समाधी अशा आठ पायऱ्या चढल्यावर योग्याला निर्विकल्प समाधी लागते. ज्ञानमार्गातील निर्विकल्प समाधी व योगमार्गातील निर्विकल्प समाधी यांत खरेतर फरक आहे. परंतु, साधारणपणे दोन्ही एकच आहेत अशी चुकीची समज साधकांमध्ये आढळते. योगशास्त्रानेही जन्म–मरणाचे चक्र खंडित होत नाही. योग्याला देखील पुनरावृत्ती असते.

पूर्वमीमांसा हे दर्शन जैमिनी मुनींचे आहे. पाप–पुण्यामुळे अनुक्रमे दुःख–सुख होते. नित्य, नैमित्तिक, प्रायश्चित्त कर्मे विधिवत् करावीत आणि निषिद्ध कर्मे करू नये असे त्यांचे मत आहे. याप्रमाणे कर्मानुष्ठान करणाऱ्याला कर्मठ असे म्हणतात. त्यांना स्वर्ग प्राप्ती होऊन तेथील भोग ते भोगतात. परंतु, स्वर्ग प्राप्ती होऊन देवशरीर प्राप्त झाल्यावर पुण्यकर्माचा भोग संपेपर्यंतच स्वर्गात राहता येते. कर्मभोग संपला की जीवाचा स्वर्गातून परत पृथ्वीवर चौऱ्यांशी लक्ष योनींपैकी एका योनीत जन्म होतो. म्हणजेच कर्मठ देखील जन्म–मृत्यूच्या फेऱ्यातून बाहेर निघत नाही. अनेकांना तशी इच्छाही दिसत नाही. उलट पुन्हा पुन्हा जन्म घेण्याची इच्छा दिसते. सहावे दर्शन म्हणजे उत्तरमीमांसा. उत्तरमीमांसा म्हणजे वेदांतशास्त्र. भगवान श्रीबादरायण व्यास यांनी ब्रह्मसूत्रांची रचना केली आहे. या ग्रंथात ५५५ सूत्रे चार अध्यायात विभागण्यात आली आहेत. देहासह सर्व सृष्टी मिथ्या असून एक निर्गुण, निराकार, क्रियारहित ब्रह्मच सत्य आहे – हा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे.

जन्म–मृत्यूच्या फेऱ्यातून बाहेर निघण्याची इच्छा असणाऱ्या साधकासाठी एकमेव वेदांतशास्त्रच ग्राह्य आहे. ज्या साधकाला वेदांतशास्त्राच्या सिद्धांताची अनुभूती होईल त्याचाच जन्म–मृत्यूचा फेरा चुकतो. जिवंत असतानाच ब्रह्मज्ञानाने मुक्तीचा निश्चय झाला म्हणजे 'जीवन्मुक्ति' या स्थितीचा निर्णय लागतो.

*****

## चिंतन क्रमांक – ४
## ब्रह्माचे स्वरूप

प्रत्येक वेदाचे संहिता, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद असे चार विभाग आहेत. उपनिषदे ही वेदाच्या शेवटी येतात म्हणून त्या भागाला वेदांत म्हणतात. उपनिषदांमध्ये ब्रह्मविद्या सांगितली आहे. प्रामुख्याने दहा उपनिषदांमध्ये ब्रह्मविद्येचे प्रतिपादन आहे. भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी दहा उपनिषदे, श्रीमद्‌भगवद्‌गीता आणि ब्रह्मसूत्रे यांवर भाष्य लिहिले आहे. **आकृती क्रमांक ६** पहा. ज्ञानमार्गातील संस्कृत जाणणाऱ्या साधकांसाठी ते अत्यंत योग्य असे उपकारक ग्रंथ आहेत.




आकृती क्रमांक ६ – भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी रचलेले प्रस्थानत्रय भाष्य (संस्कृत भाषेत)

दहा उपनिषदे, श्रीमद्‌भगवद्‌गीता आणि ब्रह्मसूत्रे ही वेदांतशास्त्राची प्रस्थानत्रयी आहे. 'प्रस्थान' म्हणजे 'प्रवास सुरू करणे' आणि 'त्रय' म्हणजे तीन. साधकाला जीवन्मुक्तिच्या प्रगतीपथावर नेणे हे प्रस्थानत्रयीचे प्रयोजन आहे. साधकाने वेदांतशास्त्राचा स्वीकार करून त्याप्रमाणे साधनांचा अवलंब करावा.

प्रथम आपल्याला वेदांतशास्त्राचे अनुभवी, पुरस्कर्ते व बोध करणारे अवतारी महापुरुष कोण हे माहिती पाहिजे. भगवान श्रीव्यास, भगवान श्री आद्य शंकराचार्य, भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज, भगवान श्रीनिवृत्तीनाथ, भगवान श्रीतुकाराम महाराज, भगवान श्रीएकनाथ महाराज, भगवान श्रीनामदेवराय हे त्यांपैकी आहेत.

भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांनी रचलेले श्रीअमृतानुभव, श्रीचांगदेव पासष्टी व श्रीज्ञानेश्वरी हे ग्रंथ मराठी भाषेतील प्रस्थानत्रयीच आहेत. मराठी भाषिकांसाठी अत्यंत उपकारक असे हे ग्रंथ आहेत. **आकृती क्रमांक ७** पहा. त्याप्रमाणेच, भगवान श्रीतुकाराम महाराज आणि इतर अवतार महापुरुषांनी रचलेल्या ग्रंथांचा अभ्यासही साधकाने करावा.

मराठी भाषेतील प्रस्थानत्रय



| श्रीज्ञानेश्वरी (९०३५ ओव्या) | श्रीचांगदेव पासष्टी (६५ ओव्या) | श्रीअमृतानुभव (८०७ ओव्या) |
|---|---|---|

आकृती क्रमांक ७ – भगवान श्री संत ज्ञानेदव महाराजांनी रचलेले प्रस्थानत्रय (मराठी भाषेत)

भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांनी आपली परंपरा भगवान श्रीव्यासांकडून पुढे भगवान श्री आद्य शंकराचार्य यांच्याद्वारे आपल्याकडे आली आहे असे ध्वनित केले आहे.

प्रमाण –

तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट पुसतु ।
अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ।।१७२२।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

वेदांतशास्त्राचा प्रतिपाद्य विषय ब्रह्मचैतन्य हा आहे. मनुष्यासह सर्व सृष्टी ही ब्रह्मरूप आहे. हा अनुभव मनुष्यदेहातच येतो. मनुष्य साक्षात ब्रह्म आहे. परंतु, तो तसे मानत नाही. याचे कारण असे की त्याला स्वतःच्या ब्रह्मस्वरूपाविषयी अज्ञान आहे. अज्ञान, अविद्या, भ्रम, अध्यास हे एकार्थवाचक शब्द आहेत. या भ्रमामुळेच व्यवहारात मनुष्य स्वतःविषयी 'मी ब्राह्मणवर्णीय आहे', 'मी ब्रह्मचारी आहे', 'या घराचा मी कर्ता आहे', 'बायको, पोरे, धन, संपत्ती माझी आहे', 'मी गोरा आहे', 'मी क्रोधिष्ट आहे', 'मी दयाळू आहे', 'मी दुःखी आहे' इत्यादी पक्की समजूत करून घेतो. अनंत जन्मांमध्ये व्यवहारात आणि कर्म, उपासना, योग या क्रियात्मक परमार्थातच डोके खुपसून राहिल्यामुळे मनुष्याची अशी ही दयनीय अवस्था झालेली आहे. खरे काय आहे? 'मी ब्रह्म आहे' अशी अनुभूती असणे हेच खरे आहे. यासाठी भगवान श्रीव्यास, भगवान श्री आद्य शंकराचार्य, भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज इत्यादी थोर महात्म्यांना शरण राहून वेदांतशास्त्राचे अनुशीलन करणे हे साधकाचे कर्तव्य आहे. असे केल्यानेच त्याचे भले होईल. मग, साहजिकच प्रश्न येतात की, 'ब्रह्म म्हणजे काय?', 'ते कसे असते?' ब्रह्म हा शब्द उपनिषदांत अनेक ठिकाणी आलेला आहे. ब्रह्म या शब्दाचा सरळ सरळ अर्थ म्हणजे 'व्यापक'. सर्व सृष्टी ब्रह्मरूप आहे.

प्रमाण –

सर्वं खल्विदं ब्रह्म । ३–१४–१

– छान्दोग्य उपनिषद

प्रमाण –



**विठ्ठल जळीं स्थळीं भरला। ठाव कोठें नाहीं उरला।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

ब्रह्म अखंड आहे. ब्रह्मात खंड नाही. म्हणजे तुकडे नाहीत. ब्रह्मस्वरूपात कोणताही भेद नाही. ब्रह्म स्वगत, सजातीय आणि विजातीय भेदरहित आहे. एका बहरलेल्या झाडाचे उदाहरण घेऊ. बुंधा, फांद्या, पाने, फुले, फळे हे झाडाचे अवयव आहेत, याला 'स्वगत भेद' म्हणतात. ब्रह्माला अवयव नाहीत. म्हणून ब्रह्मात स्वगत भेद नाही. आंब्याचे झाड आणि संत्र्याचे झाड घेतले तर त्यात 'झाड' ही जाती समान असली तरी दोन झाडांमध्ये भेद आहे, याला 'सजातीय भेद' म्हणतात. ब्रह्माच्या जातीचा दुसरा पदार्थ नसल्यामुळे त्यात सजातीय भेद संभवत नाही. दगड आणि झाड हे भिन्न जातीचे पदार्थ असल्यामुळे त्यांच्यात 'विजातीय भेद' आहे. चैतन्य एकच आहे आणि ते म्हणजे ब्रह्म. खरेतर, ब्रह्माशिवाय दुसऱ्या जातीचा पदार्थ नाही. ज्याला आपण ब्रह्मापेक्षा वेगळे असे 'जगत्' समजतो, ते 'जगत्' नसून खरे ब्रह्मच आहे. म्हणून ब्रह्मात विजातीय भेद नाही. अशाप्रकारे, ब्रह्माच्या जातीचा किंवा तदभिन्न दुसऱ्या जातीचा पदार्थच नसल्यामुळे ब्रह्म सजातीय, विजातीय भेदरहित आहे.

त्याचप्रमाणे, ब्रह्म हे देश, काल, पदार्थ भेदरहित आहे. देश म्हणजे जागा. घरामध्ये बैठकीची खोली हा एक देश आहे आणि स्वयंपाकघर हा दुसरा देश आहे. पंढरपूर हा एक देश आहे, आळंदी हा दुसरा देश आहे. मनुष्याच्या दृष्टीने देशा–देशात भेद आहे. देशभेद हा मर्यादा रेषा आखून निर्माण केला जातो. ब्रह्म हे अमर्यादित आहे. अमुक देश सात्त्विक आहे किंवा तामसिक आहे ही मनुष्याची कल्पना आहे. देश–देश असा भेद केला की हे पूर्व, पश्चिम इत्यादी दहा दिशा येतातच. परंतु, ब्रह्म हे सर्वत्र व्याप्त आहे, अपरिछिन्न आहे, म्हणून देशभेद नाही. ब्रह्मात कालभेद नाही. व्यवहार साध्य करण्यासाठी वार, महिने, वर्ष यांची विभागणी केली आहे. भूत, वर्तमान, भविष्य अशी काळाची विभागणी करून मनुष्य मागचे काहीतरी आठवत राहतो आणि भविष्यात मी हे करीन, ते करीन अशी योजना बनवित राहतो. 'अमुक दिवशी, अमुक देवस्थानात पूजा केल्याने पुण्य लाभते', 'मी सोमवारी उपवास करतो', 'अमुक वर्षी मी सेवानिवृत्त होणार', मनुष्याचा असा हा व्यवहार 'काळ' खरा आहे असे समजून चालतो. केवळ ब्रह्मच अशी वस्तू आहे जी भूत, वर्तमान, भविष्य काळात बदलत नाही. ब्रह्म त्रिकालाबाधित आहे.

ब्रह्मात पदार्थभेद नाही. आयुष्यभरात मनुष्य पुष्कळ पदार्थांचा संग्रह करतो. ते पदार्थ उपयोगात येतील हे कारण असते. पदार्थांना वेगवेगळा आकार, रंग आणि वजन असते. पदार्थांना खरे समजल्यामुळे मनुष्य पदार्थांवर आसक्त होतो. पदार्थभ्रमाची व्याप्ती फार मोठी आहे. अनंत जन्मांपासून गटांगळ्या खाण्याचे प्रमुख कारण म्हणजे 'पदार्थ माझे आहेत' असे समजणे. ब्रह्म सर्वत्र असल्यामुळे एका पदार्थात आहे आणि दुसऱ्या पदार्थात नाही असे होऊ शकत नाही. ब्रह्मात पदार्थभेद नाही.

ब्रह्म हे सच्चिदानंदस्वरूप आहे. ब्रह्म 'सत्'रूप आहे. 'सत्'चा सरळ अर्थ म्हणजे 'असणे'. केवळ ब्रह्मच असे आहे की जे तिन्ही काळी समान असते. व्यवहारात मनुष्य सरपंच, संस्थेचा अध्यक्ष किंवा कोण्या कार्यालयात अधिकारी अशी पदे मिळवण्यासाठी धडपड करीत असतो. ते पद जरी मिळाले तरी काही काळ राहते. सत्तेच्या पाठीमागे लागलेल्या मनुष्याला असत्तेची भीती असते. याप्रमाणे ब्रह्म नाही. ब्रह्माची सत्ता तिन्ही काळात आहे.



ब्रह्म चित्स्वरूप आहे. चित् म्हणजे ज्ञान अथवा जाणणे. समजा एखादा मनुष्य घट (कलश) बघत आहे. त्याचा असा ठाम निश्चय असतो की 'मी माझ्या डोळ्याने घट पाहिला'. हा भ्रम आहे. डोळा पाहू शकत नाही. कान, नाक, डोळे इत्यादी पाच ज्ञानेंद्रिये जड आहेत. त्याचप्रमाणे मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे देखील जड आहेत. त्यांना ब्रह्म चैतन्याचा टेका असल्यामुळे 'जाणणे' होते. एकमेव ब्रह्म ज्ञानस्वरूप आहे.

ब्रह्म आनंदरूप आहे. खाद्य पदार्थ, त्याचप्रमाणे स्त्री, पुत्र यात मनुष्य आनंद मानतो. हा फार मोठा भ्रम आहे. कारण विषयांत आनंद नसतो. एखाद्या मनुष्याला जिलेबी आवडते, त्याने जर जिलेबी यथेच्छ खाल्ली तर तो त्यास अनुकूल पदार्थ असल्यामुळे, तो मनुष्य काही काळ अंतर्मुख होतो व त्याच्या आतमध्ये आत्मस्वरूपानंदाचे भान होते. आगीत तूप टाकल्यावर अग्नी आणखी तीव्र होतो. त्याप्रमाणे विषयभोग भोगीत राहिल्याने मनुष्याचे भवबंधन कायम राहते. विषयभोगाने रोग आणि त्यामुळे दुःख होते. परंतु, ब्रह्मात दुःख अजीबात नाही. दुःखसंबंधरहित सुखरूप असे एकमेव ब्रह्मच आहे.

ब्रह्म हे जन्मरहित आहे. ब्रह्म नित्य आहे म्हणजे सर्वकाळी आहे. ब्रह्माला जन्म नसल्यामुळे मृत्यूचा प्रश्न नाही. ब्रह्म अनादी अनंत आहे. मनुष्याच्या स्थूलशरीराचे धर्म – काळा, गोरा, ठेंगणा, ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी असंख्य आहेत. परंतु, ब्रह्माला कोणताही धर्म नाही. काम, क्रोध, मोह, दया, जन्म, मृत्यू इत्यादी धर्म देहाचे आहेत. ब्रह्माचे नाहीत.

सृष्टीच्या पातळीवर आणि त्याच्याही पलीकडल्या चैतन्याला 'ब्रह्म' ही संज्ञा आहे. जेव्हा आपण एका जीवाचा विचार करतो, तेव्हा मनुष्य, कुत्रा, झाड, दगड या पातळीवर चैतन्याला 'आत्मा' असे म्हणतात. आत्मा आणि ब्रह्म एकच आहे. आत्मा अनेक नाहीत. जीव हा जीव नसून ब्रह्मच आहे. समजा, कोणी काचेची रिकामी घागर समुद्रात पूर्णपणे बुडवून ठेवली. समुद्रात पाणी आहे आणि घागरीतही पाणी आहे. त्याचप्रमाणे एकच ब्रह्म सर्व जीवांमध्ये व्याप्त आहे. परंतु, मनुष्य स्वतःला ब्रह्म न समजता कर्ता–भोक्ता समजतो, हा त्याचा भ्रम आहे. स्वस्वरूपाचे अज्ञान असल्यामुळे तो स्वतःला तसे समजतो.

प्रमाण –

**देहातील अहंकार अन् मी संसारी, कर्ता, भोक्ता ।**
**अरे! तू तर आहेस फक्त ह्यांचा द्रष्टा ।।१।।**
**न मिळो न मिसळती, बघ एकही लक्षण ।**

अरे! तू आत्मा नित्यच बघ याहून भिन्न ।।२।।
लक्षण तूज ब्रह्माचे असे सत्, चित्, आनंद ।
पडाल अयोगी तर रहाल दंग ।।३।।
ब्रह्म सत्य, अन् तू ही ज्ञानी सत्य ।
अरे! तूच आहेस परमानंदरूप प्रत्यक्ष ।।४।।
हा जड, दुःखरूप षड्विकारी देह ।
आहेस तू तर असंबंधी शुद्ध ब्रह्म ।।५।।
दीप अनाप म्हणे सद्गुरु ज्ञानदेव वचन ।
देतो तुज पवित्र श्रीमद्भागवत प्रमाण ।।६।। अभंग क्रमांक ६

– पंचविवेक

ब्रह्म हे कसे आहे याचे वर्णन शास्त्रात करण्यात आले आहे. म्हणून शास्त्राचा अभ्यास करणे गरजेचे आहे. तसेच, शास्त्राचा विस्तार कसा आहे हे पाहणे महत्त्वाचे आहे. धर्मशास्त्रीय ग्रंथकर्ते व पुराणांची रचना करणारे भगवान श्रीव्यास हे वेदांना प्रमाण मानतात. त्याचप्रमाणे सहा दर्शनांचे कर्तेही वेदांना मानतात. या सर्व शास्त्रांना 'आस्तिक' शास्त्रे म्हणतात. वेदांना न मानणारी प्रमुख सहा शास्त्रे आहेत. ती म्हणजे – चार्वाक, चार बौद्ध मते – माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक, वैभाषिक आणि जैन ही होय. ही सहा शास्त्रे वेदांना मानत नाहीत, म्हणून त्यांना नास्तिक शास्त्रे म्हणतात. यांपैकी चार्वाक देहालाच आत्मा मानतात व खाणे, पिणे, मजा करणे यावर त्यांचा भर असतो. जगातील ९९ टक्के लोक याच वर्गात येतात. इतर शास्त्रे चार्वाकापेक्षा श्रेष्ठ आहेत. परंतु, वैदिक लोकांना नास्तिक शास्त्रे विचारात घेण्यायोग्य नाहीत. सारासार अभ्यास करण्यासाठी या शास्त्रांचा गरजेपुरताच विचार करता येऊ शकतो.

अनंत जन्मांच्या प्रवासात मनुष्य हळुहळू उद्धाराकडे वाटचाल करतो. **आकृती क्रमांक ८** हे त्याचेच रूपक चित्र आहे. प्रथम अगणित जन्मात मनुष्य खाणे, पिणे, मजा करणे यातच वेळ खर्च करतो. त्यापलीकडे त्याची बुद्धी काम करत नाही. पुढे त्याचे अंतःकरण थोडे शुद्ध झाल्यावर, बुद्धी विचार करू लागते. तो नीतिशास्त्राचे अनेक जन्म पालन करत राहतो. पुढे असंख्य जन्मात धर्मशास्त्राचे अनुशीलन करतो. त्यानंतर कर्म, उपासना आणि योग यांच्यावर तो अवलंबून राहतो. सरते शेवटी त्याला ज्ञानमार्गाचा रस्ता दाखविणारे शास्त्र किंवा ज्ञानी पुरुष भेटतात. त्यांच्या सतत सहवासाचा परिणाम म्हणून तो आता हळुहळू ज्ञानमार्गाकडे वळतो. या मार्गातील शास्त्रकृपा आणि श्रीगुरुकृपा यांच्या सहाय्याने तो जीवन्मुक्त होतो. अशाप्रकारे पामर, विषयी, जिज्ञासू आणि मुक्त असा जीवाचा प्रवास असतो.




आकृती क्रमांक ८ – मनुष्याची उध्दाराकडे वाटचाल

या प्रवासात कुठल्याही अवस्थेत जरी मनुष्य असला तरी त्याने ती अवस्था मनापासून भोगल्याने, पुढे तो त्या अवस्थेतून वरवर सरकतो. एक अवस्था प्राप्त असताना दुसऱ्या अवस्थेचा जास्त विचार न करता प्राप्त अवस्था यशस्वीपणे पूर्ण करण्याचा यथाशक्ती प्रयत्न करावा. उदाहरणार्थ – निष्काम कर्म करणाऱ्याने निष्काम कर्मावर बारकाईने लक्ष द्यावे. खाणे, पिणे, मजा करणे इत्यादींकडे आकर्षित होऊ नये. याचाच परिणाम म्हणून तो पुढील योग्य अवस्थेवर जाऊ शकतो. निष्काम आणि त्या त्या अवस्थेतील पवित्र भाव यांमुळे जीव हा भगवंताच्या कृपेला पात्र होतो. गरजेप्रमाणे अनेक रीतीने विविध रूपाने भगवंतच त्याला आशीर्वाद देतो.

ईश्वरकृपा, शास्त्रकृपा आणि श्रीगुरुकृपा अशा क्रमाने साधकाची परमार्थात गती होऊन तो सिद्ध होतो. आकृती क्रमांक ९ पहा.




आकृती क्रमांक ९ – परमार्थ सिद्धीसाठी लागणाऱ्या कृपांचा क्रम

नव्यानेच परमार्थाकडे वळलेल्या साधकाला परमार्थ म्हणजे नक्की काय? याची स्पष्ट माहिती नसते. ईश्वर कोण? जीव म्हणजे काय? ब्रह्म म्हणजे कसे असते? याबद्दल त्याला ज्ञान नसते. म्हणून तो देवाची प्रतिमा, देवाची मूर्ति, तुळशीचे झाड इत्यादींची पूजा करतो. या पदार्थांच्याद्वारे नकळतपणे तो ईश्वराचीच पूजा करतो कारण ईश्वर सर्वत्र व्याप्त आहे. ईश्वराचा अनुग्रह त्यावर होतो. त्याचे अंतःकरण शुद्ध होते. मग, तो असा विचार करतो की, 'परमार्थ म्हणजे काय हे नीट जाणण्यासाठी शास्त्र वाचले पाहिजे'. असा विचार करून तो संस्कृत, प्राकृत भाषेतील ग्रंथांचा अभ्यास सुरू करतो. उदाहरणार्थ – श्रीज्ञानेश्वरी पारायण करणे. कोणताही दोष नसलेल्या, साक्षात ब्रह्मच असलेल्या भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या शब्दांचा नुसता उच्चार करत राहिल्यानेसुध्दा साधकाचे अंतःकरण शुद्ध आणि स्थिर होते. साधकाची परमार्थातील सूक्ष्म तत्त्व समजून घेण्याची इच्छा बलवत्तर होत जाते. तो जिज्ञासू होतो. 'आपल्याला परमार्थाची वाट दाखवून कृपा करणारे श्रीगुरू कधी भेटतील?' अशी तळमळ त्याला लागते. त्या तळमळीतून साधकाला श्रीगुरू भेटतात. खरेतर, श्रीगुरूंसाठी त्याला दारोदारी फिरण्याची गरज नसते. भगवंताच्या कृपेने ते प्राप्त होतात. ते प्राप्त झाल्यावर त्यांची अनन्यभावे सेवा घडल्यावर श्रीगुरू परमार्थाचा उपदेश देऊन शिष्याला कृतार्थ करतात.

*****

## ॥ ॐ तत् सत् ॥


## चिंतन क्रमांक – ५
## सद्गुरू, शिष्य आणि वेदांतदर्शनाची साधने

परमार्थात प्रवेश होण्यासाठी साधक पात्र असावा लागतो. व्यवहारातही आपण जाणतोच की एखाद्या कार्यालयात कोण्या मनुष्याला नोकरी हवी असेल तर त्या उमेदवाराचे वय, शिक्षण, आरोग्य विशिष्ट पातळीचे असेल तरच तो नोकरीसाठी पात्र ठरतो. ज्या विद्यार्थ्याला अभियांत्रिकी महाविद्यालयात प्रवेश हवा असेल, त्याने बारावीचे शिक्षण पूर्ण करून, अभियांत्रिकी प्रवेश परीक्षाही उत्तीर्ण होणे गरजेचे असते. त्याप्रमाणेच, विवेक, वैराग्य, शम–दमादि षट्संपत्ती आणि मुमुक्षुत्व ही चार अधिकारी लक्षणे ज्या साधकात पूर्णत्वास गेलेली आहेत त्याचा वेदांतशास्त्रात सहज प्रवेश होतो. **आकृती क्रमांक १० पहा.**

'विवेक' हे साधकासाठी पहिले अधिकार लक्षण आहे. सारासार विचार करणे याला विवेक असे म्हणतात. विवेक–विचार अनेक प्रकारचे आहेत. चांगले–वाईट, धर्म–अधर्म, पाप–पुण्य, हितकारक–अहितकारक इत्यादी विचार करणे हा विवेकच आहे. वेदांतशास्त्रात विवेक म्हणजे 'आत्म कशाला म्हणायचे व अनात्म म्हणजे काय' याची स्पष्ट समज असणे. साधकाने दिवसभरात व्यवहार करीत असतानाही आत आत्म–अनात्म विवेक–विचार सतत सुरू ठेवावा. एक आत्माच नित्य असून देहासह सृष्टीतील सर्व पदार्थ अनित्य आहेत, याला विवेक म्हणतात. जे अनित्य असते त्यात सतत बदल होत असतो. जे नित्य आहे ते कधीही बदलत नाही. विवेकातूनच पुढे वैराग्य येते.

प्रमाण –

**तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता ।**
**तैं वैराग्य दवडितां । पाठी लागे ॥३९॥ अध्याय १५**

– श्रीज्ञानेश्वरी

'वैराग्य' हे दुसरे अधिकार लक्षण आहे. स्त्री, पुरुष, धन, पुत्र असे पृथ्वीवरील असंख्य भोग्य पदार्थ, त्याचप्रमाणे स्वर्गातील सर्व भोगांचा आंतरिक त्याग म्हणजे वैराग्य. पृथ्वीच्या वर आणखी सूक्ष्म लोक आहेत, त्यांना स्वर्ग म्हणतात. भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे स्वर्ग आहेत. पृथ्वीवर कमावलेल्या पुण्याच्या तीव्रतेनुसार मृत्यूनंतर मनुष्याला एखादा स्वर्ग मिळतो. परंतु, स्वर्ग देखील परिवर्तनशील असून तेथील भोग नाशिवंत आहेत. पृथ्वी आणि स्वर्गातील पदार्थ नाशिवंत आहेत, असा प्रखर 'विवेक' ज्या साधकाचा असतो, त्या विवेकातून आलेले वैराग्य हे तीव्र असते आणि हेच वैराग्य टिकून राहते. सर्वसाधारण मनुष्याचे वैराग्य जास्त काळ टिकत नाही.

त्याला दुःखाचा झटका बसला तर काही काळ वैराग्य येते. परंतु, नंतर तो पूर्ववत् व्यवहार करणे सुरू ठेवतो. लहान मुलांच्या गोष्टीत तरुण जास्त गुंतत नाहीत. कारण त्यांना तसा व्यावहारिक विवेक असतो. देवळात सहसा म्हातारेच जास्त प्रमाणात आढळतात. म्हातारा म्हणतो, 'संसारात काही खरे नाही'. तरुणांमध्ये असा विवेक नसतो. आरशासमोर उभे राहून चेहरा, केस नीट करणे यात तरुणांना गोडवा वाटतो. आयुष्यात अनेक दुःखांनी पिचल्यामुळे आणि शरीर जर्जर झाल्यामुळे संसाराचा गोडवा म्हाताऱ्यांना राहत नाही. तरी म्हातारे तरुणांना सांगत राहतात की, 'मी आयुष्यात जे काही, जसे केले, तसेच तू कर'. म्हातारा इतरांना वैराग्याच्या गोष्टी सांगत नाही. सांगितल्या तर लोक म्हणतात – 'करून करून दमला आणि देवपूजेला लागला'. आता म्हातारा तरी काय करणार? आयुष्यभर संसारच केलेला असल्यामुळे म्हाताऱ्याच्या तोंडून संसाराच्याच गोष्टी निघणार. साधूसंत मनुष्याला वैराग्याचे महत्त्व सांगतात. या वैराग्याशिवाय आपण भगवत्ज्ञानाशी तग धरू शकत नाही.

प्रमाण –

**तरी विरक्तीवांचूनि कहीं । ज्ञानासि तगणेंचि नाहीं ।**
**हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ।।३६।। अध्याय १५**

– श्रीज्ञानेश्वरी

तिसरे अधिकारी लक्षण म्हणजे शम, दम इत्यादी षटसंपत्ती म्हणजे सहा संपत्ती –शम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा आणि समाधान.

शम म्हणजे सर्व वासनांचा त्याग. वासना सूक्ष्म शरीरात असतात. वासना म्हटल्या की 'चांगल्या वासना' आणि 'वाईट वासना' या दोन्ही घ्याव्यात. परमार्थाच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या चांगल्या, वाईट सर्व वासनांचा त्याग करावा. ईश्वर, श्रीगुरूंची सेवा करणे, शास्त्राभ्यास करणे यासुद्धा वासनाच आहेत. परंतु, साधकाने यांचा त्याग करू नये. साधूंच्या संगतीत राहून चांगले, वाईट काय हे जाणून घ्यावे.

दम म्हणजे विषयांपासून इंद्रियांना परत मागे फिरवणे. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये विषयांच्या मागे धावत राहतात. आवडते रूप पाहावे, संगीत ऐकावे याप्रमाणे मनुष्य आयुष्यभर विषयांच्या पाठीमागे नको इतका धावत असतो. प्रयत्नपूर्वक इंद्रियांचा निग्रह करणे म्हणजे दम होय.

दुःख आणि सुख हे अनुक्रमे उद्वेग आणि हर्ष न होता सहन करणे म्हणजे तितिक्षा होय. दुःखच नव्हे तर सुखही सहन करण्याची शक्ती आपल्यात वाढवायला हवी. दुःख आणि सुख दोन्हीही पचायला हवेत. त्याचप्रमाणे थंड–उष्ण, मान–अपमान इत्यादी द्वंद्व सहन करण्याची ताकद म्हणजे तितिक्षा होय.




आकृती क्रमांक १० – अधिकार लक्षण

मनाने बाह्य विषयांवरील पकड सोडणे व त्यांचे चिंतन न करणे म्हणजे उपरती. मनुष्य लहान असताना चिखलात उड्या मारतो. परंतु, तारुण्यात तसे करीत नाही. कारण चिखलात उड्या मारण्याबद्दल तरुणाला उपरती होते. पूर्वी जे करीत होतो ते चुकीचे होते, असे कळले म्हणून उपरत होतो.

श्रीगुरूंच्या वचनांवर आणि शास्त्रवाक्यांवर 'हे असेच आहे' असा पक्का विश्वास म्हणजे श्रद्धा. खरेतर, श्रद्धेच्या बळावरच प्रत्येक मनुष्य जगतो. आई–मुलाचे नाते, मास्तर–विद्यार्थी इत्यादी व्यवहार श्रद्धेवरच असतात. मास्तर जे शिकवतात, त्यावर विद्यार्थ्याने श्रद्धा ठेवली तर विद्यार्जन होते.

समाधान म्हणजे चित्त स्थिरावणे, अंतःकरणाची एकाग्रता. श्रीगुरू आणि शास्त्र यांवर दृढ श्रद्धा असेल तर बहुजन्मांपासून परमार्थ करीत आलेल्या साधकाला, 'आता मी महापुरुषांच्या आश्रयाने योग्य मार्गाला लागलो' या भावनेने समाधान लाभते.

चौथे अधिकार लक्षण म्हणजे मुमुक्षुत्व. वेदांताच्या मुक्तीच्या व्याख्येप्रमाणे, 'जन्म–मरणाचा फेरा संपविणे' म्हणजे मुक्ती होय. ज्याला मुक्तीची इच्छा असते, त्याला मुमुक्षु असे म्हणतात. ज्याला जागा झाल्यापासून झोपेपर्यंत, 'जन्ममरणाचा फेरा कसा सुटेल' याचीच चिंता लागलेली असते तो श्रेष्ठ मुमुक्षु होय. मुक्त होण्याच्या या भावनेस मुमुक्षुत्व म्हणतात.

अशाप्रकारे विवेक, वैराग्य, षट्संपत्ती आणि मुमुक्षुत्व ही चार अधिकार लक्षणे ज्या साधकात आहेत तो वेदांतशास्त्राचा खरा अधिकारी आहे. परंतु, क्रमानेही एखादा ही लक्षणे अंगी बाणवू शकतो. एक टक्का जरी आत्मानात्मविवेक एखाद्यात जागृत झाला तरी तो वेदांताचा अधिकारी आहे. पुढे क्रमाक्रमाने त्याला उत्तरोत्तर लक्षणे अवगत करता येऊ शकतात.

असा अधिकार कोणाला येतो? ज्याने अनंत जन्मांपासून विधीपूर्वक वेद आणि वेदांगाचा अभ्यास करून वेदांचा सामान्य अर्थ जाणला आहे; नित्य, नैमित्तिक आणि प्रायश्चित्त कर्म निष्काम भावाने करून किंवा उपासना निष्काम भावाने करून, 'मल' आणि 'विक्षेप' हे अंतःकरणाचे दोन दोष घालविले आहेत, त्याच्यात ही चार अधिकार लक्षणे दिसून येतात. 'मल' म्हणजे 'पाप करण्याची इच्छा' आणि 'विक्षेप' म्हणजे 'अंतःकरणाची चंचलता'. मल आणि विक्षेप ज्याचा गेला आहे, तो वेदांतशास्त्राचा अधिकारी होतो. जो मुमुक्षु आहे तोच मुक्त होतो. इतरजण कोणी छान भजन म्हणू शकतात, कोणी महाराज होतात, कोणी किर्तन करतात. परंतु, त्यांच्यात मुमुक्षत्व नसले तर ते मुक्त होत नाहीत. एखाद्या साधकामध्ये वैराग्य असेलही, पण, तो मुमुक्षु असेलच असे नाही. संसाराचा केवळ कंटाळा आल्याने एखादा मुमुक्षु होणार नाही. साधकाला जन्म–मरणाच्या चक्राची भीती वाटावी. 'मृत्यूनंतर माझी काय गती होईल?' याची चिंता असावी. या फजितीची जाणीव व्हावी.

प्रमाण –

किती वेळां जन्मा यावें । नित्य व्हावें फजीत ।
म्हणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोसी ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

जन्म–मरणाच्या संसाराला घाबरलेला, अधिकार लक्षणांनी युक्त मुमुक्षु काय करतो? भर उन्हाळ्यात ज्याप्रमाणे मनुष्य उष्णतेच्या त्रासाने कासावीस होऊन पाण्याच्या डोहाकडे धाव घेतो, त्याप्रमाणे तो श्रीगुरूंकडे धाव घेतो. साधकाने ईश्वरसेवा आणि शास्त्रसेवा भरपूर केलेली असली तरी तो श्रीगुरूकृपेशिवाय मुक्त होऊ शकत नाही.

परमार्थासंबंधीचे दुराग्रह, संशय आणि चुकीच्या कल्पना श्रीगुरूकृपेने जातात. एकतर मनुष्य देह मिळणे हीच दुर्मिळ गोष्ट आहे. त्यात साधकाला सद्गुरू भेटणे ही गोष्ट त्याहून दुर्लभ आहे. खरेतर, जे केवळ ब्रह्मज्ञानाचाच उपदेश देतात, त्यांना श्रीगुरू म्हणावे. इतरांना फक्त गुरू म्हणून संबोधावे. श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ आणि दयाळू ही श्रीगुरूंची लक्षणे आहेत. श्रोत्रिय म्हणजे ज्यांना वेदाचा अर्थ योग्यपणे कळला आहे ते. फक्त वेद पाठ असणाऱ्यांना श्रोत्रिय म्हणू नये. ब्रह्मनिष्ठ म्हणजे ज्यांचे ब्रह्मज्ञान केवळ ऐकण्या–वाचण्यापुरतेच मर्यादित नसून जे स्वतःच ब्रह्मरूप आहेत ते. केवळ एका ब्रह्मावरच दृढ निष्ठा ठेवणारेच 'ब्रह्मनिष्ठ' असतात. त्यांना प्राप्त करण्यासारखे काही राहिलेले नसते. तरीपण, शिष्यांबद्दलच्या कारुण्याने ते त्यांना कळकळीने वारंवार ब्रह्मज्ञानाचा उपदेश देतात. हाच श्रीगुरूंचा दयाळूपणा आहे.

प्रमाण –

**बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणउनि ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

श्रीगुरूंची भेट होण्याआधी शिष्याने स्वतःच्या बुद्धीने, दोषांसह शास्त्राचा अभ्यास केलेला असल्याकारणाने त्याला शास्त्रवाक्यांचा योग्य अर्थ कळलेला नसतो. शास्त्रवाक्यांचा गूढार्थ परंपरेने श्रीगुरूंनाच माहीत असतो. नारदमुनींनी अनेक शास्त्रांचा अभ्यास केलेला होता. परंतु, 'मी पूर्ण नाही' अशी त्यांची भावना शिल्लक होती. आत्मज्ञान नसल्यामुळे ते दुःखी होते. ते सनत्कुमार या ब्रह्मनिष्ठ महापुरुषांना शरण गेले. त्यांनी नारदमुनींना ब्रह्मज्ञानाचा उपदेश दिला. त्या उपदेशाने नारदमुनी कृतार्थ झाले. हे आपणा सर्वांना माहीतच आहे.

ईश्वराची सेवा करण्यापेक्षाही सद्गुरूंची सेवा करणे श्रेष्ठ मानलेले आहे. ईश्वर जीवांच्या कर्माचे फळ देण्यास निमित्त होतो. परंतु, श्रीगुरू शिष्याला कर्मबंधनातून नेहमीसाठी मुक्त करतात. सत्य, अविनाशी लक्षणं असलेल्या परमात्म्याच्या प्राप्तीसाठी शिष्याने सद्गुरूंची सेवा करावी. श्रीगुरूंची सेवा कशी करावी ?

प्रमाण –

**जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा ।**
**तो स्वाधीन करीं सुभटा । वोळगोनी ।।१६६।।**
**तरी तनुमनुजीवें । चरणांसीं लागावें ।**
**आणि अगर्वतां करावें । दास्य सकळ ।।१६७।। अध्याय ४**

– श्रीज्ञानेश्वरी

क्रमाने तन, मन आणि नंतर जीव यांद्वारे शिष्याने श्रीगुरूंची सेवा करावी. प्रथम

शिष्याने स्वतःचे शरीर श्रीगुरूंच्या सेवेसाठी अर्पावे. श्रीगुरूंचे पाय चेपणे, स्नान घालणे, भोजन तयार करून वाढणे, श्रीगुरूंचे वस्त्र धुणे, आश्रम स्वच्छ ठेवणे इत्यादी श्रीगुरूसंबंधित कामे त्याने अभिमान न धरता करावीत. मग, शिष्याने स्वतःचे मन श्रीगुरूंच्या मनाशी एकरूप करण्याचा प्रयत्न करावा. त्यांचा मनोभाव जाणण्याचा प्रयत्न करावा. त्यामुळे श्रीगुरूंना काय हवे काय नको हे शिष्याला श्रीगुरूंनी वैखरी वाणीने न सांगताही कळते. श्रीगुरूंच्या मनोभावाला न चुकणे ही एक उत्कृष्ट सेवा होय. पुढे, स्वतःचा जीव श्रीगुरूंना अर्पण करण्याचा प्रयत्न करावा. आईचा जीव मुलात असतो आणि म्हणून सतत तिचे जगणे हे मुलांसाठीच असते. तसे शिष्याला श्रीगुरू जीवलग व्हावेत.



प्रमाण –

**आतां तुम्ही कृपावंत । साधुसंत जीवलग ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

शिष्याने श्रीगुरूंच्या आज्ञेत राहावे. श्रीगुरूंनी जर सांगितले, 'आश्रम झाडून काढ', तर लगेच तसे करावे. 'झाडण्याची गरज काय? नंतर झाडेन' असा कोणताही तर्क शिष्याने लढवू नये अथवा तसे बोलू नये. श्रीगुरू रागावले तर त्याबद्दल वाईट वाटून घेऊ नये. स्वतःच्या आचरणात सुधारणा करावी. श्रीगुरूंच्या रागावण्याने अनंत जन्मांतील परमार्थाला प्रतिबंधक संस्कार निष्फळ होत असतात. अहंकार गेल्याशिवाय ब्रह्मज्ञान होत नाही. श्रीगुरूंच्या सेवेत शिष्याने 'मी' आणि 'माझे' विसरावे. तन, मन आणि जीव यांच्याद्वारे श्रीगुरू सेवा केल्याने शिष्याचा 'मी' आणि 'माझे' हा भाव शिथिल होत जातो.

अशाप्रकारे, श्रीगुरूंची सेवा करीत असता अनुकूल वेळी त्यांना प्रार्थना करावी, 'हे भगवंत! माझे पारमार्थिक कल्याण कसे होईल यासंबंधी आपली आज्ञा असेल तर विचारतो'. योग्य वेळ असेल तेव्हा श्रीगुरू शिष्याला बोध करतात की, 'तू नाम–रूपधारी देह नाहीस. तू स्वतःला काळा, ठेंगणा, ब्राह्मण, गृहस्थ समजू नकोस. अंधत्व, बधिरत्व, सुखी, दुःखी, क्रोधी हे सर्व देहांचे धर्म आहेत. तू देहांचे धर्म नाहीस. तू शुद्धचैतन्य आहेस. देह 'जड' आहे. प्राण, मन, बुद्धी, अहंकार, देह यांना तू साक्षी आहेस. तुला नाम आणि रूप नाही. 'तत्त्वमसि' – तुझा आत्मा ब्रह्मच आहे. असा अनुभव तुला आला तरच जन्म–मरणाच्या चक्रातून तू सुटशील'. या श्रवणाने शिष्याला ब्रह्माचे परोक्षज्ञान होते. पुढे, या बोधाचा साक्षात प्रत्यय येण्यासाठीही श्रीगुरूंची कृपा उपयोगाला येते. श्रीगुरूकृपेने त्याला ब्रह्माचे अपरोक्षज्ञान होते.

श्रुती, स्मृती ग्रंथामध्ये तसेच प्राकृत ग्रंथांमध्ये 'ज्ञानानेच मोक्ष होतो' यासंबंधी अनेक प्रमाणं आहेत. उदाहरणार्थ – 'आत्मवेत्ता शोक आणि मोह तरून जातो', 'ब्रह्म जाणणारा ब्रह्मच होतो' इत्यादी.

श्रीगुरू शिष्याला वेदातील महावाक्याचा बोध देतात. महावाक्ये ब्रह्मबोधक आहेत, मुख्य आहेत. प्रत्येक वेदात एक महावाक्य आहे. 'तत्त्वमसि' हे महावाक्य सामवेदातील आहे.

ऋग्वेदात 'प्रज्ञानं ब्रह्म', यजुर्वेदात 'अहं ब्रह्मास्मि' आणि अथर्ववेदात 'अयमात्मा ब्रह्म' ही महावाक्ये आहेत. पुढे आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा सविस्तर अभ्यास करणार आहोत.



द्वैत म्हणजे दोन अथवा 'मी आणि तू' असा भेद. द्वैताचे दोन प्रकार आहेत – शास्त्रीय आणि अशास्त्रीय. शास्त्रीय द्वैत म्हणजे 'भगवंत वेगळा आणि मी वेगळा' असा भेद वाटणे. काम, क्रोधादिक विकारांमुळे विचार आणि आचार यातील विचित्रपणा म्हणजे अशास्त्रीय द्वैत होय. त्यागाच्या प्रक्रियेत प्रथम अशास्त्रीय द्वैताचा त्याग करून पुढे शास्त्रीय द्वैताचाही त्याग करावा. कारण भेद राहिल्याने वारंवार जन्म होतो. द्वैत अनर्थकारी आहे. परंतु, द्वैत संपविणे अतिशय कठीण आहे.

शिष्याला ब्रह्मस्वरूपाचा अनुभव येण्यासाठी साधना गरजेची आहे. दिल्लीला जायचे असल्यास विविध साधनांचा वापर करावा लागतो. तसेच, वेदांतशास्त्रामध्ये श्रवण, मनन, निदिध्यास आणि तत्–त्वम् पदार्थ शोधन या क्रमाने साधने सांगितली आहे. **आकृती क्रमांक ११** पहा. याला साधन चतुष्टय असे म्हणतात. या साधनांनी शिष्याला शब्दज्ञान, परोक्षज्ञान आणि अपरोक्षज्ञान या क्रमाने कृतार्थ होता येते. शब्दज्ञान म्हणजे 'अविद्या', 'जीव', 'ईश्वर', 'कार्य', 'कारण', 'उपाधी', 'विशेषण', 'उपलक्षण' इत्यादी वेदांतशास्त्रातील अनेक पारिभाषिक शब्दांची व्याख्या कळणे व पटणे. परोक्षज्ञान म्हणजे ऐकून आणि ग्रंथ वाचून झालेले ब्रह्माचे ज्ञान. अपरोक्षज्ञान म्हणजे ब्रह्माची अनुभूती.




आकृती क्रमांक ११ – साधन चतुष्टय

वेदांतशास्त्राचे प्रथम साधन म्हणजे श्रवण. श्रवण म्हणजे ऐकणे. काय ऐकणे? साधकाने श्रीगुरूंच्या श्रीमुखातून महावाक्याचे निरूपण ऐकणे म्हणजे श्रवण. श्रवण

घडण्याआधी शिष्याला, 'मी ब्रह्म कसा असू शकेल?' असे वाटत असते. श्रद्धापूर्वक

जीवभावाने श्रीगुरूंच्या वचनांचे श्रवण केल्यानंतर तसे वाटत नाही. श्रवण घडण्यापूर्वी साधकाला 'प्रमाण असंभावना' असते. शास्त्रवाक्यांना 'प्रमाण' असे म्हणतात. 'असंभावना' म्हणजे 'संभवच नाही' असा भाव. 'प्रमाण असंभावना' म्हणजे शास्त्रातील वाक्ये कर्मपर आहेत, उपासनापर आहेत की ब्रह्मप्रतिपादन करणारी आहेत? असे संशय साधकाला असतात. उदाहरणार्थ – वेदांतात येणारी ब्रह्मप्रतिपादन करणारी वाक्ये ब्रह्मप्रतिपादन करणारी असूच शकत नाहीत असा भाव असणे. श्रवण केल्याने हे संशय निवृत्त होतात.

जगातील बहुसंख्य लोकांना ब्रह्म आणि ब्रह्मज्ञान याबद्दल काहीच कल्पना नाही, याला अज्ञान असे म्हणतात. या अज्ञानाच्या दोन प्रमुख शक्ति आहेत. त्या शक्ति म्हणजे 'आवरण' आणि 'विक्षेप' होय. आवरण म्हणजे वेष्टन. आवरण घालणे म्हणजे झाकून टाकणे. आवरण हे दोन प्रकारचे असते. एक अभानावरण आणि दुसरे असदावरण (असत्त्वावरण). 'ब्रह्म माहीत नसणे' हे अभानावरण आणि 'ब्रह्म असूच शकत नाही' असे वाटणे हे असदावरण होय. ब्रह्माच्या अज्ञानामुळे मनुष्य बाह्य पदार्थांत तसेच देह व देह धर्मांत गुंततो. या देहाचे व्यापार करत असताना असंख्य दुःख भोगत राहतो, याला विक्षेप असे म्हणतात. अज्ञान घालविणे हे साधकाचे कर्तव्य आहे. या अज्ञानाचा आवरण हा अंश घालविणे हे महत्त्वाचे आहे. जोपर्यंत देह राहील तोपर्यंत विक्षेप राहणार आहे. आवरण म्हणजे झाडाच्या मूळासारखे होय आणि विक्षेप म्हणजे झाडाच्या फांद्या, पाने, फूले इत्यादींसारखे होय. नुसत्या फांद्या तोडून किंवा पाने, फूले तोडून झाड नष्ट होत नाही. झाडाचे मूळच कापले तर झाड नष्ट होते. फांद्या, पाने, फूले इत्यादी हळुहळू सुकून जातात. त्याप्रमाणेच, आवरणाचा नाश करणे गरजेचे आहे. विक्षेप राहिला तरी तो पुढे शिथिल होत जातो. ब्रह्माच्या परोक्ष ज्ञानाने असदावरण जाते. ब्रह्माच्या अपरोक्ष ज्ञानाने अज्ञानाचा समूळ नाश होतो.

असंख्य जन्मांपासून ज्या साधकाने वेदाने सांगितलेली विहीत कर्मे निष्काम भावाने केली असून, वेदांतशास्त्रासाठी लागणारी विवेक, वैराग्य, षट्संपत्ती आणि मुमुक्षुत्व ही अधिकारी लक्षणे ज्याच्यामध्ये पूर्णत्वास गेली आहेत, त्याला 'उत्तम अधिकारी' म्हणतात. श्रीगुरूंच्या श्रीमुखातून महावाक्याचे प्रथम श्रवण घडताक्षणीच उत्तम अधिकारी साधक तत्काळ सिद्ध होतो, अशा श्रवणाला 'अंगीश्रवण' म्हणतात.

प्रमाण –

**कानावचनाचिये भेटी– । सरिसाचि पैं किरीटी ।**
**वस्तु होऊनि उठी । कवण एकु जो ।।९८९।। अध्याय १८**

– श्रीज्ञानेश्वरी

प्रमाण –



तुका म्हणे कानीं आइकिली मात । तोचि झाला घात जीवपणा।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

परंतु, ज्या साधकाचा अधिकार मध्यम आहे, त्याला मात्र श्रीगुरुंच्या उपदेशांचा बहुकाळ विचार करावा लागतो. नंतर त्याच्या अज्ञानाचा नाश होतो. या श्रवणास 'अंग श्रवण' म्हणतात.

वरवर श्रवण करणे याला आपाततः श्रवण असे म्हणतात. ज्या साधकांचा अधिकार कनिष्ठ असतो, त्यांचे आपोआपच आपाततः श्रवण होते. ब्रह्मप्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांचे श्रवण अशा साधकांनी सतत करीत राहावे.

मध्यम आणि कनिष्ठ अधिकाऱ्यांना पुढे मनन, निदिध्यासन केल्यानंतर तत्, त्वम् पदार्थ शोधन या साधनापर्यंत जाता येते.

वेदांतशास्त्राचे द्वितीय साधन म्हणजे मनन. श्रीगुरुंच्या वचनांचे श्रवण केल्यानंतर, 'मी ब्रह्म आहे', 'मी सच्चिदानंदस्वरूप आहे', 'जीव ब्रह्माचा भेद पुनरावृत्तीस कारण होतो' असा विचार वारंवार करीत राहणे म्हणजे मनन. श्रवण करताक्षणीच जीव आणि ब्रह्माच्या एकत्वाविषयी खात्री नसणे म्हणजे 'प्रमेय असंभावना'. मनन केल्याने ही असंभावना राहत नाही.

तिसरे साधन म्हणजे निदिध्यासन. जीव अनंत जन्मांपासून लक्षावधी योनीतून फिरलेला असल्यामुळे त्याला 'मी मनुष्य', 'मी पापी', 'मी दुःखी', 'माझी संपत्ती' इत्यादी दृढपणे वाटते, याला विपरीत भावना असे म्हणतात. तो प्रत्यक्षात ब्रह्मरूप असतानाही देह आणि बाह्य पदार्थांमध्ये गुंततो. मनन करूनही साधकाचे लक्ष अनात्म पदार्थांकडे जात असेल तर, 'पदार्थ हे ब्रह्मरूप आहेत आणि ब्रह्म मी आहे' अशी भावना तेलाच्या धारेप्रमाणे सतत बहुकाळ ठेवावी, याला निदिध्यासन म्हणतात. रात्रंदिवस असेच अनुसंधान ठेवावे. स्वतःचे चिंतन बहुकाळ ब्रह्मरूपानेच करावे. निदिध्यासनाने विपरीत भावना नष्ट होते आणि साधकाचा स्वतःबद्दल नाम–रूपातीत आत्म्याचा दृढ निश्चय होतो.

परंतु, स्वतःविषयी 'आत्मा' असा निःसंशय, दृढ निश्चय जरी झाला तरी येथे परमार्थ संपत नाही. पुढे तत्–त्वम् पदार्थ शोधन केल्याने 'मी आत्मा हा सर्वव्यापक ब्रह्मच आहे' असा निर्णय लागतो.

चौथे साधन 'तत्–त्वम् पदार्थ शोधन' हे आहे. 'तत्' आणि 'त्वम्' हे संस्कृत शब्द उपनिषदातील 'तत्त्वमसि' या महावाक्यातील आहेत. 'त्वम्'चा सरळ अर्थ म्हणजे 'तू' आणि 'तत्'चा सरळ अर्थ म्हणजे 'ते'. एका मनुष्याच्या पातळीवर तत्त्व विचार करणे म्हणजे 'त्वम् पदार्थ' शोधन. या तत्त्वाला 'आत्मा' म्हणतात. संपूर्ण सृष्टीच्या पातळीवर तत्त्व विचार करणे म्हणजे 'तत् पदार्थ' शोधन. या तत्त्वाला 'ब्रह्म' म्हणतात. 'आत्मा ब्रह्मरूपच आहे' असा दृढ, निःसंशय, अपरोक्ष आणि सहज निश्चय हे तत्, त्वम् पदार्थ शोधनाचे फल आहे. त्यामुळे

साधक जन्म-मरणाच्या चक्रातून सुटतो. त्याला ब्राह्मी स्थिती म्हणजे जीवन्मुक्त स्थिती प्राप्त होते.


साधकाने परमार्थासाठी तातडीने प्रयत्न केला पाहिजे. लहान मूल खेळता खेळता रडते. जर आई स्वयंपाक करीत असेल तर ती मुलाच्या हातात खेळणे देते, मुलगा रडणे थांबवतो व पुन्हा खेळू लागतो. आई घरातील कामे करीत राहते. आई विचार करते, 'खेळतो आहे, खेळू दे'. मुलाचे लक्ष खेळण्यात लागलेले असते. त्याचा जीव खेळण्यात गुंततो. त्याप्रमाणे, मनुष्य संसारातील बहुसंख्य खेळण्यांसोबत खेळत राहतो. कधीतरी संसार करता करता रडू लागतो. मग, आईरूपी ईश्वर म्हणतो, 'घे बायको, घे मूलं, घे अन्न, घे गोतावळा, घे संपत्ती'. या विविध पदार्थांच्या प्राप्तीने मनुष्य पुन्हा संसारात रमतो. ईश्वर विचार करतो, 'रमला आहे, रमू द्या'.

परंतु, जो मुलगा खेळण्याला भुलत नाही आणि आर्ततेने रडतो, त्याला हातातील सर्व कामं सोडून आई कडेवर घेते. त्याचे लाड करते. त्याप्रमाणे, जे साधक आर्ततेने परमार्थाकडे वळतात, त्यांना ईश्वर परमार्थासाठी लागणारी सर्व सामग्री देतो. आर्ततेने रडणारी असंख्य लेकरे लेकुरवाळ्या विठूमाईच्या अंगा-खांद्यावर गेलेली आहेत आणि पुढेही जातील. सर्वांना भगवंताच्या प्राप्तीचा अधिकार आहे. म्हणून सर्वांनीच तातडीने भगवंताकडे धाव घ्यायला हवी.

प्रमाण -

तरि झडझडोनि वहिला निघ। इये भक्तीचिये वाटे लाग।
जिया पावसी अव्यंग। निजधाम माझें ।।५१६।। अध्याय ९

- श्रीज्ञानेश्वरी

ब्रह्मस्वरूपाचे तीव्रतेने अनुसंधान करून त्याच्याशी एकरूप होणे म्हणजे भक्ती. अव्यंग निजधाम म्हणजे ब्राह्मी स्थिती.

विचारमंथन करून ब्रह्मपद कसे प्राप्त करावे यासाठी काही प्रक्रिया आहेत. सुरुवातीला मनुष्य देह कसा आहे? याचा विचार करायचा आहे. मनुष्याला एक देह नसून चार देह आहेत. पुढील चिंतनात चार देह कोणते? आत्मा म्हणजे काय? तो कसा असतो? आत्मा कुठे राहतो? इत्यादी गोष्टींवर आपण विचार करणार आहोत.

*****

## चिंतन क्रमांक – ६
## स्थूलदेहाचे अवयव

मनुष्याला विचार करण्याचे स्वातंत्र्य आहे. त्याच्या विचार–आचाराप्रमाणे त्याची गती होते. मनुष्याने त्याच्या विचारांची दिशा बाह्य पदार्थांमध्ये लावून अनेक क्षेत्रांत प्रगती केली आहे. विज्ञान, अभियांत्रिकी, व्यवस्थापन, वाणिज्य इत्यादी क्षेत्रात नवीन शोध आणि कार्यपद्धतींचा अवलंब करून भौतिक सुख–सुविधा वाढविल्या आहेत. पाश्चिमात्य देशात झालेली विज्ञानातील तीव्र आणि प्रचंड प्रगती पाहून काही भारतीय लोक स्वतःच्या देशातील लोकांना कमी लेखतात. आपल्या पूर्वजांना विज्ञान चांगल्या प्रकारे माहीत होते. परंतु, त्यांना शाश्वत सुख प्राप्त करून देणारी ब्रह्मविद्याही अवगत होती. ब्रह्मविद्येचे अनुशीलन मनुष्य देहांत होऊ शकते आणि फळही मनुष्यदेहातच मिळते.

अनंतकाळापूर्वी जीव ब्रह्मरूपच होता. अज्ञानामुळे त्याला देह मिळाला. पुढे अज्ञानापोटी सुख शोधण्यासाठी लक्षावधी योनीतून जीव फिरत राहिला. खरेतर, देहामध्ये देव आहे आणि तोच देव बाहेर सर्वत्र आहे, या गोष्टीचा त्याला विसर पडला. देह जड आहे. जो स्वतःला किंवा इतरांना जाणू शकत नसून, स्वतःच्या सिद्धीसाठी अन्य गोष्टींची अपेक्षा ठेवतो, त्याला 'जड' असे म्हणतात. मनुष्य या जड देहालाच 'मी' समजतो. देहात देव अर्थात 'आत्मा' ही चेतन वस्तू आहे हे बहुसंख्य लोकांना माहीत नाही. जड आणि चेतन यांचा विवेक, ज्ञान त्यांना नाही. शास्त्रीय भाषेत याला क्षेत्र–क्षेत्रज्ञ विवेक असे म्हणतात.

प्रमाण –

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें ।
ज्ञान ऐसें तयातें । मानूं आम्ही ।।९।। अध्याय १३

– श्रीज्ञानेश्वरी

असे ज्ञान करून घेतले तर संसारचक्रातून मनुष्य बाहेर पडतो. एखाद्याला जर विचारले, 'तू कोण आहेस ?' तर तो सांगतो, 'मी राम देशपांडे आहे' . त्याचे बारसे झाले तेव्हा 'राम' हे नाव ठेवण्यात आले. राम हे नाव नसते ठेवले तर 'लक्ष्मण' ठेवले असते. नाव कोणतेही असू शकते. ज्या घरात जन्म झाला ते आडनाव 'देशपांडे' हे मिळाले. ते सामान्यपणे स्वतःला 'राम देशपांडे' असे समजतात. आणखी खोदून विचारले तर 'मी ब्राह्मण आहे' अशी स्वतःची ओळख करून देतात. 'राम देशपांडे', 'ब्राह्मण' हे धर्म स्थूलदेहावर आरोपीत आहेत. त्याचप्रमाणे स्त्री, पुरुष, नवरा, आई, बाप हे देखील आरोपीत धर्म आहेत. देह जेव्हा नव्हता तेव्हा हे धर्म नव्हते. एखाद्या व्यक्तीशी आपल्याला व्यवहार करायचा असेल तर

त्याच्या नावाचा उच्चार करावा लागेल. व्यवहार सुलभ व्हावा म्हणून 'राम' नाव दिले. पारमार्थिकदृष्ट्या ते राम नव्हेत. देह हा 'धर्मी' आहे आणि पुरुष, राम इत्यादी असंख्य 'धर्म' आहेत. 'शरीर म्हणजे धर्मी' हे महत्त्वाचे आहे. मनुष्य देहाचा अभ्यास का करावा ? शरीर व देव कसे आहेत हे कळून घेऊन देवाचाच पक्का निश्चय करण्यासाठी देहाचा अभ्यास करणे गरजेचे आहे.



प्रमाण –

मनुष्य देहाचेनि ज्ञाने । सच्चिदानंद पदवी घेणे ।
एवढा अधिकार नारायणे । कृपावलोकने दिधला ।।३३०।। अध्याय ९

– श्री संत एकनाथ महाराज भागवत

हे शरीर म्हणजे काय याचा तुम्ही विचार केलेला आहे का ? नाही. का नाही ? ज्या शरीराच्या आधारावर दिवस–रात्र व्यवहार करीत राहता, व्यवहारातील ज्ञान गोळा करीत राहता, त्या देहाबद्दल तुम्हांला काही माहीत नाही. हे चांगले नव्हे.

परमार्थविषयक चिंतनाची सुरुवात कशी करावी ? तर 'मी' खरा कोण आहे ? 'मी' कोठून आलो ? आई, बाप, कांता, पुत्र हे कोण आहेत ? यापासून सुरुवात करावी.

प्रमाण –

का ते कांता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः।
कस्य त्वं कः कुत आयातस्तत्त्वं चिन्तय तदिह भ्रातः ।। ८

– श्री आद्य शंकराचार्य रचित मोहमुद्गर स्तोत्र

आहे मी हा कोण करावा विचार । म्हणे ज्ञानेश्वर निवृत्तीचा ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

मनुष्याचा जो देह डोळ्यांनी दिसतो, त्याला स्थूलदेह म्हणतात. हात, पाय, कान, डोळे इत्यादी अवयव असलेल्या स्थूलदेहाचा परिचय सर्वांनाच आहे. त्यातही वैद्य लोकांना स्थूलदेहाचा दाट परिचय असतो. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारणदेह हे चार देह मनुष्याला आहेत. सूक्ष्म, कारण आणि महाकारणदेह हे डोळ्यांनी दिसत नाहीत. स्थूलाच्या आत सूक्ष्म, त्याच्या आत कारण आणि कारणाच्या आत महाकारणदेह आहे. आत्मा चारही देहात व्याप्त आहे. चार देह आणि आत्मा यांचे एक रूपक चित्र **आकृती क्रमांक १२** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक १२ – आत्मा आणि चार देह यांचे रूपक चित्र

स्थूलशरीर पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेले आहे. आकाश, वायू, अग्नी, जल आणि पृथ्वी ही पाच महाभूते आहेत. शरीरामध्ये जेथे पोकळी आहे ते आकाश आहे. श्वासोच्छवास वायूचा आहे, शरीरातील उष्णता अग्नीची आहे, द्रवरूप भाग जलाचा आहे आणि शरीराचा जो भाग कठीण आहे तो पृथ्वीचा आहे. पृथ्वी, जल, अग्नी, वायू आणि आकाश ही भूते उत्तरोत्तर सूक्ष्म आणि व्यापक आहेत. पृथ्वीतत्त्वप्रधान स्थूल शरीराची त्वचा, मांस, हाडे इत्यादी डोळ्यांनी दिसतात. त्याचप्रमाणे जलतत्त्वप्रधान रक्त, लाळ, मूत्र ही देखील डोळ्यांनी दिसतात. पृथ्वीपेक्षा जल सूक्ष्म आहे. जलापेक्षा अग्नी सूक्ष्म आहे. तहान लागणे, भूक लागणे, झोप लागणे, तेजस्विता, आळस हे अग्नीचे तत्त्व आहे. चालणे, धावणे, शरीर आखडून घेणे किंवा ताणणे हे सर्व वायूचे तत्त्व आहे. आकाश म्हणजे पोकळी. शरीरात जेथे जेथे पोकळी आहे ते आकाश तत्त्व आहे. वायू आणि आकाश डोळ्यांनी दिसत नाहीत. आकाशात सत्त्वगुणाचे प्रमाण सर्वात अधिक असून पृथ्वी तत्त्वात ते अल्प प्रमाणात आहे. त्याचप्रमाणे आकाशात तमोगुणाचे प्रमाण सर्वात कमी असून उत्तरोत्तर वायू, अग्नी, जल आणि पृथ्वीत तमोगुणाचे प्रमाण वाढत जाते.

प्रत्येक महाभूताचा एक एक मुख्य गुण आहे. पृथ्वीचा मुख्य गुण 'गंध' हा आहे. मनुष्य गंधाची विभागणी सुगंध आणि दुर्गंध अशी करतो. जलाचा मुख्य गुण 'रस' आहे. गोड, खारट, आंबट, तुरट, कडू व तिखट हे षड्रस प्रसिद्धच आहेत. अग्नीचा मुख्य गुण 'रूप'

आहे. पदार्थाच्या आकारानुसार त्याच्या रूपाचा निश्चय केला जातो. सुंदर, कुरूप इत्यादी रूपाचे प्रकार आहेत. वायूचा मुख्य गुण 'स्पर्श' हा आहे. स्पर्श हा मृदु किंवा कठीण असतो. त्वचेला थंडी लागणे अथवा गरम चटका बसणे हे देखील स्पर्शाचे प्रकार आहेत. आकाशाचा मुख्य गुण 'शब्द'. शब्द हे निंदात्मक अथवा स्तुतीपर असतात. व्यवहार आणि परमार्थ शब्दांमुळे सुलभ होतात.



पंचीकृत म्हणजे 'पाच भागांमध्ये विभागून मिश्रण झालेले'. स्थूलदेह पंचीकृत पंचमहाभूतांचा आहे. ईश्वराच्या इच्छेने प्रत्येक महाभूताचे पाच भाग होतात. पुढे विशिष्ट प्रकारे त्यांचे मिश्रण होऊन स्थूलदेह तयार होतो. अपंचीकृत म्हणजे 'पाच भागांत न विभागून मिश्रण न झालेले'. अपंचीकृत महाभूते म्हणजे प्रत्येक महाभूत शुद्ध रूपात असते. आपापसात मिश्रण झालेले नसते. शुद्ध पृथ्वी, शुद्ध जल, शुद्ध अग्नी, शुद्ध वायू आणि शुद्ध आकाश म्हणजे अपंचीकृत महाभूते. ही डोळ्यांनी दिसत नाहीत. पंचीकृत महाभूतांपेक्षा अपंचीकृत महाभूते सूक्ष्म आहेत.

चार देह आणि आत्मा यांचे आणखी स्पष्टीकरण **आकृती क्रमांक १३** पाहून होईल.




**आकृती क्रमांक १३ – चार देह निर्माण होण्याची प्रक्रिया**

आत्म्यापासून ज्ञान म्हणजे महाकारणदेह तयार होतो. महाकारणदेहातून अज्ञान देह म्हणजे कारणदेह तयार होतो. अज्ञानातून अपंचीकृत पंचमहाभूते तयार होतात. अपंचीकृत पंचमहाभूतांतून पंचीकृत पंचमहाभूते तयार होतात आणि स्थूलदेह हे पंचीकृत पंचमहाभूतांचे कार्य आहे.

**आकृती क्रमांक १४मध्ये अपंचीकृत पंचमहाभूतांचे रूपक चित्र दाखविले आहे.**






आकृती क्रमांक १४ – अपंचीकृत पंचमहाभूते

प्रत्येक महाभूत शुद्धरूपात असते. त्याचे रूपांतर पंचीकृत पंचमहाभूतांमध्ये कसे होते ? याचा विचार करू. उदाहरण म्हणून अपंचीकृत पृथ्वी घेऊ. प्रथम अपंचीकृत पृथ्वीचे दोन अर्धे–अर्धे असे समान भाग होतात. हे **आकृती क्रमांक १५(अ)** मध्ये दाखविले आहे. अपंचीकृत जल, अग्नी, वायू आणि आकाश यांची देखील अर्धा–अर्धा भाग अशी समान विभागणी होते.




आकृती क्रमांक १५(अ) – प्रत्येक अपंचीकृत महाभूताचे अर्धे अर्धे दोन समान भाग होतात.

एक अर्धा भाग तसाच ठेवून, दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार समान उपविभाग होतात. हे **आकृती क्रमांक १५(ब)** मध्ये दाखविले आहे.




आकृती क्रमांक १५(ब) – अपंचीकृत महाभूताच्या अर्ध्या भागाचे चार समान विभाग होतात.

आता प्रत्येक अपंचीकृत भूताचा अर्धा भाग तसाच ठेवून, उरलेल्या चार महाभूतांच्या अर्ध्या भागांचे प्रत्येकी जे चार उपविभाग केले होते त्यातील एक–एक उपविभाग काढून एका अर्ध्या अपंचीकृत महाभूतांत मिसळण्यात येतो. हे **आकृती क्रमांक १५(क)** मध्ये दाखविले आहे.




**आकृती क्रमांक १५(क) – अपंचीकृत पंचमहाभूताच्या अर्ध्या भागासोबत इतर चार महाभूतांचा एक एक विभाग एकत्र येतात**

उदाहरणार्थ – अपंचीकृत पृथ्वीचा अर्धा भाग तसाच ठेवतात. उरलेल्या अर्ध्या भागात एक उपविभाग जल, एक उपविभाग अग्नी, एक उपविभाग वायू आणि एक उपविभाग आकाश असे मिश्रण करण्यात येते, याला पंचीकृत पृथ्वी म्हणतात.

**आकृती क्रमांक १५(ड)** मध्ये पंचीकरण झालेली पाच महाभूते दाखविण्यात आलेली आहेत.




**आकृती क्रमांक १५(ड) – पंचीकृत पंचमहाभूते**

स्थूलशरीर पंचीकरण झालेल्या पंचमहाभूतांपासून बनलेले आहे. त्याचप्रमाणे सूर्य, चंद्र, ग्रह, धूमकेतु आणि असंख्य तारे ही सर्व स्थूल सृष्टीही पंचीकृत पंचमहाभूतांचे कार्य आहे. सर्व स्वर्ग, सर्व नरक आणि पृथ्वी हे पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेले आहेत. कोणताही पदार्थ घ्या, उदाहरणार्थ – लाकडाची अथवा प्लॅस्टिकची खुर्ची. खुर्चीला स्पर्श केल्याने कठीणत्व जाणवते. म्हणून, खुर्ची केवळ पंचीकृत पृथ्वी या महाभूतापासून बनली आहे, असे कोणाला वाटू शकते. परंतु, तसे नाही. खुर्चीमध्ये पंचीकृत जल, पंचीकृत अग्नी, पंचीकृत वायू आणि पंचीकृत आकाश ही सर्व पंचीकृत पंचमहाभूते आहेत. एवढेच की खुर्चीत पंचीकृत पृथ्वीचे प्रमाण जास्त आहे. लोखंडाची सळई एका बाजूने तापवली तर उष्णता सळईत पसरत जाऊन दुसऱ्या टोकापर्यंत पोहोचते. याचे कारण लोखंडात पंचीकृत आकाश आहे. आपल्याला वायूचा स्पर्श जाणवतो. कोणाला वाटेल की वायूत केवळ वायू हे एकच महाभूत आहे. तसे नाही. जो वायू आपल्याला जाणवतो तो पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेला आहे. त्यात पंचीकृत पृथ्वी, पंचीकृत जल, पंचीकृत अग्नी, पंचीकृत आकाश आणि पंचीकृत वायू आहेत. एवढेच की वायूत पंचीकृत वायूचे प्रमाण जास्त आहे.

पंचीकृत पंचमहाभूतांपासून स्थूलशरीर कसे बनते? पंचमहाभूतांचे जेव्हा पंचीकरण होते तेव्हा त्यांच्या मुख्य तत्त्वांचेही पंचीकरण होते. प्रत्येक महाभूताची पाच तत्त्वे

आहेत. म्हणून पाच महाभूतांची एकूण पंचवीस तत्त्वे होतात. ही पंचवीस तत्त्वे कोष्टक क्रमांक १ मध्ये दिली आहेत.



| | पृथ्वी | जल | अग्नी | वायू | आकाश |
|---|---|---|---|---|---|
| पृथ्वी | हाडे | रक्त | आळस | संकोचन | कट्याकाश |
| जल | मांस | वीर्य | कांती | चलन | उदराकाश |
| अग्नी | नाडी | मूत्र | भूक | उत्क्रमण | हृदयाकाश |
| वायू | त्वचा | घाम | तहान | धावन | कंठाकाश |
| आकाश | रोम | लाळ | झोप | प्रसरण | शिराकाश |

कोष्टक क्रमांक १ – स्थूलदेहाची पंचीकृत पंचवीस तत्त्वे

या कोष्टकाच्या अभ्यासासाठी प्रथम उभ्या रांगा आणि नंतर अडव्या रांगेतील तत्त्वे पाहू. कोष्टकाच्या डावीकडे उभ्या रांगेत पृथ्वीची तत्त्वे दिली आहेत. हाडे, मांस, नाडी, त्वचा आणि रोम यांच्यामध्ये कठीणत्व असल्यामुळे ती पृथ्वीची तत्त्वे आहेत. हाडे हे पृथ्वीचे मुख्य तत्त्व आहे.

दुसऱ्या उभ्या रांगेत जलाची मुख्य पाच तत्त्वे – रक्त, वीर्य, मूत्र, घाम आणि लाळ दाखविलेली आहेत. हे द्रवरूप पदार्थ असल्यामुळे त्यांना जलाची तत्त्वे म्हणतात. जलाचे वीर्य हे मुख्य तत्त्व आहे.

तिसऱ्या उभ्या रांगेत अग्नीची पाच तत्त्वे आहेत. आळस, कांती, भूक, तहान आणि झोप ही दाखविलेली आहेत. अग्नीचे मुख्य तत्त्व भूक आहे.

कोष्टकाच्या चौथ्या उभ्या रांगेत वायूची पाच तत्त्वे – संकोचन, चलन, उत्क्रमण(म्हणजे उर्ध्वगती), धावन व प्रसरण ही दिली आहेत. वायू हा चंचल आहे, चलायमान आहे म्हणून ही पाच तत्त्वे वायूची आहेत. वायूचे मुख्य तत्त्व धावन आहे.

पाचव्या उभ्या रांगेत आकाशाची पाच तत्त्वे – कट्याकाश(कटी म्हणजे कंबर), उदराकाश(उदर म्हणजे पोट), हृदयाकाश, कंठाकाश आणि शिराकाश ही दिली आहेत. आकाश म्हणजे पोकळी. शरीरातील पाच भागातल्या पोकळींना ही नावे दिली आहेत. शिराकाश हे आकाशाचे मुख्य तत्त्व आहे.

आता कोष्टकाचा अभ्यास अडव्या रांगा घेऊन करू. सर्वांत वरच्या अडव्या रांगेत पृथ्वीची हाडे, जलाचे रक्त, अग्नीचे आळस, वायूचे संकोचन आणि आकाशाचे कट्याकाश अशी तत्त्वे आली आहेत. या पाच तत्त्वांचे पंचीकरण होते. अर्धा भाग हाडे, एक अष्टमांश भाग रक्त, एक अष्टमांश भाग आळस, एक अष्टमांश भाग संकोचन आणि एक अष्टमांश भाग कट्याकाश यांचे मिश्रण होऊन पृथ्वीच्या तत्त्वांचे पंचीकरण होते. रक्त, आळस, संकोचन आणि कटी यांत पृथ्वीचाही अंश असल्याने, यांच्या मिश्रणाला 'पृथ्वीच्या तत्त्वांचे पंचीकरण' म्हणतात.

दुसऱ्या अडव्या रांगेत जलाचे वीर्य, पृथ्वीचे मांस, अग्नीची कांती, वायूचे चलन आणि आकाशाचे उदराकाश अशी तत्त्वे आहेत. या पाच तत्त्वांचे पंचीकरण होते. अर्धा भाग वीर्य, एक अष्टमांश भाग मांस, एक अष्टमांश भाग कांती, एक अष्टमांश भाग चलन आणि एक अष्टमांश भाग उदराकाश यांचे मिश्रण होऊन जलाच्या तत्त्वांचे पंचीकरण होते. मांस, कांती, चलन आणि उदर यांच्यात जलाचा अंश असतोच, या कारणासाठी या पाच तत्त्वांच्या मिश्रणाला 'जलाच्या तत्त्वांचे पंचीकरण' म्हणतात.

कोष्टकाच्या तिसऱ्या अडव्या रांगेत अग्नीची भूक, पृथ्वीची नाडी, जलाचे मूत्र, वायूचे उत्क्रमण आणि आकाशाचे हृदयाकाश ही तत्त्वे आहेत. या पाच तत्त्वांचे पंचीकरण होते. अर्धा भाग भूक, एक अष्टमांश भाग नाडी, एक अष्टमांश भाग मूत्र, एक अष्टमांश भाग उत्क्रमण आणि एक अष्टमांश भाग हृदयाकाश यांचे मिश्रण होऊन अग्नीच्या तत्त्वांचे पंचीकरण होते. भूक, नाडी, उत्क्रमण आणि हृदय यांच्यातही अग्नी आहेच, म्हणून या पाच तत्त्वांच्या मिश्रणाला 'अग्नीच्या तत्त्वांचे पंचीकरण' असे म्हणतात.

कोष्टकाच्या चौथ्या अडव्या रांगेत वायूचे धावन, पृथ्वीची त्वचा, जलाचे घाम, अग्नीची तहान आणि आकाशाचे कंठाकाश ही तत्त्वे दिली आहेत. या पाच तत्त्वांचे पंचीकरण होते. अर्धा भाग धावन, एक अष्टमांश भाग त्वचा, एक अष्टमांश भाग घाम, एक अष्टमांश भाग तहान आणि एक अष्टमांश भाग कंठाकाश यांचे मिश्रण होऊन वायूच्या तत्त्वांचे पंचीकरण होते. त्वचा, घाम, तहान आणि कंठाकाश यांचा संबंध वायूशी असतोच, म्हणून या पाच तत्त्वांच्या मिश्रणाला 'वायूच्या तत्त्वांचे पंचीकरण' म्हणतात.

कोष्टकाच्या पाचव्या अडव्या रांगेत आकाशाचे शिराकाश, पृथ्वीचे रोम, जलाची लाळ, अग्नीची झोप आणि वायूचे प्रसरण ही तत्त्वे दिली आहेत. या पाच तत्त्वांचे पंचीकरण होते. अर्धा भाग शिराकाश, एक अष्टमांश भाग रोम, एक अष्टमांश भाग लाळ, एक अष्टमांश भाग झोप आणि एक अष्टमांश भाग प्रसरण यांचे मिश्रण होऊन आकाशाच्या तत्त्वांचे पंचीकरण होते. रोम, लाळ, झोप आणि प्रसरण यांचा संबंध आकाशाशी आहेच, म्हणून या पाच तत्त्वांच्या मिश्रणाला 'आकाशाच्या तत्त्वांचे पंचीकरण' म्हणतात.

**आकृती क्रमांक १६** मध्ये पाच महाभूतांच्या तत्त्वांचे पंचीकरण दाखविले आहे. अशाप्रकारे स्थूलदेह पंचवीस तत्त्वांचा बनलेला आहे.




आकाशाच्या तत्त्वांचे पंचीकरण




वायूच्या तत्त्वांचे पंचीकरण




अग्नीच्या तत्त्वांचे पंचीकरण




जलाच्या तत्त्वांचे पंचीकरण




पृथ्वीच्या तत्त्वांचे पंचीकरण

आकृती क्रमांक १६ – स्थूलदेहाच्या पंचवीस तत्त्वांचे पंचीकरण

**स्थूलदेहाची आणखी आठ तत्त्वे – 'जागृतावस्था', 'नेत्रस्थान', 'वैखरीवाचा', 'स्थूलभोग', 'क्रियाशक्ती', 'रजोगुण', ॐ काराची 'अकार मात्रा' आणि 'विश्वाभिमान' ही होत. आकृती क्रमांक १७ पहा.**

आभास ⟶ विश्व

ॐ काराची मात्रा ⟶ 'अ'कार

अवस्था ⟶ जागृती

गुण ⟶ रज

शक्ति ⟶ क्रिया

वाणी ⟶ वैखरी

स्थान ⟶ नेत्र

भोग ⟶ स्थूल

आकृती क्रमांक १७ – स्थूलदेहाची आणखी आठ तत्त्वे

'जागृती अवस्था' म्हणजे ज्या अवस्थेत मनुष्य जागा असतो. मनुष्य वाणी, हात, पाय, शिश्न आणि गुद या पाच कर्मेंद्रियांनी व्यवहार करतो. तसेच कान, त्वचा, डोळे, जीभ आणि नाक या पाच ज्ञानेंद्रियांनी अनुक्रमे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पाच विषयांचे त्याला ज्ञान होते. जागृती अवस्थेत डोळ्यांनी सभोवतालची परिस्थिती पाहून नंतर व्यवहार केला जातो. म्हणून जागृत अवस्थेत 'नेत्रस्थान' प्रमुख आहे. कंठ, टाळू, जिव्हामूल, दात, ओठ, नाक, छाती आणि डोके यांच्या सहाय्याने मनुष्य जे बोलतो, तिला 'वैखरी वाणी(वाचा)' म्हणतात. जागृत अवस्थेत स्थूल पदार्थांचा भोग घेतला जातो, म्हणून 'स्थूल भोग' हे तत्त्व आहे. जागृती अवस्थेत इंद्रियांमार्फत क्रिया केल्या जातात म्हणून स्थूलदेहात 'क्रियाशक्ती' आहे. क्रिया, व्यवहार प्रामुख्याने रजोगुणात्मक असतो म्हणून 'रजोगुण' हे स्थूलदेहाचे तत्त्व आहे. 'अ', 'उ', 'म', आणि अर्धी मात्रा अशा ओंकाराच्या साडेतीन मात्रा आहेत. स्थूलदेहाशी संबंधीत 'अ' कार मात्रा आहे. विश्वाभिमानातील 'विश्व' हा आत्म्याचा स्थूलदेहातील आभास आहे. आरशावर सूर्यप्रकाश पडला तर आरशातून तो प्रकाश परावर्तीत होतो. त्याप्रमाणेच, आत्म्याचा प्रकाश बुद्धीतून परावर्तीत होऊन स्थूलदेहात पसरून बाह्यविश्वातील पदार्थांपर्यंत जातो, या आत्म्याच्या आभासाला 'विश्व' असे म्हणतात. या आभासामुळे मनुष्याला जागृती अवस्थेत स्थूलशरीर आणि बाह्य स्थूल पदार्थांचे भान असते. आत्म्याचा प्रकाश हे मूळ खरे चैतन्य असून बुद्धीतून वाहणारा चैतन्याचा आभास हा विकारी म्हणजे परिवर्तनशील आहे.

आपण पूर्वी स्थूलदेहाची पंचवीस तत्त्वे अभ्यासली आणि आता पाहिलेली आठ असे मिळून स्थूलदेहाची तेहत्तीस तत्त्वे आहेत. हा देह परिवर्तनशील आहे, आत्मा

परिवर्तनशील नाही आणि मनुष्य हा आत्माच आहे. जन्मणे, राहणे, वाढणे, तरुणपण, वार्धक्य आणि मरण असे देहाचे सहा विकार(षड्विकार) आहेत. 'मी आत्मा असून, शरीर आणि शरीरांच्या या तत्त्वांचा मी द्रष्टा आहे, साक्षी आहे. मी शरीर, शरीराचे तत्त्व आणि शरीराचे धर्म नाही' असा विचार साधकाने दिवस–रात्र करावा.

हा देह 'मी' नाही किंवा 'माझा नाही' हे कसे समजावे ? व्यवहारात मनुष्य 'माझा हात', 'माझे डोके' असे म्हणतांना आढळतो. तो 'मी हात', 'मी डोके' असे म्हणत नाही. गाडी चालवणारा चालक 'मी गाडी' असे समजत नाही. गाडी आणि तो भिन्न असा स्पष्ट विवेक त्याला असतो. त्याप्रमाणे 'मी' आणि 'शरीर' भिन्न आहे असा विवेक पाहिजे. शक्यतो असा विवेक आई, बाप शिकवत नाहीत. साधूसंत हा विवेक शिकवतात. हे स्थूल शरीर माझे नाही. ते पंचीकृत पंचमहाभूतांचे आहे. साधारणपणे मनुष्याला भूतांची भीती वाटते. मग, ही तर 'पंचमहाभूते' आहेत. त्यांच्या देहाला मी आणि माझे म्हणणे सोडून द्या. नाहीतर त्याचे फळ आपल्याला भोगण्याशिवाय सुटका होणार नाही.

एका मनुष्याला यज्ञ–याग करण्यासाठी एका स्वतंत्र खोलीची गरज पडली. एका श्रीमंत माणसाकडे जाऊन तो म्हणाला, 'एका महिन्यासाठी तुमच्या मालकीची एक खोली मला वापरायला द्या. मी धार्मिक विधी करणार आहे. एका महिन्यानंतर खोलीची चावी आपल्याला परत करीन'. त्या श्रीमंत मनुष्याने खोलीची चावी त्याला दिली. एक महिना म्हणून एक वर्ष झाले तरी तो खोलीची चावी परत करेना. मालकाने विचारल्यावर, 'अजून काही दिवस थांबा. मी काय तुमची खोली घेऊन चाललो काय ?' अशी उडवाउडवीची उत्तरे तो देऊ लागला. मालक भोळा असल्यामुळे कालांतराने हा म्हणू लागला, 'ही खोली माझीच आहे'. शेवटी वैतागून श्रीमंत माणसाने वकीलांकरवी त्याच्यावर खटला भरला. आतामात्र नाईलाजाने त्या मनुष्याला खोली सोडावी लागली व तुरुंगात जावे लागले.

त्याचप्रमाणे, जीवाने पाच महाभूतांचा हा देह भगवंत प्राप्तीच्या उद्देशाने यमाकडून मागून घेतला.

प्रमाण –

**दिले हात, पाय, डोळे, कान । जेणे तू जोडशी नारायण ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

परंतु, देह मिळाल्याबरोबर खरे प्रयोजन विसरला आणि 'शरीर माझेच आहे. ते मी सोडणार नाही.' असा हट्ट धरून बसला. म्हणून, कोणाचीही इच्छा नसतानाही यम बळजबरीने शरीर घेऊन जातो व जोपर्यंत तो जीव स्वतःला शरीर समजेल, तोपर्यंत त्याला चौऱ्याऐंशी लक्ष प्रकारच्या देहरूपी तुरुंगात फिरण्याची शिक्षा भोगायला लावतो.

म्हणून, साधकाने सावध व्हावे आणि मनुष्य देहातील खरे प्रयोजन लक्षात ठेवावे.

*****

## चिंतन क्रमांक – ७
## सूक्ष्मदेहाचे अवयव

स्थूलदेहाच्या आत सूक्ष्मदेह आहे. स्थूलदेहाचे आत पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच प्राण यांचे सूक्ष्म रूप सूक्ष्मदेहात आहे. सूक्ष्मदेहातून स्थूलदेह आला आहे. सूक्ष्मदेह अपंचीकृत पंचमहाभूतांचे कार्य आहे. सूक्ष्मदेह डोळ्यांनी अथवा सूक्ष्मदर्शी यंत्राच्या सहाय्याने दिसत नाही. पाच अंतःकरणे, पाच प्राण, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये आणि पाच विषय हे सर्व सूक्ष्मदेहाचे अवयव आहेत. या तत्त्वांची संख्या पंचवीस आहे. अपंचीकृत पंचमहाभूतांच्या सात्त्विक, राजसी आणि तामसी गुणांपासून हे पंचवीस अवयव बनले आहेत. **आकृती क्रमांक १८** मध्ये सूक्ष्मदेहाचे रूपक चित्र आहे.




आकृती क्रमांक १८ – सूक्ष्मदेहाचे रूपक

प्रथम 'अंतःकरण पंचक' म्हणजे काय ते पाहूया. 'अंतःकरण' म्हणजे 'आतली इंद्रिये'. अंतःकरण, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांना 'अंतःकरण पंचक' म्हणतात. पदार्थाचे ज्ञान होण्याचे, सुख आणि दुःख जाणण्याचे सूक्ष्मदेहातील इंद्रिय म्हणजे अंतःकरण. या इंद्रियांच्या देवता त्या त्या इंद्रियांच्या कार्याला सहाय्य करतात. व्यवहारातले एखादे काम करायचे असेल, तर त्याचे स्फुरण अंतःकरणात होते. अंतःकरणाची देवता विष्णू आहे. अंतःकरणात जे स्फुरण होते ते योग्य किंवा अयोग्य असते. योग्य असल्यास त्याला 'संकल्प' आणि अयोग्य असल्यास त्याला 'विकल्प' असे म्हणतात. 'संकल्प आणि विकल्प' करणे 'मनाचे' कार्य आहे. मनाची देवता 'चंद्रमा' आहे. बुद्धी विचार करून संकल्प किंवा विकल्प यापैकी एकाचा निश्चय करते. बुद्धीची देवता 'ब्रह्मदेव' आहे. चित्तामध्ये अनंत जन्मांचे संस्कार साठवलेले असतात. तसेच, एखादे काम कसे करायचे याचे चिंतन करणे, काम

झाल्यानंतर समाधान व्यक्त करणे हे चित्ताचे कार्य असून 'चित्ताची' देवता 'नारायण' आहे. 'हे काम मी करणार', 'हा पदार्थ माझा आहे' इत्यादी अभिमान धरणे म्हणजे 'अहंकार'. अहंकाराची देवता 'रुद्र' आहे. खरे पाहिले तर अंतःकरण एकच आहे. अंतःकरण जेव्हा संकल्प–विकल्प करते तेव्हा अंतःकरणालाच 'मन' म्हणतात, निश्चय करते तेव्हा त्याच अंतःकरणाला 'बुद्धी' हे नाव पडते. चिंतन करू लागले तर अंतःकरणाला 'चित्त' म्हणतात व बुद्धीने केलेल्या निश्चयावर अभिमान धरला, तर त्यालाच 'अहंकार' असे म्हणतात. एकच स्त्री कोणाची मुलगी, कोणाची बायको, कोणाची आई असते, त्याचप्रमाणे, कार्यभेदाने अंतःकरणालाच मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार ही नावे येतात. म्हणूनच मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांना अंतःकरण–चतुष्टय असेही म्हणतात.

दैनंदिन व्यवहारात मनुष्य अनेक क्रिया करतो. कुठल्याही क्रियेत प्रथम चित्तात साठवलेल्या अनंत जन्मातील संस्कारातील फलोन्मुख झालेल्या संस्काराचे अंतःकरणात स्फुरण होते. त्या स्फुरणावर मनात संकल्प–विकल्प घडून, बुद्धीकडून त्यावर निश्चय केला जातो व अहंकार त्यावर अहं धरतो. पुढे तोच अहंकार पाच प्राण, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये यांच्या सहाय्याने स्थूलदेहाला हालवतो. डोळ्यांच्या पापण्यांची उघडझाप करायला जितका वेळ लागतो, त्या कालावधीपेक्षाही कितीतरी कमी वेळेत ही प्रक्रिया होते. एक उदाहरण पाहू. सकाळची वेळ आहे. एक मनुष्य घरात बसलेला आहे. त्याच्या चित्तातील संस्कारामुळे मंदिरात जाण्याचे अंतःकरणात स्फुरण होते. 'जाऊ की नको ?' असे विचार त्याचे मन करते. मन प्रबळ असेल तर मनाप्रमाणे व बुद्धी प्रबळ असेल तर बुद्धीप्रमाणे निश्चय केला जातो. त्या निर्णयाप्रमाणे मंदिरात जाण्याच्या अथवा न जाण्याच्या विचारावर अहंकार धरला जातो. जाण्याचा निर्णय झाला तर अहंकार प्राण, ज्ञानेंद्रिय आणि कर्मेंद्रिये यांच्या सहाय्याने स्थूलदेहाला हालवतो. तेव्हा तो मनुष्य मंदिरात जातो.

प्रत्येक क्रियेची प्रतिक्रिया अंतःकरणात संस्काररूपाने साठवली जाते. पुढे प्रत्येक क्रियेसाठी अंतःकरणातील या संस्कारांचा उपयोग होतो. अंतःकरणाच्या प्रत्येक स्फुरणासाठी कधी मन प्रबळ असते तर कधी बुद्धी. मन प्रबळ असेल तर ते बुद्धीला दाबून टाकते. एखाद्याच्या अंतःकरणात दारू पिण्याचा संस्कार स्फुरला तर, 'दारू पिऊ की नको ?' असे विकल्प मन करते. प्रथम बुद्धी निर्णय देते, 'पिऊ नकोस, ते अपायकारक आहे'. मनाचा विकल्प बलवत्तर असेल तर मन म्हणते, 'अरे! पी. काही होत नाही'. बुद्धीचा जोर कमी असेल तर बुद्धी, 'ठीक आहे, दारू पी' असा मनाप्रमाणे निर्णय देते. मन हे चंचल असल्यामुळे, अस्थिर असल्यामुळे मनाप्रमाणे वागल्याने वाटोळे होते.

प्रमाण –

**मनोमार्गे गेला तो येथें मुकला । हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज हरिपाठ

कधी बुद्धी प्रबळ असते आणि मनाचा जोर कमी असतो. एखाद्या मनुष्याने आळंदीला जाण्याचा संकल्प केला तर त्याच्या त्या संकल्पावर बुद्धी शिक्कामोर्तब करते. 'आळंदी दर्शनाने परमार्थात गती होणार म्हणून निश्चितपणे आळंदीला जा' असा निश्चय बुद्धी करते. समजा बायको, पोरं म्हणाली, 'आळंदीला जाऊ नका', पण, बुद्धी प्रबळ असल्यामुळे बुद्धी म्हणते,'आळंदीला जायचेच'. पुढे तशीच क्रिया होते. तो आळंदीला जातोच.

व्यान, समान, उदान, प्राण आणि अपान हे पाच प्राण आहेत. शरीराचे सांधे हालविण्याचे काम व्यान वायूचे आहे. हा वायू पूर्ण शरीरात सर्वत्र असतो. मनुष्य जे खाद्यपदार्थ आणि पेयपदार्थ ग्रहण करतो, त्यांचे पचन झाल्यानंतर त्याचे तीन विभाग होतात. स्थूल, सूक्ष्म आणि अतिसूक्ष्म. ही विभागणी समान वायू नाभीस्थानात राहून करतो. अन्नाचा पचलेला स्थूल भाग मल, मूत्राच्या रूपाने बाहेर पडतो. जलाच्या सूक्ष्म भागाने प्राण पुष्ट होतात. अन्न आणि जलाचा जो रसरूप मध्यम भाग तो नाड्यांच्या सहाय्याने समान वायू शरीराच्या सर्व भागांत पोहोचवून शरीराला पुष्ट करतो. अन्नाचा अतिसूक्ष्म भाग मन व बुद्धीस पुष्ट करतो. उदान वायू कंठस्थानात राहतो आणि उचकी व स्वप्न उत्पन्न करतो. तसेच मनुष्य मरताना कंठस्थानात जो उर्ध्व लागतो त्यासाठी उदान वायू उपयोगात येतो. श्वासोच्छवासाच्या क्रियेसाठी प्राण वायू उपयोगात येतो. गुदस्थानातून मलविसर्जनाच्या कामी अपान वायूची मदत होते.

कान, त्वचा, नेत्र, जीभ आणि नाक ही पाच ज्ञानेंद्रिये आहेत. ही सूक्ष्मदेहात आहेत आणि त्यांचे स्थूलरूप स्थूलदेहामध्ये आहे. कानाची देवता दिशा असून ऐकणे त्याचे कार्य आहे. त्वचेची देवता वायू असून स्पर्श समजणे या इंद्रियामार्फत होते. नेत्राने पाहणे होते. नेत्राची देवता सूर्य आहे. जीभेच्या योगाने गोड, आंबट इत्यादी रस कळतात. जीभेची देवता वरुण आहे. नाकाची देवता अश्विनीकुमार आहे. त्यामुळे सुगंध, दुर्गंध कळतात.

वाक्, हात, पाय, शिश्न आणि गुद ही पाच कर्मेंद्रिये आहेत. ही सूक्ष्मदेहात असून त्यांचे स्थूलरूप स्थूलदेहात आहे. वागींद्रियाने शब्द बोलता येतात. वागींद्रियाची देवता अग्नी आहे. पदार्थ देणे–घेणे हा व्यवहार हाताने होतो. हाताची देवता इंद्र आहे. चालण्याची क्रिया पायाने होते. पाय या इंद्रियाची देवता उपेंद्र आहे. शिश्नाने मूत्र विसर्जन आणि स्त्रीभोग होतो. याची देवता प्रजापती आहे. गुदातून मलविसर्जन होते. त्याची देवता यम आहे.

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय आहेत. सर्वसाधारणपणे या पाच विषयांसाठीच मनुष्याची धडपड दिसून येते. म्हणून त्यांचे संसारचक्र कायम आहे. या पाच विषयांना मी साक्षी आहे, असा विवेक साधकाने सतत ठेवावा.

सूक्ष्मदेहाची ही पंचवीस तत्त्वे अपंचीकृत पंचमहाभूतांच्या सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांपासून झाली आहेत. **कोष्टक क्रमांक २** पहा. अपंचीकृत पंचमहाभूतांच्या सात्त्विक भागापासून पाच अंतःकरणे व पाच ज्ञानेंद्रिये बनली आहेत. राजस भागापासून पाच प्राण आणि कर्मेंद्रिये झालेली आहेत व तामस भागापासून पाच विषय झाले आहेत.

| | अपंचीकृत पंचमहाभूताच्या सात्त्विक भागापासून | | अपंचीकृत पंचमहाभूताच्या राजस भागापासून | | अपंचीकृत पंचमहाभूताच्या तामस भागापासून |
|---|---|---|---|---|---|
| | पाच अंतःकरणे | पाच ज्ञानेंद्रिये | पाच प्राण | पाच कर्मेंद्रिये | पाच विषय |
| आकाशाच्या | अंतःकरण | श्रोत्र (कान) | व्यान | वाक् (वाचा) | शब्द |
| वायूच्या | मन | त्वक् (त्वचा) | समान | हस्त (हात) | स्पर्श |
| अग्नीच्या | बुद्धी | चक्षू (डोळे) | उदान | पाद (पाय) | रूप |
| जलाच्या | चित्त | रसना (जीभ) | प्राण | उपस्थ (जननेंद्रिय) | रस |
| पृथ्वीच्या | अहंकार | घ्राण (नाक) | अपान | गुद (पायु, मलद्वार) | गंध |

कोष्टक क्रमांक २ – सूक्ष्मदेहाची पंचवीस तत्त्वे

**कोष्टक क्रमांक २** च्या पहिल्या अडव्या ओळीत अंतःकरण, कान, व्यान, वाक् आणि शब्द ही पाच तत्त्वे आली आहेत. अपंचीकृत आकाशाच्या सात्त्विक भागातून अंतःकरण आणि कान आले आहेत. राजस भागापासून व्यान आणि वाक् आले व तामसिक भागातून शब्द आला. व्यान वायूच्या सहाय्याने अंतःकरण कानापर्यंत वाहत येते व शब्द विषय ग्रहण करते. वागींद्रियाने शब्दांचा उच्चार होतो.

दुसऱ्या अडव्या ओळीत मन, त्वचा, समान, हात आणि स्पर्श ही पाच तत्त्वे आहेत. अपंचीकृत वायूच्या सात्त्विक भागापासून मन आणि त्वचा झाली. राजस भागापासून समान आणि हात व तामस भागापासून स्पर्श विषय झाला आहे. समान वायूच्या सहाय्याने मन त्वचेपर्यंत येऊन स्पर्श विषय भोगते. शितोष्ण स्पर्श जाणवला तर हाताचा उपयोग पंखा हलविणे किंवा पांघरूण घेणे असा केला जातो.

तिसऱ्या अडव्या रांगेत बुद्धी, नेत्र, उदान, पाय आणि रूप ही पाच तत्त्वे दिली आहेत. अपंचीकृत अग्नीच्या सात्त्विक भागापासून बुद्धी आणि नेत्र, राजस भागापासून उदान आणि पाय व तामस भागापासून रूप विषय आला आहे. बुद्धी उदान वायूच्या सहाय्याने नेत्रातून रूपापर्यंत जाऊन रूप विषय भोगते. पदार्थाचे रूप आवडल्यास त्या दिशेने चालण्यास पायांचा उपयोग होतो.

चवथ्या अडव्या रांगेत चित्त, जीभ, प्राण, जननेंद्रिय आणि रस ही पाच तत्त्वे आली आहेत. अपंचीकृत जलाच्या सात्त्विक भागापासून चित्त आणि जीभ, राजस भागापासून प्राण आणि जननेंद्रिय आणि तामस भागापासून रस विषय आला आहे. चित्त हे प्राणाच्या सहाय्याने जीभेपर्यंत वाहत येते व कडू, आंबट इत्यादी रसांचा स्वाद घेते. जननेंद्रियातून वीर्य आणि मूत्र स्त्रवतात.

कोष्टकाच्या पाचव्या अडव्या रांगेत अहंकार, नाक, अपान, गुद आणि गंध ही तत्त्वे आली आहेत. अपंचीकृत पृथ्वीच्या सात्त्विक भागापासून अहंकार, नाक, राजस भागापासून अपान, गुद आणि तामस भागापासून गंध विषय आलेला आहे. अहंकार हा अपान वायूच्या सहाय्याने नाकापर्यंत वाहत येतो व गंधविषय भोगतो. गुदातून पृथ्वीतत्त्वप्रधान मलाचे विसर्जन होते.

स्थूल देह, इंद्रिये आणि इंद्रियांच्या सहाय्यक देवता, प्राण व जीव यांमुळे जी क्रिया होते, त्या क्रियेच्या पोटात कर्माची उत्पत्ती होते. कर्म हे धर्मरूप अथवा अधर्मरूप असते. त्यामुळे पुण्य अथवा पाप उत्पन्न होते. पुण्याचे फल सुख आणि पापाचे फल दुःख मिळते. पुण्याच्या अधिक्याने मनुष्याला जन्मानंतर एखादा स्वर्ग प्राप्त होतो. परंतु, पुण्यभोग संपला की त्याचा परत पृथ्वीवर जन्म होतो. पापाधिक्यामुळे नरक मिळतो. पण, तो भोग संपल्यावर तेथूनही त्याचा परत पृथ्वीवर जन्म होतो. पृथ्वीवर जन्म मिळाला तर परत पाप–पुण्य करतो.

**प्रमाण –**

**पुण्य जोडूनियां स्वर्गासी जाइजे । पापाशी सेविजे अधोगती ।।**

**– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा**

पाप–पुण्याच्या भोगासाठी विविध लोकांतील अनेक देह घेणे आणि सोडणे, याला 'संसारचक्र' असे म्हणतात. अनंत जन्मांपासून असेच सुरू आहे. ब्रह्मज्ञानानेच या संसारचक्रातून बाहेर पडता येते. स्वर्गाला जाऊनही पुन्हा जन्म–मरणाचा फेरा मारावाच लागतो. म्हणून, स्वर्ग मिळवणे हे देखील पापच होय.

दैनंदिन व्यवहारात मनुष्य जे काही पाहतो, चाखतो, वास घेतो, स्पर्श करतो, ऐकतो त्यांचे ज्ञान अंतःकरणात होते. जाणणारा, जाणण्यास सहाय्य करणारे आणि जाणण्यायोग्य पदार्थ अशा तिघांना मिळून 'त्रिपुटी' म्हणतात. सत्त्वगुणाने जाणणे होते. अंतःकरण पंचकात सत्त्वगुणाचे प्रमाण सर्वात जास्त आहे, म्हणून जाणणे अंतःकरणाने होते. तसेच पाच ज्ञानेंद्रियांनी जाणण्यास मदत होते. रजोगुणाने जाणण्यास सहाय्य होते. पाच प्राण, पाच कर्मेंद्रिये रजोगुणापासून बनली आहेत म्हणून ते जाणण्यास सहाय्य करतात. पाच विषय हे तमोगुणी आहेत. जाणण्यायोग्य पदार्थ तमोगुणापासून झाले आहेत.

सूक्ष्म देहाची पंचवीस तत्त्वे त्रिगुणांपासून कशी झाली यांचे आणखी मंथन करू. अपंचीकृत एक–एक महाभूतांच्या सत्त्वगुणापासून पाच ज्ञानेंद्रिये बनली आहेत. अपंचीकृत

सर्व पंचमहाभूतांच्या एकत्रित सत्त्वगुणापासून पाच अंतःकरणे झाली आहेत. अपंचीकृत सर्व महाभूतांच्या एकत्रित रजोगुणापासून पाच प्राण झाले आहेत. अपंचीकृत एक–एक महाभूतांच्या तमोगुणापासून पाच विषय झाले.

पूर्वीच्या पंचवीस तत्त्वांव्यतिरिक्त आणखी आठ तत्त्वे सूक्ष्म देहाची आहेत. 'स्वप्न अवस्था', 'कंठस्थान', 'मध्यमा वाचा', 'प्रविविक्त भोग', 'ज्ञानशक्ती', 'सत्त्वगुण', 'उकार मात्रा' आणि 'तैजस' हा अभिमान. **आकृती क्रमांक १९** पहा.

| | | |
|---|---|---|
| आभास | ⟶ | तैजस |
| ॐकाराची मात्रा | ⟶ | 'उ' कार |
| अवस्था | ⟶ | स्वप्न |
| गुण | ⟶ | सत्त्व |
| शक्ति | ⟶ | ज्ञान |
| वाणी | ⟶ | मध्यमा |
| स्थान | ⟶ | कंठ |
| भोग | ⟶ | प्रविविक्त |

आकृती क्रमांक १९ – सूक्ष्मदेहाची आणखी आठ तत्त्वे

'स्वप्न अवस्था' सूक्ष्मदेहाची आहे. जागृती अवस्थेत मनुष्याला जे अनुभव येतात ते अंतःकरणातील चित्तात संस्काररूपाने साठतात. या संस्कारांमुळे झोपेच्या वेळी स्वप्न पडते. 'कंठस्थानात' 'हिता' नावाच्या नाडीत स्वप्नावस्था होते. अंतःकरणामध्ये जो विचार प्रवाह असतो, तिला 'मध्यमा वाणी' म्हणतात. त्यालाच आपण मनातल्या मनात बोलणे म्हणतो. स्वप्नातील प्रपंचामध्ये सुख–दुःखाचा जो सूक्ष्मभोग होतो, त्याला 'प्रविविक्त भोग' म्हणतात. ज्या शक्तीने स्वप्नपदार्थ जाणले जातात, त्यास 'ज्ञानशक्ती' म्हणतात. स्वप्नात विषयांचे ज्ञान असते पण कर्म (क्रिया) घडत नाही. म्हणून स्वप्नावस्थेचा 'सत्त्वगुण' आहे. ॐकाराच्या साडेतीन मात्रांपैकी 'उ' ही मात्रा स्वप्नात असते. आत्म्याचा प्रकाश अंतःकरणातून वाहू लागतो, तेव्हा त्याला 'आभास' असे म्हणतात. स्वप्नातील आत्म्याचा जो आभास असतो, त्याला 'तैजस' असे म्हणतात. स्वप्नातील सुख–दुःखांचा भोग घेणारा 'तैजस' हा अभिमान असतो.

साधकाने हे लक्षात घ्यावे की सूक्ष्मदेहाच्या तेहेतीस तत्त्वांना तो साक्षी आहे. तो स्वतः आत्मा असून सूक्ष्मदेह हा जड आहे. सुख, दुःख, काम, क्रोध, लोभ, मोह, स्पृहा, दया, पाप, पुण्य इत्यादी सूक्ष्मदेहाचे असंख्य धर्म आहेत. 'मी आत्मा आहे, सूक्ष्मदेह आणि त्यांचे धर्म मी नाही' असा विचार साधकाने सतत करावा.

*****

## चिंतन क्रमांक – ८
## कारणदेहाचे आणि महाकारणदेहाचे अवयव

मनुष्याचा तिसरा देह म्हणजे 'कारणदेह' होय. कारणदेहाला 'अज्ञान देह', 'अज्ञान' किंवा 'अविद्या' असेही म्हणतात. स्थूल आणि सूक्ष्मदेहांचे असंख्य धर्म आहेत. परंतु, अज्ञान देहाचा प्रामुख्याने एकच धर्म आहे आणि तो म्हणजे, 'मला आत्म्याचे ज्ञान नाही' असे वाटणे. या कारणदेहापासून सूक्ष्म आणि स्थूलदेह आले आहेत.

प्रमाण –

**शरीरद्वय कारणम् आत्मा अज्ञानम् ।**

– श्री आद्य शंकराचार्यकृत पंचीकरण

अनंत काळापूर्वी जीव ब्रह्मच होता. केव्हातरी मूळ अज्ञानाचा स्वीकार करण्यात आला. त्यातून सूक्ष्म आणि स्थूलदेह झाले. त्यामुळे जीव स्वतःचे मूळस्वरूप विसरून प्रपंचामध्ये गुरफटला आणि त्याने चौऱ्याऐंशी लक्ष योनींचा गरका पाठीशी लावून घेतला.

'सुषुप्ती' ही कारणदेहाची अवस्था आहे. कारणदेहाचे स्थान–'हृदय', वाणी–'पश्यंती', भोग–'आनंद', शक्ती–'द्रव्य', गुण–'तम', ॐकाराची 'म' मात्रा आणि अभिमान–'प्राज्ञ' आहे. 'सुषुप्ती' म्हणजे गाढ झोप. ज्या अवस्थेत जागृती आणि स्वप्नप्रपंच अजिबात अनुभवास येत नाहीत त्या अवस्थेस 'सुषुप्ती' म्हणतात. 'सुषुप्ती' अवस्थेत मनुष्याचे शरीर निश्चल असते. मनुष्याला सुषुप्तीत सुखाचा अनुभव असतो. कारणदेहाचे स्थान हृदय आहे. साधारण मनुष्य ज्याला हृदय समजतो, त्या स्थूलदेहातल्या हृदयाशी या हृदयाचा काही संबंध नाही.

अज्ञानाला विपर्यय किंवा भ्रम असेही म्हणतात. कारणदेहात आनंदभोग होतो. एखाद्या मनुष्याला लॉटरीचे बक्षीस मिळाल्याची माहिती प्रथम मिळते तेव्हा त्याला तीव्र आनंद होतो. तो अनुभव कारणदेहात होतो. आनंद 'प्रिय', 'मोद' आणि 'प्रमोद' या तीन प्रकारे होतो. आवडता पदार्थ पाहिल्याने जो आनंद होतो, त्याला 'प्रिय' म्हणतात. आवडणारा पदार्थ प्राप्त झाल्याने जो आनंद होतो, त्याला 'मोद' म्हणतात आणि आवडता पदार्थ भोगल्याने जो आनंद होतो, त्याला 'प्रमोद' म्हणतात. सुषुप्ती अवस्थेत जो आनंदभोग होतो तो स्वप्नातल्या आणि जागृतीतल्या पदार्थांशिवाय होतो.

जेव्हा एक अवस्था असते तेव्हा बाकी दोन अवस्था नसतात. जेव्हा सुषुप्ती अवस्था असते तेव्हा स्वप्न आणि जागृती या अवस्था नसतात. सुषुप्तीतून स्वप्नावस्था येते व स्वप्नावस्थेतून जागृतावस्था येते. कारणातून सूक्ष्मदेह आणि सूक्ष्मदेहातून स्थूलदेह येतो.

सुषुप्तीतील शक्तीला 'द्रव्य शक्ति' म्हणतात. कारणदेहाचा 'तमोगुण' आहे. सुषुप्तीत ब्रह्माचे भान नसते व स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचेही भान नसते म्हणून कारणदेहाचा तमोगुण आहे. सुषुप्तीत ॐकाराची 'म'कार मात्रा असते. सुषुप्तीत आत्म्याचा जो प्रकाश कारणदेहात असतो त्याला 'प्राज्ञ' नावाचा आभास म्हणतात. प्राज्ञ म्हणजे प्र+अज्ञ. प्रकर्षेण अज्ञ. म्हणजेच घनअज्ञान. सुषुप्तीत स्थूल, सूक्ष्मप्रपंचाचे ज्ञान नसते व ब्रह्मस्वरूपतेचाही निश्चय नसतो, म्हणून त्यास 'घनअज्ञान' असे म्हणतात. परंतु, अज्ञानाने आवृत्त असलेला आत्म्याचा आनंद सुषुप्तीत असतो आणि त्या आनंदाचा भोग घेणारा 'प्राज्ञ' असतो. **आकृती क्रमांक २०** पहा.

| | | |
|---|---|---|
| आभास | ⟶ | प्राज्ञ |
| ॐकाराची मात्रा | ⟶ | 'म' कार |
| अवस्था | ⟶ | सुषुप्ती |
| गुण | ⟶ | तम |
| शक्ति | ⟶ | द्रव्य |
| वाणी | ⟶ | पश्यंती |
| स्थान | ⟶ | हृदय |
| भोग | ⟶ | आनंद |

आकृती क्रमांक २० – कारणदेहाची आठ तत्त्वे

जीव जेव्हा सुषुप्तीत असतो तेव्हा त्याचा स्थूलदेह निश्चल असतो. परंतु, त्याचा श्वासोच्छवास, अन्नाचे पचन इत्यादी प्राणाचे कार्य सुरूच राहतात. सुषुप्तीत सुख असते आणि त्या सुखाचा भोग 'प्राज्ञ' हा आत्म्याचा आभास घेतो. झोपेतून उठल्यावर मनुष्य म्हणतो, 'मी सुखाने झोपलो होतो. मला बाकी काही माहीत नव्हते'. पण, मग झोपेतच मनुष्य, 'मी सुखाचा अनुभव घेत आहे' असे का सांगत नाही? सुषुप्तीत स्थूल आणि सूक्ष्मप्रपंच नसतो. स्थूलदेहातील वैखरी वाणी, जीभ त्या ठिकाणी नसते. त्याचप्रमाणे सूक्ष्मदेहातील ज्ञानेंद्रियेही सुषुप्तीत नसतात. या कारणासाठी सुषुप्तीतल्या सुखाचा अनुभव सुषुप्तीत बोलून दाखवता येत नाही.

'मी स्वतःला ओळखत नाही. मी माझे मलाच जाणत नाही' असे वाटणे म्हणजे अज्ञान. मनुष्य हा स्वतः आत्माच असल्यामुळे ज्याप्रमाणे आत्मा स्थूलदेह आणि सूक्ष्मदेहांपासून वेगळा आहे, त्याचप्रमाणे आत्मा कारणदेहाचा म्हणजे अज्ञानाचाही द्रष्टा आहे. मनुष्य 'मी अज्ञानी आहे' असे म्हणतो. 'मी स्वतः अज्ञान आहे' असे म्हणत नाही. यावरून आत्मा अज्ञानापासून पृथक आहे हे लक्षात येते. 'मी आत्म्याला जाणत नाही' ही सुद्धा जाणीव आहे, ज्ञान आहे. मनुष्य ज्ञानरूप आत्मा आहे.

या अज्ञानामुळेच मनुष्याचा वारंवार जन्म होतो. या अज्ञानाला 'मूळ अज्ञान' असे म्हणतात. सद्गुरूंच्या कृपेने ब्रह्मज्ञान होऊन मूळ अज्ञान नष्ट होते. म्हणजे कारणदेह नष्ट होतो. त्यामुळे जन्म-मरणाचे चक्र बंद होते. जगातील ९९.९९ टक्क्यांपेक्षा जास्त लोक 'मूळ अज्ञान' घालविण्याच्या ऐवजी 'तूळ अज्ञान' घालवीत बसतात. स्थूल, सूक्ष्म सृष्टीतील पदार्थांच्या अज्ञानाला 'तूळ अज्ञान' म्हणतात. कला, वाणिज्य, अभियांत्रिकी, गणित, स्थापत्यशास्त्र, पाकशास्त्र, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, वैद्यकशास्त्र, समाजशास्त्र, व्यवस्थापन इत्यादी ज्या ज्ञानाच्या असंख्य शाखा आहेत, ते सर्व 'तूळ ज्ञान' आहे. या ज्ञानाने मनुष्यजन्म सार्थकी लागत नाही. एकमेव ब्रह्मविद्या ज्या मनुष्यामध्ये फलीभूत होते त्याचेच 'मूळ अज्ञान' जाते. तोच कृतार्थ होतो.

मनुष्याचा चौथा देह म्हणजे महाकारणदेह. महाकारणदेहाला 'ज्ञान देह' असेही म्हणतात. महाकारणदेहाचा एकच धर्म आहे – 'मी ज्ञानी आहे' असे वाटणे. 'कारण, सूक्ष्म, स्थूल' देहांच्या प्रवृत्ती व निवृत्तीचे कारण आहे म्हणून या देहाला 'महाकारण' असे नाव देण्यात आले आहे. साधकाला श्रीगुरूंचा लाभ झाल्यावर श्रीगुरूंनी जर त्याला 'तू ब्रह्म आहेस' असा बोध केला तर साधकाचा 'मी स्वतःच सर्व प्रपंचांना साक्षी आहे. मी नाम-रूपातीत ब्रह्म आहे' असा निर्णय होतो. असा साधक स्थूल, सूक्ष्म, कारणदेहांना महत्त्व देत नाही. तो स्वतःला 'वर्णाश्रमी, काळा, ठेंगणा' किंवा 'सुखी, दुःखी, पापी, पुण्यवान' अथवा 'मी अज्ञानी' असे समजत नाही. चार देहांपैकी महाकारणदेहाची सूक्ष्मता सर्वात जास्त आहे.

महाकारणदेहाची आठ तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत. अवस्था-'तुर्या', स्थान-'मूर्धनि', वाणी-'परा', भोग-'आनंदावभास', शक्ती-'इच्छा', गुण-'शुद्धसत्त्व', ॐकाराची 'अर्धी मात्रा' आणि अभिमान-'प्रत्यगात्मा' आहे. **आकृती क्रमांक २१** पहा.

| | | |
|---|---|---|
| आभास | ⟶ | प्रत्यगात्मा |
| ॐकाराची मात्रा | ⟶ | अर्धी |
| अवस्था | ⟶ | तुर्या |
| गुण | ⟶ | शुद्ध सत्त्व |
| शक्ति | ⟶ | इच्छा |
| वाणी | ⟶ | परा |
| स्थान | ⟶ | मूर्धनि |
| भोग | ⟶ | आनंदावभास |

आकृती क्रमांक २१ – महाकारणदेहाची आठ तत्त्वे

'तुर्या–तुरीय' म्हणजे चौथी. जागृती, स्वप्न, सुषुप्ती या तिघांहून भिन्न अशी चौथी अवस्था 'तुर्या' ही महाकारणदेहाची आहे. तीन अवस्थांच्या अपेक्षेने 'तुर्या' नाव आले. डोळ्यांच्या दोन भुवया आणि नाकाचा अग्रभाग हे तीन ज्याठिकाणी मिळतात त्या ठिकाणी कपाळाच्या आतील बिंदूला 'मूर्धनि' स्थान म्हणतात. हे महाकारणदेहाचे स्थान आहे. महाकारणदेहाची 'परा' वाणी आहे. मनुष्य जो शब्द बोलतो त्या शब्दाची सूक्ष्म–अतिसूक्ष्म पहिली अवस्था म्हणजे 'परा' वाणी होय. हीच वाणी पुढे कारणदेहात पश्यंती, सूक्ष्मदेहात मध्यमा आणि स्थूलदेहात वैखरी रूपाने व्यक्त होऊन शब्दाचा उच्चार होतो. अनंत जन्मांपासून असंख्य सुख–दुःख जीवाने भोगलेली असतात. श्रीगुरूंच्या बोधाने जेव्हा साधक महाकारणावर जातो तेव्हा, 'मी ज्ञानी आहे' असा निर्णय होऊन, 'मी धन्य झालो. माझी सुख–दुःखे निवृत्त झाली' या समजुतीने त्याला अतिशय आनंद होतो, त्याच्या या भोगाला 'आनंदावभास' भोग म्हणतात. त्यानंतर साधक वारंवार 'मी ब्रह्मच आहे' याच निर्णयावर राहण्याचा प्रयत्न करतो, इच्छा करतो. ज्या शक्तीने हे होते तिला 'इच्छा' शक्ती म्हणतात. ॐकाराची 'अर्धी मात्रा' महाकारणदेहाची आहे. महाकारणदेहाचा 'शुद्धसत्त्व' गुण आहे. सत्त्वगुणाने आचार–विचार चांगले होतात. ब्रह्मज्ञानासाठी त्याही पलीकडचा गुण म्हणजे 'शुद्धसत्त्व' गुण उपजणे गरजेचे असते. ज्या गुणामध्ये रज आणि तम गुणांचे अंश संपतात, त्या गुणाला 'शुद्धसत्त्व' गुण असे म्हणतात. ज्याच्यामध्ये शुद्धसत्त्व गुण येतो त्याच्या समक्ष सात्त्विक, राजसी किंवा तामसी घटना घडल्या तरी तो विचलीत होत नाही.

प्रमाण –

**इंद्रियवर्गे दाखविलिया । विरुद्धा अथवा भलेया ।**
**विस्मयो कांहीं केलिया । नुठी चित्तीं ।।७८।। अध्याय १६**

– श्रीज्ञानेश्वरी

साधकात 'शुद्धसत्त्व' गुण आला तरच ब्रह्मज्ञान अनुभवण्याची पात्रता त्याच्यामध्ये येते.

आत्म्याचा प्रकाश महाकारणदेहात येतो, तेव्हा त्या आभासाला 'प्रत्यगात्मा' म्हणतात. 'प्रत्यक् आत्मा' म्हणजे 'आत असलेला, आत्म्याच्या अगदी जवळचा'. 'प्रत्यगात्मा' हा आभास आहे, मूळ आत्मा नव्हे. तुर्या अवस्थेत 'प्रत्यगात्मा' या आभासाने साधकाला 'मी ज्ञानी आहे' असे वाटते. असा निर्णय त्याच्या दिवसाच्या चोवीस तासांमध्ये सतत नसतो. जोपर्यंत तो जागा असतो तोपर्यंतच 'मी ज्ञानी आहे' असा निर्णय असतो. आत्मा महाकारणदेहाच्याही पलीकडे आहे. मनुष्य हा आत्मा असून तो महाकारणदेहाचाही द्रष्टा–साक्षी आहे.

अशाप्रकारे, आपण चार देहांचे अवयव कोणते ते पाहिले. चारही देहांना रूप, नाव आहे. चारही देह जड आणि मर्यादित आहेत. आत्मा हा चेतन आहे. आत्मा हा रूपरहित आणि

चारही देहांत व्याप्त आहे. जेथे सूक्ष्म, कारण आणि महाकारणदेह डोळ्यांना दिसत नाही तेथे आत्मा डोळ्यांनी कसा दिसेल? 'इंद्रियांना आत्मा कळावा' हा चुकीचा समज अनेक साधकांचा असतो. ही चुकीची सवय इंद्रियांच्या संगतीत राहिल्यामुळे अनेक साधकांची असते. आत्मा कुठे जात नाही, कुठून येत नाही. पंचमहाभूतात्मक पदार्थ आत्म्यात कोणत्याच प्रकारचा भेद करू शकत नाहीत. आत्मा काही करत नाही. परंतु, आत्म्यामुळेच चार देहांचे कार्य चालते. विद्युत दिव्याचे प्रकाशणे विद्युत प्रवाहावर अवलंबून आहे. विद्युत प्रवाहच काढून घेतला तर दिव्याचा उपयोग नाही. त्याप्रमाणे आत्मा आहे.



प्रत्येक देहातील किती तत्त्वांचा आपण अभ्यास केला त्याचे रूपक चित्र **आकृती क्रमांक २२** मध्ये दाखविले आहे. चार देहांशी संबंधीत धर्म **आकृती क्रमांक २३** मध्ये दाखविले आहे.

| देह | तत्त्वांची संख्या |
|---|---|
| स्थूल | २५ + ८ |
| सूक्ष्म | २५ + ८ |
| कारण | ८ |
| महाकारण | ८ |

आकृती क्रमांक २२ – चार देहांतील अभ्यासलेली तत्त्वे

महाकारणदेहाचा धर्म  'मी ज्ञानी आहे' हा एकच धर्म

कारणदेहाचा धर्म  'मी अज्ञानी आहे' हा एकच धर्म

सूक्ष्मदेहाचे धर्म  सुखी, दुःखी, पापी, पुण्यवान, क्रोधिष्ट असे असंख्य धर्म

स्थूलदेहाचे धर्म  काळा, ठेंगणा, ब्राह्मण, ब्रह्मचारी असे असंख्य धर्म

आकृती क्रमांक २३ – चार देहांचे धर्म

चार देहांतील वाणी **आकृती क्रमांक २४** आणि चार देहांतील आभास यांचे रूपक चित्र **आकृती क्रमांक २५** मध्ये आहे.




आकृती क्रमांक २४ – चार देहांतील वाणी

आकृती क्रमांक २५ – चार देहांतील आत्म्याचा आभास

**कोष्टक क्रमांक ३ मध्ये प्रत्येक देहाची आठ तत्त्वे दाखविली आहेत.**

| | स्थूलदेह | सूक्ष्मदेह | कारणदेह | महाकारणदेह |
|---|---|---|---|---|
| आभास | विश्व | तैजस | प्राज्ञ | प्रत्यगात्मा |
| ॐकाराची मात्रा | 'अ'कार | 'उ' कार | 'म' कार | अर्धी |
| अवस्था | जागृती | स्वप्न | सुषुप्ती | तुर्या |
| गुण | रज | सत्त्व | तम | शुद्ध सत्त्व |
| शक्ति | क्रिया | ज्ञान | द्रव्य | इच्छा |
| वाणी | वैखरी | मध्यमा | पश्यंती | परा |
| स्थान | नेत्र | कंठ | हृदय | मूर्धनि |
| भोग | स्थूल | प्रविविक्त | आनंद | आनंदावभास |

कोष्टक क्रमांक ३ – चार देहांच्या आठ तत्त्वांचे कोष्टक

भगवंत म्हणजेच आत्मा. भगवंत, देव, आत्मा हे एकार्थवाचक शब्द आहेत. आपण आत्मा आहोत. देव म्हणजेच आत्मा असा निश्चय होणार नाही तोपर्यंत आपल्याला फिरावे लागेल. ज्या अर्थी हा देह आहे त्या अर्थी आपण करोडो–करोडो वर्षांपासून चौऱ्यांशी लक्ष योनीमधून भटकत आलो आहोत. देवाचा यथार्थ निश्चय झाला नाही तर पुढेही असेच फिरावे लागेल. कारणदेहामध्ये म्हणजे अज्ञानामध्ये अनंत जन्म देण्याचे सामर्थ्य आहे.



चौऱ्यांशी लक्ष योनींचे संस्कार अतिशय सूक्ष्म अवस्थेत सूक्ष्मदेहात आहेत. चौऱ्यांशी लक्ष प्राण्यांचे मुख्य चार प्रकार आहेत. 'जरायुज(जारज)' – पोटातून जन्म होणारे म्हणजे मनुष्य, गाय इत्यादी. 'अण्डज(मणिज)' – अंड्यापासून निर्माण होणारे जसे कोंबडी, बदक इत्यादी पक्षी. 'उद्‌भिज' – जमिनीतून वर येणारे म्हणजे गहू, तांदूळ, ऊस इत्यादी वनस्पती. 'स्वेदज' – ओलावा आणि उष्णतेपासून उत्पन्न होणारे अनेक किडे. उदाहरणार्थ – उवा, पावसाळ्यात गरमीमुळे तयार होणारे किडे इत्यादी. या चार प्रकारचे मिळून चौऱ्यांशी लक्ष योनी आहेत. त्यांचे संस्कार अतिसूक्ष्म रूपात सूक्ष्मदेहातील चित्त या अवयवात आहेत. चित्त हे कारणदेहाला एकदम जवळचे आहे. चित्त हे कारणदेह आणि सूक्ष्मदेह यांच्या मर्यादारेषेवर आहे असे म्हणायलाही काही हरकत नाही. **आकृती क्रमांक २६** पहा.




**आकृती क्रमांक २६– अनेक जन्मांचे संस्कार सूक्ष्मदेहातील चित्तात सूक्ष्मरूपाने असतात**

श्रीगुरू जेव्हा साधकाला 'तत्त्वमसि' महावाक्याचा बोध देतात तेव्हा ब्रह्मज्ञान फलीभूत होऊन कारणदेह नष्ट होतो. सूक्ष्मदेहातील संस्कार भाजलेल्या 'बी' प्रमाणे निष्फळ होतात आणि स्थूलदेह प्रारब्ध कर्म शिल्लक असेपर्यंत उरतो, याला जीवन्मुक्त स्थिती असे म्हणतात. जीवंत असतांनाच या स्थितीत साधकाने प्रतिष्ठित झाले पाहिजे. 'मेल्यानंतर मुक्ती' – ही गोष्ट वेदांतशास्त्रात मान्य नाही.

प्रमाण –

**मोक्ष मेल्या पाठीं आम्हांसी होईल । ऐसें जे म्हणतील अतिमूर्ख ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

**याची देही याची डोळा । भोगी मुक्तीचा सोहळा ।।**

– श्री संत तुकाराम महाराज क्षेपक अभंग

जोपर्यंत देवाचा अनुभव येणार नाही तोपर्यंत साधन करत राहावे लागेल. देव डोळ्यांनी दिसत नाही म्हणून देव नाही का? देव आहे. साधूंची तशी अनुभूती आहे आणि शास्त्रातही तेच लिहिले आहे. भगवंत हा एकच आहे व तो म्हणजे आत्मा. भ्रमणदूरभाषयंत्रातून आपण दूर अंतरावर असलेल्या लोकांशी आवाजाच्या माध्यमातून संपर्क साधतो. त्या यंत्राला कार्यान्वित करण्यासाठी ज्या सूक्ष्म लहरी वातावरणात असतात त्या लहरी डोळ्यांनी दिसत नाहीत. परंतु, त्या लहरींच्या आधारेच भ्रमणदूरभाषयंत्र काम करते. त्याप्रमाणे, आत्मा डोळ्यांनी दिसत नाही. आत्मा सर्वत्र व्यापक आहे. देहांचे कार्य कोणाच्या आधारे चालते? नदीतील पाणी कसे वाहते? पृथ्वी कोणाच्या आधारे आहे? हे सर्वच भगवंताच्या म्हणजे आत्म्याच्या आश्रयाला आहेत. भ्रमणदूरभाषयंत्राचे बटन दाबल्याने त्याचे कार्य वातावरणातल्या लहरींच्या आधारे सुरू होते. त्याप्रमाणे शरीररूपी बटन दाबा, म्हणजे चार देहांची माहिती मिळवून, आत्मा त्यांच्यापासून पृथक कसा आहे याचा स्पष्ट विवेक करून घ्या. अन्यथा फिरत राहावे लागेल. ईश्वर, शास्त्र व श्रीगुरुंना शरण जा. त्यांच्या कृपेने आत्मा हा सर्वव्यापक ब्रह्मच आहे असा अनुभव येतो.

प्रमाण –

**विठ्ठल जळीं स्थळीं भरला । ठाव कोठें नाहीं उरला ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

आत्मा सर्व जीवांमध्ये आहे. पण, मग सर्वांना त्याचा तसा अनुभव का येत नाही? सामान्यरूपाने आत्मा सर्व लोकांमध्ये आहे. परंतु, विशेषरूपाने साधूसंतांनी आत्म्याला जाणले आहे. साधकाने तसाच अनुभव घ्यायचा आहे. अतिशय शुद्धरूपात असलेल्या भिमसेनी कापूरात अग्नी सामान्यरूपाने असतो. कापूर चेतवला की अग्नी प्रकट होतो म्हणजे विशेषरूपाने कळतो. कापूराच्या निमित्ताने अग्नी जळतो. अनात्मपदार्थांनाच महत्त्व देत राहिल्याने मनुष्याचा ज्ञानाग्नी सामान्यरूपाने आहे. श्रीगुरु व शास्त्रकृपेने तो विशेष होतो. म्हणजे आत्म्याची अनुभूती येते. साधकांना हा अनुभव येण्यासाठी 'तत्त्वमसि' महावाक्य अत्यंत महत्त्वाचे आहे. 'तत्त्वमसि' महावाक्याच्या निरूपणाची सुरुवात करण्याआधी मनुष्याला जड पदार्थ कसे कळतात व ब्रह्म कसे कळते हे समजून घ्यावे लागेल. पुढील चिंतनात आपण पदार्थज्ञान होण्याची प्रक्रिया पाहणार आहोत.

*****

## चिंतन क्रमांक – ९
## बाह्य पदार्थज्ञानाची रीत

आपण मागील चिंतनात पाहिले की आत्मा असंग आहे. तो काही करत नाही. शरीर जड आहे. म्हणून शरीरही काही करू शकत नाही. असे असताना मनुष्याचे व्यवहार कसे होतात? पाहणे, ऐकणे, वास घेणे, स्पर्श जाणवणे, स्वाद कळणे हे सर्व कसे होते? हे सर्व 'अंतःकरण वृत्ती' आणि 'चिदाभास' यांच्यामुळे होते. 'वृत्ती', 'चित्' आणि 'आभास' हे शास्त्रीय शब्द आहेत. साधकाने शास्त्रग्रंथांचा अभ्यास सतत करावा व पारिभाषिक शब्द आणि त्या शब्दांचा अर्थ जाणून घ्यावा. पारिभाषिक शब्द आणि वेदांतशास्त्राच्या प्रक्रियांचा वारंवार अभ्यास केल्यानेच ब्रह्मज्ञानाचा बोध दृढ होत जातो, परमार्थाविषयी सर्व संशय कमी होत जातात व 'मी चार देहरूपी प्रपंच नसून आत्माच आहे' अशी खात्री होऊ लागते. कालांतराने आत्म्याचा दृढ, निःसंदेह, अपरोक्ष आणि सहज निश्चय होतो.

एका अभ्यासाप्रमाणे सूक्ष्मदेह अपंचीकृत पंचमहाभूतांचा असून पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच प्राण आणि चार अंतःकरणे मिळून सूक्ष्म देहाची १९ तत्त्वे आहेत. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार ही नावे कार्यभेदानुसार एका अंतःकरणाला येतात. सर्व अवयवांपैकी अंतःकरणामध्ये सत्त्वगुणाचे प्रमाण सर्वात जास्त आहे. ज्याप्रमाणे आरसा अतिशय स्वच्छ असतो त्याप्रमाणे अंतःकरणामध्ये सत्त्व अधिक असल्यामुळे ते स्वच्छ आहे. आरशावर पडलेला प्रकाश परावर्तीत करण्याची शक्ती आरशात आहे. त्याचप्रमाणे आत्म्याचा प्रकाश परावर्तीत करण्याचा सहज स्वभाव अंतःकरणाचा आहे. **आकृती क्रमांक २७** मध्ये प्रकाशाचे स्त्रोत म्हणजे दिवा (आपण दिव्याच्या ऐवजी सूर्यही घेऊ शकतो), आरसा आणि आरशातून परावर्तीत होणारा प्रकाश दाखविला आहे.




आकृती क्रमांक २७– आरसा आणि परावर्तीत प्रकाश

तसे पाहिले तर आत्म्याच्या पुढे कारणदेह (अज्ञान) त्यापुढे सूक्ष्मदेह आणि त्यापुढे स्थूलदेह असा क्रम आहे. परंतु, सध्या आपण आत्मा, सूक्ष्मदेह आणि स्थूलदेह यांचाच विचार पदार्थज्ञानाची प्रक्रिया समजून घेण्यासाठी करू.

आत्म्याचा प्रकाश अंतःकरणावर पडतो, या प्रकाशाला 'साक्षी' असे म्हणतात. अंतःकरणावर आत्म्याचा प्रकाश पडल्यावर अंतःकरणातून पुढे तो वाहायला लागतो, त्याला 'चिदाभास' असे म्हणतात. 'चिदाभास' म्हणजे 'चित्'चा आभास. 'चित्' म्हणजे जाणणे. 'जाणणे' हे आत्म्याचे लक्षण आहे. सोप्या पद्धतीने सांगायचे झाले तर अंतःकरणाच्या पुढे वाहणाऱ्या आत्म्याच्या परावर्तीत प्रकाशाला 'चिदाभास' किंवा 'आत्म्याचा आभास' असे म्हणतात. अंतःकरणाच्या संबंधाने आत्म्याला 'साक्षी' हे नाव आले आहे. आत्मा आणि साक्षी हे एकार्थवाचकच आहेत. परंतु, अंतःकरणाच्या संबंधाने 'साक्षी' म्हटले जाते. अर्थात, आत्मा चेतन आहे म्हणून साक्षीही चेतन आहे. परंतु, अंतःकरणातून परावर्तीत झालेला आत्म्याचा प्रकाश म्हणजे 'चिदाभास' हा विकारी प्रकाश आहे.

'साक्षी' म्हणजे काय? समजा, एका खोलीच्या दारात एक मनुष्य उभा आहे. खोलीच्या आतले व्यवहार तो पाहतो व खोलीच्या बाहेरील व्यवहारही तो पाहतो. दोन्ही व्यवहारांना तो 'साक्षी' असतो. समजा, रात्री दाराच्या उंबरठ्यावर एक दिवा ठेवलेला आहे. दिव्याचा प्रकाश खोलीच्या आत आणि खोलीच्या बाहेरही पसरतो. दिवा दोन्हीकडच्या वस्तूंना साक्षी असतो. त्याप्रमाणे साक्षीच्या एका बाजूस आत्मा आणि दुसऱ्या बाजूस अंतःकरण आहे. या दोघांना हा साक्षी आहे. **आकृती क्रमांक २८** मध्ये आत्मा, साक्षी, अंतःकरण, वृत्ती आणि चिदाभास दाखविले आहेत.




आकृती क्रमांक २८– साक्षी, चिदाभास आणि वृत्ती

अंतःकरणाच्या पुढे चिदाभास वृत्तीतून वाहतो. 'चिदाभासासह वृत्ती' समजण्यासाठी आपण एका लांबट फुग्याचे उदाहरण घेऊ. असे समजा की फुग्यात हवा नाही. आता, जशी जशी त्यात हवा भरण्यात येते तसा तसा तो फुगा लंबायमान होत जातो. हवेच्या ठिकाणी चिदाभास घ्यावा आणि फुग्याच्या ठिकाणी वृत्ती घ्यावी. त्यासाठी **आकृती क्रमांक २९** पाहू. हवेभोवती फुग्याचे वेष्टन असते, त्याचप्रमाणे चिदाभासाभोवती वृत्तीचे वेष्टन असते. हवेमुळे फुगा जसा लंबायमान होत जातो, त्याप्रमाणे वृत्ती चिदाभासासह लंबायमान

होत जाते. वृत्ती अंतःकरणापासून उगम पावते, म्हणून वृत्तीला 'अंतःकरणवृत्ती' असेही म्हणतात. हीच वृत्ती पुढे सूक्ष्मदेहातील ज्ञानेंद्रियांतून, स्थूलदेहातील ज्ञानेंद्रियातून वाहत बाहेर येते व बाहेरच्या पदार्थांना व्यापते. ती वृत्ती त्या पदार्थाच्या आकाराची होते, म्हणून तो पदार्थ अंतःकरणात 'स्फुरतो' म्हणजे 'विशिष्ट आकाराचा पदार्थ' किंवा 'हे काहीतरी' असे ज्ञान अंतःकरणात स्फुरते.






आकृती क्रमांक २९ – चिदाभासासह वृत्तीसाठी फुग्याचे रूपक

स्थूलदेहातील पाच ज्ञानेंद्रियांचेच सूक्ष्मरूप म्हणजे सूक्ष्मदेहातील पाच ज्ञानेंद्रिये. डोळे, कान, नाक, जीभ आणि त्वचा या स्थूलदेहातील पाच ज्ञानेंद्रियांचेच सूक्ष्मरूप म्हणजे चक्षु, श्रोत्र, घ्राण, रसना आणि त्वक् ही सूक्ष्मदेहातील पाच ज्ञानेंद्रिये आहेत. दोन देहातील ही इंद्रिये भिन्न नसून एकच आहेत. म्हणजे एकूण दहा नसून पाचच आहेत. हे लक्षात ठेवावे. अंतःकरण देखील सूक्ष्मदेहाचा अवयव आहे. पदार्थज्ञान कसे होते ते कळण्यासाठी, पाहण्याची प्रक्रिया कशी होते त्याचा प्रथम अभ्यास करू.

समजा, एका मनुष्यासमोर घट (कलश) ठेवला आहे. त्याला घटाचे ज्ञान कसे होते? घटावर दोन आवरणे असतात. पहिले आवरण अंधाराचे आणि दुसरे आवरण त्या पदार्थाच्या अज्ञानाचे होय. पदार्थ अंधारात असेल तर दिसत नाही. म्हणून पदार्थावर प्रकाश पाहिजे. मग तो सूर्याचा, चंद्राचा असो अथवा मानवनिर्मित दिव्याचा असो. प्रकाशाने पदार्थावरील अंधकाराचे आवरण दूर होते. पदार्थ पहाण्यासाठी मनुष्याचे डोळेही दोषरहित असावे लागतात. मनुष्याचे लक्षही त्या पदार्थाकडे असावे लागते. म्हणजे या उदाहरणात मनुष्याचे लक्षही घटाकडे असावे लागते. वृत्तीतील चिदाभास एका वेळी एकाच पदार्थाला प्रकाशन करतो. मनुष्याची वृत्ती घटाकडेच लागलेली असावी अन्य पदार्थांकडे नाही आणि आतल्या आत अन्य गोष्टींचा विचारही नसावा. आत्म्याचा प्रकाश अंतःकरणावर पडतो. अंतःकरणातून चिदाभास वृत्तीतून वाहायला लागून प्रथम सूक्ष्म देहांतील चक्षुरिंद्रिय–ज्ञानेंद्रियातून वाहतो. पुढे तोच चिदाभास वृत्तीसह 'स्थूलदेहातील डोळा' या ज्ञानेंद्रियातून वाहून बाहेर येतो व बाहेरील घटापर्यंत जातो. वृत्ती घटाच्या आकाराची होते व त्यामुळे घटावरील अज्ञानाचे आवरण दूर होते. चिदाभासही घटाच्या आकाराचा होऊन 'छोटे तोंड आणि मोठे पोट असलेला पदार्थ' अशी जाणीव करून देतो. पटकन लगेच वृत्ती माघारी

अंतःकरणात येऊन चित्तातील असंख्य संस्कारांपैकी घटाच्या संस्कारासोबत जुळल्यावर 'हा घट' असे निश्चयपूर्वक ज्ञान अंतःकरणात होते. हे **आकृती क्रमांक ३० मध्ये** दाखविले आहे. ही प्रक्रिया अतिशय कमी वेळात–एका क्षणापेक्षाही अत्यंत कमी वेळात होते. ओळखीचे पदार्थ पाहण्याची हीच रीत असते. अनोळखी पदार्थ प्रथमच समोर आला तर 'हा कोणता तरी पदार्थ' एवढेच कळते. कारण त्या पदार्थाचे संस्कार अंतःकरणात नसतात.






आकृती क्रमांक ३० – बाह्य पदार्थ दिसण्याची प्रक्रिया

याच प्रकारच्या प्रक्रियेने ऐकणे, वास घेणे, स्पर्श जाणवणे आणि स्वाद कळणे होते. ऐकण्याची प्रक्रिया **आकृती क्रमांक ३१** मध्ये दाखविली आहे.




आकृती क्रमांक ३१ – बाह्य पदार्थ ऐकण्याची प्रक्रिया

आपल्यापासून काही अंतरावर असलेल्या लोकांचा आवाज, पशू–पक्ष्यांचा आवाज, घंटेचा आवाज इत्यादी आपल्याला कसे ऐकू येतात ? समजा, आपल्यापासून काही अंतरावर मंदिरात घंटा वाजत आहे. आत्म्याचा प्रकाश अंतःकरणावर पडतो, अंतःकरणातून चिदाभासासह वृत्ती वाहू लागते. ती वृत्ती सूक्ष्मदेहातील श्रवणेंद्रियातून वाहून, स्थूलदेहातील कान या ज्ञानेंद्रियातून बाहेर पडते आणि वातावरणातील घंटेच्या ध्वनीलहरींच्या आकाराची होते. तेव्हा वृत्तीतील चिदाभासाला 'कसला तरी आवाज' येवढेच कळते. पटकन लगेच वृत्ती माघारी अंतःकरणात येते. चित्तातील असंख्य संस्कारांपैकी 'घंटेचा आवाज' असे निश्चयपूर्वक ज्ञान अंतःकरणात होते. हे सर्व अतिशय कमी वेळात होते.

अशाप्रकारे, मनुष्याच्या ज्ञानेंद्रियांतून आत्म्याचा परावर्तीत प्रकाश म्हणजे चिदाभास बाहेर पडून पाच प्रकारचे विषय जाणतो. वृत्ती एका वेळेस एकाच विषयाला जाणते. समजा, एखादा मनुष्य दुसऱ्या मनुष्याकडे पाहत आहे आणि त्याचे बोलणे ऐकत आहे. कोणाला वाटेल की तो एकाच वेळी पाहतो आणि ऐकतो. परंतु, तसे नसते. वृत्ती अल्पकाळ डोळ्यातून बाहेर येऊन माणसाला पाहते आणि लगेच अंतःकरणात परत जाते. मग लगेच वृत्ती अंतःकरणातून पुन्हा बाहेर कानातून येते आणि शब्द ऐकणे होते. त्यानंतर परत पाहणे, परत ऐकणे असे अत्यंत अल्प वेळेत होत राहते. कारण वृत्ती एका वेळेस एकाच विषयास जाणते. समजा, फुलाच्या पाच पाकळ्या एकावर एक रचल्या आणि त्यातून सुई घातली तर पहिल्या पाकळीचा छेद केल्याशिवाय दुसऱ्या पाकळीचा छेद होत नाही. सुई एकदमच पाच पाकळ्यातून बाहेर पडत नाही. पहिल्या पाकळीचा छेद, मग दुसऱ्या पाकळीचा छेद याप्रमाणे जाऊन पाचव्या पाकळीतून बाहेर पडते. त्याप्रमाणे, एका पाठोपाठ अनेक वृत्ती उठतात व पदार्थांना व्यापून त्यांचे ज्ञान करून पुन्हा मावळतात. त्यांचा अत्यंत वेग असल्यामुळे आपल्याला एकाच वेळेस पाहणे, ऐकणे इत्यादी केल्यासारखे वाटते.

लोकांची गर्दी असलेल्या बाजारात एक मनुष्य उभा होता. तो आतल्या आत कोण्या गोष्टीचा विचार करीत होता म्हणजे त्याची वृत्ती आतल्या आतच होती. त्याचवेळेस त्याच्या समोरून त्याचा मित्र गेला. पण, मनुष्याची वृत्ती आतमध्येच असल्यामुळे समोरून गेलेल्या मित्राकडे त्याचे लक्ष गेले नाही. डोळ्यासमोर त्याचा मित्र असूनही त्याच्या वृत्तीने ते ग्रहण केले नाही, कारण त्याची वृत्ती आत होती. वृत्ती एका वेळेस एकच पदार्थ ग्रहण करते. वृत्ती आतील विषयाचे ग्रहण करत असल्यामुळे मित्र समोर असूनही दिसला नाही.

पदार्थज्ञानाच्या प्रक्रियेत तीन गोष्टी दिसून येतात. पदार्थ जाणणारा, पदार्थाला जाणण्यास सहाय्य करणारा आणि प्रत्यक्ष पदार्थ. पदार्थ जाणणाऱ्यास 'ज्ञाता', जाणण्यास सहाय्य होते ते 'ज्ञान' आणि बाह्य पदार्थ म्हणजे 'ज्ञेय'. 'ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय' याला 'त्रिपुटी' असे म्हणतात. पदार्थज्ञान म्हटले की त्रिपुटी येतेच.

सोप्या पद्धतीने समजण्यासाठी 'प्रमाता-प्रमाण-प्रमेय' ही त्रिपुटी बघू. पाहण्याच्या प्रक्रियेत अंतःकरणाशी संबंधीत आभासाला 'प्रमाता' म्हणतात. डोळ्यांशी संबंधीत आभासाला 'प्रमाण' म्हणतात आणि बाह्य पदार्थांशी संबंधीत आभासाला 'प्रमेय' म्हणतात. 'प्रमाता-प्रमाण-प्रमेय' या त्रिपुटीचे रूपक चित्र **आकृती क्रमांक ३२** मध्ये दाखविले आहे. इंद्रियांना 'प्रमाण' असे म्हणतात. अंतःकरणाच्या आत जो आभास आहे, त्यास 'प्रमाता' असे म्हणतात. वृत्तीवाटे आभास अंतःकरणातून वाहू लागतो व पुढे सूक्ष्मदेहातील डोळा, तसेच स्थूलदेहातील डोळा या इंद्रियातून वाहतो. त्यावेळेस त्या आभासाला 'प्रमाण' असे म्हणतात. बाह्य पदार्थांत जे चैतन्य व्याप्त आहे, त्याला 'प्रमेय' असे म्हणतात. आभासासह वृत्ती इंद्रियातून बाहेर पडून पदार्थाच्या आकाराची होते, त्यास 'प्रमा' म्हणतात. जेव्हा प्रमाण आणि प्रमेय यांची एकी होते तेव्हा 'प्रमा' होते. 'प्रमा' म्हणजे प्रमाणापासून उत्पन्न झालेले 'यथार्थ ज्ञान'.




प्रमाता ——→ अंतःकरणातील आभास
प्रमाण ——→ इंद्रियांतील आभास
प्रमेय ——→ घटातील आभास
प्रमा ——→ घटासारखा झालेला आभास

आकृती क्रमांक ३२ – प्रमाता–प्रमाण–प्रमेय त्रिपुटी

वरील अभ्यास स्पष्ट होण्यासाठी एक उदाहरण पाहू. झाडाला पाणी देण्यासाठी झाडाभोवती आळे तयार करण्यात येते. काही अंतरावरील जलाशयातील पाणी आळ्यापर्यंत आणण्यासाठी एक पाट तयार करण्यात येतो. जलाशयातील पाणी पाटातून वाहत जाते आणि आळ्याच्या आकाराचे होते. **आकृती क्रमांक ३३** पहा.




आकृती क्रमांक ३३ – जलाशय–पाट–आळे दृष्टांत

त्याचप्रमाणे, चिदाभासासह अंतःकरणवृत्ती अंतःकरणातून निघून, इंद्रियांद्वारे बाहेर पडून बाह्य पदार्थाच्या आकाराची होते. अंतःकरणातील आभास म्हणजे 'प्रमाता' – दृष्टांतातील 'जलाशयातील पाणी'. इंद्रियांतील आभास म्हणजे 'प्रमाण' – दृष्टांतातील

'पाट'. पदार्थाच्या ठिकाणी जो आभास ते 'प्रमेय' – दृष्टांतातील 'आळे'. पदार्थाच्या आकाराप्रमाणे झालेला आभास म्हणजे 'प्रमा' – दृष्टांतातील 'आळ्याच्या आकाराप्रमाणे असलेले पाणी'. प्रमाता प्रमाणांच्या माध्यमातून प्रमेयांपर्यंत वाहात जातो आणि त्याला प्रमा होते. साक्षी हा स्वयंप्रकाश असून अंतःकरणाच्या पुढे आभासच आहे. अंतःकरणवृत्ती बाहेर घटापर्यंत जाते तेव्हा 'हा पदार्थ' एवढेच जाणले जाते. लगेच वृत्ती प्रमात्यापर्यंत माघारी येते आणि प्रमात्याला 'मी घट जाणला' असे ज्ञान होते. या ठिकाणी 'घट' हे 'ज्ञेय', 'मी' हा 'ज्ञाता' आणि 'जाणला' हे 'ज्ञान'. अशाप्रकारे 'ज्ञाता–ज्ञेय–ज्ञान' ही त्रिपुटी असते.

प्रमात्याच्या ठिकाणी अंतःकरण आणि अंतःकरणातील आत्म्याचा आभास असतो. काम, क्रोध, लोभ, दया, मोह, मद, मत्सर, औदार्य, क्षमा इत्यादी अंतःकरणाचे असंख्य धर्म आहेत. या धर्मांचा आभासाशी निर्माण झालेल्या दृढ संबंधामुळे मनुष्याला 'मी क्रोधिष्ट', 'मी पापी', 'मी दयाळू' इत्यादी वाटते. म्हणजे आत्म्याला अंतःकरण हे विशेषण ठरले. अंतःकरणविशिष्ट आत्म्याला प्रमाता किंवा 'जीव' असे म्हणतात. काम, क्रोधादिक धर्म अंतःकरणाचे आहेत. ते धर्म आत्म्यात मुळीच नाहीत. ज्या मनुष्याला अंतःकरण हे विशेषण ठरलेले असते तो अंतःकरणाच्या धर्मांना स्वतःचे धर्म समजून, 'मी कर्ता', 'मी भोक्ता', 'मी चांगला', 'मी वाईट' इत्यादी समजतो.

विशेषण म्हणजे काय? एका वस्तूचे ज्ञान स्वतःच्या धर्मांप्रमाणे करून देते, त्यास 'विशेषण' असे म्हणतात. एका ठिकाणी घोड्यांचा समूह आहे. त्यापैकी केवळ एकच घोडा संपूर्ण लाल रंगाचा आहे, त्याला आपण 'लाल घोडा' म्हणू. येथे 'लाल' हे विशेषण आहे व घोडा हे विशेष्य आहे. 'लाल' हे स्वतःच्या धर्मानुसार घोड्याबद्दलचे विशेष ज्ञान करून देते. म्हणून लाल हे 'विशेषण' आहे. 'लाल घोडा' हे विशिष्ट आहे.

विशेष्य + विशेषण = विशिष्ट
घोडा + लाल = लाल घोडा

लाल रंग त्या घोड्याला इतर रंगांच्या घोड्यांपासून वेगळे दाखवितो. विशेषण हे आपले धर्म विशेष्यावर चालवून ते लाल आणि घोडा हे दोन्ही पक्के एकरूप आहेत असे दर्शवितो. लाल हे विशेषण त्याचे 'लालपण' हा धर्म घोड्यावर चालवितो. अंतःकरण आत्म्याचे विशेषण ठरणे म्हणजे काय? या ठिकाणी अंतःकरण विशेषण, आत्मा विशेष्य आणि प्रमाता किंवा जीव म्हणजे विशिष्ट.

विशेष्य + विशेषण = विशिष्ट
आत्मा + अंतःकरण = प्रमाता किंवा जीव

अंतःकरण हे विशेषण स्वतःच्या धर्मानुसार आत्म्याची जीव म्हणून ओळख करून देते. सुख, दुःख, पाप, पुण्य इत्यादी असंख्य धर्म अंतःकरण आत्म्यावर चालवते आणि ते त्याचे सर्व धर्म आत्म्याचेच आहेत असे दाखविते. आत्मा आणि अंतःकरण यांची जणू काही

पक्की गाठ बसली आहे, एकरूपता निर्माण झाली आहे. अंतःकरण आत्म्याचे विशेषण ठरले  की आत्म्याला 'प्रमाता' किंवा 'जीव' ही संज्ञा येते. देहधर्मांना आत्म्याचेच समजून जगातील ९९.९९ टक्के लोक व्यवहार करताना दिसतात, म्हणून ते जीव आहेत. परमार्थ करणाऱ्यांपैकी कर्मठ, उपासक आणि योगीही जीव आहेत. अंतःकरणविशिष्ट चैतन्याला 'जीव' असे म्हणतात. देहधर्मांशी त्याचे तादात्म्य असते.

आता उपाधी कशास म्हणतात ते पाहू. जी स्वतः वेगळी राहून ज्याच्या आश्रयाला राहते त्याचे ज्ञान करून देते, तिला उपाधी म्हणावे. उपधेय + उपाधी = उपहित. एका पुरुषाच्या हातात दंड आहे, त्याला 'दंडी पुरुष' असे म्हणू. पुरुष हा उपधेय आहे. 'दंड' ही त्याची उपाधी आहे आणि म्हणून 'दंडी पुरुष' हे उपहित आहे.

उपधेय + उपाधी = उपहित
पुरुष + दंड = दंडी पुरुष

दंड हा काही पुरुषाचा अविभाज्य भाग नाही. दंड ही उपाधी वेगळी राहून ज्याच्या आश्रयाला राहते त्या पुरुषाचे ज्ञान करून देते. तसेच, इतर दंडरहित पुरुषांपासून दंडी पुरुषाला वेगळी करून दाखविते. उपाधी आपले धर्म उपधेयावर चालवत नाही. म्हणजेच या उदाहरणात दंड आपले धर्म पुरुषावर चालवत नाही. दंडआणि पुरुष हे पक्के एकरूप नसतात.

उपधेय + उपाधी = उपहित
आत्मा + अंतःकरण = साक्षी किंवा कूटस्थ

जेव्हा अंतःकरण उपाधी होते तेव्हा काय होते ? अंतःकरण हे आत्म्यापासून वेगळे राहून आत्म्याचे 'साक्षी' किंवा 'कूटस्थ' म्हणून ज्ञान करून देते. अंतःकरण अथवा त्याचे धर्म आत्म्याशी एकरूप राहत नाहीत. अंतःकरण स्वतःचे धर्म आत्म्यावर चालवत नाही. ज्ञानमार्गातील साधकाने योग्य शास्त्राचा अभ्यास केला आणि सद्गुरूंचा बोध त्याला प्राप्त झाला तर 'मी चैतन्यरूप साक्षी असून अंतःकरण इत्यादी प्रपंचाचा द्रष्टा आहे' असा त्याचा निर्णय होतो. अशा साधकाचा देह आणि देहधर्मांशी केवळ संसर्ग असतो, 'तादात्म्य' नसते. म्हणजे एकरूपता नसते. अशा साधकाला अंतःकरण ही उपाधी ठरलेली असते. म्हणून तो साक्षी या निश्चयावर असतो. अंतःकरणोपहित चैतन्य म्हणजे 'साक्षी' होय.

विशेषण आणि उपाधी दोन्ही पदार्थाला इतर पदार्थांपासून वेगळे करून दाखवतात. परंतु, दोघांमध्ये फरक असा की विशेषण आपले धर्म विशेष्यावर चालवते. पण उपाधी आपले धर्म उपधेयावर चालवत नाही.

पुढील चिंतनात आपण पदार्थज्ञानाची प्रक्रिया पुन्हा पाहू. त्यानंतर आत्मज्ञान होण्याची रीत अभ्यासू.

*****

## चिंतन क्रमांक – १०
## आत्मज्ञानाची रीत

आता पदार्थज्ञानाच्या प्रक्रियेकडे परत वळू. पदार्थाचे ज्ञान नेमके होते कोणाला? वृत्ती, चिदाभास, साक्षी की आत्म्याला? वृत्तीला पदार्थ कळतो म्हणावे तर वृत्ती जड आहे. चिदाभास सापेक्षित चेतन आहे. परंतु, तो विकारी प्रकाश आहे, आत्म्याचा प्रकाश अंतःकरणातून परावर्तीत झालेला असतो, त्यास चिदाभास म्हणतात. आत्म्याचा प्रकाश जो अंतःकरणावर पडतो, त्याला साक्षी म्हणतात. साक्षी हा चेतन आहे. साक्षी नसता तर पुढचा व्यवहार झाला नसता. दिवा मालवला तर अंधाऱ्या खोलीतल्या वस्तू दिसणार कशा? म्हणून पदार्थ जाणणारा साक्षी आहे. परंतु, साक्षी हा चैतन्यस्वरूप असून, चैतन्य स्वतः काही करत नाही.

साक्षी हा पदार्थाचे प्रकाशन अंतःकरणवृत्तीने करतो. प्रमाता–प्रमाण–प्रमेय यांना प्रकाशन करणारा साक्षी आहे. अंतःकरणविशिष्ट चैतन्याला 'प्रमाता' असे म्हणतात. अंतःकरणवृत्तीविशिष्ट चैतन्याला 'प्रमाण' असे म्हणतात. तसेच, प्रमेय म्हणजे बाह्य जडपदार्थविशिष्ट चैतन्य होय. प्रमाणांच्याद्वारे वाहत जाऊन पदार्थाच्या आकाराचे झालेले अंतःकरणवृत्तीविशिष्ट चैतन्य म्हणजेच 'प्रमा' होय.

बाह्य पदार्थांच्या ज्ञानासाठी 'वृत्तीव्याप्ती' आणि 'फलव्याप्ती' या दोघांची गरज असते. व्याप्ती म्हणजे विषयत्व. म्हणजेच विषयाला व्यापणे–विषय करणे होय. अंतःकरणातून परावर्तीत होणाऱ्या आत्म्याच्या प्रकाशाला 'चिदाभास' असे म्हणतात आणि या चिदाभासालाच 'फल' असेही म्हणतात.

वरील विषय समजण्यासाठी घट हा बाह्य पदार्थ घेऊ. अंतःकरणवृत्ती चिदाभासासह लंबायमान होऊन घटापर्यंत जाते. वृत्ती घटाच्या आकाराची होऊन घटावरील अज्ञानाच्या आवरणाचा नाश करते. वृत्तीतला चिदाभासही घटाच्या आकाराचा होतो. म्हणजे चिदाभासालाच घटाचा आकार प्राप्त होतो. घटाचे ज्ञान चिदाभासाने होते. म्हणून घटावरील अज्ञानाच्या नाशासाठी वृत्तीचा उपयोग व घटाच्या ज्ञानासाठी चिदाभासाचा उपयोग आहे. म्हणजेच या प्रक्रियेत 'वृत्तीव्याप्ती' आणि 'फलव्याप्ती' या दोघांची गरज आहे.

उदाहरणार्थ – एक अंधारी खोली आहे. त्या अंधाऱ्या खोलीत एक पदार्थ मातीच्या पात्राखाली झाकून ठेवला आहे. तो पदार्थ पाहायचा असेल तर मातीचे भांडे फोडावे लागेल. परंतु, खोलीत अंधारही आहे. पदार्थ दिसण्यासाठी प्रकाशही आवश्यक आहे. म्हणून दिव्याची देखील गरज पडणार. एक मनुष्य हातात काठी आणि दुसऱ्या हातात दिवा घेऊन आला. त्याने काठीने मातीचे पात्र फोडले. त्यामुळे, दिव्याच्या प्रकाशात त्याला पदार्थाचे ज्ञान झाले. सिद्धांतात मातीचे पात्र हे पदार्थावरील 'अज्ञानाचे आवरण' घ्यावे. काठीच्या ठिकाणी 'वृत्ती'

घ्यावी. दिव्याच्या प्रकाशाच्या ठिकाणी 'चिदाभास' घ्यावा. आकृती क्रमांक ३४(अ) आणि आकृती क्रमांक ३४(ब) पहा.



आकृती क्रमांक ३४(अ) – मातीच्या पात्राखालील पदार्थ



आकृती क्रमांक ३४(ब) – आच्छादित पदार्थ जाणण्याची रीत

वृत्तीरूपी काठीच्याद्वारे, अज्ञान आवरणरूपी पात्र फोडल्यावर, चिदाभासरूपी दिव्याने पदार्थ जाणला जातो.

बाह्य पदार्थाचे ज्ञान कसे होते ते आपण पाहिले. 'आतले पदार्थ' कसे जाणले जातात? याचा आता विचार करू. 'आतले पदार्थ' म्हणजे अंतःकरणातील काम, क्रोधादिक असंख्य धर्म. त्याचप्रमाणे सुख, दुःख, संशय, भ्रांती, स्मरण, विपर्यास इत्यादी देखील अंतःकरणात जाणवतात, म्हणून तेही 'आतले पदार्थ' आहेत. हे सर्व शरीराच्या आतच आहेत. म्हणून, अंतःकरणवृत्तीला यांना जाणण्यासाठी बाहेर जाण्याची गरज नाही. अंतःकरणाचे धर्म जाणण्यासाठी देहातील डोळा(चक्षु), कान(कर्ण), नाक(घ्राण), त्वचा(त्वग्), जीभ(रसना) या ज्ञानेंद्रियांची म्हणजेच प्रमाणांचीही आवश्यकता नाही. अंतःकरणाचे धर्म प्रमाणांपासून जाणले जात नाहीत. म्हणून त्यांच्या ज्ञानास 'प्रमा' म्हणता येत नाही. मग हे आतले पदार्थ कुठे जाणले जातात? कोण जाणतो? अंतःकरणाच्या आतही चिदाभास आहे. आंतरपदार्थांना अंतःकरणाच्या आतच चिदाभास जाणतो. अंतःकरणवृत्ती तेव्हा आतल्या आत असते. चिदाभासाला प्रकाशन करणारा साक्षी आहे. म्हणजे, साक्षी हा अंतर्मुख झालेल्या अंतःकरणवृत्तीच्या साहाय्याने काम, क्रोधादिक असंख्य 'आतले पदार्थ' जाणतो. आकृती क्रमांक ३५ पहा.




आकृती क्रमांक ३५ – आंतरपदार्थ जाणण्याची रीत

अशाप्रकारे, आंतरपदार्थ हे 'साक्षीभास्य' आहेत. खरे पाहिले तर बाह्य पदार्थही 'साक्षीभास्य' आहेत. 'भास्य' म्हणजे प्रकाशन करणे. 'साक्षीभास्य' म्हणजे साक्षीने प्रकाशन करणे.

पदार्थज्ञानासाठी अंतःकरणवृत्ती आणि चिदाभास दोघांची गरज असते. जगातील ९९.९९ टक्के लोक पदार्थज्ञानाला खरे समजतात. त्रिपुटीला खरे समजून पदार्थांच्या मागे लागतात. सुख–दुःख भोगतात, मरतात आणि पुनः पुनः जन्म घेतात.

आकृती क्रमांक ३६ पहा.




आकृती क्रमांक ३६ – त्रिपुटीला खरे समजणाऱ्या लोकांची गती

आता आत्मज्ञान कसे होते ते पाहू. जगातील सर्वसामान्य लोकांना, त्याचप्रमाणे वेदांतशास्त्राची माहिती नसणाऱ्या साधकांना केवळ बाह्य पदार्थांचाच दाट परिचय असतो. पुढे काही कारणांमुळे त्यांचे आंतरपदार्थांकडे लक्ष जायला लागते. या कारणांपैकी बाह्य पदार्थांविषयी निर्माण झालेली विरक्ति हे एक कारण होय. साधारणपणे दुःखामुळे विरक्ति येणाऱ्यांची संख्या जास्त आढळते. त्याहीपुढे जर साधकाने वेदांतशास्त्राचे अध्ययन व त्याप्रमाणे आचरण केले तर, अथवा शास्त्राभ्यास अधिक त्याने श्रीगुरुंकडून ब्रह्मज्ञानाचा बोध श्रवण केला तर त्या साधकाची अंतःकरणवृत्ती अंतर्मुख होऊन आत्म्याकडे पाहू लागते. म्हणून, आत्मज्ञान होण्यासाठी साधकाचे अंतःकरण शास्त्र आणि सद्गुरु यांच्या शब्दांनी संस्कारित असावे लागते. आत्मज्ञान होण्याची रीत **आकृती क्रमांक ३७** वरून लक्षात येईल.




आकृती क्रमांक ३७ – आत्मज्ञान होण्याची रीत

अंतःकरणाशी संबंधीत आत्म्याचे दोन प्रकाश असतात. एक म्हणजे 'साक्षी' आणि दुसरा म्हणजे 'चिदाभास' होय. ज्याप्रमाणे आरशातील प्रतिबिंब हे बिंबाला जाणू शकत नाही, त्याप्रमाणे आत्म्याचा प्रतिबिंबित, विकारी प्रकाश म्हणजे 'चिदाभास' हा आत्म्याला जाणू शकत नाही.

**आकृती क्रमांक ३७** मध्ये दाखविल्याप्रमाणे आत्म्यापासून निघून ते अंतःकरणाच्या डाव्या बाजूपर्यंत पडलेल्या प्रकाशास 'साक्षी' म्हणतात. (या ठिकाणी 'डाव्या बाजूस' असे शब्द केवळ विषय नीट समजण्यासाठी योजलेले आहेत. आत्मा हा एकदेशी नसून व्यापक आहे.) शास्त्र, श्रीगुरुंच्या शब्दांनी संस्कारित झालेली, बहिर्मुखतेकडून अंतर्मुखतेकडे आलेली म्हणजेच पाठिमोरी झालेली साधकाची एकाग्र अंतःकरणवृत्ती अंतःकरणाच्या आत डाव्या बाजूस येते आणि साक्षीकडे पाहू लागते.

प्रमाण –

**परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखें ।**
**देखतखेवो वोळखे । म्हणे तत्त्व हें मी ।।३६६।। अध्याय ६**

– श्रीज्ञानेश्वरी

अंतःकरणाच्या डाव्या बाजूस 'साक्षी'च आहे आणि तो चेतन आहे, स्वयंप्रकाश आहे, जाणणारा आहे. या साक्षीशी ही चिदाभासासह असलेली वृत्ती जर एकरूप झाली तर भेद नष्ट होऊन, म्हणजे वृत्तीची निवृत्ती होऊन 'मीच साक्षी आहे' हे तत्त्वज्ञान साधकाला होते. ही आत्मज्ञान होण्याची रीत आहे.

**उदासीनत्वे सति बोद्धा साक्षी** जो स्वतः उदासीन म्हणजे निर्विकार, निर्गुण असून जाणणारा आहे तो 'साक्षी' आहे. त्रिपुटीच्या व्यवहारात तो अडकलेला नाही. त्रिपुटीच्या विकाराने तो मलिन होत नाही. उदासीन असून तो जड नाही. केवळ तोच खरा चिद्रूप आहे. त्याच्या चिद्रूपतेवर इतर सर्व प्रकाशमान वाटतात. तो स्वतः प्रकाशरूप असून इतरांना प्रकाश देतो आणि कोणाकडूनही प्रकाशित केला जात नाही. येथे प्रकाशन करणे म्हणजे जाणणे.

**प्रमाण –**

**साक्षी चेताः केवलो निर्गुणश्च । ६–११**

**– श्वेताश्वतर उपनिषद्**

चिदाभासाला 'फल' असेही म्हणतात. आत्मज्ञान होण्यासाठी फलव्याप्तीची गरज नाही. म्हणजे चिदाभासाची गरज नाही. आत्म्याचा परावर्तीत प्रकाश म्हणजे 'चिदाभास'. चिदाभासाने आत्म्याला जाणणे म्हणजे जणू काही 'पुत्रापासून पित्याची उत्पत्ती' असे होईल. आत्मज्ञानासाठी केवळ वृत्तीव्याप्तीची गरज आहे.

आत्मज्ञानासाठी दृष्टांत – एक अंधारी खोली आहे. खोलीमध्ये एक पेटलेला दीप मातीच्या पात्राखाली झाकलेला आहे. आता तो दीप पाहण्यासाठी काय करावे लागेल? काठीने मातीचे पात्र फोडावे लागेल. काठीने मातीचे पात्र फोडल्याबरोबर आतला पेटलेला दीप दिसणारच. त्या दीपाला पाहण्यासाठी दुसऱ्या चेतविलेल्या दीपाची आवश्यकता नाही.

हे रूपक **आकृती क्रमांक ३८(अ)** व **आकृती क्रमांक ३८(ब)** मध्ये दाखविलेले आहे.




**आकृती क्रमांक ३८(अ) – मातीच्या पात्राखाली चेतविलेला दीप**




आकृती क्रमांक ३८(ब) – आच्छादित दीपाला पाहण्याची रीत

सिद्धांतात दीपाच्या ठिकाणी आत्मा घ्यावा व मातीच्या पात्राच्या ठिकाणी अज्ञान घ्यावे. काठीच्या ठिकाणी अंतःकरणवृत्ती घ्यावी. अंतःकरणवृत्तीरूपी काठीने, अज्ञानरूपी पात्राला फोडून आत असलेला आत्मा स्वतःच प्रकाशमान होतो. ज्याप्रमाणे दीपाला पाहण्यासाठी दुसऱ्या चेतविलेल्या दीपाची आवश्यकता नाही, त्याप्रमाणे आत्म्याला पाहण्यासाठी दुसऱ्या कशाचीही आवश्यकता नाही. म्हणजे स्वयंप्रकाश आत्म्याला जाणण्यासाठी विकारी जो चिदाभास आहे त्याची आवश्यकता नाही.

ही आत्मज्ञान होण्याची रीत आपण पाहिली. परंतु, ब्रह्मज्ञान झाल्याशिवाय साधक मुक्त होऊ शकत नाही. म्हणजे आत्म्याचे ब्रह्माशी असलेले ऐक्य लक्षात आल्याशिवाय साधक मुक्त होऊ शकत नाही. 'व्यष्टी' पातळीवर चैतन्याला 'आत्मा' म्हणतात. 'समष्टी' पातळीवर चैतन्याला 'ब्रह्म' अशी संज्ञा आहे. 'व्यष्टी' म्हणजे एक जीव. 'समष्टी' म्हणजे संपूर्ण चराचर सृष्टी. म्हणजेच पृथ्वी, त्यावरील सर्व जीवमात्र, ग्रह, सूर्य, चंद्र, तारे, स्वर्ग इत्यादी. 'व्यष्टी'ने असलेला आत्मा 'चराचर सृष्टीत' असलेल्या ब्रह्माशी एकरूप आहे. 'आत्मा हा सर्व व्यापक ब्रह्मच आहे' असा निःसंशय निश्चय झाला तरच साधक मुक्त होतो.

★★★★★

## चिंतन क्रमांक – ११
## सत्य–मिथ्या विवेक, सत्तात्रय आणि सहा प्रमाणं

मनुष्याचे चारही देह सत्य नाहीत. मनुष्याचा देह सृष्टीच्या अंतर्गतच येतो. संपूर्ण सृष्टीही सत्य नाही. याचा अर्थ संपूर्ण सृष्टी असत्य आहे, खोटी आहे, असे नव्हे. तर सर्व सृष्टी 'मिथ्या' आहे. 'मिथ्या' म्हणजे भासमान, भासलेले. जे फक्त दिसण्यापुरते खरे असते पण शोधांती खरे ठरत नाही, त्याला 'मिथ्या' असे म्हणतात. केवळ 'ब्रह्म' सत्य असून 'मी ब्रह्म आहे', 'माझा आत्माच ब्रह्म आहे' अशी अनुभूती साधकास आली पाहिजे. मनुष्याला ब्रह्माचे अज्ञान असल्यामुळे त्याला सृष्टी दिसते. सृष्टीतल्या पदार्थांना तो सत्य मानतो. तशीच समजूत पक्की करून त्यांच्यात गुंततो. वास्तविक पाहता 'ब्रह्म' या अधिष्ठानाच्या ठिकाणी जगत् हे मिथ्या भासते. अर्थात मनुष्याला प्रतीत होणारे सुख, दुःख, जन्म, मरण, स्पृहा, दया, अहंकार इत्यादी असंख्य धर्मही मिथ्याच आहेत. मिथ्या म्हणजेच अनिर्वचनीय होय.

जगत् सत्य वाटणे हा मनुष्याचा भ्रम आहे. हा जगताचा भ्रम नेमका होतो कसा? जगताचे हे भ्रमात्मक ज्ञान कसे होते? जगताचे हे ज्ञान निवृत्त कसे होते?

हा विषय समजण्यासाठी एक उदाहरण पाहू. संध्याकाळची वेळ आहे. थोडा वारा वाहत आहे. मंद अंधकार आहे. रस्त्यावर एक दोरी पडलेली आहे.

एक मनुष्य रस्त्याने चालला आहे. मनुष्य जेव्हा दोरीच्या जवळ आला तेव्हा त्याला वाऱ्याने किंचित् हलणारी दोरी साप वाटली. त्यामुळे तो घाबरून पळू लागला. पळताना ठेच लागून पडला. डोक्याला जबरदस्त मार लागल्यामुळे त्याला इस्पितळात भरती करावे लागले आणि दुःख भोगावे लागले. त्याचे असे हाल झाले.

दुसरा मनुष्य त्याच रस्त्याने आला. त्यालाही दोरीच्या ठिकाणी साप दिसला. त्यामुळे तो घाबरून पळू लागला. पळताना वाटेत त्याला कंदील आणि काठी घेऊन जाणारा एक सद्गृहस्थ भेटला. सद्गृहस्थाने त्याला घाबरून पळण्याचे कारण विचारले. तेव्हा त्याने सद्गृहस्थाला त्या सापाबद्दल सांगितले. ते ऐकून सद्गृहस्थ त्या मनुष्याला दोरी पडलेल्या ठिकाणी घेऊन आला. त्याने कंदीलाच्या प्रकाशात तो साप नसून ती दोरीच आहे, असे दोरीचे ज्ञान त्याला करून दिले. मग तो मनुष्य स्वतःवरच हसू लागला. सद्गृहस्थाचे आभार मानून आनंदाने पुढे निघून गेला.

तिसरा मनुष्यही त्याच रस्त्याने आला. त्यालाही दोरीच्या ठिकाणी साप दिसला. परंतु, थोडं शांत राहून बारकाईने त्याने दोरीकडे पाहीलं. साप नसून ती दोरी आहे असा निश्चय करून तो निर्धास्तपणे पुढे निघून गेला.

या दृष्टांतात पहिला मनुष्य म्हणजे मूर्ख व्यक्ती, दुसरा मनुष्य म्हणजे साधक आणि

तिसरा मनुष्य म्हणजे ज्ञानी पुरुष असे घ्यावे. दोरीच्या ठिकाणी 'ब्रह्म' घ्यावे. सर्पाच्या ठिकाणी 'जगत्' घ्यावे आणि वाऱ्याच्या ठिकाणी अविद्या घ्यावी.



साधक मनुष्याचा आपण प्रामुख्याने विचार करू. साधकाला जगत् हे ब्रह्मरूप न कळता, जगत्‌रूपाने दिसते. श्रीगुरुरूपी सद्‌गृहस्थ, ब्रह्मज्ञानरूपी कंदीलाच्या प्रकाशाने 'जगत्' ब्रह्मरूपच आहे असा निश्चय करून देतात.

मनुष्य दोरीजवळ येण्याच्या आधी तेथे सर्प नव्हता. मनुष्य दोरीजवळ आला तेव्हाही प्रत्यक्षात तेथे सर्प नव्हता आणि नंतर सद्‌गृहस्थाने कंदीलाच्या प्रकाशात सर्प नाही असे दाखवून दिले. तिन्ही वेळेस प्रत्यक्षात तेथे सर्प नव्हता.

त्या मनुष्याला दोरीच्या ठिकाणी सर्प दिसला. तो सर्प कसा आहे? तो सर्प 'अनिर्वचनीय' आहे. 'सांगता न येणे' म्हणजे 'अनिर्वचनीय' नव्हे. जो पदार्थ 'आहे' म्हणता येत नाही आणि 'नाही' पण म्हणता येत नाही, त्याला 'अनिर्वचनीय' म्हणतात. रज्जूच्या ठिकाणी सर्प आहे असे म्हणावे तर व्यावहारिक सर्प तेथे नाही. रज्जूच्या ठिकाणी सर्प नाही म्हणावे तर सर्प तर दिसतो. रज्जूवर भासलेला सर्प व्यावहारिक 'सत्' नाही, पण, प्रतीत तर होतो म्हणून 'असत्'ही नाही. व्यावहारिक 'सत्' पदार्थ दिसतो आणि 'असत्' पदार्थ दिसतच नाही. भासलेल्या सर्पाला 'सत्' म्हणता येत नाही आणि 'असत्' म्हणता येत नाही. म्हणजेच हा काहीतरी विलक्षण पदार्थ आहे. म्हणूनच, त्याला 'सतासत् विलक्षण' असे म्हटले जाते. 'सतासत् विलक्षण' पदार्थालाच 'अनिर्वचनीय' किंवा 'मिथ्या' असे म्हणतात.

'अनिर्वचनीय' सर्प उत्पन्न का होतो? संध्याकाळच्या वेळेस धड अंधार नाही आणि धड उजेड नाही अशी अवस्था असते. पदार्थ स्पष्ट दिसण्यासाठी पूर्ण प्रकाश असायला पाहिजे. पण येथे प्रकाश कमी आहे. प्रकाश कमी असल्यामुळे दोरीच्या ठिकाणी असलेल्या अज्ञानाचा अंतःकरणवृत्तीने नाश होत नाही. मनुष्याची अंतःकरणवृत्ती दोरीला व्यापते. पण, रज्जूपहित चैतन्याच्या ठिकाणी असलेल्या अज्ञानाचा नाश न होता, त्या अज्ञानाच्या ठिकाणी विकार उत्पन्न होऊन सर्प दिसतो. सारांश – रज्जूपहित चैतन्याच्या आश्रयाला जी अविद्या आहे तिच्यामुळे सर्प भासतो.

बरे, सर्प जाणणारा कोण आहे? ज्ञान हे अंतःकरणात होते. म्हणून, अंतःकरणोपहित चैतन्याश्रीत अविद्येचा परिणाम सर्पज्ञान आहे. साक्षी म्हणजे अंतःकरणोपहित चैतन्य. या कारणासाठी साक्षीचैतन्याश्रीत अविद्येचा परिणाम 'सर्प जाणणे' आहे. आणखी सूक्ष्मपणे सांगायचे झाले तर रज्जूपहित चैतन्याश्रीत जी अविद्या आहे त्यातील तमोगुणामुळे सर्प उत्पन्न होतो व अंतःकरणोपहित चैतन्याश्रीत अविद्येतील सत्त्वगुणामुळे सर्पाचे ज्ञान होते. **आकृती क्रमांक ३९** मध्ये याचे रूपक चित्र दाखविले आहे. (दोरीचा वरचा भाग भ्रमाने सर्प दिसतो असे दाखवले आहे आणि खालचा भाग भ्रम नाशाने दोरीच दिसते अशा रीतीने दाखवला आहे. एकाच वेळेस दोन्ही दिसत नाहीत. हे लक्षात घ्यावे.)




आकृती क्रमांक ३९ – अनिर्वचनीय सर्पाची उत्पत्ती आणि सर्पज्ञान

चैतन्य सर्वत्र आहे. त्यामुळे, सर्पाचे अधिष्ठान–दोरीशी संबंधीत चैतन्य आणि सर्पज्ञानाचे अधिष्ठान–अंतःकरणाशी संबंधीत चैतन्य असे दोन अधिष्ठान मानता येत नाहीत. चैतन्य एक आहे. जे चैतन्य अंतःकरणाचे अधिष्ठान आहे, तेच चैतन्य पदार्थाचेही अधिष्ठान आहे. साक्षी हाच अंतःकरणवृत्तीच्या माध्यमातून पदार्थापर्यंत येतो. म्हणून, सर्पाचे अधिष्ठान हे साक्षी आहे आणि सर्पाच्या ज्ञानाचे अधिष्ठानही साक्षीच आहे. सारांश – साक्षी चैतन्याश्रीत अविद्येचा परिणाम सर्प आणि सर्पज्ञान आहे.

रज्जूच्या ठिकाणी अनिर्वचनीय सर्प आणि सर्पाचे ज्ञान उत्पन्न होणे यालाच 'भ्रम' किंवा 'अध्यास' असे म्हणतात. जो पदार्थ अनिर्वचनीय असतो तो मिथ्या असतो. मिथ्या पदार्थ सत्य नसतो. अनिर्वचनीय सर्प चावा घेत नाही किंवा पळूनही जात नाही. तरीसुद्धा मनुष्य भीतीपोटी पळून, धडपडून दुःख ओढवून घेतो. प्रत्यक्षात सर्प नाही तरी तो दिसतो. मिथ्या पदार्थाला कल्पित पदार्थ असेही म्हणतात. सर्व जगत् कल्पित आहे. साक्षीचैतन्य या अधिष्ठानावर सर्व जगत् अध्यस्त आहे.

अधिष्ठान कशाला म्हणावे? समजा, एका भिंतीवर एक चित्र काढलेले आहे. भिंत ही अधिष्ठान आणि त्यावरचे चित्र हे अध्यस्त होय. पदार्थ ज्याच्यावर आधारलेला असतो, त्याला अधिष्ठान असे म्हणतात व त्या पदार्थाला अध्यस्त असे म्हणतात. खरेतर, एकमेकांच्या आधाराला अनेक पदार्थ राहतात. परंतु, जो पदार्थ कोणाच्याही आधाराला राहत नाही आणि सर्वांना तोच आधार असतो, त्यालाच अधिष्ठान असे म्हणावे. ब्रह्म हे एकमेव 'अधिष्ठान' आहे. अधिष्ठान ब्रह्मावर कोणताही पदार्थ अध्यस्त असू शकतो.

रज्जूच्या ठिकाणी काही लोकांना सर्प, भू–रेषा, काहींना जलधारा असे काहीही दिसू शकते. जादूगाराच्या खेळाप्रमाणे कल्पितात काहीही शक्य आहे. भासलेल्या भू–रेषा, सर्प, जलधारा इत्यादींचा व्यवहारात काही उपयोग नसतो. या युक्तीनुसारही ते पदार्थ मिथ्या ठरतात. 'मंद अंधकार' या दोषाने सर्प दिसला. त्याप्रमाणे, 'अविद्या' या दोषाने जगत् दिसते. जे दिसते ते सत्यच असते असे नाही. अनिर्वचनीय पदार्थ नसूनही दिसतो. साधकाने शोध घेऊन, 'अविद्या' या दोषाने भासलेले जग दिसते तेव्हाही ते नाहीच असा निश्चय करावा.

अंतःकरण, इंद्रिये आणि बाह्य पदार्थ हे तिन्हीही मिथ्या आहेत. म्हणून, त्रिपुटी मिथ्या आहे. अधिष्ठान ब्रह्म हे सत्य आहे. रज्जूच्या ठिकाणी सर्प वाटणे, म्हणजेच ब्रह्माच्या ठिकाणी जगत् भासणे. रज्जू कळली नाही तर सर्प भासतो. सर्वांनाच जगत् सत्य वाटते याला कारण अविद्या होय. ब्रह्म न कळणे म्हणजेच अविद्या होय. जगत् मिथ्यत्वाचा निश्चय होण्यासाठी श्रीगुरुंची कृपा उपयोगाला येते. श्रीगुरुंच्या कृपेने ब्रह्मज्ञान होते. ब्रह्मज्ञानाने जगत् मिथ्यत्वाचा निश्चय होतो. म्हणून श्रीगुरुकृपा संपादन करावी.

जगत् हा पदार्थ चैतन्याचा 'विवर्त' आहे. 'पूर्व रूपाचा परित्याग न करता रूपांतराचे भान होणे' म्हणजे 'विवर्त'. दोरी या अधिष्ठानावर सर्प आणि सर्पज्ञान भासतात. मूळ दोरीत कोणताही बदल न होता दोरीच सर्प आणि सर्पज्ञान रूपाने भासते. सोन्याच्या अलंकारामध्ये सर्वत्र सोनेच असते. अलंकाररूपाने सोन्याचे रूपांतर झाले असे वाटते. त्याप्रमाणे, संपूर्ण जगत् हे ब्रह्मच आहे. जगताच्या रूपाला ब्रह्म आले असे केवळ वाटते. जगत् हे ब्रह्माचे विवर्त आहे.

मिथ्या पदार्थाची निवृत्ती कशी होते? सर्पज्ञान कसे जाते? रज्जू कळली तर सर्प आणि सर्पज्ञान जाते. त्याचप्रमाणे, साक्षीचैतन्याचा अनुभव आला तर जगताचे ज्ञान जाते. चैतन्य एकच आहे. मग 'घटोपहित चैतन्य' आणि 'अंतःकरणोपहित चैतन्य' असे भेद का केले? तर, पदार्थांची संगती लावण्यासाठी आणि साधकाला वेदांतशास्त्रातील सिद्धांत क्रमाक्रमाने समजावून सांगण्यासाठी शास्त्राने हे भेद सांगितले आहेत. भेद वास्तव नाही, कल्पित आहे.

जेव्हा रज्जूचे अंतःकरणवृत्तीने ज्ञान होते तेव्हा वृत्ती रज्जूपर्यंत गेलेली असते. तेव्हा रज्जू आणि भासलेला सर्प या दोन उपाध्या एकरूप होतात. अंतःकरणवृत्ती रज्जूरूप होते. अंतःकरणवृत्ती आणि रज्जू या दोघांतील चैतन्य एकच आहे. म्हणजे, जे अंतःकरणोपहित चैतन्य तेच रज्जूपहित चैतन्य असा निश्चय झाल्यामुळे सर्प आणि सर्पज्ञान निवृत्त होते. त्याचप्रमाणे, 'आतले चैतन्य तेच बाहेरचे चैतन्य असून, ते मी आहे' असा साधकाचा निश्चय होतो. 'मी आत्मा असून आत्मा ब्रह्मरूपच आहे' असा त्याचा निर्णय लागतो. शास्त्र आणि सद्गुरुंच्या शब्दांनी संस्कारित झालेल्या साधकाची अशी ब्राह्मी स्थिती होते, याला 'जीवन्मुक्ति' म्हणतात.

जर ब्रह्मचैतन्य सर्वांमध्ये आहे, तर सर्वांना तसा अनुभव का येत नाही? चैतन्याचे सामान्यरूप आणि विशेषरूप लक्षात घेतल्याशिवाय याची संगती लावता येत नाही. आत्म्याचे 'अस्तित्व आहे' हे सामान्यरूप असून 'सच्चिदानंद' हे विशेषरूप आहे. आत्म्याचे सामान्यरूपाचे भान जगातील सर्व प्राण्यांना आहे. 'हा घट आहे', 'हे शरीर आहे' इत्यादी मिथ्या पदार्थांशी एकरूप होऊन 'आहे' असे सत्रूपाने आत्म्याचे सामान्यरूपातील ज्ञान जगातील सर्व अज्ञानी जीवांना आहे. सामान्यज्ञान हे मूळ अज्ञानाच्या विरोधी नसते. भ्रांतीज्ञानाशी एकरूप होऊन भ्रांतीज्ञानकाळीही जे 'आहे' रूपाने प्रतीत होते ते चैतन्याचे 'सामान्यरूप' म्हटले जाते. ज्या चैतन्यामुळे भ्रांतीचा नाश होतो, त्याला चैतन्याचे

'विशेषरूप' म्हणतात. जेव्हा चैतन्याचे विशेषरूप कळते तेव्हा 'मी सच्चिदानंदरूप ब्रह्मच आहे' असा निश्चय होतो. विशेषरूप हे ज्ञानी महात्म्यांना कळलेले असते.

उदाहरणार्थ – लाकडामध्ये अग्नी सामान्यरूपाने असतो. तो लाकडाशी एकरूप राहतो. पण लाकडाची राख करीत नाही. लाकडातीलच अग्नी जेव्हा लाकडावर लाकूड घासून प्रकट केला जातो, तेव्हा त्याला विशेष अग्नी म्हणतात. तो अग्नी लाकडाची राख करतो व सामान्यरूपाने अवशिष्ट राहतो.

प्रपंचाला पाहणारा कोण ? पदार्थामध्ये चैतन्य आहे. अंतःकरणातही चैतन्य आहे. दोघांना एकच अधिष्ठान आहे. हे चैतन्य म्हणजे 'मी' आहे. 'मी'च 'मी'च्या अज्ञानाने उत्पन्न झालेल्या अंतःकरणवृत्तीच्या सहाय्याने कल्पित जगताला पाहणारा–द्रष्टा आहे.

मंद जिज्ञासूंना बोध व्हावा म्हणून वेदांतशास्त्राने तीन सत्ता मानल्या आहेत. त्या सत्ता म्हणजे 'व्यावहारिक', 'प्रातिभासिक' आणि 'पारमार्थिक' या होय. 'सत्ता' म्हणजे 'विद्यमानता' किंवा 'अस्तित्व'.

ब्रह्म हे सर्व अवस्थेत, सर्व काळी, सर्व ठिकाणी आहेच. केवळ एका ब्रह्माचीच 'पारमार्थिक' सत्ता आहे.

ज्या पदार्थांच्या मिथ्यत्वाचा निश्चय केवळ ब्रह्मज्ञानानेच होतो त्या पदार्थांची 'व्यावहारिक' सत्ता असते. जागृत अवस्थेतील स्थूलदेह आणि बाह्य पदार्थ यांची व्यावहारिक सत्ता आहे. सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्र, तारे यांसह चौदा भुवने यांची व्यावहारिक सत्ता आहे. व्यावहारिक पदार्थ 'उभयप्रत्यक्ष' असतात.

ज्या पदार्थांच्या मिथ्यत्वाचा निश्चय ब्रह्मज्ञानाशिवाय होतो, त्यांची 'प्रातिभासिक' म्हणजेच 'प्राततिक' सत्ता असते. प्रातिभासिक पदार्थ हा दिसण्यापुरता असतो, प्रतितीमात्र असतो. प्रातिभासिक म्हणजे – 'आगंतुकदोषजन्यः प्राततिकः'. आगंतुकदोष म्हणजे प्रमातृदोष, प्रमाणदोष आणि प्रमेयदोष किंवा 'आगंतुकदोषसहकृत – अविद्याकार्यत्वम्'. डोळ्यातील मोतीबिंदू, कावीळ रोगामुळे पदार्थ पिवळे दिसणे, निद्रा इत्यादी आगंतुक दोषांनी युक्त असलेले अविद्येचे कार्य म्हणजे स्वप्न हे प्रातिभासिक होय. रज्जू–सर्प, शुक्ती–रजत, स्थाणू–पुरुष, स्वप्न आणि मनोराज्य ही प्रातिभासिक सत्तेची उदाहरणे आहेत. प्रातिभासिक पदार्थ 'स्वप्रत्यक्ष' असतात. म्हणजे ज्याचे त्यालाच दिसतात.

जोपर्यंत प्रातिभासिक पदार्थ दिसत असतो तोपर्यंत तो भ्रमात्मक वाटत नाही. स्वप्नाचे उदाहरण घेऊ. स्वप्न हे दिसण्यापुरतेच असते. निद्रादोषयुक्त अविद्येमुळे स्वप्न प्रतिति होते. ज्याचे स्वप्न त्यालाच दिसते. स्वप्न दिसतेकाळी ते भ्रमात्मक वाटत नाही. स्वप्नाच्या मिथ्यत्व निश्चयासाठी ब्रह्मज्ञानाची आवश्यकता नाही. ज्या दोषानी स्वप्न प्रतिति होते तो दोष (निद्रा, स्वप्नात भोग देणारी कर्मे, जाग्रतीतले संस्कार) गेला की स्वप्न मिथ्या ठरते.

जागृती अवस्थेत जे मनोराज्य मनुष्य करतो ते प्रातिभासिक आहे. मनुष्याची अशी कल्पना की, 'अमुक गोष्ट झाली तर बरे होईल. मग मला संपत्ती, उच्चपद मिळेल' इत्यादींना

मनोराज्य म्हणतात. मनोराज्य हे कल्पनेपुरतेच असते, प्रत्यक्ष नसते. प्रमातृदोषामुळे मनोराज्य केले जाते. मनोराज्य स्वप्रत्यक्ष आहे. ज्याने मनोराज्य केले ते त्याचे त्यालाच कळते. मनोराज्य करते वेळी ते सत्यत्वाने केले जाते. ते मिथ्या वाटत नाही. मनोराज्याच्या मिथ्यत्व निश्चयासाठी ब्रह्मज्ञानाची आवश्यकता नाही. मनोराज्य जेव्हा वाटेल तेव्हा थांबवता येते.



रज्जू–सर्प या उदाहरणातील सर्प हा प्रातिभासिक आहे. सर्प हा दिसण्यापुरताच असतो, प्रत्यक्षात नसतो. मंद अंधकार या दोषामुळे सर्प दिसतो. तो स्वप्रत्यक्ष आहे. सर्प दिसतेकाळी तो मिथ्या वाटत नाही. सर्पाचा मिथ्यत्व निश्चय होण्यास ब्रह्मज्ञानाची आवश्यकता नाही. प्रकाशाच्या झोतात रज्जू म्हणजे दोरी स्पष्ट दिसते तेव्हा सर्पाचा मिथ्यत्व निश्चय होतो.

वाळूवर 'शुक्ती' म्हणजे शिंपले पडलेले आहेत. भरदिवसा काही अंतरावरून एक मनुष्य त्या शिंपल्यांकडे पाहतो. सूर्यप्रकाशात शिंपले चकाकतात. ती चमक पाहून त्या ठिकाणी 'रजत' म्हणजे 'चांदी' आहे असे त्या माणसाला वाटते. चांदी ही दिसण्यापुरतीच असते. पाहणाऱ्यालाच चांदी दिसते. चांदी जोपर्यंत दिसते तोपर्यंत तो भास आहे असे वाटत नाही. चांदी खरी वाटते. चांदी मिथ्या आहे हे कळण्यासाठी ब्रह्मज्ञानाची आवश्यकता नाही. मनुष्य शिंपल्याजवळ गेला आणि शिंपले उचलून पाहिले तर 'रजत भ्रम' जातो.

स्थाणू–पुरुष या उदाहरणातील पुरुष हा भासलेला आहे, प्रातिभासिक आहे. समजा, एका शेतामध्ये एका झाडाला जमिनीपासून वर काही अंतरावर छाटले. आता झाडाचा उभा बुंधाच शिल्लक राहतो, त्या बुंध्याला 'स्थाणू' म्हणतात. त्या बुंध्याकडे कोणी दूर अंतरावरून पाहिले तर बुंध्याच्या ठिकाणी मनुष्य उभा आहे असा भ्रम होतो. पुरुष हा दिसण्यापुरताच असतो. पुरुषभ्रम हा स्वप्रत्यक्ष आहे. म्हणजे ज्याचा त्यालाच पुरुषभ्रम होतो. स्थाणूच्या ठिकाणी जोपर्यंत पुरुष दिसत आहे, तोपर्यंत तो पुरुष मिथ्या वाटत नाही. त्या पुरुषाच्या मिथ्यत्व निश्चयासाठी ब्रह्मज्ञानाची आवश्यकता नाही. पाहणाऱ्याने जर बुंध्याजवळ जाऊन पाहिले, तर पुरुषाचा मिथ्यत्व निश्चय होतो.

समान सत्तेतील पदार्थच एकमेकांना साधक–बाधक ठरतात. एखाद्या मनुष्याला भूक लागली आहे, तर तो अन्न ग्रहण करतो. 'भूक' आणि 'अन्न' दोन्ही व्यावहारिक सत्तेतील आहेत. या कारणाने अन्न ग्रहणाने भूक शमते. म्हणजे समान सत्तेतील दोन गोष्टी साधक ठरल्या.

एका मनुष्याला असे स्वप्न पडले की तो राजा झालेला असून रथातून जात आहे. ज्या प्रदेशातून तो जात आहे तेथे शेत, नदी, पर्वत आहेत. या ठिकाणी राजा, रथ, शेत, नदी, पर्वत हे सर्व एकाच प्रातिभासिक सत्तेतील आहेत. म्हणून त्याला स्वप्नात ते पदार्थ उपयोगाला येतात. तो जागा झाल्यावर त्या पदार्थांचा त्याला काही उपयोग होत नाही.

एका सत्तेतील पदार्थ दुसऱ्या सत्तेत उपयोगात येत नाहीत. जागृतीतील पदार्थ स्वप्नात कामाला येत नाहीत. स्वप्नात कोणाला भूक लागली तर जागृतीतील अन्न तेथे

उपलब्ध होत नाही, कामातच येत नाही. स्वप्नातील भूक शमविण्यासाठी स्वप्नातील अन्नच कामाला येते. स्वप्नातील पदार्थ जागृतीत उपलब्ध होत नाहीत.



साधकाने जागृत अवस्थेतील पदार्थांचा सूक्ष्म अभ्यास करावा. त्यातून त्याला हे लक्षात येईल की जागृत अवस्थेतील पदार्थही प्रतितीमात्रच असतात. जागृतीतले पदार्थही ज्याचे त्यालाच त्याच्याप्रमाणेच दिसतात. त्यामुळे ज्याला जागृती म्हटले जाते ते एक स्वप्नच आहे. म्हणून, ज्याप्रमाणे स्वप्नातले पदार्थ प्रातिभासिक आहेत, त्याचप्रमाणे, जागृतीतील पदार्थही प्रातिभासिकच आहेत. जागृती आणि स्वप्न अवस्थांची एकच प्रातिभासिक सत्ता आहे. या अभ्यासातून व्यावहारिक सत्ता नष्ट होते. फक्त प्रातिभासिक आणि पारमार्थिक सत्ता शिल्लक राहतात.

संपूर्ण जगत् प्रपंच हा प्रातिभासिक असून केवळ ब्रह्माची पारमार्थिक सत्ता आहे. ब्रह्म या पारमार्थिक सत्तेवर जगत् प्रपंच हा भासलेला आहे, यालाच 'विवर्तवाद' असे म्हणतात. जे विवर्तवादाच्या सिद्धांतात स्थित होतात, त्यांना 'जीवन्मुक्त' म्हणतात. साधकाची ही स्थिती होण्यासाठी त्याला शास्त्र आणि सद्गुरूंच्या शब्दांची गरज असते. शब्द प्रमाणाने परमार्थ संपतो.

ज्ञानेंद्रियांना प्रमाणे म्हणतात. प्रमाणांपासून झालेल्या यथार्थ ज्ञानास 'प्रमा' असे म्हणतात. प्रमाण आणि प्रमा यांची संख्या सहा आहे. प्रत्यक्ष, अनुमान, शब्द, उपमान, अर्थापत्ती आणि अनुपलब्धी ही सहा प्रमाणे आहेत. त्यांच्यापासून अनुक्रमे प्रत्यक्ष, अनुमिती, शाब्द, उपमिती, अर्थापत्ती आणि अनुपलब्धी या प्रमा होतात. ब्रह्मविचारात सहाही प्रमाणांचा उपयोग साधकाला होतो. परंतु, शब्द प्रमाण हे सर्वश्रेष्ठ होय.

'डोळ्यांनी जे दिसते, कानांनी जे ऐकू येते तेच खरे' याला प्रत्यक्ष 'प्रमाण' म्हणतात. जगातील ९९.९९ टक्के लोकप्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारावरच जगतात. जीवन्मुक्त महापुरुषांचा, 'पदार्थ हा पदार्थ नसून ब्रह्मच आहे' असा दृढ निश्चय असतो. खरेतर, मनुष्याला ब्रह्म प्रत्यक्षच आहे. परंतु, मूळ अविद्येमुळे त्यांचा तसा निश्चय होत नाही.

दुसरे प्रमाण म्हणजे 'अनुमान' प्रमाण. समजा, जंगलाजवळ एक मनुष्य आहे. त्याच्यापासून दूर अंतरावर जंगलात त्याला धूर निघताना दिसला. तो विचार करतो, 'ज्याअर्थी धूर निघत आहे त्याअर्थी तेथे अग्नी असला पाहिजे'. धूरावरून अग्नीचे अनुमान केले जाते, याला अनुमान प्रमाण असे म्हणतात. साधकाने या प्रमाणाचा उपयोग ब्रह्मनिश्चयासाठी असा करावा की, 'ज्याअर्थी ईश्वर ब्रह्माशी अभिन्न आहे, त्याअर्थी ईश्वराचाच अंश असलेला जीवही ब्रह्माशी अभिन्न आहे'.

तिसरे प्रमाण म्हणजे 'शब्द' प्रमाण. उदाहरणार्थ – शाळेत शिकणारे दोन जीवलग मित्र आहेत. परीक्षेचा निकाल लागल्यानंतर, एक मित्र निकाल घेण्यास न आलेल्या दुसऱ्या मित्राला सांगतो, 'तुझा वर्गात दुसरा क्रमांक आला आहे'. हे शब्द ऐकून दुसऱ्या मित्राचा लगेचच तसा निर्णय होतो. मित्राच्या शब्दांना प्रमाण मानले जाते. त्याप्रमाणेच, श्रीगुरूंच्या श्रीमुखातून शास्त्रातील 'तत्त्वमसि' या महावाक्याचे निरूपण ऐकल्यावर साधकाला ब्रह्माचे

अपरोक्ष ज्ञान होते. श्रीगुरुंचे शब्द आणि वेद हे अत्यंत विश्वसनीयच आहेत. श्रीगुरुंचे शब्द आणि वेद हे ब्रह्मज्ञानास उपयुक्त, अत्यंत उपकारक असे शब्दप्रमाण आहे.



चौथे प्रमाण म्हणजे 'उपमान' प्रमाण. 'राम हा मनुष्य सिंहासारखा आहे' या उदाहरणात राम या मनुष्यास सिंहाची उपमा देण्यात आली आहे, यालाच उपमान प्रमाण असे म्हणतात. तसेच, 'हत्ती कसा आहे?' यावर उत्तर 'वाघासारखा नाही'. या उदाहरणातही वाघाची उपमा वापरण्यात आली आहे. यालाही उपमान प्रमाण म्हणतात. त्याचप्रमाणे 'ब्रह्म कसे आहे?' तर, उत्तर – 'ते मायेसारखे असत्, जड आणि दुःखरूप नाही' असे सांगण्यात येते, यालाच 'अतद्व्यावृत्ती' असेही म्हणतात. अशारीतीने उपमान प्रमाणाचा उपयोग करता येतो.

पाचवे प्रमाण म्हणजे 'अर्थापत्ती' प्रमाण. उदाहरणार्थ – देवदत्त नावाचा पुरुष दिवसा जेवतांना दिसत नाही तरीपण दिवसेंदिवस त्याचे शरीर पुष्ट होत आहे. याचाच अर्थ तो रात्री जेवत असला पाहिजे असा अर्थ लावावा लागतो, यालाच 'अर्थापत्ती' प्रमाण असे म्हणतात. 'महापुरुष शोक तरून जातात' अशी श्रुती माता सांगते. शोक हा प्रत्यक्ष प्रतीत होतो. तो मिथ्या ठरविल्याशिवाय हे शक्य नाही आणि ब्रह्मज्ञानानेच शोक मिथ्या ठरतो. म्हणून, ज्याअर्थी ते शोक तरून जातात, त्याअर्थी त्यांना ब्रह्मप्रत्यक्षता आहे असा अर्थ करावा लागतो.

सहावे प्रमाण म्हणजे 'अनुपलब्धी' प्रमाण. अनुपलब्धी म्हणजे 'उपलब्ध न होणे', 'न दिसणे' किंवा 'प्रतीत न होणे'. एखाद्या ठिकाणी घट नाही याचा अर्थ त्या ठिकाणी घटाचा अभाव आहे. घटाच्या अनुपलब्धीमुळे घटाच्या अभावाचे ज्ञान होते. त्याचप्रमाणे, पारमार्थिक रीतीने पाहिल्यास, जगाचा तिन्ही काळी अत्यंत अभाव आहे. म्हणजे जगाची उपलब्धी होत नाही. या जगाच्या अभावाचे प्रकाशन करणारा कोणी चेतन असला पाहिजे आणि ते म्हणजे स्वयंप्रकाश साक्षीचैतन्य होय.

पुढील चिंतनात आपण आभासांचा आणि अवस्थांचा एकत्रित अभ्यास करणार आहोत. त्याचप्रमाणे, मनुष्याचा जन्म आणि मृत्यू होतो म्हणजे नक्की काय होते? ते पाहणार आहोत.

*****

## चिंतन क्रमांक – १२
## प्रपंच चतुष्टय, जन्म–मरण दिव्यता आणि पंचकोश

'तत्त्वमसि' महावाक्याचे निरूपण सुरू करण्याआधी जड–चेतन यांचा स्पष्ट विवेक असणे गरजेचे आहे. या कारणासाठी आपण स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण देह आणि त्यांच्या धर्मांचा प्रथम अभ्यास केला. त्यानंतर मनुष्य हा आत्माच असून देह आणि देहधर्मांचा लेप त्याला लागत नाही हे पाहिले. आत्मा चेतन आहे आणि चार देह जड आहेत. चार देह, त्यांच्या चार अवस्था व चार देहांशी संबंधीत आत्म्याचे चार आभास यांचा एक एक करून विस्तृत अभ्यास केला. आता आपल्याला देहांचा एकत्रित, अवस्थांचा एकत्रित आणि आभासांचा एकत्रित विचार करायचा आहे.

मागील चिंतनांत वेदांतशास्त्रातील अनेक पारिभाषिक शब्दांचा परिचय आपल्याला झालेला आहे. समष्टी पातळीवर ब्रह्म या अधिष्ठानावर संपूर्ण जगत् अध्यस्त आहे. त्याचप्रमाणे, व्यष्टी पातळीवर आत्मा या अधिष्ठानावर चार देह अध्यस्त आहेत. अधिष्ठान आणि अध्यस्त कसे समजून घ्यावेत? उदाहरणार्थ – प्राणीमात्र पृथ्वीवर जगतात. त्यांचा निवारा म्हणजे घरे, घरटे, गुहा, जंगल इत्यादींना पृथ्वीचा आधार आहे. म्हणजे 'पृथ्वी' या अधिष्ठानावर 'प्राणीमात्र' अध्यस्त आहेत. चार देह आत्म्यावर कसे अध्यस्त आहेत याचे रूपक चित्र **आकृती क्रमांक ४०(अ)** मध्ये दिलेले आहे. चार देहांपैकी महाकारणदेहाची व्यापकता सर्वात जास्त असल्यामुळे ते मोठे दाखविलेले आहे. उत्तरोत्तर देहांची व्यापकता कमी असते. **आकृती क्रमांक ४०(ब)** मध्ये अध्यस्त–अधिष्ठान याप्रमाणे चार देहांना मिळून एकच अध्यस्त दर्शविले आहे व आत्मा चेतन असून अधिष्ठान आहे.




आकृती क्रमांक ४०(अ) – आत्म्यावर चार देह अध्यस्त आहेत




आकृती क्रमांक ४०(ब) – आत्मा या अधिष्ठानावर चार देह अध्यस्त आहेत

स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण यातील प्रत्येक देहाची आयुष्यमर्यादा किती असते? यावर विचार करू. त्यासाठी प्रथम जीवपणा, जीव आणि शिव म्हणजे काय? हे जाणावे लागेल. जे लोक स्थूल, सूक्ष्मदेह आणि त्यांच्या धर्मांना 'मी आणि माझे' समजतात त्यांना 'जीवपणा' आहे. म्हणजे 'जीवत्व' आहे. 'जीव' कोणाला म्हणावे? मागे चिंतनात, अंतःकरण विशिष्ट आत्मा म्हणजे जीव अशी जीवाची व्याख्या आपण पाहिली होती. या व्याख्येत अंतःकरण जो की सूक्ष्मदेहाचा अवयव आहे, त्याचा विचार केला होता. आता 'जीव' या शब्दाची आणखी सूक्ष्म व्याख्या पाहू. 'कारणदेह विशिष्ट आत्मा म्हणजे जीव'. 'मी अज्ञानी आहे' असे ज्याला प्रकर्षाने वाटते तो 'जीव' या पदावर असतो. कारणदेहाचा 'अज्ञान' हा एकच धर्म आहे.

'शिव' कोणाला म्हणावे? महाकारणदेह विशिष्ट आत्मा म्हणजे 'शिव'. जो मनुष्य 'शिव' या अवस्थेवर असतो, त्याची 'मी ज्ञानी आहे' अशी वृत्ती असते. महाकारणदेह कारणदेहापेक्षा फार व्यापक आहे. म्हणून 'शिव' या अवस्थेवर असलेला साधक जगताच्या पातळीवर विचार करतो. 'शिव' या अवस्थेवर असतांनाच तो मेला तर पुढच्या सृष्टीमध्ये त्याला जगत् चालविण्याचा अधिकार प्राप्त होऊन तो ब्रह्मदेव, विष्णू अथवा शंकर होऊ शकतो.

सृष्टीची उत्पत्ती होण्यापासून ते महाप्रलय होण्यापर्यंतचा काळ हा 'एक कल्प' असतो. 'एक कल्प' म्हणजे ४.३२ अब्ज वर्ष. महाप्रलय झाल्यावर सर्व सृष्टी अतिसूक्ष्म रूपात म्हणजे बीजरूपात–कारणरूपात आणखी एक कल्पापर्यंत राहते. त्यानंतर, पुढचे एक कल्प नवीन सृष्टी चालते. पूर्वीच्या सृष्टीत ज्या जीवांना मुक्ती मिळाली नाही ते सर्व परत नवीन सृष्टीत सूक्ष्म, स्थूलदेहावर येतात आणि जगत् व्यवहार पुनश्च सुरू होतो. अशाप्रकारे, सृष्टी–महाप्रलय–सृष्टी–महाप्रलय हे चक्र अनादीकालापासून सुरू आहे आणि पुढेही सुरूच राहील.

कोणी साधक जर महाकारणदेहामध्ये रमला आणि मृत्यूनंतर पुढच्या सृष्टीत ब्रह्मदेव, विष्णू किंवा शंकर झाला, तर, त्या पदावर १ महाकल्प म्हणजे ७२००० कल्पांपर्यंत राहतो. त्याला सृष्टी चालविण्याचा कंटाळा आला नाही व त्याचा अधिकार राहिला, तर, त्यापुढच्या सृष्टीतही तो परत त्याच पदावर राहतो. त्यामुळे, महाकारणदेहावर अनेक कल्प

साधक राहू शकतो. त्याला सृष्टीचा कंटाळा येऊन मुक्त व्हावे असे वाटले, तर, त्याला मनुष्य देहात यावे लागते, श्रीगुरूंची भेट व्हावी लागते व त्यांच्याकडून ब्रह्मज्ञानाचा बोध प्राप्त झाला तर तो जीवन्मुक्त होतो.



कारणदेहाचे आयुष्य अनंत कल्पे आहे. ज्या मनुष्याला ब्रह्माचे अज्ञान आहे तो अनंत कल्पांपासून जन्म-मरणाच्या चक्रात सापडलेला आहे. आतापर्यंत तो असंख्य वेळा चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या प्राण्यांचे सूक्ष्म, स्थूलदेह घेऊन जन्मला व मेलेला आहे. या चक्रातून सुटण्याचा 'ब्रह्मज्ञान' हा एकमेव उपाय आहे. म्हणजेच, श्रीगुरूंच्या श्रीमुखातून साधकाला 'तत्त्वमसि' महावाक्याचा बोध प्राप्त झाला, तर, या चक्रातून तो नेहमीसाठी बाहेर पडतो. संसारचक्र किती भयावह आहे हे साधकाने लक्षात घ्यावे.

सूक्ष्मदेहाचे आयुष्य एक कल्प असते. या एका कल्पात कुत्रा, मांजर, मनुष्य इत्यादी चौऱ्यांशी लक्ष योनीत असंख्य जन्म होत राहतात. या कल्पात मुक्ती मिळाली नाही, तर, पुढच्या सृष्टीत नवीन सूक्ष्म शरीर मिळते. ब्रह्मज्ञान होत नाही तोपर्यंत हे सुरू राहील.

स्थूल शरीराचे आयुष्य काही क्षण ते काही वर्षे असते. अत्यंत बारीक किड्यांचा स्थूलदेह काही क्षणापुरताच टिकतो. कुत्रा, मांजर, वाघ इत्यादींची आयुष्य मर्यादा काही वर्षे असते. सर्वसाधारणपणे मनुष्याच्या स्थूलदेहाची आयुष्य मर्यादा १०० वर्षे असते.

आतापर्यंत आपण 'जीवपणा', 'जीव' आणि 'शिव' खालीलप्रमाणे अभ्यासले.

आत्मा + महाकारणदेह (विशेषण) = शिव
आत्मा + कारणदेह (विशेषण) = जीव
आत्मा + सूक्ष्म, स्थूलदेह (विशेषण) = जीवपणा

चार देहांची आयुष्य मर्यादा अशी पाहिली –

स्थूलदेहाची आयुष्य मर्यादा – काही क्षण ते काही वर्षे
सूक्ष्मदेहाची आयुष्य मर्यादा – एक कल्प
कारणदेहाची आयुष्य मर्यादा – अनंत कल्पांपासून ते ब्रह्मज्ञान होईपर्यंत
महाकारणदेहाची आयुष्य मर्यादा – अनेक कल्पांपासून ते ब्रह्मज्ञान होईपर्यंत

'कारणदेह' हे चौऱ्यांशी लक्ष योनींचे बीज़ आहे. समजा, कुत्र्याचा जन्म मिळणार असेल, तर, सूक्ष्मदेहातील चित्तामधील कुत्र्याचे अतिसूक्ष्म संस्कार हे सूक्ष्मरूपावर येतात. म्हणजे, कुत्र्याचा सूक्ष्मदेह तयार होऊन, पुढे कुत्रीच्या उदरात त्याचा स्थूलदेह तयार होऊन बाहेर येतो. ज्या मनुष्य देहात श्रीगुरूकृपेने ब्रह्मज्ञान होईल त्या जन्मात कारणदेह नष्ट होतो व जन्म-मरणाचा फेरा चुकतो. मनुष्याने शास्त्र आणि संत वचनांचा आश्रय घेऊन प्रथम 'जीवपणा' सोडावा व नंतर 'जीव' या पदावर यावे. पुढे, श्रीगुरूकृपा प्राप्त करून 'जीव' या पदावरून 'ब्रह्म' या पदावर यावे. जीवपदावरून शिवपदावर जाण्याची काहीही गरज नाही.

चार देहांचा एकत्रित विचार आपण करीत आहोत. मनुष्य जन्मताना आणि मरताना

आपल्यापैकी बहुतेक जणांनी पाहिलेले आहे. परंतु, मृत्यू म्हणजे नक्की काय ? हे माहीत आहे काय ? त्याचप्रमाणे, जन्म होतो म्हणजे नक्की काय होते ? हेही माहीत पाहिजे.

मरण म्हणजे काय ते प्रथम पाहू. स्थूलदेह डोळ्यांनी दिसतो. परंतु, सूक्ष्म, कारण आणि महाकारणदेह हे डोळ्यांनी दिसत नाहीत. तसेच, आजतागायत विज्ञानाने शोधून काढलेल्या कोणत्याही यंत्राने ते ग्राह्य होत नाहीत. या जन्माचे प्रारब्ध कर्म जेव्हा संपुष्टात येते, तेव्हा सूक्ष्मदेहातील प्राणशक्ति क्षीण होते. त्यामुळे, सूक्ष्मदेहातील अंतःकरणे, ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये यांची शक्ति झपाट्याने कमी होत जाते. वृत्ती माघारी फिरते. एक क्षण असा येतो की स्थूलदेहापासून सूक्ष्म, कारण आणि महाकारण हे तीन देह एकत्रितपणे वेगळे होतात. स्थूलदेहाला असलेल्या नऊ छिद्रांपैकी कोणत्याही एका छिद्रातून सूक्ष्म, कारण आणि महाकारणदेहांचा पुंजका स्थूलदेहाच्या बाहेर पडतो. यालाच 'मृत्यू' असे म्हणतात. या एकत्रित पुंजक्याला 'वासनेची गाठ' असे म्हणतात. ही गाठ अनादीकालाच्या अविद्येच्या पदार्थांच्या ज्ञानाच्या सत्यत्वाच्या संस्कारांनी बनलेली असते. ही वासनेची गाठ त्या जीवाच्या अधिकाराप्रमाणे सृष्टीमध्ये योग्य त्या लोकांत योग्य देह प्राप्त होईपर्यंत फिरत राहते. मृत्यूचे रूपक चित्र **आकृती क्रमांक ४१** मध्ये दाखविले आहे.




आकृती क्रमांक ४१ – मृत्यूचे रूपक चित्र

आत्मा कधीही मरत नाही. देह मरतो. मेलेल्या स्थूलदेहातही आत्मा असतो. परंतु, त्यात बाकीचे तीन देह नसल्यामुळे त्या मेलेल्या स्थूलदेहाची हालचाल होत नाही. ते स्थूल शरीर जाळावे अथवा पुरावे लागते किंवा त्याला किडे–मकोडे इत्यादी खातात. अर्थात वेगळे झालेल्या तीन देहातही, म्हणजे वासनेच्या गाठीतही आत्मा असतोच. आत्मा चेतन असून सर्वव्यापक आहे. आत्मा काही करत नाही, कुठे येत–जात नाही.

आता 'जन्म होणे' म्हणजे काय ? ते पाहू. भोगाच्या इच्छेने नर–नारी जेव्हा एकत्र येतात (नर–नारी म्हणजे पुरुष–स्त्री, कुत्रा–कुत्री अथवा सर्प–सर्पीण अशी कुठलीही जोडी

असू शकते) तेव्हा त्यांचा श्वास जोरात चालतो. पुरुष-स्त्री या जोडीतील पुरुषाचा श्वास सर्वसाधारणपणे बारा आंगुळ इतका असतो. पण, भोगाच्या इच्छेने हे दोघे जेव्हा एकत्र येतात तेव्हा पुरुषाचा श्वास चौदा आंगुळ इतका होतो. तेव्हा वातावरणातील एखादी वासनेची गाठ (खरेतर, नर-नारी यांच्या त्या प्रक्रियेच्या वेळेस असलेल्या अधिभौतिक, अधिदैविक व आध्यात्मिक स्थितीच्या योग्य अशी वासनेची गाठ) नराच्या श्वासातून त्याच्या हृदयात जाते. सूक्ष्मदेह आणि कारणदेह ज्या ठिकाणी जोडलेले आहेत त्याला 'हृदय' म्हणतात. हृदयात चैतन्याचे प्रतिबिंब आहे. वासनेची गाठ नराच्या हृदयातील चैतन्यामुळे पटकन फुटते व शुक्राणूंच्या रूपात वळवळ करते. हे शुक्राणू वीर्याच्या माध्यमातून स्त्रीच्या गर्भाशयात जातात आणि त्यातील एखादाच फलित होतो. नारीच्या उदरात स्थूल देह वाढू लागतो व विशिष्ट काळानंतर उदरातून बाहेर येतो, याला 'जन्म होणे' असे म्हणतात किंवा 'जीवाला स्थूलदेह मिळणे' असे म्हणतात. त्यातल्या त्यात मनुष्य जन्म मिळणे ही फार दुर्लभ गोष्ट आहे. मनुष्य जन्म मिळणे हे 'काकताल' न्यायाप्रमाणे आहे. म्हणजे, आंधळ्याने टाळी वाजवावी आणि त्याच क्षणाला त्याच्या हातात कावळा यावा, याला 'काकताल' न्याय म्हणतात. असे होण्याची शक्यता फारच कमी असते. त्याप्रमाणे, मनुष्य जन्म हा दुर्मिळ आहे. म्हणून, मनुष्यदेहाला आलेल्या प्रत्येक जीवाने तातडीने परमार्थ करावा.

आता 'पंचकोश' कशाला म्हणतात ते पाहू. तलवार म्यानेत ठेवतात. म्यान हे तलवारीसाठी 'कोश' आहे. त्याचप्रमाणे, आत्म्याभोवती पाच कोश आहेत. 'अन्नमय', 'प्राणमय', 'मनोमय', 'विज्ञानमय' आणि 'आनंदमय' अशा पाच कोशांनी आत्मा जणू काही झाकलेला आहे. तीन देहांना मिळून पाच कोश आहेत. याचे रूपक चित्र **आकृती क्रमांक ४२** मध्ये दाखविले आहे. स्थूलदेहाला 'अन्नमय' कोश म्हणतात. अन्न ग्रहण केल्याने स्थूलदेह पुष्ट होतो. म्हणून, अन्नाचा परिणाम असलेल्या या देहाला 'अन्नमय' कोश असे म्हणतात. सूक्ष्मदेहातील पाच कर्मेंद्रिये आणि पाच प्राण मिळून जो कोश तयार होतो, त्याला 'प्राणमय' कोश असे म्हणतात. कर्मेंद्रियांचा व्यवहार होण्यासाठी प्राणांचे सहाय्य असते. त्याचप्रमाणे, अंतःकरणवृत्ती पदार्थापर्यंत जाण्यास तिला प्राणांचे सहाय्य होते. या कारणासाठी प्राणमय कोश क्रियाशक्तीवान आहे. पाच ज्ञानेंद्रिये आणि मन मिळून 'मनोमय' कोश म्हटला जातो. मन संकल्प-विकल्प करते म्हणजे इच्छा करते. मनोमय कोश इच्छाशक्तीवान आहे. मनोमय कोश क्रियेचे कारण आहे.

पाच ज्ञानेंद्रियांसह बुद्धीला 'विज्ञानमय' कोश म्हणतात. बुद्धीचा संबंध असल्यामुळे विज्ञानमय कोश ज्ञानशक्तीवान आहे. या विज्ञानमय कोशामुळेच जीव स्वतःला 'मी सुखी', 'मी दुःखी', 'मी कर्ता', 'मी भोक्ता' असे समजतो.

प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय हे तिन्ही कोश सूक्ष्मदेहाशी संबंधीत आहेत. या कोशांमध्ये अनुक्रमे क्रियाशक्ती, इच्छाशक्ती आणि ज्ञानशक्ती आहे. यांच्या माध्यमातून व्यावहारिक अथवा पारमार्थिक कर्म करण्याची इच्छा, प्रेरणा होते व पुढे तशी कृती केली जाते.

कारणदेह म्हणजे 'आनंदमय' कोश होय. आवडता पदार्थ पाहिल्यावर जे सुख मिळते, त्याला 'प्रिय' म्हणतात. आवडता पदार्थ प्राप्त झाल्याने जे सुख प्राप्त होते, त्यास 'मोद' म्हणतात आणि त्या पदार्थाचा भोग घेतल्याने जे सुख मिळते, त्यास 'प्रमोद' असे म्हणतात. या तीन प्रकाराच्या सुखासह असलेले अविद्यारूपी कारण शरीरातील मलिनसत्त्व म्हणजे आनंदमय कोश होय.




आकृती क्रमांक ४२ – आत्मा आणि पाच कोश

तीन देहांमध्ये पाच कोश कसे अंतर्भूत होतात ते **कोष्टक क्रमांक ४** मध्ये दाखविलेले आहे.

| कोशाचे नाव | कोशाचे भाग | संबंधीत देह |
|---|---|---|
| अन्नमय | अस्थि, मज्जा इत्यादी | स्थूलदेह |
| प्राणमय | पाच प्राण + पाच कर्मेंद्रिये | सूक्ष्मदेह |
| मनोमय | मन + पाच ज्ञानेंद्रिये | सूक्ष्मदेह |
| विज्ञानमय | बुद्धी+ पाच ज्ञानेंद्रिये | सूक्ष्मदेह |
| आनंदमय | अज्ञान | कारणदेह |

कोष्टक क्रमांक ४ – तीन देहांत पंचकोशाचा अंतर्भाव

व्यष्टी पातळीवर बाहेरून आत अनुक्रमे स्थूलदेह, सूक्ष्मदेह आणि कारणदेह आहेत. म्हणून कोशांचा क्रम बाहेरून आत अनुक्रमे 'अन्नमय', 'प्राणमय', 'मनोमय', 'विज्ञानमय' आणि 'आनंदमय' असा आहे. साधकाने जाणून घ्यावे की पाचही कोश आणि त्यांचे धर्म तो नाही. तो या सर्वांहून वेगळा सद्रूप, चिद्रूप, आनंदरूप आत्मा आहे.

जो मनुष्य ज्या कोशाच्या पातळीवर असतो, त्याची स्वतःकडे पाहण्याची दृष्टी तशीच असते. अन्नमय कोशाच्या पातळीवर असणारा स्थूलदेहालाच सर्व काही समजतो व इतर लोकांकडेही त्याच दृष्टीने पाहतो. देहाला सजविणे, भोग देणाऱ्या साधनांची जमवाजमव करत राहणे यावरच त्याचे लक्ष असते. तो जसे जसे आतील कोशांवर जातो तसे तसे बाहेरील कोशांवरील त्याचे लक्ष कमी कमी होत जाते. ज्या कोशावर मनुष्य असतो, त्या कोशाच्या धर्मांचा त्याच्यावर प्रभाव असतो. इतर कोशांच्या धर्मांचा तो सहजच विचार करत नाही.

जगातील ९९.९९ टक्के लोक अन्नमय कोशावरच आहेत. परमार्थ करणाऱ्यांपैकी जे कर्मठ असतात, त्यांचेही लक्ष जास्त प्रमाणात अन्नमय कोशाकडेच असते. उपासक मूर्ति अथवा प्रतिमा समोर ठेऊन किंवा अंतर्मुख होऊन देवतेची उपासना करतो. उपासकावर अन्नमय, प्राणमय आणि मनोमय कोशांचा जास्त प्रभाव असतो. पातंजल योगमार्गी साधकावर विज्ञानमय आणि आनंदमय कोशांचा प्रभाव असतो.

आत्मा पंचकोशातीत आहे, एवढ्याच निर्णयाने साधक मुक्त होत नाही. 'आत्मा ब्रह्मरूप आहे' असा निश्चय होणे गरजेचे आहे. त्यासाठी श्रीगुरुंकडून महावाक्याच्या निरूपणाचे श्रवण साधकांनी करावे.

★★★★★

## चिंतन क्रमांक – १३
## जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती अवस्था

आता जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांचा एकत्रित अभ्यास करू. कारणदेहातून सूक्ष्मदेह येतो व सूक्ष्मदेहातून स्थूलदेह येतो. सुषुप्ती अवस्थेतून स्वप्नावस्था व स्वप्नावस्थेतून जाग्रतावस्था येते.

ज्या अवस्थेत स्थूलदेहाची हालचाल होते, स्थूल कर्मेंद्रियांनी व्यवहार केला जातो, अंतःकरणवृत्तीने बाह्यपदार्थांचे ज्ञान होते, त्या अवस्थेला 'जागृत' अवस्था म्हणतात. प्रत्येक अवस्था पुण्य–पापरूप कर्माचे फळ देण्यास उत्पन्न झालेली असते. एका अवस्थेतील पुण्य–पापरूप फलभोग संपला की दुसरी अवस्था सुरू होते. प्रत्येक अवस्था पुण्य–पापरूप कर्मांचे फळ आहे. जागृतावस्थेत स्थूलदेहाचे भान असतेच, शिवाय काम, क्रोधादिक सूक्ष्मदेहाचे धर्मही जाणवतात व 'मी मलाच जाणत नाही' या कारणदेहाच्या धर्माची जाणीवसुद्धा असते. जागृतावस्थेचे रूपक चित्र **आकृती क्रमांक ४३(अ)** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ४३(अ) – जागृती अवस्थेचे रूपक

आत्म्यासह तिन्ही देह त्यात दाखविले आहेत. स्थूलदेहात परावर्तीत झालेल्या आत्म्याचा प्रकाश म्हणजे 'विश्व' नावाचा चिदाभास असतो. ही 'विश्व' या आभासाची व्याख्या पूर्वी आपण केली आहे. आता 'विश्व'ची आणखी सूक्ष्म व्याख्या पाहू. जागृतावस्थेत स्थूल, सूक्ष्म आणि कारणदेहांवर अभिमान धरणाऱ्या चिदाभासाला 'विश्व' असे म्हणतात.

या विश्वाला प्रकाशन करणारा साक्षी आहे. जागृत अवस्थेत चिदाभासासह अंतःकरणवृत्तीने

बाह्य पदार्थांचे ज्ञान होते. जागृतावस्थेतील त्रिपुटी प्रमाता–प्रमाण–प्रमेय असते. अंतःकरण, ज्ञानेंद्रिय आणि बाह्यपदार्थांशी संबंधीत आभासांमुळे अनुक्रमे प्रमाता, प्रमाण आणि प्रमेय अशी नावे चिदाभासाला दिलेली आहेत. जागृतावस्थेतील पदार्थांची व्यावहारिक सत्ता असते.

जागृतावस्थेतील ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये ही स्वप्नावस्थेत उपलब्ध होत नाहीत. स्वप्नावस्थेत अंतःकरणवृत्ती अंतःकरणापर्यंत माघारी आलेली असते. जागृतावस्थेतील सुख–दुःखादिरूप फळ देणारे कर्म क्षीण झाले आणि स्वप्नात भोग देणारी कर्मे फलोन्मुख झाली म्हणजे निद्रा येऊन अंतःकरण वृत्ती माघारी अंतःकरणापर्यंत जाते तेव्हा मनुष्याला स्वप्न दिसू लागते. जागृतावस्थेत जे अनुभव मनुष्याला येतात त्याचे संस्कार अंतःकरणात साठतात. त्या संस्कारामुळे स्वप्न पडते. स्वप्नावस्थेतील ज्ञान संस्कारजन्य असते. वृत्ती अंतःकरणात लीन झालेली असल्यामुळे जागृतावस्थेतील पदार्थ स्वप्नात दिसत नाहीत. निद्रादोषयुक्त अविद्येमुळे स्वप्न पडते. स्वप्नावस्थेच्या रूपक चित्रात **आकृती क्रमांक ४३(ब)** मध्ये आत्म्यासह कारणदेह, सूक्ष्मदेह दाखविलेले आहेत.



आकृती क्रमांक ४३(ब) – स्वप्न अवस्थेचे रूपक



आकृती क्रमांक ४३(क) – सुषुप्ती अवस्थेचे रूपक

स्वप्नावस्थेतील चिदाभासाला 'तैजस' म्हणतात. अशी व्याख्या पूर्वी पाहिलेली होती. 'तैजस'ची सूक्ष्म व्याख्या म्हणजे स्वप्नावस्थेत कारणदेह आणि सूक्ष्मदेह यांच्यावर अभिमान धरणाऱ्या आत्म्याच्या आभासाला 'तैजस' असे म्हणतात. 'तैजस'ला प्रकाशन

करणारा साक्षी आहे. जेव्हा स्वप्न अवस्था असते तेव्हा जागृत आणि सुषुप्ती या अवस्था 
नसतात. स्वप्नावस्थेतील पदार्थ निद्रादोषयुक्त अविद्यावृत्तीने कळतात. स्वप्न पदार्थांची प्रातिभासिक सत्ता असते.

जेव्हा जागृती आणि स्वप्न अवस्थेत भोग देणारी कर्मे क्षीण होतात तेव्हा सुषुप्ती अवस्था सुरू होते. सुषुप्ती म्हणजे गाढ झोप. त्या अवस्थेत केवळ आनंदाचा भोग होतो. सुषुप्तीत स्थूलदेहाची हालचाल होत नाही. स्थूलदेह निपचित पडलेला असतो. सुषुप्ती अवस्था जेव्हा असते तेव्हा जागृती आणि स्वप्न या अवस्था नसतात. **आकृती क्रमांक ४३(क)** मध्ये आत्म्यासह कारणदेह दाखविलेला आहे. ते सुषुप्ती अवस्थेचे रूपक चित्र आहे. अंतःकरणच कारणदेहात लीन झालेले असल्यामुळे तेथे स्वप्नप्रपंच नसतो आणि जागृतप्रपंच असण्याचा प्रश्न येत नाही. सुषुप्ती अवस्थेत कारणदेहावर अभिमान धरणाऱ्या आत्म्याच्या आभासाला 'प्राज्ञ' म्हणतात. सुषुप्ती अवस्थेत आनंदाचा भोग घेणारा प्राज्ञ हा आभास आहे. प्राज्ञाला प्रकाशन करणारा साक्षी आहे. सुषुप्ती अवस्थेत ज्या वृत्तीने प्राज्ञ आनंदाचा भोग घेतो, त्या वृत्तीस अविद्यावृत्ती म्हणतात. ही 'अविद्यावृत्ती' स्वप्नावस्थेतील अंतःकरणवृत्ती आणि जागृतावस्थेतील अंतःकरणवृत्ती यांच्यापेक्षा वेगळी आहे. सुषुप्तीतील आनंदाची प्रातिभासिक सत्ता आहे. **(आकृती क्रमांक ४४)**



आकृती क्रमांक ४४ – तीन अवस्थांना साक्षी आत्मा

तिन्ही अवस्थांना साक्षी तटस्थपणे पाहतो. लाल, पांढरी, काळी अशा तीन रंगांच्या तीन काचा वर्तुळाकार जुळविल्या आणि चेतलेल्या दीपासमोरून फिरविल्या तर ते साक्षीसह तीन अवस्थेचे रूपक चित्र **आकृती क्रमांक ४५** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ४५ – तटस्थ साक्षीचे रूपक चित्र

जागृती अवस्थेत आणि स्वप्न अवस्थेत पदार्थ दिसतात. मनुष्य जागृती अवस्थेतील पदार्थांना सत्य समजून त्यांच्या मागे लागून गुरफटतो. परंतु, स्वप्नप्रपंचात तसा तो गुरफटत नाही. का ?

त्याचे उत्तर म्हणजे – स्वप्न ज्याचे त्यालाच दिसते. स्वप्नात केव्हा काय दिसेल हे सांगता येत नाही. स्वप्नाचा काळ अल्प म्हणजे कमी असतो. स्वप्नातील पदार्थ जागृतीत उपलब्ध होत नाहीत. जागृतीतील पदार्थ स्वप्नात उपलब्ध, उपयोगी नसतात. जागृतावस्थेतील पदार्थ बहुकाळ दिसतात, स्थिर दिसतात आणि उभयतांना प्रत्यक्ष असतात. जागृत अवस्थेतील घटनांमध्ये जसा कार्य–कारण भाव प्रतीत होतो, तसा कार्य–कारण भाव स्वप्नातील घटनांमध्ये दिसून येत नाही. 'अमुक क्रिया अमुक पद्धतीने केली तर अमुक फळ मिळेल' असा कार्य–कारण भाव दृढपणे, सत्यत्वाने जागृतावस्थेत जीवांना असतो. त्यामुळे, जागृतावस्थेतील पदार्थांशी जीव तादात्म्य पावतो. प्राणी, पदार्थ, परिस्थिती यांचे संस्कार गोळा करत राहतो आणि त्यामुळे पुनरावृत्ती होत राहते. जीवाभोवती जागृती, स्वप्न, सुषुप्ती या अवस्था अनंत काळापासून एकसारख्या गोल गोल फिरत आहेत. जीव या अवस्थांशी एकरूप होऊन तो सुद्धा भोवऱ्यासारखा फिरत आहे. म्हणून, जीवाला अज्ञानापासून निर्माण होणाऱ्या अवस्थांची भोवळ आलेली आहे.

आता, आपण स्वप्नावस्थेची आणखी सूक्ष्म मीमांसा करू. पूर्वी आपण पाहिले की जागृती अवस्थेतील संस्कारांमुळे स्वप्न पडते. म्हणजे जागृतीतल्या पदार्थांची स्वप्नामध्ये स्मृती होते. हा गौण सिद्धांत आहे. मग स्वप्न कसे पडते याबद्दल मुख्य सिद्धांत कोणता ? ते समजून घेण्यासाठी आपल्याला स्मृतीज्ञान, प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्षज्ञान आणि अभिज्ञारूप प्रत्यक्षज्ञान हे कळून घ्यावे लागेल.

मनुष्य जे पाहतो, ऐकतो, करतो त्या सर्व गोष्टींची छाप त्याच्या अंतःकरणातील चित्त या अवयवामध्ये संस्काररूपाने पडते व गोळा होत राहते. पदार्थ समोर नसताना केवळ संस्कारामुळे त्या पदार्थाची आठवण होणे, याला 'स्मृतीज्ञान' असे म्हणतात. समजा, एखादा मनुष्य खोलीत एकटाच बसला आहे आणि अचानक त्याला त्याच्या मित्राची आठवण आली. मित्र समोर नाही, केवळ संस्कारांमुळे मित्राची आठवण आली, म्हणजे त्याला मित्राचे 'स्मृतीज्ञान' झाले.

स्वप्नपदार्थ हे प्रत्यक्ष प्रतीत होतात, ते स्मृतीज्ञान नाही, प्रत्यक्षज्ञान आहे. समजा, कोणाला स्वप्नात रथ, घोडे, सैनिक दिसले, त्यांची प्रतिती प्रत्यक्ष असते. कोणत्या संस्कारांपासून झालेले ते ज्ञान नव्हे. ते निद्रादोषामुळे झालेले ज्ञान आहे. तात्पर्य – जागृतीतल्या पदार्थांचे स्मरण स्वप्नात होत नाही. मनुष्य जागा झाल्यावर स्वप्नाबद्दल असे सांगतो, 'स्वप्नात मी रथ, घोडे, सैनिक प्रत्यक्ष पाहिले'. तो असे म्हणत नाही की स्वप्नात त्याला रथ, घोडे, सैनिक यांची स्मृती झाली.

स्वप्नातील पदार्थ हे प्रत्यक्ष प्रतीत होतात. प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्ष आणि अभिज्ञारूप प्रत्यक्ष असे दोन प्रकारे पदार्थाचे ज्ञान होते. समजा, देवदत्त नावाच्या मनुष्याने यज्ञदत्त नावाच्या मनुष्याला एकदा पाहिले. म्हणजे देवदत्ताच्या अंतःकरणात यज्ञदत्ताचा संस्कार उमटला. पुढे देवदत्तासमोर एक वर्षाच्या कालावधी नंतर यज्ञदत्त आला. त्याला पाहिल्याबरोबर देवदत्ताच्या मनात विचार येतो, 'हाच तो यज्ञदत्त'. पदार्थ समोर आहे आणि पूर्वीचा संस्कार त्या पदार्थाविषयी होता, त्या आधारे जे ज्ञान होते त्याला 'प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्षज्ञान' म्हणतात. देवदत्ताच्या समोर यज्ञदत्त प्रत्यक्ष उभा असून पूर्वीचा यज्ञदत्तचा संस्कार देवदत्ताच्या चित्तात होताच, म्हणून देवदत्ताला यज्ञदत्ताची प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्षता आहे.

अभिज्ञारूप प्रत्यक्ष म्हणजे काय? देवदत्तासमोर एक अनोळखी मनुष्य अचानक आला. देवदत्ताने पूर्वी त्याला कधीही पाहिलेले नव्हते. देवदत्त विचार करू लागला, 'हा मनुष्य कोण आहे?' पदार्थ समोर आहे, परंतु, त्या पदार्थाचा पूर्वसंस्कार अंतःकरणात नाही त्यामुळे 'हा कोणता तरी पदार्थ' एवढेच कळते. समोर उभ्या असलेल्या मनुष्याचा संस्कार देवदत्ताच्या अंतःकरणात नसल्यामुळे 'हा कोणीतरी मनुष्य आहे' असे ज्ञान त्याला झाले. अंतःकरणवृत्ती पदार्थापर्यंत गेलेली आहे पण त्या पदार्थाचा पूर्व संस्कार अंतःकरणात नसेल तर त्या ज्ञानाला अभिज्ञारूप प्रत्यक्ष असे म्हणतात. स्वप्नातले पदार्थ एकदमच काहीतरी दिसतात. स्वप्नात केव्हा काय दिसेल हे सांगता येत नाही. स्वप्नातील पदार्थांचे ज्ञान हे अभिज्ञारूप प्रत्यक्ष आहे, स्मृतीज्ञान नव्हे. तात्पर्य – जागृतावस्थेतील पदार्थांच्या पूर्वसंस्कारांनी स्वप्न पडत नाही.

या जन्माच्या अथवा पूर्वजन्मातील जागृती अवस्थेत गोळा केलेल्या संस्कारामुळे स्वप्न पडत नाही. जागृती अवस्थेत अशक्य वाटणाऱ्या घटना स्वप्नामधे दिसतात. जागृतीत तशी घटना घडलीच नाही तर त्याचे संस्कार कसे पडतील? आणि तसे संस्कारच नाहीत

तरीपण स्वप्नात ती अशक्य घटना घडताना दिसते. या कारणामुळे जागृतीतील स्मृती स्वप्नात होत नाही. स्मृतीज्ञानात पदार्थ समोर नसतो. परंतु, स्वप्नात तर पदार्थ दिसतात. म्हणूनही स्वप्नपदार्थज्ञान हे स्मृतीज्ञान नाही. ते अभिज्ञारूप प्रत्यक्ष आहे.

स्वप्न दिसतेकाळी सूक्ष्मदेह स्थूलदेहाला सोडून बाहेरील व्यावहारिक पदार्थ पाहत नाही. सूक्ष्मदेह जर स्थूलदेहाला सोडून गेला, तर त्याला मृत्यू म्हणतात आणि मृत मनुष्याचा चेहरा भयानक दिसतो. परंतु, स्वप्न पाहणाऱ्या मनुष्याचा चेहरा साधारण दिसतो, भयानक दिसत नाही. त्यामुळे स्वप्न पाहण्यासाठी सूक्ष्मदेह स्थूलदेहाच्या बाहेर जाऊन ते पदार्थ पाहत नाही. पंढरपूरात राहणाऱ्या मनुष्यास रात्री स्वप्न पडले की तो आळंदीला गेला आहे आणि लख्ख सूर्याच्या प्रकाशात श्रीज्ञानेश्वर महाराजांचे मंदिर, इंद्रायणी नदी आणि घाट पाहत आहे. स्वप्नाचा अवधी कमी असतो. एवढ्या कमी वेळात रात्रीच्या वेळी मनुष्य आळंदीत येऊन हे सर्व पाहू शकत नाही. हे सर्व अशक्य आहे. पंढरपूरात रात्र असते, त्यावेळेस आळंदीतही रात्रच असते. परंतु, त्याला स्वप्नात आळंदीत दिवस आहे असे दिसले. या कारणासाठी सूक्ष्मदेह स्वप्नकाळी स्थूलदेहाच्या बाहेर जाऊन व्यावहारिक पदार्थ पाहत नाही.

समजा, एके रात्री देवदत्ताला स्वप्न पडले की तो यज्ञदत्ताच्या घरी जाऊन त्याला भेटला. दुसऱ्या दिवशी देवदत्त यज्ञदत्तला म्हणाला, 'मी काल रात्री १ वाजता तुला भेटलो होतो. तू अमूक या विषयावर माझ्याशी बोललास'. परंतु, यज्ञदत्ताकडून त्या गोष्टीची पुष्टी झाली नाही. यावरून हे लक्षात येते की जागृत प्रपंच आणि स्वप्न प्रपंच यांचा आपापसात कोणताही संबंध नाही.

सूक्ष्म देहामध्ये कान, नाक, डोळा इत्यादी पाच ज्ञानेंद्रिये सूक्ष्म रूपाने आहेत. त्यांचेच स्थूल रूप स्थूलदेहामध्ये आहे. सूक्ष्मदेहामध्ये हात, पाय इत्यादी पाच कर्मेंद्रिये सूक्ष्म रूपाने आहेत. त्यांचेच स्थूल रूप स्थूलदेहामध्येही आहे. या इंद्रियांचे सहाय्य केवळ जागृतीतील पदार्थ कळण्यासाठी होते. सूक्ष्म, स्थूलदेहातील ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये यांचा उपयोग स्वप्न पाहण्यास होत नाही.

मग स्वप्न पाहण्यास कोणाचे सहाय्य होते? जागृतावस्थेत पदार्थ कळण्यासाठी अंतःकरण, अंतःकरणवृत्ती, प्राण, ज्ञानेंद्रिये यांचे सहाय्य होते. तशीच सामग्री स्वप्नकाळी आतल्या आतच नवीन उत्पन्न होते. परंतु, ही सामग्री जागृतावस्थेतील सामग्रीहून भिन्न असून जागृतावस्थेतील सामग्रीशी तिचा काहीही संबंध नसतो. ज्याअर्थी स्वप्नपदार्थ दिसतो त्याअर्थी स्वप्नात तो पदार्थ उत्पन्न होतो असे म्हणावे लागते. पदार्थ उत्पन्न झाल्याशिवाय त्यांची प्रतिती येत नाही. ज्याअर्थी पदार्थ आहे त्या अर्थी 'प्रमेय' आहे. ज्याअर्थी 'प्रमेय' आहे, त्याअर्थी स्वप्नात 'प्रमाता' आणि 'प्रमाण' असायला हवेत. स्वप्नपदार्थांना ग्रहण करणारी वृत्ती आणि त्याप्रमाणे वृत्तीला पदार्थांपर्यंत पोहोचविण्यास मदत करणारा प्राणही असायला हवा. पदार्थाचे ज्ञान अंतःकरणात होते म्हणून अंतःकरणाची उत्पत्ती स्वप्नात मानायला हवी. परंतु, हे 'अंतःकरण', 'स्वप्नातले अंतःकरण' आहे. या अंतःकरणाचा

सूक्ष्मदेहातील अंतःकरणाशी काहीही संबंध नाही. स्वप्नामध्ये काहीतरी दिसते, काहीतरी ऐकू येते, काहीतरी बोलले जाते. स्वतःला एक शरीर आहे असेही वाटते. याचा अर्थ स्वप्नामध्ये ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये आणि शरीरही मानले पाहिजे. ही सर्व सामग्री स्वप्नात नवीनच एकदम उत्पन्न होते.

जागृत प्रपंचाची व्यावहारिक सत्ता व स्वप्न प्रपंचाची प्रातिभासिक सत्ता आहे. एका सत्तेतील पदार्थ दुसऱ्या सत्तेत कामात येत नाहीत. म्हणून, स्थूलदेहातील डोळा, कान इत्यादी ज्ञानेंद्रियांनी स्वप्न जाणता येत नाही. त्याचप्रमाणे, स्वप्नातील सामग्रीने जागृतावस्थेतील पदार्थ कळत नाहीत.

स्वप्नातील प्रमाता–प्रमाण–प्रमेय ही त्रिपुटी कशी असते? निद्रादोषासहित अविद्येमुळे स्वप्न पडते. या निद्रादोषासहित अविद्येच्या तमोगुणापासून स्वप्नपदार्थ तयार होतात. निद्रादोषासहित अविद्येच्या सत्त्वगुणापासून ज्ञानेंद्रिये, रजोगुणापासून कर्मेंद्रिये तयार होतात आणि स्वप्नातील वृत्ती वाहू लागते. या वृत्तीला 'निद्रादोषासहित अविद्यावृत्ती' असे म्हणतात. निद्रादोषासहित अविद्येच्या सत्त्वगुणापासून स्वप्नातील अंतःकरण तयार होते आणि स्वप्न पदार्थांचे ज्ञान होते. स्वप्नातील अंतःकरणातून निद्रादोषसहित अविद्यावृत्ती, स्वप्नातील ज्ञानेंद्रियातून स्वप्नातील प्राणाच्या सहाय्याने स्वप्नपदार्थापर्यंत वाहत जाते व स्वप्नपदार्थांच्या आकाराची होते. स्वप्न पदार्थ कसे दिसतात याची प्रक्रिया **आकृती क्रमांक ४६** मध्ये दाखविली आहे.




आकृती क्रमांक ४६ – स्वप्न अवस्थेतील त्रिपुटी

दोषसहित अविद्येपासून जे उत्पन्न होते ते मिथ्या असते, म्हणून स्वप्न पदार्थ मिथ्या आहेत. कंठातील हिता (पूरीतत) नाडीमध्ये स्वप्न प्रपंच तयार होतो. याचा अर्थ स्वप्नप्रपंच एका छोट्याशा स्थानात म्हणजे 'देशात' तयार होतो. जागृतीच्या कालाच्या मानाने स्वप्नाचा काल कमी असतो. स्वप्न हे छोट्या देशात पडते व स्वप्नाचा कालावधी कमी असतो. म्हणजे योग्य देश, कालाशिवाय उत्पन्न होते म्हणूनही स्वप्न प्रपंच मिथ्या आहे. स्वप्न एकदम सुरु होते आणि एकदमच बंद होते. जागृत व्यवहारातल्या घटना जशा एकापाठोपाठ एक होताना

दिसतात तसे स्वप्नात नसते. व्यवहारात प्रथम कारण मग कार्य असते. समजा, एक मुलगा

आणि एक मुलगी आहे. तारुण्यात दोघांचे लग्न ठरले. पुढे दोघांचे लग्न होते तेव्हा ते पती-पत्नी होतात. काही कालानंतर त्यांना पुत्र झाला तर ते माता-पिता म्हटले जातात. याप्रकारचा कार्य-कारण भाव व्यवहारात दिसून येतो. तसा कार्य-कारण भाव स्वप्नात नसतो. स्वप्नातले सर्व पदार्थ युगपत म्हणजेच एकदम उत्पन्न होतात व स्वप्न संपते तेव्हा युगपत लय पावतात. स्वप्नात कोणाला पती-पत्नी आणि त्यांचा मुलगा असे दृष्य दिसले तर तिन्ही एकदम उत्पन्न होतात व एकदम लय पावतात. स्वप्नातील पती-पत्नी स्वप्नातील मुलाच्या शरीरास कारण नसतात. कधी कधी स्वप्नात तारुण्य ते म्हातारपण एवढा मोठा कालावधी जाणवतो आणि नद्या, पर्वत, सूर्य इत्यादी 'मोठा देश'ही जाणवतो. सर्व स्वप्न पदार्थ अनिर्वचनीय उत्पन्न होतात.

आता जागृती अवस्थेसंबंधी सूक्ष्म सिद्धांत पाहू. समजा, एखादा मनुष्य घट (कलश) पाहत आहे. घट पाहताना त्याची अशी पक्की समज असते की, 'हा घट पूर्वी केव्हातरी म्हणजे कोणे एके काळी कुंभाराने बनविला असून तोच घट आता मी पाहत आहे'. ज्या ज्या वस्तू मनुष्य बघतो त्या त्या वस्तू पाहताना त्या वस्तूंची निर्मिती पूर्वी झालेली असून सध्या मी त्याच वस्तू पाहत आहे असा त्याचा निश्चय असतो. हीच समज जगातील ९९.९९ टक्के लोकांची जागृती अवस्थेतील पदार्थांबद्दल असते. एखादा मनुष्य घरातील आई, बाप, बायको, मुले, अनेक पदार्थ पाहतो. दुसऱ्या दिवशी परत ते दृष्टीस पडल्यावर, 'काल जागा असताना ज्या आई, बाप, बायको, मुले, अनेक पदार्थ यांना पाहिले होते त्यांनाच आज परत पाहत आहे' अशी त्याची पक्की खात्री असते. अशाप्रकारे, 'सृष्टी' पूर्वीचीच आहे असे वाटणे म्हणजे 'सृष्टीदृष्टीवाद'.

ब्रह्म सत्य आहे, पदार्थ मिथ्या आहेत. परंतु, 'पदार्थ पूर्वी निर्माण झालेले होते आणि तेच सध्या पाहण्यात येतात' याला 'सृष्टीदृष्टीवाद' असे म्हणतात. विवर्तवादाचा एक सिद्धांत म्हणजे 'सृष्टीदृष्टीवाद' होय. व्यष्टी पातळीवर सृष्टीदृष्टी म्हणजे काय ते आपण पाहिले. समष्टी पातळीवर सृष्टीदृष्टी म्हणजे काय ? सूर्य, चंद्र, ग्रह, तारे, स्वर्ग, नरक हे सर्व पूर्वी केव्हातरी निर्माण झाले होते आणि आता देखील तेच अस्तित्वात आणि प्रतितीत आहेत असे वाटणे. या कल्पाच्या आरंभी सर्व सृष्टी स्थूल रूपास आली व तीच आता आहे अशी समज म्हणजे समष्टी पातळीवर सृष्टीदृष्टीवाद.

'पूर्वी', 'सध्या' असे शब्द आल्याने सृष्टीदृष्टीवादात भूत, वर्तमान, भविष्य हे तिन्ही काळ येतात. जागृतीतल्या मानाने स्वप्न प्रपंच हा खोटा वाटतो. सृष्टीदृष्टीवादात जागृत, स्वप्न, सुषुप्ती या तिन्ही अवस्था घ्याव्यात. जागृतीतल्या पदार्थांपेक्षा स्वप्नातले पदार्थ भिन्न मानल्यामुळे व्यावहारिक सत्ता आणि प्रातिभासिक सत्ता सृष्टीदृष्टीवादात आहेत आणि ब्रह्माची पारमार्थिक सत्ता तर आहेच आहे.

सृष्टीदृष्टीवादात जागृतावस्था असल्यामुळे कार्य-कारणभावाची जाणीव असते. पदार्थज्ञानाच्या प्रक्रियेत अंतःकरण आणि त्याच्या पुढे त्रिपुटी असते. सृष्टीदृष्टीमध्ये

पदार्थांचा प्रमाता–प्रमेय त्याप्रमाणे विषयी–विषय असा भाव असतो. खरेतर, सर्व पदार्थ 'साक्षीभास्य'च आहेत. पण, अंतःकरणवृत्ती पदार्थांपर्यंत जाते, म्हणून सृष्टीदृष्टीत 'पदार्थ हे प्रमातृभास्य आहेत' असे म्हणतात. अंतःकरणाच्या पाठीमागे स्वयंप्रकाश साक्षी आहेच. त्रिपुटीच्या आधी पदार्थ अस्तित्वात होता हे सृष्टीदृष्टीवादात मानले आहे. 'दृष्टी' म्हणजे 'वृत्तीज्ञान'. सृष्टीदृष्टीवादात अंतःकरणवृत्ती असते. सृष्टीदृष्टीवादात जीव असंख्य आहेत, अशी प्रतिती असते. तसेच, प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्ष, अभिज्ञारूप प्रत्यक्ष आणि स्मृतीज्ञान हे तिन्ही असतात.

जागृती प्रपंचातील काही पदार्थांची उत्पत्ती होते, काही नष्ट होतात असा हा जगत् प्रपंच अनादी कालापासून आहे आणि पुढे अनंत काल हा प्रवाह सुरू राहील. यातून सुटण्यासाठी ब्रह्मज्ञान हा एकमेव उपाय आहे.

'कधीकाळी', 'कोण्या ठिकाणी' अशाप्रकारे देश आणि काळ यांची प्रतिती जागृतावस्थेत लोकांना प्रकर्षाने असते. सफरचंद हे काश्मीरमध्ये पिकतात आणि कोकण आंब्यांसाठी प्रसिद्ध आहे, असा देशादेशांतील फरक आहे. तसेच, 'अमुक काळ–वेळ काम आरंभ करण्यासाठी चांगला आहे', 'अमुक दिवशी अमुक व्रत करावे' इत्यादी काळासंबंधी सत्यत्व लोकांमध्ये पाहावयास मिळते. जागृतीतील पदार्थ अमुक ठिकाणी अमुक काळी तयार झाले असे वाटणे म्हणजे देश, काल कारण आहेत अशी समज असणे. तसेच, समष्टी पातळीवर सृष्टीला देश, काल कारण असून पंचभूतात्मक जागृत प्रपंच हे कार्य आहे असे वाटते. वेदाच्या प्रमुख सिद्धांतात सृष्टी निर्माण होण्याला देश, काल ही कारणे सांगितलेली नाहीत. मायेमुळे देश, काल हे सृष्टीचे कारण व पंचभूतात्मक प्रपंच हे कार्य वाटते. मायेला 'आहे' किंवा 'नाही' असे म्हणता येत नाही. ज्याप्रमाणे, माया अनिर्वचनीय आहे त्याचप्रमाणे देश, काल आणि पदार्थ हे सुद्धा अनिर्वचनीय आहेत. अनिर्वचनीय म्हणजेच मिथ्या.

मनुष्याला 'काल पाहिलेले पदार्थ तेच आज पाहत आहे' असे वाटते याचे कारण जागृतीतील पदार्थ बहुकाल स्थिर वाटतात. पदार्थज्ञान होण्याच्या आधी पदार्थ होता आणि पदार्थज्ञान झाल्यानंतरही तो पदार्थ राहतो असे लोकांना वाटते. नदी, पर्वत इत्यादी प्रपंच जन्मापूर्वी होता आणि मेल्यावर देखील राहील असे मनुष्याला अविद्येमुळे वाटते. क्षणाक्षणाला पदार्थांमध्ये बदल होत असतो. या क्षणाला जो पदार्थ पाहण्यात येतो तो पुढच्या क्षणाला सूक्ष्मपणे बदललेला असतो. म्हणून 'पूर्वीचाच पदार्थ मी पाहत आहे' असे समजणे चुकीचे आहे.

समजा, एखादा मनुष्य घट पाहत आहे. जेव्हा तो घट पाहतो तेव्हाच तो घट उत्पन्न होतो. जेव्हा घटावरची दृष्टी बाजूला करून तो मनुष्य दुसऱ्या पदार्थाकडे पाहू लागतो तेव्हा घट नसतो. जेव्हा घटाकडे पाहतो तेव्हाच घट आणि त्याचे ज्ञान उत्पन्न होते आणि अन्य पदार्थांकडे पाहतो तेव्हा घट आणि त्याचे ज्ञान नष्ट झालेले असते. याचा अर्थ असा की दृष्टीबरोबरच सृष्टी आहे. याला 'दृष्टीसृष्टीवाद' असे म्हणतात. एक मनुष्य जेवण करण्यास बसलेला असून त्याच्यासमोर पात्रावर भात वाढलेला आहे. 'पात्रावर असलेला भात हा

खाद्यपदार्थ आहे' अशी प्रथम दृष्टी म्हणजे वृत्तीज्ञान त्याला असते म्हणून त्याचा हात भात

(म्हणंजेच सृष्टी) घेण्यासाठी पुढे सरसावतो. या क्षणाचा पदार्थ पुढच्या क्षणाला नाही. पुढच्या क्षणाला नवीन उत्पन्न झालेला असतो. त्यामुळे 'काल पाहिलेली आई, बाप, बायको, मुले, पदार्थ तीच आज पाहतो आहे' ही समज चुकीची आहे. आज ज्यांना पाहत आहोत ते नवीनच कोणीतरी आहेत. आधीच्या जागृतीतले पदार्थ पुढच्या जागृतीत नसतात. परमार्थात इतकी सूक्ष्म नजर यावी. मग पदार्थाविषयी असलेले राग, द्वेष सहजच गळून पडू लागतात.

'ब्रह्म सत्य आहे, पदार्थ मिथ्या आहेत आणि जोपर्यंत दृष्टीत पदार्थ आहे तेव्हाच तो आहे, अन्य वेळेस नाही' – याला 'दृष्टीसृष्टीवाद' असे म्हणतात. 'दृष्टीसृष्टीवाद' हा देखील विवर्तवादाचा एक सिद्धांत आहे. समष्टी पातळीवर दृष्टीसृष्टी म्हणजे काय ? ज्या वेळेस सूर्याला पाहतो तेव्हाच तो आहे, अन्य काली नाही. जेव्हा ग्रह, तारे इत्यादींना पाहतो तेव्हाच ते आहेत, अन्य वेळेस नाही. दृष्टीसृष्टीवादामध्ये ज्ञानालाच पदार्थांचा आकार आलेला असतो.

प्रतितीकालीच पदार्थ असल्यामुळे दृष्टीसृष्टीवादात वर्तमानकाळच मानता येतो. जोपर्यंत स्वप्न असते तोपर्यंतच स्वप्नातील पदार्थ असतात, नंतर नसतात. त्याचप्रमाणे, ज्या अवस्थेला जागृती अवस्था मानण्यात आले होते त्या जागृती अवस्थेतील पदार्थही प्रतितीकालीच असतात, अन्य काली नसतात. याचा अर्थ जागृती ही अवस्था जागृती अवस्था नसून स्वप्नच आहे असे सिद्ध होते. म्हणून, दृष्टीसृष्टीवादात सुषुप्ती आणि स्वप्न या दोनच अवस्था आहेत, जागृती अवस्था नाही. जागृती अवस्था नसल्यामुळे व्यावहारिक सत्ताही नाही. जागृतीत कार्य–कारण भाव प्रकर्षाने असतो. परंतु, दृष्टीसृष्टीवादात जागृती अवस्था नसल्यामुळे कार्य–कारण भाव नसतो. स्वप्न ज्याचे त्यालाच दिसते. दृष्टीसृष्टीवादात जीव एकच आहे. दृष्टीसृष्टीवादात ब्रह्माची पारमार्थिक सत्ता आणि जीवाची प्रातिभासिक (स्वप्न, सुषुप्ती) अशा दोनच सत्ता आहेत.

दृष्टीसृष्टीवादात जागृती अवस्था नसल्यामुळे अंतःकरणवृत्ती नाही आणि प्रथम प्रमाता, मग प्रमाण आणि नंतर प्रमेय असे नसते. दृष्टीसृष्टीवादात विषयी–विषय नसतो. दृष्टीसृष्टीवादात ज्ञाता–ज्ञान–ज्ञेय एकदमच उत्पन्न होतात आणि एकदमच तिन्ही लय पावतात. दृष्टीसृष्टीवादात अंतःकरणवृत्ती नसते, अविद्यावृत्ती असते. दृष्टीसृष्टीवादात सर्व पदार्थ साक्षीभास्य आहेत. साक्षी अविद्यावृत्तीने पदार्थांचे प्रकाशन करतो. दृष्टीसृष्टीवादात त्रिपुटीच्या आधी पदार्थ नसतो, त्रिपुटी सोबतच पदार्थ असतो, त्रिपुटी मावळली (म्हणजे अन्य पदार्थाकडे पाहिले) की हा पदार्थही नष्ट होतो. स्वप्नावस्था असल्यामुळे पदार्थांची अभिज्ञारूप प्रत्यक्षता असते. अशाप्रकारे, जितक्या प्रमाणात स्वप्न मिथ्या तितक्याच प्रमाणात जागृतीही मिथ्या आहे. जागृती ही जागृती नसून स्वप्नच आहे. अशाप्रकारे, समस्त प्राणी, पदार्थ, परिस्थिती हे अनिर्वचनीय आहेत. दृष्टीसृष्टीवाद हा खऱ्या अर्थाने विवर्तवादाचा सिद्धांत आहे. भासलेल्या सर्पाप्रमाणे जगत्प्रपंच मिथ्या आहे आणि प्रत्यक्षात रज्जूप्रमाणे ब्रह्म सत्य आहे.

सृष्टीदृष्टीवाद आणि दृष्टीसृष्टीवाद शास्त्राला का सांगावे लागले? मनुष्याला पदार्थांची प्रत्यक्षता असून ते सत्य वाटतात. म्हणून, पदार्थ मिथ्या कसे आहेत याचा बोध करण्यासाठी शास्त्राने सृष्टीदृष्टीवाद आणि दृष्टीसृष्टीवाद सांगितले आहेत. सृष्टीदृष्टीवाद आणि दृष्टीसृष्टीवाद सांगण्याच्या निमित्ताने सर्व देश, काल, पदार्थ हे अनिर्वचनीय आहेत यावरच भर दिलेला आहे.



आतापर्यंत आपण देहांचा एकत्रित, अवस्थांचा एकत्रित व आभासांचा एकत्रित अभ्यास केला. आत्मा पंचकोशातीत आहे हे समजून घेतले. मृत्यू होणे आणि जन्म होणे म्हणजे काय हे जाणले. शेवटी जागृती ही देखील स्वप्नच असून सर्व पदार्थ मिथ्या आहेत असा निर्णय लावला. जोपर्यंत ईश्वर, जीव, जगत्, ब्रह्म यांच्या व्याख्या आपल्याला कळणार नाहीत, तोपर्यंत 'तत्त्वमसि' महावाक्याचा अर्थ नीट समजणार नाही. म्हणून, पुढे या व्याख्या जाणून घेऊन महावाक्य निरूपण श्रवण करण्यासाठी जी भूमिका गरजेची असते त्या भूमिकेवर येऊ.

★★★★★

|| ॐ तत् सत् ||



## चिंतन क्रमांक – १४
## कूटस्थ आणि जीव

तत्त्वमसि महावाक्यावर विचार करण्यासाठी आपण एकत्रित जमलेलो आहोत. मनुष्य देह मिळालेल्या जीवाने श्रीगुरूंच्या श्रीमुखातून तत्त्वमसि महावाक्याचे निरूपण श्रवण करावे. वेदातील महावाक्ये ब्रह्मबोधक आहेत. महावाक्य श्रवणानंतर शिष्याला, 'सर्व चराचराला व्यापक ब्रह्म मी आहे', असे अपरोक्ष ज्ञान झाले पाहिजे आणि त्यातच मनुष्य जन्माची सार्थकता आहे. महावाक्य निरूपण श्रवण करण्याआधी पार्श्वभूमी माहिती पाहिजे आणि त्यावर चिंतन केले पाहिजे. म्हणून, सर्वप्रथम आपण कर्ममीमांसेचा अभ्यास केला. जन्मोंजन्मी केवळ कर्मच करत राहिल्याने कर्म बंधनातून मनुष्य सुटत नाही. मनुष्य प्रत्यक्षात कोण आहे? हे जाणून घेतले पाहिजे. म्हणून, जडाची व्याप्ती कुठपासून कुठपर्यंत आहे व चैतन्य म्हणजे काय? याचा पूर्वी आपण अभ्यास केला. 'देह आणि आत्मा यांचा विवेक' येथून परमार्थाला सुरुवात होते. तो विवेक स्पष्टपणे कळण्यासाठी चार देहांचा अभ्यास करून, आत्मा असंग आहे ते जाणले पाहिजे. 'मी असंग आहे' एवढे जाणल्यानेच परमार्थ पूर्ण होत नाही. साक्षी हा कसा आहे? हे जाणले पाहिजे. या कारणासाठी पदार्थज्ञान आणि आत्मज्ञान होण्याच्या प्रक्रिया पाहिल्या. एक ब्रह्मच सर्वत्र असताना, मग, मला पदार्थ का दिसतात? असा साधकाला प्रश्न पडतो. म्हणून, पदार्थ मिथ्या असून, ब्रह्मच सत्य आहे असा विवर्ताचा सिद्धांत आपण कळून घेतला. हाच सिद्धांत दृढ करण्यासाठी प्रपंच चतुष्टयाचा एकत्रित अभ्यास केला. त्यामुळे, पदार्थाचे मिथ्यत्व आपण आणखी स्पष्टपणे जाणून घेतले.

आता ब्रह्म, ईश्वर, कूटस्थ आणि जीव यांच्या व्याख्या पाहू. एका ब्रह्मालाच उपाधी भेदाने ईश्वर, कूटस्थ, जीव अशी नावे येतात. पूर्वी चिंतनांमध्ये 'सृष्टी' हा शब्द अनेक वेळा आलेला आहे. प्रत्यक्षात सृष्टी किती अफाट आहे? हे कळून घेतल्यावर मनुष्याला त्याचा देह आणि त्याचा बायको, पोरे, संपत्तीरूपी संसार क्षुद्र असून त्याबद्दल अभिमान धरण्याचे कोणतेच कारण नाही हे लक्षात येईल. सृष्टी किती काळापर्यंत टिकते? महाप्रलयाचा काळ किती असतो? ते समजण्यासाठी मन्वंतर, कल्प आणि महाकल्प ही काळ मोजण्याची परिमाणे समजून घ्यावी लागतील. व्यष्टी पातळीवर एका जीवाचे शरीर उत्पन्न होण्यास अविद्या कारण आहे आणि समष्टी पातळीवर सृष्टी उत्पन्न होण्यास माया कारण आहे. मूल अविद्या आणि तूल अविद्या असे अविद्येचे दोन प्रकार आहेत. अविद्येमुळे जन्म–मरणाचे चक्र आहे. म्हणून, साधकाला अविद्या आणि माया यांचे कार्य, लक्षण आणि आश्रयस्थान याबद्दल सखोल माहिती असणे गरजेचे आहे. जरी सृष्टी ईश्वराने निर्माण केलेली आहे, तरी, तो त्यासाठी जबाबदार आहे की नाही? ब्रह्मदेव, विष्णू आणि शंकर यांची वास्तविक स्थिती काय आहे? हे साधकाने जाणून घेणे आवश्यक आहे. श्रीराम, श्रीकृष्ण इत्यादी ईश्वराच्या

दशावतारांच्या लीलांचा प्रभाव बहुसंख्य साधकांवर असतो. त्यांची वास्तविक स्थिती कळून घेतली पाहिजे.

पूर्वी आपण जीवाच्या तीन देहांचा सविस्तर अभ्यास केला होता. ईश्वराचेही तीन देह आहेत. जीवाच्या तीन देहांशी संबंधीत जसे चैतन्याचे विश्व, तैजस, प्राज्ञ हे तीन आभास आहेत, तसेच, ईश्वराच्या तीन देहांशी संबंधीत विराट, हिरण्यगर्भ आणि ईश्वर हे चैतन्याचे तीन आभास आहेत. जीवाचे तीन देह, तीन आभास आणि ईश्वराचे तीन देह आणि तीन आभास यांचा एकत्रित विचार आपण करणार आहोत. आत्म्याच्या ठिकाणी देहाचा भ्रम होणे याला व्यष्टी पातळीवरचा भ्रम–अध्यास म्हणतात. ब्रह्मावर जगताचा भ्रम होणे याला समष्टी पातळीवरचा भ्रम–अध्यास म्हणतात. अध्यासाचा निरास झाल्यानेच जीवन्मुक्ति सिद्ध होते. या कारणासाठी अध्यासाचे विवेचन करू.

साधकाने संप्रदायपूर्वक वेदांतशास्त्राचे अनुशीलन केले, तरच, त्याला वेदांतशास्त्राचे फळ प्राप्त होते. संप्रदाय कशाला म्हणायचे? एखाद्या संप्रदायास खऱ्या अर्थाने संप्रदाय म्हणविण्यासाठी कोणत्या अटी पूर्ण असायला पाहिजेत? याची माहिती करून घेऊ. अंतिम सिद्धांत असा आहे की ब्रह्म हे जगतास कारण आहे. सृष्टी व्यक्त रूपात असते तेव्हा जे सृष्टी कार्य प्रतीत होते, ते, त्याच्या कारणाशी म्हणजे ब्रह्माशी एकरूप आहे. जगताच्या उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय या तीन अवस्था अनित्य असल्यामुळे ब्रह्माला त्या तीन अवस्थांचा संबंध लागत नाही. ब्रह्म हे कारण आणि जगत्‌रूपी कार्य यांचा अभेद कसा आहे हे साधकाला स्पष्टपणे कळणे आवश्यक आहे. जीवाला स्वतःच्या अस्तित्वाची अहं म्हणजे 'मी' अशी जाणीव असते. भ्रामक 'मी' आणि यथार्थ 'मी' कळून घेतले पाहिजे. तत्त्वमसि महावाक्यात 'तत्', 'त्वम्', 'असि' हे तीन शब्द आहेत. मनुष्याला शब्दाचा अर्थ कसा कळतो? त्याचप्रमाणे शक्तिवृत्ती आणि लक्षणावृत्ती म्हणजे काय? हे स्पष्टपणे समजले, तर, तत्त्वमसि महावाक्याचा अर्थ निश्चित करता येईल. दोन प्रक्रियांच्या माध्यमातून तत्त्वमसि महावाक्याचे निरूपण करता येते. त्या दोन प्रक्रिया थोडक्यात समजावून घेऊ.

सर्वप्रथम आपण 'कूटस्थ' कोणाला म्हणतात? ते पाहू. स्थूल, सूक्ष्म, कारण या तीन देहांना आत्मा अधिष्ठान आहे. सूक्ष्मपणे विचार केला, तर, लक्षात येते की जेव्हा 'आत्मा' म्हणतो, तेव्हा देहादिकांना मान्यताच देता येत नाही. कारण, सर्वकाही एक आत्माच आहे. वेदांतशास्त्राचा सिद्धांत क्रमाक्रमाने समजून घ्यायचा असेल, तर, व्यष्टीने देह आणि चैतन्य यांचा विचार करावा लागेल. स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन देहांच्या संबंधाने आत्म्याला 'आत्मा' असे न म्हणता 'कूटस्थ' म्हणावे. कारणदेह म्हणजेच अज्ञान, म्हणजेच अविद्या म्हणजेच 'मी स्वतःला जाणत नाही' असा निश्चय. व्यष्टी अज्ञानाच्या अधिष्ठानाला 'कूटस्थ' असे म्हणतात.

**आकृती क्रमांक ४७ मध्ये कूटस्थ, कारणदेह आणि साक्षी दाखविलेले आहेत.**






**आकृती क्रमांक ४७ – कूटस्थ आणि साक्षी**

कूटस्थाचा प्रकाश कारणदेहावर पडतो, त्या प्रकाशाला साक्षी असे म्हणतात. ही साक्षीची सूक्ष्म व्याख्या आहे. कारणदेह उपहित चैतन्य म्हणजे साक्षी. म्हणजेच, अविद्या उपहित चैतन्य म्हणजे साक्षी. कूटस्थ असंग आहे. त्याला अज्ञानाचा संग लागत नाही. सोनार ऐरणीवर विविध दागिने घडवितो. परंतु, त्या व्यवहाराचा संबंध ऐरणीस लागत नाही. 'कूट' या शब्दाचा अर्थ कपट, लबाडी, फसवणूक असा होतो. मिथ्या अज्ञान हीच खरेतर सर्वात मोठी फसवणूक आहे. म्हणून, 'कूट' म्हणजे मिथ्या अज्ञान. तसेच, 'स्थ' म्हणजे राहणारा, वास करणारा. म्हणून, मिथ्या अज्ञानासह त्याचे कार्य स्थूल, सूक्ष्मदेह यांत असंग रूपाने राहणारा म्हणजे 'कूटस्थ'. अर्थात स्थूल, सूक्ष्म, कारणदेहांच्या अधिष्ठानाला 'कूटस्थ' असे म्हणतात. कूटस्थ हा चेतन आहे. कूटस्थाला स्थूल, सूक्ष्म, कारणदेह आणि त्यांच्या धर्मांचा संबंध का लागत नाही? कूटस्थाची पारमार्थिक सत्ता आहे. कारणदेह, सूक्ष्मदेह यांची प्रातिभासिक सत्ता आहे व स्थूलदेहाची व्यावहारिक सत्ता आहे. देहांची सत्ता आणि कूटस्थाची सत्ता भिन्न आहे. भिन्न सत्तेत व्यवहार होत नाही. म्हणून, कूटस्थाला देह व त्यांच्या धर्मांचा संबंध लागत नाही. कूटस्थाच्या सत्तेवरच कल्पित तीन देहांचा व्यवहार होतो. कूटस्थ हे ब्रह्मच आहे.

**चिंतन क्रमांक ९** मध्ये जीवाच्या व्याख्येत आपण अंतःकरण धरले होते. अंतःकरण हा सूक्ष्मदेहाचा अवयव आहे. अंतःकरण, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार या अंतःकरण पंचकाशी संबंधीत चैतन्य म्हणजे जीव अशी व्याख्या आपण केली होती. काम, क्रोध, दया, स्पृहा, दुःख, कर्ता इत्यादी अंतःकरणाचे असंख्य धर्म आहेत. 'मी दुःखी', 'मी पापी' असा निश्चय मनुष्याचा असतो, याला 'जीवपणा' किंवा 'जीवत्व' असे म्हणतात. ती जी व्याख्या आपण अभ्यासली होती ती वास्तविक 'जीवपणा'ची व्याख्या होती.

जीवाच्या सूक्ष्म व्याख्येसाठी कारणदेह म्हणजे अविद्या विचारात घ्यायची असते.

तर, मग जीव म्हणजे काय? कूटस्थ चैतन्य, अविद्या आणि अविद्येतील कूटस्थ चैतन्याचा आभास या तिघांना मिळून 'जीव' असे म्हणतात. ही जीवाची व्याख्या आकृती क्रमांक ४८ वरून स्पष्ट होईल.






आकृती क्रमांक ४८ – जीवाचे रूपक

जीवाच्या व्याख्येत अविद्या हे विशेषण ठरते.

विशेष्य + विशेषण = विशिष्ट
कूटस्थ + अविद्या = जीव

कूटस्थ आणि साक्षी हे चेतन आहेत. त्यांच्या ठिकाणी कोणताही व्यवहार संभवत नाही. कूटस्थ आणि साक्षी ही 'दोन' चैतन्ये नाहीत. ते दोन्ही एकच चैतन्य आहेत. परंतु, कूटस्थाचा प्रकाश जेव्हा कारण शरीरात येतो, तेव्हा त्या आभासाला 'प्राज्ञ' असे म्हणतात. 'मी स्वतःलाच जाणत नाही' किंवा 'मला आत्म्याचे अज्ञान आहे' असा निश्चय त्या आभासाच्या ठिकाणी असतो. त्यालाच खऱ्या अर्थाने जीव असे म्हणतात.

चैतन्य एकच आहे. व्यष्टीने तीन देहांच्या अपेक्षेने चैतन्याला कूटस्थ म्हणतात. त्याच चैतन्याला समष्टीने, चराचर सर्व सृष्टीला अधिष्ठान असलेले ब्रह्म म्हणतात. आताच आपण हे लक्षात घ्यावे की कूटस्थ आणि ब्रह्म एकच आहेत. उपाधी भेदाने 'कूटस्थ' आणि 'ब्रह्म' ही नावे दिलेली आहेत. कूटस्थ अकर्ता, अविकारी आहे. कूटस्थ सच्चिदानंदस्वरूप आहे. जागृती अवस्थेत अंतःकरणवृत्ती आणि चिदाभास यांच्या सहाय्याने आंतरबाह्य पदार्थ

जाणले जातात. स्वप्नावस्थेत निद्रादोषयुक्त अविद्यावृत्ती आणि चिदाभास यांच्या सहाय्याने स्वप्नपदार्थ जाणले जातात. सुषुप्ती, योग्यांची समाधी आणि मूर्च्छा या अवस्थेत पदार्थांचा अभाव जाणवतो. या सर्वांना कूटस्थ प्रकाशित करतो. चिदाभास विकारी आहे. वृत्तीदेखील संकोच–विकासवान आहे. चेतन असलेला कूटस्थ व्यष्टी पातळीवरचा प्रपंच प्रकाशित करतो. दोन वृत्तींमधील जी संधी असते, त्यालाही कूटस्थ प्रकाशन करतो. वृत्तीची संधी म्हणजे काय? वृत्ती एका वेळेस एकाच पदार्थाला जाणते. समजा, एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याकडे पाहत आहे आणि त्याचे म्हणणे ऐकत आहे. 'पाहणे आणि ऐकणे' हे एकाच वेळी होत नाही. पाहण्याची वृत्ती उदय होते आणि मावळते. नंतर, लगेच ऐकण्याची वृत्ती उदय होते आणि मावळते. एक वृत्ती मावळलेली आहे आणि दुसऱ्या वृत्तीचा उदय व्हायचा आहे. याला दोन वृत्तींमधल्या भागास संधी म्हणतात. वृत्ती, वृत्तींची संधी आणि वृत्तींचा अभाव प्रकाशित करणारा कूटस्थ आहे. अशाप्रकारे, कूटस्थाचा 'प्रपंचापासून वेगळा' असा विवेक करावा.

कूटस्थाचा बोध स्पष्ट होण्यासाठी एक दृष्टांत पाहू. निरभ्र आकाशात सूर्य तळपत आहे. सूर्याचा प्रकाश घरामध्ये व्याप्त आहे. भिंतीवर सूर्य किरणे प्रत्यक्षात पडलेली नसली तरी सूर्याचा सामान्य प्रकाश भिंतीवर असतोच. एक आरसा घेऊन सूर्याच्या प्रकाशात ठेऊन कवडसा भिंतीवर पाडला. **(आकृती क्रमांक ४९)** कवडसा सूर्याच्या सामान्य प्रकाशापेक्षा अधिक प्रकाशमान असतो. आता आरसा काढून घेऊ. भिंतीवर फक्त सूर्याचा सामान्य प्रकाश राहील. पुन्हा कवडसा भिंतीवर पाडा. पुन्हा आरसा काढून घ्या. पुन्हा कवडसा भिंतीवर पाडा. असे पटापट करा. पाठोपाठ येणाऱ्या दोन कवडशांमध्ये भिंतीवर सूर्याचा सामान्य प्रकाश आहे. हीच 'संधी' आहे.

सूर्य, आरसा, कवडसा आणि भिंत यांच्या ठिकाणी अनुक्रमे ब्रह्म, अंतःकरण, चिदाभासयुक्त वृत्ती आणि स्थूलदेह घ्यावा. ब्रह्मरूपी सूर्याचा प्रकाश अंतःकरणरूपी आरशावर पडून देहरूपी भिंतीवर कवडसारूपी चिदाभासयुक्त वृत्ती पडते. एक वृत्ती उठते व मावळते. दुसरी वृत्ती उठते व मावळते. अशा असंख्य वृत्ती उत्पन्न होतात व मावळतात. पण एका वेळी एकच वृत्ती उत्पन्न होते. पूर्व वृत्तीचा लय झाल्याशिवाय नंतरच्या वृत्तीचा उगम होत नाही. असे पटापट होते. एका वृत्तीचा लय होऊन दुसऱ्या वृत्तीचा उगम होईपर्यंतचा जो काळ आहे, हीच 'संधी' आहे. सुषुप्ती, मूर्च्छा व समाधी या अवस्थांमध्ये वृत्ती लीन होऊन राहते. 'संधी' आणि सुषुप्ती, मूर्च्छा व समाधी अवस्थांमध्ये जो काल जातो त्यांत वृत्तीचा अभाव असतो. कूटस्थ वृत्तीच्या संधी आणि वृत्तीच्या अभावालाही प्रकाशित करतो.

प्रमाण –

संधयोऽखिलवृत्तीनामभावाश्चावभासिताः ।
निर्विकारेण येनासौ कूटस्थ इति चोच्यते ।।२१।। प्रकरण ८

–श्रीपंचदशी

जागृती आणि स्वप्न अवस्थेत क्षणाक्षणाला अनेक वृत्ती पुन्हा पुन्हा उदय होतात आणि पुन्हा पुन्हा मावळतात. सुषुप्ती, समाधी आणि मूर्च्छा या अवस्थेत सर्व वृत्ती लय पावलेल्या असतात.




आकृती क्रमांक ४९ – कूटस्थासाठी आरसा आणि कवडसा यांचा दृष्टांत

आता, आपण पदार्थज्ञान होण्याची सूक्ष्म प्रक्रिया बघू. समजा, एखादा मनुष्य घट पाहत आहे. त्याच्या देहाच्या आतमध्ये कूटस्थाचा प्रकाश कारणदेहावर पडतो. कारणदेहातील आभासाला 'प्राज्ञ' म्हणतात. कारणदेहातून तो प्रकाश सूक्ष्मदेहातील अंतःकरणावर पडतो. अंतःकरणातील आभासाला 'प्रमाता' म्हणतात. हाच प्रकाश सूक्ष्मदेहातील डोळा या ज्ञानेंद्रियातून (म्हणजे प्रमाणातून) वाहतो. पुढे स्थूलदेहातील डोळा

या ज्ञानेंद्रियातून बाहेर पडतो. अंतःकरणाच्या पुढे आभासयुक्त वृत्ती स्थूल डोळ्यातून बाहेर पडून बाहेर ठेवलेल्या घटाला व्यापते. बाह्य पदार्थाकार झालेल्या आभासाला 'प्रमेय' म्हणतात. ज्यावेळेस वृत्ती घटाला व्यापते तेव्हा 'छोटी मान, मोठ्या पोटासारखा पदार्थ' असे प्रकाशन चिदाभासामुळे होते व 'मी घट जाणला' असे जाणणे म्हणजे ज्ञातत्व हे ब्रह्मचैतन्यामुळे होते. ही प्रक्रिया **आकृती क्रमांक ५० मध्ये** दाखविलेली आहे.






आकृती क्रमांक ५० – पदार्थज्ञानाची विस्तृत प्रक्रिया

ब्रह्मचैतन्य सर्वत्र व्याप्त आहे. घटाचे प्रकाशन होण्यासाठी अंतःकरणवृत्ती व चिदाभास यांचे सहाय्य असते. घट प्रकाशनाच्या सर्व सामग्रीला कोण अधिष्ठान आहे? ब्रह्मचैतन्य हेच घट प्रकाशनाच्या सामग्रीचे अधिष्ठान आहे. अंतःकरणवृत्ती, चिदाभास आणि घट यांचे अधिष्ठान कोणते? अंतःकरणवृत्ती, चिदाभास आणि घट यांचे अधिष्ठान ब्रह्मचैतन्य हेच होय.

पदार्थज्ञानाची ही श्रेष्ठ प्रक्रिया समजण्यासाठी एक सूत्रवाक्य लक्षात ठेवले पाहिजे. देहाच्या आत कूटस्थ आणि चिदाभास प्रकाशन करतात. देहाच्या बाहेर ब्रह्म आणि चिदाभास हे प्रकाशन करतात.

देहाच्या बाहेरील सर्व पदार्थ ब्रह्मचैतन्यामुळे ज्ञात होतात. आतमध्ये कारण, सूक्ष्म, स्थूलदेहांना प्रकाशित करण्याचे काम कूटस्थ चैतन्याचे (म्हणजेच ब्रह्मचैतन्याचे) आहे. यावरून असा निष्कर्ष निघतो की पदार्थज्ञानास ब्रह्मचैतन्य आणि चिदाभास कारणीभूत आहेत.

समजा, घट जेथे ठेवला आहे तिकडे मनुष्य पाहत नाही. याचा अर्थ अंतःकरणवृत्ती घटाच्या दिशेने नाही आणि म्हणून चिदाभास घटाला व्यापण्याचा प्रश्नच नाही. म्हणजे मनुष्याला घटाचे अज्ञान असते. या घटाचे अज्ञान कोणामुळे? घटाचे अज्ञान ब्रह्मचैतन्यामुळे प्रकाशित होते.

समजा, घटाकडे मनुष्य बघत आहे. चिदाभासयुक्त वृत्ती अंतःकरणाच्या पुढे वाहू लागते, चिदाभासासह वृत्ती घटाच्या आकाराची होते आणि 'छोटी मान, मोठे पोट' सारख्या पदार्थाचे प्रकाशन होते. हे प्रकाशन चिदाभासामुळे होते आणि लगेच 'मी घट जाणला' हे

घटाचे ज्ञान ब्रह्मचैतन्यामुळे होते. अशाप्रकारे, घटाचे ज्ञातत्व आणि अज्ञातत्वास ब्रह्मचैतन्य कारण आहे.



चिदाभास हा मर्यादित असतो. मनुष्याची वृत्ती ज्या ठिकाणी जाते, त्या ठिकाणच्याच पदार्थांचे प्रकाशन चिदाभास करतो. पदार्थज्ञान ब्रह्मचैतन्यामुळे होते. अंतःकरणवृत्ती, चिदाभास आणि पदार्थ यांचे अधिष्ठान ब्रह्मचैतन्य आहे.

कोणी म्हणेल, 'पदार्थ कळण्यासाठी अंतःकरण पुरे आहे. त्यासाठी चिदाभासाची काय गरज आहे?' चैतन्य आणि चैतन्याचा आभास नसेल, तर, 'अंतःकरणाचे स्फुरण हे कार्य व ज्ञानेंद्रियांचे पदार्थज्ञान होण्यास सहाय्य' हे सर्व होणारच नाही. मग, दगड आणि अंतःकरण हे समान अर्थाने जड ठरतील. तापवून लाल केलेल्या लोखंडाच्या गोळ्यात जसा अग्नी व्याप्त असतो. तसा अंतःकरणवृत्तीमध्ये चिदाभास व्याप्त असतो. हाच चिदाभास बाह्य पदार्थाला व्यापतो. तेव्हा अंतःकरणात 'हा कोणतातरी आकारवान पदार्थ' असे पदार्थाचे प्रकाशन म्हणजेच स्फुरण होते.

*****

## चिंतन क्रमांक – १५
## ब्रह्म आणि ईश्वर

आतापर्यंत, आपण 'कूटस्थ' आणि 'जीव' यांच्या व्याख्या पाहिल्या. ज्या मनुष्याला (साधकाला) अविद्या विशेषण ठरते त्याला जीव म्हणावे. त्याचे अविद्येशी तादात्म्य असल्यामुळे, 'मी अज्ञानी आहे, मला ब्रह्मज्ञान केव्हा होईल ?' अशी चिंता त्याला सतत असते. ब्रह्माचे परोक्षज्ञान होण्यासाठी तो शास्त्राभ्यास करतो. त्याला जर श्रीगुरू भेटले, तर, ते साधकाला बोध देतात की 'अविद्येशी तुझा संसर्ग आहे, तादात्म्य नाही'. श्रीगुरूंनी केलेल्या महावाक्य निरूपणाने 'अविद्या नाही' असे पक्के कळून तो स्वतः ब्रह्मरूपच आहे, असा त्याचा निश्चय होतो. तेव्हा त्याची जीवन्मुक्ति सिद्ध होते.

व्यष्टीने अविद्या संबंधाने कूटस्थ जीव म्हणून भासतो. समष्टीने मायेच्या संबंधाने ब्रह्म ईश्वर म्हणून भासते. ईश्वर कळून घ्यायचा असेल, तर, प्रथम मायेचे लक्षण कळून घ्यावे लागेल. सृष्टीतील सर्व जीवांच्या कारणदेहांना एकत्र धरले, तर, त्यास 'माया' असे म्हणतात. 'सर्व जीव' असे म्हटल्यामुळे केवळ मनुष्याचेच कारणदेह एकत्रित धरून चालणार नाही. चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या असंख्य जीवांचे कारणदेह एकत्रित धरावे लागतील. दगड, पर्वत, नद्या हेही जीव असून त्यांचेही कारण देह एकत्रित घ्यावे लागतील. स्वर्ग, नरकात राहणाऱ्या सर्व जीवांच्या कारणदेहांचा समावेश करावा लागेल. 'सृष्टीतील सर्व जीव' म्हटल्याने सृष्टीतील एकाही पदार्थाला वजा करता येणार नाही. अशाप्रकारे समष्टी पातळीवरील एकत्रित कारणदेहांना मिळून माया म्हणतात. समष्टी पातळीवरील अज्ञानाला माया म्हणतात. व्यष्टीने अविद्या जशी त्रिगुणात्मक आहे तशी मायाही त्रिगुणात्मक आहे. अविद्येतील सत्त्व मलिन आहे. याचा अर्थ अविद्येत रजोगुण आणि तमोगुण यांचे आधिक्य असून सत्त्वगुण न्यून आहे. या कारणाने जीवाला ब्रह्माचे अज्ञान आहे. याच कारणाने जीवाचे व्यवहारासंबंधीचे ज्ञानही फारच मर्यादित आहे. जीव अल्पज्ञ आहे, त्याचप्रमाणे जीव अल्पशक्तिमान आहे. मनुष्य, मनुष्येतर प्राणी आणि स्वर्गातील देव, तसेच, नरकातील जीव हे अविद्या आणि अविद्याकार्याला सत्य समजतात आणि म्हणून त्यांना बंध आहे, जन्म–मरणाचा फेरा आहे. 'अहं आणि मम' यांची अभिव्यक्ती– हा जीवाचा सहज स्वभाव होऊन बसलेला आहे. परंतु, हे लक्षात घेणे गरजेचे आहे की, अविद्येचे अधिष्ठान म्हणजे कूटस्थ हा चेतन असून बंध–मोक्षातीत आहे. साधकाची अविद्या निवृत्त होते, तेव्हा कूटस्थाला कूटस्थ न म्हणता आत्मा म्हणावे. पुढे आत्मा हा ब्रह्मच आहे हे कळून साधकाचा ब्रह्मरूपतेचा निश्चय होतो.

मायेचे अधिष्ठान ब्रह्म आहे. ईश्वराची व्याख्या काय? ब्रह्मचैतन्य अधिक माया अधिक मायेतील ब्रह्माचा आभास मिळून ईश्वर. ईश्वराचे रूपक **आकृती क्रमांक ५१** मध्ये दाखविले आहे.




आकृती क्रमांक ५१ – ईश्वराचे रूपक

मायेतील सत्त्व शुद्ध आहे. सत्त्वगुणाचे प्रमाण अधिक असून रज आणि तम या गुणांचे प्रमाण अल्प आहे. या कारणाने ईश्वराला ब्रह्मज्ञान आहे. देह आणि देहधर्मांची भ्रांती जीवांना असते. तशी भ्रांती ईश्वराला नाही. ईश्वराची माया ही उपाधी अत्यंत स्वच्छ आहे. सर्व जीवांच्या कारणदेहांच्या समष्टीला माया म्हणतात. ईश्वर सदैव मुक्त आहे. ईश्वर सदैव सर्व पदार्थांना जाणतो. ईश्वर सर्वज्ञ आहे. तो सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय करतो. एक कल्प इतक्या कालावधीत सृष्टी व्यक्त रूपात राहते. त्यानंतरच्या एक कल्पात सृष्टी अतिसूक्ष्म म्हणजे कारण रूपात, अव्यक्त स्थितीत राहते आणि यालाच महाप्रलय म्हणतात. पुढच्या कल्पात परत सृष्टी व्यक्त रूपाला येते. सृष्टी–महाप्रलय–सृष्टी–महाप्रलय हे चक्र अनादी काळापासून सुरू आहे आणि पुढे अनंत काळ सुरू राहील. याच्यातून नेहमीसाठी बाहेर पडायचे की नाही हे मनुष्याने आपले आपण ठरवायचे आहे. ईश्वर सर्व जीवांचे अंतर्याम जाणतो. ईश्वर जीवांच्या कर्माप्रमाणे त्यांना कर्म करण्यास प्रेरणा देऊन त्यांना सुख, दुःख हे फळ देण्यास निमित्त होतो.

ब्रह्माचा प्रकाश मायेत पडतो. या प्रकाशाला 'मायोपहित चैतन्य' म्हणजे 'ईश्वरसाक्षी' असे म्हणतात. मायेला ब्रह्माच्या प्रकाशाचा स्पर्श झाल्यावर मायेत ब्रह्मचैतन्याचा आभास होतो, याला 'ईश्वराचा आभास' असे म्हणतात. **आकृती क्रमांक ५१** मध्ये ब्रह्म, ईश्वरसाक्षी, माया आणि ईश्वराचा आभास दाखविलेले आहेत. काही वेळापूर्वी आपण 'ईश्वर जीवांना कर्मांचे फळ देतो', 'ईश्वर सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, प्रलय करतो', असे पाहिले. 'ईश्वर करतो' म्हणजे नक्की काय? ब्रह्म, ईश्वरसाक्षी, माया आणि ईश्वराचा आभास यांपैकी व्यवहार कोण करतो? ब्रह्माच्या ठिकाणी कोणतीही उपाधी नाही. त्याच्या

दृष्टीने सृष्टी नाहीच. ब्रह्माला क्रियावान अथवा निष्क्रियावान असे काहीच म्हणता येत नाही.

ब्रह्मावर द्वंद्वाचा आरोप करता येत नाही. शुध्द चैतन्य काही करत नाही. म्हणून, ब्रह्म व्यवहार करत नाही. एकटी माया व्यवहार करू शकते का? जेथे त्रिगुण राहतात, ते जड असते. माया जड आहे. माया आहे म्हणावे, तर, ब्रह्मज्ञानाने तिचा अत्यंताभाव होतो. माया नाही म्हणावे, तर, सृष्टी कारण रूपात आणि व्यक्त रूपात राहते. आहे आणि नाही एकाच ठिकाणी राहू शकत नाहीत. म्हणून, माया आहे आणि नाही यांपेक्षा वेगळी, विलक्षण अर्थात अनिर्वचनीय म्हणजेच मिथ्या आहे. सारांश – एकटी माया व्यवहार करू शकत नाही.

मग, ईश्वरसाक्षी व्यवहार करतो का? ब्रह्मापासून निघालेला आणि मायेला स्पर्श करण्याच्या आधीपर्यंतचा जो प्रकाश आहे, त्याला 'ईश्वरसाक्षी' म्हणतात. ईश्वरसाक्षी तटस्थ असतो. तो काहीही करत नाही. ईश्वरसाक्षीच्या एका बाजूस ब्रह्म आहे आणि दुसऱ्या बाजूस माया आहे. दोघांना 'ईश्वरसाक्षी' हा 'साक्षी' आहे. सारांश – ईश्वरसाक्षीही व्यवहार करत नाही. ईश्वरसाक्षीही चैतन्यच आहे.

मग, समष्टीपातळीवरचा व्यवहार कोण करतो? मायेतील ब्रह्माचा आभास ज्याला 'ईश्वराचा आभास' म्हणतात, तो व्यवहार करतो. जीवांना कर्मांचे फळ देणे, सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, प्रलय करणे, अवतार घेऊन भक्तांवर कृपा करून आसुरी प्रवृत्तीच्या लोकांचा नाश करणे हे सर्व ईश्वराच्या आभासाचे कार्य आहे. राम, कृष्णादि अवतार हे ईश्वराच्या आभासाचे असून ते व्यापक पातळीवर घडामोडी करतात. अनेक जीवांच्या एकत्रित प्रारब्धाने या अवतारांचा देह हालतो व अनुग्रह, नाश इत्यादी कार्य होते. सृष्टीचा विचार करणे हे त्यांच्या ठिकाणी दिसून येते. श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या दहाव्या अध्यायात ईश्वराच्या ऐश्वर्याचे (विभूतींचे) वर्णन आहे. हे सर्व ऐश्वर्य ईश्वराच्या आभासाचे आहे. तात्पर्य – 'ईश्वर करतो' म्हणजे खऱ्या अर्थाने 'ईश्वराचा आभास करतो' हे लक्षात घ्यावे.

'ईश्वर म्हणजे कोण?' हे समजण्यासाठी आपण ईश्वराचा एकच देह म्हणजे समष्टी कारणदेह म्हणजेच माया विचारात घेतली. ईश्वराला एकच शरीर आहे काय? ज्याप्रमाणे जीवाचे कारण, सूक्ष्म, स्थूल असे तीन देह आहेत, तसेच, ईश्वराचे माया, समष्टी सूक्ष्मशरीर आणि समष्टी स्थूलशरीर असे तीन देह आहेत.

समष्टी स्थूलशरीर म्हणजे काय? स्वर्ग, पृथ्वी, नरक येथील सर्व जीवांचे स्थूल शरीर एकत्र धरले, तर, त्याला समष्टी स्थूलशरीर म्हणतात. हा ईश्वराचा स्थूलदेह आहे. पृथ्वीवरच चौऱ्यांशी लक्ष प्रकारचे असंख्य जीव आहेत. त्या चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या स्थूलदेहांचे वर्गीकरण जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज असे केलेले आहे. पर्वत, नद्या, दगड आणि समुद्र हे सुध्दा जीव आहेत. सूर्य, चंद्र, असंख्य तारका, उल्का इत्यादी हे देखील जीवच आहेत. भूर्वलोक ते सत्यलोक या सहा स्वर्गात व अतल ते पाताल या सात पाताळात असंख्य जीव आहेत. या सर्वांच्या स्थूलदेहांच्या समष्टीला समष्टी स्थूलदेह म्हणतात व हाच ईश्वराचा स्थूलदेह आहे. सृष्टीतील सर्व जीवांचे वर्गीकरण 'चर' व 'अचर' अशा दोन प्रकारेही करता येते. 'चर' म्हणजे हालणारे. 'अचर' म्हणजे न हालणारे. दगड, पर्वत इत्यादी 'न

हालणारे' जीव हे अचर सृष्टीत येतात. मनुष्य, पशु, पक्षी हे 'हालणारे' जीव चर सृष्टीत येतात.


स्थूलदेह म्हटला की, सूक्ष्मदेह असतोच. सूक्ष्मदेहातून स्थूलदेह येतो. मनुष्य आणि पशू, पक्ष्यादिंचे सूक्ष्म शरीर २५ तत्त्वांचे बनलेले आहे. असा अभ्यास आपण पूर्वी केलेला आहे. दगडालादेखील सूक्ष्मदेह आहे. मनुष्य, पशू, पक्षी, दगड यांच्या आचार विचारांमध्ये मोठा फरक जाणवतो. असे का? पूर्वजन्मींच्या पाप-पुण्याच्या आधारावर जीवाला विशिष्ट देह मिळतो. शरीर हे पाप-पुण्यात्मक आहे.

प्रमाण –

**तेथ कृमि कीट लोष्ट। हे देह लाहती निकृष्ट।**
**तया नाम तें अनिष्ट। कर्मफळ ।।२४२।। अध्याय १८**

– श्रीज्ञानेश्वरी

अतिपापामुळे, घोर तमोगुण असल्यामुळे, अनिष्ट कर्माचरणाचे फळ म्हणून दगडात विचार आणि आचारांची अभिव्यक्तीच होत नाही. त्यापेक्षा कमी पाप झाडे, पशूपक्षी यांचे आहे. पशूपक्ष्यांमध्ये थोडीतरी विचारशक्ती आहे. पाप-पुण्य समसमान असली, तर, मनुष्यदेह मिळतो.

प्रमाण –

**म्हणोनि समभागें शुभाशुभें। मिळोनि अनुष्ठानाचें उभे।**
**तेणें मनुष्यत्व लाभे। तें मिश्र फळ ।।२४७।। अध्याय १८**

– श्रीज्ञानेश्वरी

आपल्याला डोळ्यांनी सूर्य, चंद्र, तारका इत्यादी दिसतात: ते त्यांचे स्थूलदेह आहेत. त्यांच्या स्थूलदेहाच्या आत सूक्ष्मदेह आहे. पुण्यकर्माचे, इष्ट कर्माचे फळ म्हणून इंद्रादिक देवतांची शरीरे प्राप्त होतात.

प्रमाण –

**तैं इंद्रादिक देवांचीं। देहें लाहिजती सव्यसाची।**
**तया कर्मफळा इष्टाची। प्रसिद्धी गा ।।२४४।। अध्याय १८**

– श्रीज्ञानेश्वरी

सारांश – सृष्टीतील सर्व जीवांचे सूक्ष्मदेह एकत्रित धरले, तर, त्याला समष्टी सूक्ष्मदेह म्हणतात. हाच ईश्वराचा सूक्ष्मदेह आहे. **आकृती क्रमांक ५२** मध्ये ईश्वराचे तीन देह दाखविलेले आहेत.




आकृती क्रमांक ५२ – ईश्वराचे तीन देह

आकृत्यांमध्ये ब्रह्माच्या खाली काही अंतरावर माया, त्याच्या खाली काही अंतरावर समष्टी सूक्ष्मशरीर आणि त्याच्या खाली काही अंतरावर समष्टी स्थूलशरीर हे दाखविलेले आहे. असे केवळ विषय समजून घेण्यासाठी निदर्शन केलेले आहे. प्रत्यक्षात तसे नाही. ब्रह्म हे सृष्टीत ओतप्रोत व्याप्त आहे. सरोवरामध्ये कमळाच्या झाडाची पाने जसे पाण्यावर तरंगतात, त्याप्रमाणे, ब्रह्मावर जगत् अध्यस्त आहे.

आतापर्यंत आपण कूटस्थ, जीव आणि ईश्वर यांच्या व्याख्या समजून घेतल्या. आता ब्रह्मचैतन्याचे लक्षण पाहू. श्रुत, अश्रुत, ज्ञात, अज्ञात अशा सृष्टीतील सर्व पदार्थांमध्ये आत–बाहेर व्यापक, सच्चिदानंदस्वरूप एक चैतन्य आहे. त्याला ब्रह्म असे म्हणतात. जगतामध्ये ब्रह्म आहे. परंतु, ब्रह्मात जगत् नाही. जीव आणि ईश्वर हे उपाधींमुळे भासतात. ब्रह्मात कोणतीही उपाधी नाही. ब्रह्माच्या दृष्टीने जगत् नाहीच. मनुष्याला स्वतःच्या देहासह जगताची प्रतिती आहे. जगतास कोणी चेतन आधार पाहिजे आणि ते अधिष्ठान म्हणजे ब्रह्म.

एकाच चैतन्याच्या चार भागांचा अभ्यास आपण केला. चैतन्याच्या चार भागांचा आपापसात कसा संबंध आहे, हे कळण्यासाठी आपण एक दृष्टांत पाहू. घटाकाश, जलाकाश, मेघाकाश आणि महाकाश अशा चार आकाशांचा विचार करू. घट म्हणजे कलश. एका मोकळ्या मैदानावर आरंभी रिकामा घट ठेवलेला आहे. आकाशात ढग (मेघ) जमलेले आहेत. ढगाच्या आकाराने जेवढे मर्यादित आकाश आहे, त्याला मेघाकाश म्हणावे. ढगांसह घट ज्या मोठ्या पोकळीत आहे, त्याला महाकाश म्हणू. हे **आकृती क्रमांक ५३** मध्ये दाखविलेले आहे.




**आकृती क्रमांक ५३ – घटाकाश, जलाकाश, मेघाकाश आणि महाकाश**

घट हा सर्वांत लहान आहे. घटाच्या निमित्ताने कूटस्थ चैतन्य व जीवचैतन्य कळून घ्यायचे आहेत. आरंभी घट रिकामा आहे. घटाच्या आतील पोकळीला घटाकाश म्हणतात. घटाच्या ठिकाणी स्थूलशरीर आणि घटाकाशाच्या ठिकाणी कूटस्थचैतन्य समजावे. आता, घटामध्ये जल काठोकाठ भरले. जलाकाश कशाला म्हणावे? घटाकाश, घटाकाशाच्या आश्रयाला असलेले जल आणि जलातील घटाकाशाचे प्रतिबिंब यांना मिळून जलाकाश म्हणतात. जलाकाशाच्या ठिकाणी जीवचैतन्य घ्यावे. जलाच्या ठिकाणी अविद्या समजावी.

मेघाकाश आणि महाकाशाच्या माध्यमातून ईश्वर आणि ब्रह्म कळून घ्यायचे आहेत. मेघामध्ये जल असते. मेघाकाशाच्या ठिकाणी सापेक्ष ब्रह्म समजावे. मेघातील जलाला माया

समजावे. मेघाकाशाचे प्रतिबिंब मेघातील जलात पडते, म्हणजे सापेक्ष ब्रह्माचे प्रतिबिंब मायेत पडते. साधारणपणे, जलात रूपवान पदार्थांचेच प्रतिबिंब पडते, असे सर्व लोकांना माहीत आहे. परंतु, आकाशाला रूप दिसत नाही, तर, मग जलात आकाशाचे प्रतिबिंब कसे पडेल? शांत ठिकाणी मोठ्याने शब्द उच्चारला, तर, आकाशातून प्रतिध्वनी ऐकू येतो. निर्जन, शांत ठिकाणी असलेल्या तळ्यातील पाण्यात गंभीरता जाणवते. पाण्यात आकाशाचे प्रतिबिंब पडते म्हणून ती गंभीरता जाणवते. जलात आकाशाचे आकाशातील तारकांसह प्रतिबिंब पडते.



जलाकाशाच्या लक्षणात पुढील तीन गोष्टी आहेत –

(१) घटाकाश

(२) घटाकाशाच्या आश्रयाला असलेले जल आणि

(३) घटाकाशाचे जलातील प्रतिबिंब

जीवाच्या लक्षणात पुढील तीन गोष्टी घ्याव्यात –

(१) कूटस्थ

(२) कूटस्थाच्या आश्रयाला राहणारी अविद्या (म्हणजे अज्ञान म्हणजेच कारणदेह) आणि

(३) अविद्येत पडलेले कूटस्थाचे प्रतिबिंब

दृष्टांत आणि सिद्धांत जुळवला, तर, जलाकाशाच्या ठिकाणी जीव घ्यावा.

(१) घटाकाश = कूटस्थ

(२) घटाकाशाच्या आश्रयाला असलेले जल = कूटस्थाच्या आश्रयाला राहणारी अविद्या आणि

(३) घटाकाशाचे जलातील प्रतिबिंब = अविद्येत पडलेले कूटस्थाचे प्रतिबिंब

मेघाकाश म्हणजे काय? घटापेक्षा मेघ प्रचंड मोठे आहे, व्यापक आहे. जेथे जल असते तेथे आकाशाचे प्रतिबिंब असतेच. मेघात जल असल्यामुळे मेघातील जलात आकाशाचे प्रतिबिंब पडते.

मेघाकाशाच्या लक्षणात पुढील तीन गोष्टी आहेत –

(१) सर्व ढगांना आश्रय असलेले तेवढ्या आकाराचे आकाश

(२) मेघातील जल आणि

(३) मेघस्थ जलातील आकाशाचे प्रतिबिंब

ईश्वराच्या लक्षणात पुढील तीन गोष्टी घ्याव्यात –

(१) सापेक्ष ब्रह्म

(२) माया आणि

(३) मायेतील सापेक्ष ब्रह्माचे प्रतिबिंब

दृष्टांत आणि सिद्धांत जुळवला, तर, मेघाकाशाच्या ठिकाणी ईश्वर घ्यावा.

(१) सर्व मेघांना आश्रय असलेले आकाश = सापेक्ष ब्रह्म

(२) मेघातील जल = माया आणि

(३) मेघस्थ जलातील आकाशाचे प्रतिबिंब = सापेक्ष ब्रह्माचे मायेतील प्रतिबिंब

महाकाश म्हणजे काय? महाकाश हे मेघाकाशापेक्षाही इतके प्रचंड व्यापक आहे की मनुष्यबुद्धीने ते ग्रहण होत नाही. महाकाश हे घटात तर व्याप्त आहेच आणि मेघातही व्याप्त असून त्याही पलीकडे व्याप्त आहे. महाकाशाच्या ठिकाणी निरपेक्ष ब्रह्म घ्यावे. ईश्वराच्या कक्षेत येणाऱ्या असंख्य जीवांमध्ये ब्रह्म व्याप्त आहे. सर्व कारण, सूक्ष्म, स्थूल प्रपंचात सर्वत्र ओतप्रोत ब्रह्मचैतन्य आहे.

चार चैतन्यांचे रूपक **आकृती क्रमांक ५४** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ५४ – कूटस्थ, जीव, ईश्वर आणि ब्रह्म यांचे रूपक

कूटस्थ हा ब्रह्मच आहे. कूटस्थ कर्म करीत नाही किंवा कर्माचे फळ देत नाही. ब्रह्माच्या सत्तेवर सृष्टी चालते. व्यष्टीने तीन देहांच्या भ्रमाचे अधिष्ठान कूटस्थ चैतन्य आहे. समष्टीने सर्व जगत्‌भ्रमाचे अधिष्ठान ब्रह्मचैतन्य आहे. 'मी कूटस्थ असून ब्रह्मरूपच आहे' असा दृढ, निःसंदेह निश्चय होणे हे वेदांतशास्त्राच्या अनुशीलनाचे फल आहे.

परमार्थाकडे वळलेल्या अनेक साधकांना ब्रह्म आणि ईश्वर यांची व्याख्याच माहीत नसल्यामुळे ते ब्रह्म आणि ईश्वर यांना एकच समजतात. हे चुकीचे आहे. शास्त्रानुसार विचार केल्यावर ब्रह्म हे असंग असून ईश्वर सृष्टी करतो, असे लक्षात येते. माया, समष्टी सूक्ष्म शरीर आणि समष्टी स्थूल शरीर हे ईश्वराचे तीन देह आहेत. त्यात यच्चावत सर्व जगत् अंतर्भुत आहे. ब्रह्म आणि ईश्वर यांची स्पष्टता यावी म्हणून शास्त्रात 'ब्रह्माच्या एक चतुर्थांश भागात जगत् आहे' असे सांगितलेले आहे. ब्रह्म देश, काल, पदार्थ यांच्या अतीत आहे. त्यामुळे व्यावहारिक दृष्टीने त्याचे मोजमाप करता येत नाही. ब्रह्म हे निरपेक्ष व्यापक आहे आणि माया ही सापेक्ष व्यापक आहे, असे विषय समजण्यासाठी गृहीत धरू. **आकृती क्रमांक ५५** हे ब्रह्म आणि ईश्वर यांचे रूपक चित्र आहे.




आकृती क्रमांक ५५ – ब्रह्म आणि ईश्वर यांचे रूपक

ब्रह्माच्या एक चतुर्थांश भागावरच माया आणि तिचे कार्य म्हणजे जगत् यांची व्याप्ती असल्यामुळे मायेची व्यापकता सापेक्षित आहे. ब्रह्माची व्यापकता माया आणि मायाकार्याला व्यापून त्याही पलीकडे आहे. म्हणून ब्रह्माची व्यापकता निरपेक्ष आहे. म्हणून, ब्रह्म श्रेष्ठ आहे. ईश्वराची उपाधी माया सापेक्ष व्यापक आहे. म्हणून ब्रह्मचैतन्याच्या मानाने ईश्वर चैतन्य निकृष्ट आहे. ईश्वर हा ब्रह्मापेक्षा एक पायरी खाली आहे. **आकृती क्रमांक ५५** मध्ये जे संपूर्ण गोल वर्तुळ दाखवलेले आहे, त्याठिकाणी, ब्रह्म घ्यावे. वर्तुळाच्या ज्या भागावर रेषा दाखविल्या आहेत, तेवढ्या भागाच्या ठिकाणी माया घ्यावी. जेवढी मायेची व्याप्ती, तेवढा ईश्वर असतो. आकृती पाहूनही लक्षात येईल की, ब्रह्मचैतन्य श्रेष्ठ आहे. साधकाने हेही लक्षात ठेवले पाहिजे की शास्त्रात काही ठिकाणी 'ईश्वर' हा शब्द ब्रह्माला उद्देशून वापरलेला आहे आणि काही ठिकाणी 'ब्रह्म' हा शब्द ईश्वराला उद्देशून वापरलेला आहे. हे यथार्थपणे समजण्यासाठी साधकाने श्रीगुरुंच्या श्रीमुखातूनच शास्त्राच्या निरूपणाचे श्रवण करावे.

★★★★★

## चिंतन क्रमांक – १६
## अविद्या आणि माया – १

आता, जीव आणि ईश्वर यांचे विवेचन करू. आकृती क्रमांक ५६ मध्ये जीव आणि ईश्वर यांचे रूपक सोबतच दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ५६ – व्यष्टी प्रपंच आणि समष्टी प्रपंच

अविद्या विशेषण ठरली, तर, कूटस्थाला 'जीव' ही संज्ञा प्राप्त होते. कूटस्थाचा आभास सूक्ष्मदेह आणि स्थूलदेहामध्येही असतो. दोन देहातल्या आभासामुळे जो व्यवहार होतो, त्याला जीवत्व किंवा जीवपणा म्हणतात. सर्व वैदिक आणि लौकिक कर्मे जीवत्वान्तर्गतच येतात. अर्थात सात्त्विक, राजसिक आणि तामसिक कर्म हे 'जीवपणा' आहे. त्यालाच 'जीवाच्या आभासाचे कार्य' असे म्हणू. 'मी कर्ता', 'मी दुःखी', 'मी ब्राह्मण' इत्यादी निश्चयाने जीवाभास व्यक्त होताना जाणवतो. अविद्येच्या आवरण शक्तीमुळे 'जीव' आणि

पुढे 'जीवपणा' अशा भावना होतात. अविद्येतीलच कूटस्थाचा आभास (जीव) अविद्येच्या अधीन होऊन संसारात गुरफटतो.


माया या उपाधीने ब्रह्माला 'ईश्वर' ही संज्ञा येते. ब्रह्माचा आभास समष्टी सूक्ष्मदेह आणि समष्टी स्थूलदेहामध्येही असतो. या दोन देहांमध्ये जो समष्टी पातळीवर व्यवहार होतो, त्याला 'ईश्वराच्या आभासाचे कार्य' म्हणतात. माया शुद्धसत्त्वप्रधान असल्याकारणाने मायेतील ब्रह्माचा आभास (ईश्वर) हा मायेला स्वतःच्या ताब्यात ठेवतो. ईश्वराला स्वस्वरूपाची भ्रांति नाही किंवा प्रपंचातल्या पदार्थांमागे तो जीवाप्रमाणे धावत नाही. ईश्वराला ब्रह्मज्ञान असून तो सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् आहे. महाप्रलयाच्या एक कल्प या कालावधीमध्ये ईश्वर अव्यक्त रूपात असतो. पुढील एक कल्प या कालावधीत तो व्यक्त रूपात राहतो. ही शृंखला अनादीकालापासून आहे आणि पुढेही अशीच चालत राहील.

सर्व पदार्थ हे ईश्वराचे अवयवच आहेत. परमार्थाचा बोध नसलेले जीव दगडाची मूर्ति, लाकडाची मूर्ति, कुदळ इत्यादींची पूजा करतात. ज्या भावनेने पूजा केली जाते, त्याप्रमाणे फल मिळते. पूजा ही सात्त्विक, राजसिक अथवा तामसिक असू शकते. परंतु, अशा क्रियांमुळे ब्रह्मज्ञान होत नाही. साधकाने वेदांतशास्त्रासाठी लागणारा अधिकार संपादन करून श्रीगुरूंकडून महावाक्याचे निरूपण श्रवण करावे.

जीव आणि ईश्वर यांच्यातील भेद अविद्या आणि माया या उपाधींमुळे वाटतो. हा भेद कल्पित आहे, वास्तविक नाही. सत्य, ज्ञान, अनंत इत्यादी लक्षण असलेले एक ब्रह्मच पारमार्थिक सत्य आहे. 'तत्त्वमसि' या महावाक्यामध्ये 'तत्' म्हणजे 'ते' आणि 'त्वम्' म्हणजे 'तू' आणि 'असि' म्हणजे 'आहे'. त्वम्‌चा गौण अर्थ (वाच्यार्थ) म्हणजे जीव. तत्‌चा गौण अर्थ (वाच्यार्थ) म्हणजे ईश्वर. याचा सरळ अर्थ 'ईश्वर जीव आहे'. परंतु, जीव आणि ईश्वर हे एक कसे असतील? आपण जीवाभास आणि ईश्वराभास यातील फरक अभ्यासलेला आहे. 'त्वम्'चा मुख्य अर्थ (लक्ष्यार्थ) म्हणजे 'कूटस्थ' आणि 'तत्'चा मुख्य अर्थ (लक्ष्यार्थ) म्हणजे 'ब्रह्म'. जीवाचे अधिष्ठान कूटस्थ आणि ईश्वराचे अधिष्ठान ब्रह्म हे एकच आहे. अर्थात कूटस्थ ब्रह्मच आहे. अशारितीने अभ्यास करता येतो.

जीवाभास आणि ईश्वराभासामध्ये भेद जाणवतो. हे लक्षात घेऊन वेदाच्या कर्मकांडात आणि उपासनाकांडात ईश्वराचे आराधन करण्याविषयी क्रिया सांगितल्या आहेत. परमार्थाचा बोध नसलेला सर्वसामान्य मनुष्य स्वतःला दीन समजतो व ईश्वराला श्रेष्ठ समजून त्याच्याकडून संसारात उत्कर्ष होण्याची अपेक्षा ठेवतो. एकच चैतन्य जीव आणि ईश्वरात व्याप्त आहे आणि तेच ब्रह्मचैतन्य जीवाचे स्वरूप आहे. हा सिद्धांत लक्षात घेऊन वेदाच्या ज्ञानकांडात महावाक्यातून ब्रह्माचाच निर्देश केलेला आहे. वेदांतशास्त्राचा अधिकार जोपर्यंत जीवाभास संपादन करणार नाही तोपर्यंत त्याला ईश्वराभासाची उपासना करावी लागेल. स्व-स्वरूपाच्या निःसंशय निश्चयानेच जीव आणि जीवपणा जातो.

आता, जीव आणि ईश्वर यांचे रूपक असलेल्या **आकृती क्रमांक ५६** चा विचार करू. जीवाच्या ठिकाणी एकीकडे कूटस्थ, जीवसाक्षी, कारणदेह, सूक्ष्मदेह, स्थूलदेह

दाखविलेले आहेत. ईश्वराच्या ठिकाणी ब्रह्म, ईश्वरसाक्षी, समष्टी कारणदेह, समष्टी सूक्ष्मदेह, समष्टी स्थूलदेह दाखविलेले आहेत. यांच्यामध्ये एकी कोणत्या पातळीवर आहे?



जीवाचा स्थूलदेह आणि ईश्वराचा स्थूलदेह हे एक आहेत काय? जीवाचा देह छोटा आणि ईश्वराचा स्थूलदेह प्रचंड मोठा आहे. जीवाचा सूक्ष्मदेह मर्यादित असून त्यात काम, क्रोधादिक विकार तर आहेतच, शिवाय, बाह्य पदार्थांवरील आसक्ती, दुसऱ्यांना फसविण्याची इच्छा इत्यादी असंख्य दोष आहेत. ईश्वराचा सूक्ष्मदेह फार व्यापक असून सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलयाचे संकल्प त्याच्या ठिकाणी आहेत. जीवाचा कारणदेह म्हणजेच आत्म्याचे अज्ञान. जीवाचे व्यवहाराचे ज्ञानही कमीच आहे. ईश्वराला ब्रह्मज्ञान तर आहेच, शिवाय, सृष्टीतील सर्व व्यवहार तो सतत जाणतो. सारांश – जीव आणि ईश्वर यांच्या शरीरांचा विचार केला, तर, स्थूल–स्थूल, सूक्ष्म–सूक्ष्म, कारण–कारण मध्ये फरक आहे. मग, एकी कोणत्या पातळीवर आहे? जीवसाक्षी हा कूटस्थाचा आणि ईश्वरसाक्षी हा ब्रह्माचा प्रकाश आहे. जीवसाक्षी आणि ईश्वरसाक्षी दोन्ही चेतन, सच्चिदानंदस्वरूप आहेत. त्यांच्यामध्ये उपाधी नाहीत. जीवसाक्षीच्या ठिकाणी कार्य नाही. ईश्वरसाक्षीच्या ठिकाणीही कार्य नाही. तात्पर्य – जीवसाक्षी आणि ईश्वरसाक्षी एकच आहेत. कूटस्थ आणि ब्रह्म हेही एकच आहेत.

आता, ईश्वराची उपाधी जी माया आहे तिचे विस्ताराने विवेचन करू. श्रुतीमाता सांगते – 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म'. नाम–रूपातीत, असंग, अविकारी, अक्रिय एक ब्रह्मचैतन्यच आहे. त्याच्यासारखे दुसरे चैतन्य नाही. त्याचप्रमाणे, श्रुतीमाता 'नेह नानास्ति किञ्चन्' अर्थात 'नाम–रूपात्मक विविधता अजीबात नाही' असा बोध करते. परंतु, सर्वसामान्य मनुष्य आणि वेदांतशास्त्राचे साधक विचारतात, 'तर मग ही सृष्टी आम्हांला दिसते ती का दिसते? सृष्टी कुठून झाली?'

प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारावर जगतात वैचित्र्य सहजपणे लक्षात येते. जगतामध्ये असंख्य पदार्थ दिसतात. मनुष्य आणि मनुष्येतर प्राण्यांच्या आचार–विचारातील विविधता लक्षात येते. संसारात गुरफटलेले लोक दिसतात. मुक्तीसाठी प्रयत्न करणारेही दिसून येतात. प्रतीत होणाऱ्या या द्वैत व्यवहाराची संगती लावण्यासाठी माया मानलेली आहे. ती त्रिगुणात्मक मानली, तर, प्राण्यांच्या वागण्यातील वैचित्र्याचे विश्लेषण करता येते. मोजमापच करता येणार नाही, इतक्या मोठ्या कालावधीपासून संसारप्रवाह सुरू आहे. म्हणून, मायेला 'अनादी' म्हणतात. ब्रह्मज्ञानाने साधकासाठी माया राहतच नाही. म्हणून, मायेला 'अंतवती' अर्थात 'सान्त' म्हणतात.

ईश्वर या शब्दास पर्यायी शब्द म्हणजे 'शिव' आणि 'पुरुष'. माया या शब्दांस पर्यायी शब्द म्हणजे 'शक्ति' आणि 'प्रकृती'. माया म्हणजेच शक्ति ही जगतातील पदार्थांचे विशिष्ट पद्धतीने नियमन करते. पाहणे हे डोळ्यांच्या माध्यमातूनच होते, ऐकणे कानानेच होते, पृथ्वी सूर्याभोवती विशिष्ट गतीनेच फिरते. असे नियम आपल्याला लक्षात येतात. असे नसते, तर, पदार्थांच्या धर्मांमध्ये संकर होऊन सर्वच व्यवहार विचित्र झाला असता. घट जसा मनुष्याला

स्पष्टपणे दिसतो. तशी माया उपलब्ध होत नाही. सृष्टीतील पदार्थांमध्ये ती गुप्तपणे राहते. ही

शक्ती स्वतः जड आहे. परंतु, ब्रह्माचा आभास तिच्यात असल्याने त्या आभासाच्या (ईश्वराच्या) बळावर ती पदार्थांचे नियमन करते.

प्रमाण –

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् । ४–१०

– श्वेताश्वतर उपनिषद्

'माया' आणि 'मायाकार्य' हे कळून घेतले पाहिजे. समष्टी कारणदेह म्हणजे माया. समष्टी कारणदेहातून समष्टी सूक्ष्मदेह आणि समष्टी स्थूलदेह आलेले आहेत. समष्टी सूक्ष्मदेह आणि समष्टी स्थूलदेह यांना मिळून 'मायाकार्य' म्हणतात. सशाला शिंगे नसतातच, तशी, माया नाहीच असे म्हणता येत नाही. असत् पदार्थ हा नसतोच. परंतु, कार्यरूपाने माया प्रतीत तर होते. म्हणून, मायेला असत् म्हणता येत नाही. तिन्ही काळी जे सदैव कुठलाही बदल न होता असते त्याला सत् म्हणतात. असे फक्त ब्रह्मच आहे. मायेत बदल स्पष्टपणे जाणवतो. त्यामुळे, मायेला सत्ही म्हणता येत नाही. कुठलाही पदार्थ एकतर सत् असावा किंवा असत् असावा. परंतु, सत्ही नाही आणि असत्ही म्हणता येत नाही म्हणून, माया एक विलक्षण पदार्थ आहे. यामुळेच मायेला सतासत्विलक्षण अर्थात अनिर्वचनीय असे म्हणतात.

महाप्रलय काळात समष्टी सूक्ष्मदेह आणि समष्टी स्थूलदेह हे मायेत लय पावलेले असतात. त्यावेळेस मायेत सत्त्व, रज, तम हे तीन गुण समप्रमाणात म्हणजे प्रत्येकी ३३.३३३३ टक्के असतात (बेरीज १०० टक्के येते). त्यावेळेस मायेला 'प्रधान' असे म्हणतात. एक कल्पाच्या कालावधीत जेव्हा सृष्टी व्यक्त रूपात असते तेव्हा सत्त्व, रज, तम यांचे प्रमाण क्षणाक्षणाला बदलत राहते आणि मायाकार्याची जाणीव होते.

व्यष्टीने पाहिले असता, मनुष्य जेव्हा गाढ झोपलेला असतो, तेव्हा, अंतःकरण कारणात लीन झालेले असल्यामुळे सूक्ष्म, स्थूल प्रपंचांची प्रतिती नसते. जाग्रत अवस्थेत मनुष्याला कारण, सूक्ष्म, स्थूल प्रपंचाची प्रतिती असते. समष्टी पातळीवर महाप्रलयामध्ये सृष्टी बीज रूपाने असते. जेव्हा सृष्टी व्यक्तरूपाला येते, तेव्हा नाम–रूपांची प्रतिती येते.

पंचीकृत पंचमहाभूतांपासून विष तयार होते आणि पंचीकृत पंचमहाभूतांपासूनच अमृत तयार होते. कसे काय? शुक्राणुपासून स्थूलदेह निर्माण होतो. कसा काय? वीर्य इतके सूक्ष्म आणि देह तर विविध अवयव असणारा मोठा, दृष्य पदार्थ आहे. बीज कुठे आणि झाड कुठे! बीजातून मोठे झाड व्यक्त रूपाला येते. हे कसे काय? अशा विविध प्रकारे माया दुर्घट गोष्टी घडवून आणते. म्हणून, विद्वान पुरुष मायेला 'इंद्रजाल' म्हणतात. मायाकार्यास संपूर्णपणे थोपवून धरण्यास अथवा नाश करण्यास कोणताही जीव समर्थ नाही.

**'न निरुपयितुं शक्या विस्पष्टं भासते च या सा माया।'** अनिर्वचनीय असून स्पष्टपणे प्रतीत होते ती माया. पंचमहाभूतात्मक पदार्थ मनुष्याला ज्ञानेंद्रियांच्या माध्यमातून

प्रतीत होतात. म्हणून, माया 'स्पष्टपणे प्रतीत होणारी' असे तिचे लक्षण आहे.


माया ही स्वतंत्र नाही. एखादा मुमुक्षु साधन करून सिद्ध झाला आणि त्याने मायेला स्वतंत्र मानले, तर, ती माया त्याला परत बंधात टाकेल. मायेला स्वतंत्र मानले, तर, एखाद्या जीवाच्या कर्माचे फळ ती दुसऱ्याच कोण्यातरी जीवाला देईल. तिला स्वतंत्र मानले, तर, ती वाटेल तेव्हा जगताला व्यक्त रूपात आणेल अथवा अव्यक्त रूपात ठेवेल. ब्रह्मचैतन्य हे मायेचे आश्रयस्थान आहे. मायेच्या संबंधाने ब्रह्मचैतन्याला ईश्वर हे नाव येते. ईश्वर मायेचे नियमन करतो. मायेला स्वतःची सत्ता नाही. सत्ता म्हणजे अस्तित्व किंवा विद्यमानता. ब्रह्मचैतन्याच्या सत्तेने ती सत्तावान वाटते. स्फटिकाच्या एका बाजूस लाल रंगाचे फूल ठेवले आणि स्फटिकाकडे दुसऱ्या बाजूने पाहिले, तर, रंगहीन, स्वच्छ असलेला स्फटिकही लाल वाटतो. त्याप्रमाणे, ब्रह्माची सत्ता सत्ताहीन मायेला आणि तिच्या कार्याला आल्यासारखी वाटते.

आपण ईश्वराची उपाधी 'माया', तिची व्याख्या, लक्षण व कार्य पाहिले. आता जीवासाठी विशेषण ठरलेली 'अविद्या', तिची व्याख्या, लक्षण आणि कार्यही समजून घेतले पाहिजे. अविद्या म्हणजे कारणदेह म्हणजेच आत्म्याचे अज्ञान. मायेप्रमाणे अविद्या त्रिगुणात्मक आहे. परंतु, दोघीत फरक आहे. अविद्येत रज आणि तम या गुणांची जास्त प्रमाणात अभिव्यक्ती दिसून येते. म्हणून, जीवाला स्व-स्वरूपाचे अज्ञान असून तो 'अविद्याकार्यात' गुंतलेला राहतो. एका जीवाचा सूक्ष्मदेह आणि स्थूलदेह यांना मिळून अविद्याकार्य म्हणतात. अन्नमय, प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय या चार कोषांना मिळून अविद्याकार्य म्हणतात. 'मी स्वतःला जाणत नाही' असे वाटणे याला अविद्या म्हणतात. 'मी क्रोधिष्ट', 'मी दयाळू', 'मी गोरा', 'मी काळा' असे सत्यत्वाने समजणे हे अविद्याकार्यांतर्गत येते.

तीन अवस्थांमध्ये जीवाला अविद्येची प्रतिति कशी येते ? जागृती अवस्थेत त्याला प्रामुख्याने त्याच्या स्थूलदेहाचे भान असते व सभोवतालच्या पंचीकृत पंचमहाभूतात्मक पदार्थांची प्रतिति असते. स्वप्नावस्थेत जीवाला जे पदार्थ प्रतीत होतात, तेही अविद्याकार्यांतर्गत येतात. सुषुप्तीत जीवाला ज्या सुखाचा अनुभव असतो, ते सुख जागृती, स्वप्नावस्थेतील सुखाच्या सापेक्ष श्रेष्ठ असते. मायेप्रमाणे अविद्याही अनिर्वचनीय आहे. अविद्येला आश्रय कूटस्थ चैतन्याचा आहे. जीवन्मुक्त महापुरुषांना अविद्या किंवा माया या उपाधी नसतात.

अविद्या आणि माया यांचे रूपक **आकृती क्रमांक ५७** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ५७ – माया आणि अविद्या यांचे रूपक

माया फार व्यापक आहे. जेवढी अफाट आणि अचिंत्य ही सृष्टी आहे, तेवढी माया आहे. या कारणासाठी एका मोठ्या वर्तुळाच्या रूपाने माया दाखविलेली आहे. अविद्या ही प्रत्येक जीवाची विशेषण असून जीव असंख्य आहेत. छोटी अनेक वर्तुळे म्हणजे अविद्या. अविद्या अनेक आहेत, असा याचा अर्थ नाही. अविद्या म्हणजे 'आत्म्याचे अज्ञान'. भारतामध्ये राहणारा मनुष्य किंवा अमेरिकेत राहणारा मनुष्य असो, त्यांचे आत्म्याचे अज्ञान वेगवेगळे नसते. ह्याला आत्म्याचे अज्ञान आहे व त्यालाही आत्म्याचे अज्ञान आहे.

जगातील ९९.९९ टक्के लोकांना माया व मायाकार्याबद्दल काहीच माहीत नाही. मायाकार्य अफाट असल्यामुळे ते मायाकार्यामध्येच कुठेतरी गुरफटलेले असतात. जणूकाही मायेने त्यांना कापून संपविलेच आहे. हे समजण्यासाठी 'काली' या देवीचे रूपक योग्य ठरेल व ते रूपक चित्र **आकृती क्रमांक ५८** मध्ये दाखविलेले आहे. कालीच्या एका हातात खड्ग आहे. तिने दुसऱ्या हातात मनुष्याचे मुंडके धरलेले आहे. त्या मनुष्याला केवळ जटा व मुख असून खालचा भाग नाही. कालीने त्याचे मुंडके छाटलेले असून मुंडक्यातून रक्त पडत आहे. काली म्हणजे माया. मनुष्य म्हणजे जीव व शंकर म्हणजे ईश्वर. जीवाची काय स्थिती आहे? मायेने जीवाला कापलेले आहे. त्याचा काहीही विषय उरलेला नाही. जीव संसार चक्रात पार अडकलेला आहे. त्यामुळे भगवंतप्राप्तीच्या विषयात तो संपुष्टात आलेला आहे. त्याची अशी दयनीय अवस्था झालेली आहे. मनुष्यासारख्या असंख्य जीवांना कापून त्यांची माळ कालीने परिधान केली आहे. शंकर खाली पडलेले आहेत. ते धड जागे नाहीत आणि धड झोपलेले नाहीत. काली त्यांच्या छातीवर पाय ठेऊन उभी आहे. तिने शंकरांना पायाखाली दाबलेलं आहे. म्हणजे तिच्या कार्यात ईश्वरही शांत आहे.

जगात मायेचा जोर इतका की ती जीवाला भगवंताकडे जाऊ देत नाही. शंकर शांतपणे का पडलेले आहेत? ईश्वर तटस्थ आहे, निष्पक्ष आहे हे दाखवण्यासाठी हे रूपक आहे. प्राण्यांचे जसे कर्म असेल तसे फळ देण्यास ईश्वर निमित्त होतो. 'हा जीव चांगला', 'तो जीव वाईट' असा विषमभाव तो करीत नाही. कोणी जीव दुःखी असेल, तर, ते त्याच्या पूर्व पापामुळे असते. काही जीव त्यांच्या पूर्व पुण्याईमुळे सुखी असतात. ईश्वर क्रूर नाही. ईश्वर दयाळू नाही. ईश्वरावर क्रूरतेचा अथवा दयाळूपणाचा आरोप करताच येत नाही.



आकृती क्रमांक ५८ – माया आणि अविद्येसाठी काली आणि शंकर यांचे रूपक

मायेतील ब्रह्माचा आभास म्हणजे ईश्वर. हा जगत्कार्य चालवतो. परंतु, बहुतांश लोक अविद्याकार्यात आणि मायाकार्यातच गुंतलेले असल्यामुळे अशा बहुसंख्य जीवांची वास्तविक अवस्था दर्शविण्यासाठी या रूपकात कालीला म्हणजे मायेला प्राधान्य दाखविलेले आहे. मलिनसत्त्वप्रधान असलेल्या जीवाच्या अविद्येचा फायदा घेऊन माया जीवांना फिरविते. परंतु, ज्याच्या आश्रयाला माया राहते, त्याला ती मोहित करीत नाही. माया ब्रह्माश्रित आहे. 'स्वाश्रयाव्यामोहकरी' असे मायेचे एक लक्षण आहे. मायेने ब्रह्माला मोहित करण्याचा प्रश्नच येत नाही.

*****

## चिंतन क्रमांक – १७
## अविद्या आणि माया – २

व्यावहारिक पदार्थांना वेगवेगळे आकार दिसून येतात. उदाहरणार्थ – घटाचा आकार पटाच्या (वस्त्राच्या) आकाराहून वेगळा दिसतो. 'सर्व पदार्थांमध्ये एक ब्रह्मचैतन्य असून ते मीच आहे' असा अनुभव ज्यांना नसतो ते पदार्थ–पदार्थांमध्ये भेद पाहतात. अशा लोकांचा द्वैतनिश्चय असतो. भिन्नता किंवा नानात्वाचा निश्चय म्हणजे द्वैत. ईश्वराने जी चराचरात्मक सृष्टी निर्माण केलेली आहे, त्यात द्वैत दिसून येते. ईश्वराच्या सृष्टीच्या अंतर्गत कोणते पदार्थ येतात? ब्रह्मलोकांपासून ते पाताळापर्यंतची चौदा भुवने त्याने निर्माण केलीत. अपंचीकृत पंचमहाभूते, पंचीकृत पंचमहाभूते आणि त्यांच्यापासून मोजता येणार नाहीत इतके पदार्थ तयार केलेत. हे ईश्वराने निर्माण केलेले द्वैत आहे.

ईशनिर्मित पदार्थांची प्रतिती जीवाला चिदाभासासह वृत्तीमुळे होते. वृत्ती पदार्थापर्यंत पोहोचल्यावर 'हा कोणता तरी पदार्थ' असे पदार्थाचे स्फुरण होते. येथपर्यंत ठीक आहे. वृत्ती पटकन अंतःकरणापर्यंत परत येऊन चित्तामध्ये त्या पदार्थाचा संस्कार सापडला, तर, उदाहरणार्थ – 'हे सोने आहे' अशी प्रमा होते. येथपर्यंतही ठीक आहे. पण, मनुष्य एवढ्यावरच थांबतो का? मन, बुद्धी, चित्त, अहंकार यांचे कार्य वेगाने सुरू होते – 'हे सोने माझ्या कामात येईल. ते मी प्राप्त केले तर बाजारात विकून मला पुष्कळ पैसे मिळतील. त्या पैशाने मी संसार करण्यास उपयोगी अनेक पदार्थ विकत घेईन' इत्यादी. येथेच बिघडते.

सोने हा ईशनिर्मित पदार्थ आहे. म्हणजे ईशसृष्टी आहे. परंतु, मनुष्यदेहातील जीव त्या सोन्याबद्दल अनुकूलतेची कल्पना करून सोने प्राप्त करण्याच्या पाठीमागे धावतो, याला 'जीवसृष्टी' असे म्हणतात. ईशसृष्टीतील पदार्थांबाबत 'मी आणि माझे' असा सत्यत्वाने संबंध जोडल्याने जीव जीवसृष्टी तयार करतो. भवबंध दृढ असण्याचे हे एक मुख्य कारण आहे. एकाच पदार्थाविषयी जीवांचा वेगवेगळा विचार असतो. एखाद्या मनुष्याने दुसऱ्या मनुष्याजवळचे सोने लुबाडले, तर ज्याने सोने लुटले त्याला सुख होते, ज्याचे सोने लुबाडले गेले त्याला दुःख होते. तिसरा मनुष्य जो विरक्त आहे, त्याने जर त्या सोन्याकडे पाहिले, तर, त्याची तो उपेक्षा करतो. ईशनिर्मित पदार्थांना सत्यत्व देऊन जीव जीवसृष्टी निर्माण करतो. पदार्थांबद्दलचे संस्कार त्याच्या चित्तात गोळा होत जातात व पुन्हा पुन्हा तेच पदार्थ प्राप्त करण्याच्या वासना दृढ होत जातात आणि त्यामुळे भवबंधन कायम राहते.

यावरून असे लक्षात येते की ईशनिर्मित पदार्थ जीवाच्या बंधाला कारणीभूत नसून, त्या पदार्थांबद्दल अनुकूल–प्रतिकूल असा मानसिक व्यापार बंधाला कारणीभूत आहे. सर्वच पदार्थांबद्दल जीवाला आकर्षण वाटत नाही. काही पदार्थांबद्दलच आकर्षण वाटते. कोणी साधक असा विचार करेल 'जे पदार्थ मला बाधक वाटतात त्यांचा मी नाश करीन'. पण, अशी

समज मूर्खपणाची आहे. कारण, त्यामुळे स्वस्वरूपाची सिद्धी होत नसते. असंख्य जीवांच्या पूर्व कर्मांचा भोग होण्याच्या उद्देशाने ईश्वराने सृष्टी निर्माण केलेली आहे. कोणत्याही जीवाला सृष्टीचा नाश करता येत नाही व त्याने तसा विचारही करू नये. जीवाने पदार्थांबद्दलचे सत्यत्व काढत जावे. कोणी साधक विचार करेल 'मनाच्या व्यापाराने पदार्थ बंधनकारक ठरतात, तर, मी इंद्रिय निग्रह करून, वृत्तीचा निरोध करून, वृत्तीला अंतःकरणाजवळ नेण्याचा सतत अभ्यास करीन'. वृत्ती निग्रहाने द्वैतखंडन होत नाही. वृत्ती माघारी वळवून अंतःकरणाजवळ नेली, तर, सुखाचा अनुभव येईल, पण, ते अल्पकाळ टिकेल. वृत्ती निग्रह सुटला की पुढचा पदार्थ परत सत्यत्वाने दिसेल. या कारणासाठी वृत्ती निग्रह हा द्वैतखंडनाचा खरा उपाय नसून 'ब्रह्मज्ञान' हाच द्वैतखंडनाचा उपाय आहे. 'ब्रह्मज्ञानाशिवाय मोक्षप्राप्ती नाही' अशी अनेक ठिकाणी उपनिषदांमध्ये वचने आहेत. कोणी साधक शंका घेईल 'ईशनिर्मित द्वैत जोपर्यंत आहे तोपर्यंत ब्रह्मज्ञान कसे होईल?' ईशनिर्मित द्वैत ब्रह्मज्ञान होण्यास बाधक ठरत नाही. ईशनिर्मित द्वैत मिथ्या आहे असे निःसंशयपणे जाणल्याने ब्रह्मज्ञान होते. ईशनिर्मित द्वैताचा उच्छेद जीव करू शकत नाही आणि तसा विचार करण्याचीही गरजच नाही. उलट सद्‌गुरू, शास्त्र असे द्वैत हे ज्ञानास साधन असल्यामुळे त्यांचे सहाय्य साधकाने घ्यावे.

जीवाने केलेले द्वैत दोन प्रकारचे असते – शास्त्रीय आणि अशास्त्रीय. श्रवण, मननादि साधना याला शास्त्रीय द्वैत म्हणतात. निःसंदेह, दृढ, अपरोक्ष ब्रह्मज्ञान होईपर्यंत साधकाने शास्त्रीय द्वैताचा स्वीकार करावा. शास्त्राभ्यास करणे, सद्‌गुरूंची सेवा करणे, तसेच,'श्रवण, मनन, निदिध्यासन, तत् त्वम् पदार्थ शोधन' हे सर्व स्व–स्वरूपात स्थित होईपर्यंत करावे. त्यानंतर, शास्त्रीय द्वैत आपोमत गळून पडते.

जीवनिर्मित अशास्त्रीय द्वैत दोन प्रकारचे आहे. तीव्र आणि मंद. काम, क्रोधादिक असंख्य वाईट वृत्ती यांना तीव्र अशास्त्रीय द्वैत म्हणतात. मनोराज्य याला मंद अशास्त्रीय द्वैत म्हणतात. काम, क्रोधादिक अशास्त्रीय द्वैत साधकासाठी अनर्थकारी असते. सद्‌गुरूंसमोर साधकाने काम, क्रोधादिकांमुळे विचित्र बोलणे, आचरण केले, तर, त्याला कित्येक युगांपर्यंत जन्म–मरणाच्या चक्रात परत परत फिरावे लागते. लाखो जन्मांमध्ये त्याला परमार्थ करण्याची बुद्धीच होत नाही. याबद्दल शास्त्रांमध्ये अनेक ठिकाणी वर्णन आहे. वेदांतशास्त्रासाठी लागणाऱ्या अधिकारी लक्षणांमध्ये शम, दम, समाधान इत्यादी लक्षणेही आहेत. जर कोणी साधक विचित्र वागत–बोलत असेल, तर, त्यावरून हे लक्षात येते की वेदांतशास्त्रासाठी लागणारी अधिकार लक्षणे त्या साधकात पूर्ण अंशावर नाहीत. अशा साधकाला स्वतःचे कल्याण व्हावे असे वाटत असेल, तर, त्याने प्रयत्नपूर्वक शास्त्र आणि सद्‌गुरूंना शरण राहावे. त्याने तीव्र अशास्त्रीय द्वैताचा त्याग करावा. विषयांबद्दल मनोराज्य करीत बसू नये. विषयांबद्दल मनोराज्य केले, तर, ते विषय प्राप्त करण्याची इच्छा तीव्र होत जाते. साधक ते विषय प्राप्त करण्यासाठी प्रयत्न करू लागतो. विषय प्राप्त झाले नाहीत, तर, त्याला क्रोध येतो. यामुळे साधकाच्या विवेकावर पडदा पडतो व तो मार्गभ्रष्ट होतो. यास्तव मनोराज्य या मंद अशास्त्रीय द्वैताचा त्याग साधकाने करावा.

सिद्ध म्हणजे जीवन्मुक्त महापुरुषांचा देह त्यांच्या प्रारब्धानुसार हालतो. त्यांचे प्रारब्ध चांगले, वाईट किंवा मिश्र असू शकते. जीवन्मुक्त महापुरुष चांगलेच वागतात असा नियम नाही. 'माझ्या ठिकाणी संसार नसून मी सच्चिदानंदस्वरूप ब्रह्म आहे' असा त्यांचा ठाम निश्चय असतो. तो त्यांचा शेवटचा जन्म असतो. त्यांच्या दृष्टीने त्यांना संचित, क्रियमाण आणि प्रारब्ध हे तिन्ही कर्म नसतात. जीवन्मुक्त महापुरुष ईश्वराच्या आज्ञेच्या पलीकडे असतात. ते निरंकुश असतात. 'अमुक पध्दतीनेच आचरण असावे' अशी कोणतीही वेदाची विधी त्यांना नसते. परंतु, साधकाने जर एखाद्या जीवन्मुक्त महापुरुषांप्रमाणे वागण्याचा किंवा काम, क्रोधादिकांना थारा देऊन विचित्र आचरण करण्याचा प्रयत्न केला, तर, त्याच्यासाठी नरक हा ठरलेलाच आहे.

बहुतेक साधकांचा अविद्येचा अभ्यासच नाही. आवरण, विक्षेप आणि मल हे अविद्येचे तीन अंग आहेत. तुमच्याकडे अविद्या आहे की नाही हे लक्षात येण्यासाठी एक सोपे गणित आहे. आवरण, विक्षेप आणि मल यांपैकी एक जरी गोष्ट तुमच्याकडे असली तरी तुम्हांला अविद्या आहे. तिन्ही अंग तुमच्याकडे असतील तर अविद्या तुमच्यामध्ये फार दृढ आहे. तुमच्याकडे मल असेल तर तुमच्याकडे अविद्या आहे. कारण मल हे अविद्येचे एक अंग आहे. तुमच्यामध्ये विक्षेप आहे का ? मग तुम्हांला अविद्या आहे. तुमच्याकडे आवरण आहे का ? तर मग तुम्हांला अविद्या आहे. 'भगवंत कोण ?' अथवा 'मी कोण ?' हे न कळणे म्हणजे आवरण. या आवरणामुळे व आंतर–बाह्य विषयांमुळे, चित्तातली तीव्र चंचलता म्हणजे विक्षेप. अविद्याकार्य आणि मायाकार्यातील पदार्थांवरील आसक्तीमुळे वृत्ती अत्यंत चंचल होते, त्याला विक्षेप असे म्हणतात आणि त्या आसक्तीपोटी नको ते करणे म्हणजे मल. नको ते खाणे, नको ते पाहणे, नको ते ऐकणे इत्यादी म्हणजे मल. सृष्टीच्या नियमाबाहेर जे काही तुम्ही करीत आहात, ते सगळे 'नको ते' आहे. याचा परिणाम भोगावाच लागतो. 'नको ते' केल्यामुळे काय होते हे सगळ्यांना कळते. जेव्हा मनुष्य 'नको ते' करायला जातो तेव्हा 'हे चुकीचे आहे', 'हे अयोग्य आहे' असे त्याला कळतच असते. तरीही तशा गोष्टी करणे याला मल असे म्हणतात. हा मल कसा जातो? मल आणि विक्षेप घालविणे हे धर्मशास्त्र शिकविते. उदाहरणार्थ – तिर्थस्थळे ही मल नाशासाठी उपयोगास येतात. पंढरपूरचा महिमा गाताना भगवान श्रीतुकाराम महाराज म्हणतात–

प्रमाण –

**तुका म्हणे मळ। नासी तात्काळ तें स्थळ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

आवरण नाश हा वेदांतशास्त्राचा विषय आहे. ९९.९९ टक्के साधकांना प्रथम मल घालवावा लागतो, मग विक्षेप घालवावा लागतो आणि नंतर आवरण नाश करावा लागतो. परंतु, आवरण घालविल्याशिवाय जन्म–मरणाचा फेरा चुकत नाही. एखाद्याचा मल गेला,

विक्षेप गेला परंतु, आवरण गेले नाही, तर, त्याला वेदांतशास्त्राचे 'ब्रह्मप्राप्ती' हे फल मिळत

नाही आणि म्हणून संसारचक्रातून त्याला निघता येत नाही. आवरणाची निवृत्ती करणे हे साधकाचे आद्य कर्तव्य आहे. आवरण गेले की खऱ्या अर्थाने अविद्या जाते.

ही अविद्या निवृत्त करायची कशी ? साधकाने अविद्या आणि माया यांच्या स्वरूपाचा विचार करून प्रथम अविद्या आणि माया कल्पित आहेत असे लक्षात घ्यावे. कल्पना म्हणजे काय ? एखाद्या भिकाऱ्याच्या मनात 'मी राजा आहे' असा विचार आला, तर, तो भिकारी राजा ठरतो का ? नाही. जे विचारापुरतेच मर्यादित असून प्रत्यक्षात नसते त्याला कल्पना म्हणतात.

प्रमाण –

**कल्पना अविद्या तेणे झाला जीव । मायोपाधी शिव बोलिजेती ।।**

– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

कल्पित अविद्या व कल्पित मायेने अनुक्रमे जीव व शिव तयार होतो. जीव व शिव यांचा प्रपंच तयार होतो. शिव म्हणजे ईश्वर. जीव आणि ईश्वर कल्पित असल्यामुळे त्यांचे कार्यही कल्पितच आहे. यांची कल्पना ज्या वेळेस संपते, तेव्हा, वास्तव ब्रह्म लक्षात येते. वास्तव ब्रह्म लक्षात घ्यायचे असेल, तर, अविद्या आणि माया कल्पित आहे हे जाणून घ्या.

माया ही वांझेसारखी आहे आणि अविद्या तिचे लेकरूं आहे. आणि आपले लेकरूं ? त्याच्यात तर पारच मेलोय आपण. या कारणामुळेच आपण अविद्या, माया यांच्या अभ्यासाकडे येऊ शकत नाही. तुम्ही तुमच्या लेकरात अडकले, तर, तुम्हांला अविद्या आणि माया कळणार नाहीत. तुम्ही जर अविद्या आणि माया कळून घेतली, तर, तुमच्या लेकरात तुमचा जीव गुंतणार नाही. म्हणून, यांच्यात मरावं की त्यांच्यात मरावं हे लक्षात घेणं गरजेचे आहे. माया ही वांझ आहे. जी स्त्री वांझ असते तिच्यापासून काही उत्पन्न होत नाही. ईश्वराची बायको जी माया ती वांझ आहे. ईश्वराच्या बायकोपासून काही उत्पन्न होत नाही. म्हणून, तो बंधनात नाही. पण, जीवाच्या अविद्येपासून बरंच काही उत्पन्न होतंय. म्हणून, जीव बंधनात आहे. वांझेपासून काही निर्माण होत नाही. परंतु, वांझेच्या लेकरापासून म्हणजे अविद्येपासून काहीही निर्माण होतं. हे फारच अजब आहे. 'अविद्या कल्पित आहे' असं लक्षात आलं की तिच्यापासून निर्माण होणारे कार्य काहीही असो, ते कल्पितच आहे असा निर्णय होतो. अविद्या वास्तव नाही आणि मायाही वास्तव नाही. मायेच्या संबंधाने ईश्वर वास्तव नाही आणि अविद्येच्या संबंधाने जीवही वास्तव नाही. ईश्वर कल्पित, जीव कल्पित आणि त्याच्या खाली तुम्ही जे नवरा, स्त्री, सुखी, क्रोधिष्ट, दयाळू, पापी इत्यादी समजता तेही कल्पित आहे. वैद्यकशास्त्र, वाणिज्य, गणित, विज्ञान, अभियांत्रिकी या आणि तशा असंख्य विद्या कल्पित आहेत. चौदा विद्या आणि चौसष्ट कला या कल्पित आहेत. 'माझे घर', 'माझी बायको' हे सर्वही कल्पित आहेत. यांत गुंतले, तर, फार मोठे नुकसान होते.

प्रमाण –



**कल्पनेपासून कल्पिला जो ठेवा। तेणें पडे गोवा नेणे हरि ।।**

**– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ**

गोवा म्हणजे बंधन. म्हणजेच जन्म–मरणाचा फेरा. स्त्री हे मायाकार्य आहे. म्हणजे स्त्री ही कल्पनेची कल्पना आहे. स्त्रीला तुम्ही 'माझी बायको' असे म्हणता, तेव्हा स्त्रीवर 'बायको' ही आणखी एक कल्पना करता. याचा अर्थ बायको ही कल्पनेच्या कल्पनेची कल्पना ठरते. माया ही कल्पना, स्त्री ही कल्पनेची कल्पना आणि बायको ही कल्पनेच्या कल्पनेची कल्पना. जीव माया कार्याशी अंतःकरणातून संबंध जोडतो, तेव्हा, ते कल्पनेच्या कल्पनेची कल्पना असे ठरते. ही जीवाची फार मोठी घसरण आहे.

हे जर तुम्हांला समजले नाही किंवा समजूनही तुम्ही ते ऐकलेच नाही, तर, यम तुम्हांला ते दाखवून देईल. जिला तुम्ही तुमची बायको समजता, तिच्यातील प्राण जर यमाने काढला, तर, तिचे शरीर तुम्हांला जाळावे लागते. तुझी बायकोच आहे, तर, ठेव ना तिला नेहमीसाठी स्वतःजवळ. वास्तविक तुम्ही हे जे समजत चालले की 'ही माझी आई', 'हा माझा बाप', 'ही माझी बायको', 'ही माझी मुलंबाळं' हे सर्व थोतांड आहे. हे सर्व कल्पित आहे. हे सर्व कल्पनामात्र आहे. कोणी कोणाची आई नाही, बाप नाही, बायको नाही. या सर्वांना तुम्ही सत्य समजून बसले. म्हणून, तुम्हांला जन्म–मरणाचे चक्र आहे. अविद्येचा निर्णय लावणे फार गरजेचे आहे. आपल्याला अविद्याकार्य पदार्थांशी काहीच देणे–घेणे नाही. तुम्ही मरायच्या आत जर माझे हे वाक्य तुम्हांला कळले, तर, तुमचे बरेच मोठे काम होईल. त्यामुळे, तुम्ही अनंत जन्मांची प्रगती कराल. अविद्याकार्य पदार्थांच्या नादालाच लागायचे नाही. सूक्ष्म, स्थूल प्रपंचातील पदार्थांमध्ये रमायचे नाही. एका ब्रह्मविद्येशिवाय इतर कोणतीही विद्या शिकू नका. अन्य विद्या शिकायची असेल तर पोट भरण्यापुरतीच शिका.

मंद अंधकारामुळे रज्जूवर भासलेला जो सर्प आहे त्याला किती मोठ्या काठीने मारावं? रज्जूवर भासलेला सर्प कल्पित आहे हे लक्षात घेणं गरजेचे आहे. भासणे म्हणजेच सर्प कल्पित आहे. कल्पित सर्पाचा नाश अधिष्ठान रज्जूच्या ज्ञानाने होतो. म्हणून, तेथे काठीची गरज नसून रज्जूज्ञानाची गरज आहे. तसेच, अविद्या आणि अविद्याकार्य कल्पित आहे. घर, बायको, पोरं, संपत्ती इत्यादी कल्पित प्रपंचाचा नाश कल्पित अविद्येसह अधिष्ठानाच्या ज्ञानाने होणार आहे. अधिष्ठान भगवंताच्या ज्ञानाने कल्पित अविद्येसह अविद्याकार्याचा नाश होतो. तेव्हा आई आई राहत नाही, बाप बाप राहत नाही, बायको बायको राहत नाही. पण, अधिष्ठान ब्रह्म जर कळले नाही तर आईला 'आई नाही' आणि बापाला 'बाप नाही' असे म्हटले, तरी, साधकाच्या दृष्टीने ते सत्यत्वाने राहणार आहेत आणि साधकाचे संसारचक्र कायम राहणार. अविद्याकार्य आणि मायाकार्याचा व्यवहारी दृष्टीने नाश केल्याने ब्रह्मप्राप्ती होते असे साधकाने समजू नये.

'अविद्या कल्पित आहे' याच्यापुढे जाऊन 'अविद्या नाहीच' असे साधकाने लक्षात

घ्यावे. अविद्या असलेली आहे की नसलेली आहे? माया, अविद्या असलेली असेल, तर, 
तिचा नाश कोणीच करू शकत नाही. असलेल्या अविद्येने ब्रह्मदेवापासून दगडापर्यंत सर्वांना दमविलेलं आहे.

प्रमाण –

हे आदिपुरुषाची माया। ब्रह्मेयाही नयेचि आया।
म्हणौनि भुलविला ऐकें राया। संजयो म्हणे ।।२०३।। अध्याय १

– श्रीज्ञानेश्वरी

अविद्या कोणालाही तरून जाणे शक्य नाही. कोणती अविद्या तरून जाणे शक्य नाही? जी असलेली अविद्या आहे, तिला तरून जाणे शक्य नाही. तुम्हांला काय बोध आहे? असलेली अविद्या की नसलेली अविद्या? असलेली अविद्या? तर, तिला कधीही तरून जाणे शक्य नाही. नसलेली अविद्या? मग, तिचा नाश करण्याची गरज नाही.

सुरुवातीला साधकाला अविद्येबद्दल काही माहिती नसते. त्याने शास्त्राभ्यास केला आणि पुढे गेला, तर, अविद्या काय आहे हे त्याला कळायला लागते. त्याच्यासाठी ही 'असलेली अविद्या' ठरते. पुढे, तो हुशार झाला, तर, त्याला असलेली अविद्या ही 'नसलेली अविद्या' होते. अविद्या आहे की नाही? जी विद्यमानच नाही, ती अविद्या नसलेली अविद्या आहे, असलेली अविद्या नाही. संसारचक्र 'असलेल्या अविद्येने' सुरु झाले. नसलेल्या अविद्येने जीवन्मुक्ति प्राप्त होते. म्हणून, नसलेली अविद्या प्राप्त करावी लागते आणि नसलेल्या अविद्येचा नाश करावा. तो कसा? वंध्यापुत्राला मारण्यासाठी किती मोठी तलवार लागेल? वंध्यापुत्राला मारण्यासाठी किती मोठी फौज लागेल? वंध्यापुत्र हा असलेला पदार्थ आहे की नसलेला पदार्थ आहे?

प्रमाण –

वांझेचे सूने पुत्र झाला। तेथ भीष्मस्त्रियेसी पान्हा आला।
तेणें पयःपाने तो मातला। घरभंगु केला दिगंबराचा।। ३६।। अध्याय ३

– श्री एकनाथी भागवत

वांझेच्या सूनेला पुत्र झाला, हे कसे काय? अविद्या मुळात वांझेचे म्हणजे मायेचे लेकरूं आहे. तिची सून. तिला सून कशी असेल? त्या सूनेला पुत्र होणे हे अशक्य आहे. लोक म्हणतात, 'जगत् अविद्येमुळे आहे. अविद्या आहे'. अविद्या आहे असे ठामपणे समजतोस ना, मग चक्रात फिरत रहा. अविद्येचे स्वरूप लक्षात घेणे गरजेचे आहे. अविद्येचा विचार केला, तर, 'अविद्या नाही' असे लक्षात येते. तू जन्मल्यावर तुला काहीच कळत नव्हते. वाटोळे करणाऱ्या आई, बाप, गोतावळ्याने तुला, 'हे कान', 'हे डोळे', 'तू ब्राह्मण', 'तू मुलगा', 'तू नवरा' असे

सर्व विपरीत शिकविले. तू परमार्थाकडे वळलास, तेव्हा शास्त्र, सद्गुरूंनी सांगितले, 'हे अविद्येमुळे आहे'. तू 'नवरा आहे', 'मामा आहे' असे बडबडत होतास म्हणून, सद्गुरूंना सांगावे लागले की, 'अविद्या आहे'. तू समजू लागलास, 'मी जन्मलो, मी करणार, मी विकारवान आहे'. म्हणून, शास्त्र आणि सद्गुरू तुला सांगू लगले की 'अविद्या आहे'. त्यानंतर, 'असलेली अविद्या' तुला लक्षात येऊ लागल्यावर सद्गुरूंनी सांगितले, 'अविद्या नाही. तू असलेल्या अविद्येचा विचार करीत होतास. मी तुला नसलेल्या अविद्येबद्दल सांगत आहे.'



नसलेल्या अविद्येला ओळखावे आणि स्थिर रहावे, काहीही करू नये. प्रपंच म्हणजे काय? प्रपंच म्हणजे करणे. परमार्थ म्हणजे काय? काहीही न करणे म्हणजे परमार्थ. परमार्थ सफल झालेल्या जीवन्मुक्त महापुरुषाबाबत बोलताना भगवान श्रीज्ञानदेव महाराज म्हणतात–

प्रमाण –

म्हणोनि तयासि कांहीं। त्रिशुध्दि करणें नाहीं।
परी ऐसे जरी हें कांहीं। नव्हे जया ।।९९१।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

जीवन्मुक्ति म्हणजे काय? काहीही न करणे. कोणी परमार्थ करीत असेल, तर, तो सात्त्विक व्यवहार करतोय. संसार म्हणजे राजसिक व्यवहार. जे आवडणारे पदार्थ प्राप्त नाहीत त्यांचे अविद्येमुळे कौतुक वाटते. आवडता पदार्थ प्राप्त झाला, तर, तो कमी आहे आणि आणखी उत्तम पदार्थ कसा मिळेल? असे वाटते. 'नको ते' करणे यास तामसिक व्यवहार म्हणतात. खरेतर, तुम्ही सात्त्विक व्यवहार करता, परमार्थ नाही. परमार्थ म्हणजे काहीही न करणे. अकर्तृबोध ज्याच्या शरीरामध्ये प्रकट होतो, त्याचा जन्म-मरणाचा फेरा चुकतो. अशा महापुरुषांसाठी जगत् हा पदार्थ राहत नाही आणि त्याच्या सापेक्ष अधिष्ठानाचे नाव घेण्याची गरज राहत नाही.

उदाहरणार्थ – सूर्याच्या ठिकाणचा प्रकाश आणि पृथ्वीवरील सूर्याचा प्रकाश या दोघांमध्ये काय फरक आहे? पृथ्वीवरील सूर्याच्या प्रकाशाला पृथ्वीवरील अंधाराचा संबंध आहे. म्हणून, या प्रकाशाला आपण 'प्रकाश' असे म्हणतो. पण, एखादा जर सदैवच सूर्याच्या ठिकाणी राहत असेल, तर, त्याला अंधार ही संकल्पनाच नाही. म्हणून, त्याच्या सापेक्ष 'प्रकाश' ही संकल्पनासुद्धा नाही. पृथ्वीवरच्या मनुष्याला अंधार, उजेड आहे. पण, सूर्याच्या ठिकाणी राहणाऱ्याला अंधार ही कल्पनाच नसल्यामुळे त्या ठिकाणी उजेड ही कल्पनासुद्धा नाही. पण, तरीसुद्धा तेथे प्रकाश मात्र आहेच.

त्याचप्रमाणे, अविद्याच नाही म्हणून तिच्या सापेक्ष विद्यासुद्धा नाही. म्हणून, ज्ञान-अज्ञानातीत असे 'ज्ञान' आहे. सूर्यावरील प्रकाश कसा आहे? प्रकाश-अंधारातीत असा तो

प्रकाश आहे. त्याचप्रमाणे, अविद्या सापेक्ष विद्या ही विकारी ठरत असल्यामुळे त्या ज्ञानाच्या–

विद्येच्या अतीत झाले पाहिजे. ज्ञानातीत आणि अज्ञानातीत जे तत्त्व राहते त्याला 'आत्मा' असेही म्हणता येत नाही. चार देहांचे अधिष्ठान म्हणून आत्मा म्हणावा आणि जगताला अधिष्ठान म्हणून ब्रह्म म्हणावे.

प्रमाण –

तुका म्हणे शेषा । जागें करा हृषीकेशा ।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

जे शेष राहते तेच ज्ञान–अज्ञानातीत ब्रह्म आहे. तोच हृषिकेश आहे.

प्रमाण –

दुजे खंडे तरी । उरला तो अवघा हरि ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

शेवटी, ब्रह्मच शिल्लक राहावे, जगत् शिल्लक राहू नये. जगत् उरूच नये. 'ब्रह्म' हे ब्रह्म या शब्दाच्या अतीत आहे असा निश्चय असावा. असा निश्चय होण्यासाठी साधकाने शास्त्राभ्यास करावा. परंतु, शास्त्रही एका ठिकाणी येऊन थांबते. तेथून सद्गुरूंची सुरूवात होते.

प्रमाण –

गुरू परमात्मा परेशु । ऐसा ज्याचा दृढ विश्वास ।।

– श्री संत एकनाथ महाराज गाथा

साधकाचा सद्गुरूंवर दृढ विश्वास असावा. सद्गुरूंची प्रसन्नता लाभल्याशिवाय जन्म–मरणाचा फेरा चुकत नाही. कल्पित माया, कल्पित अविद्या आणि त्यांपासून निर्मित ईश्वर आणि जीव यांचा निरास करण्यासाठी, फक्त सद्गुरूंचाच उपयोग होतो. म्हणून, सद्गुरूंना शरण जावे लागते. संसार नीट चालावा म्हणून त्यांना शरण राहू नये. जीव आणि ईश्वर ज्या अविद्येने आणि मायेने निर्माण झाले त्यांचा निरास करायचा असेल तर सद्गुरूंना शरण जावे.

★★★★★

## चिंतन क्रमांक – १८
## सृष्टीचा विस्तार

आता, सृष्टीची उत्पत्ती कशी होते? सृष्टीचा विस्तार कसा होतो? यावर विचार करू. सृष्टी म्हणजे जगत्. 'एक कल्प' या काळात सृष्टी व्यक्त रूपात असते. नंतर एक कल्पपर्यंत ती अव्यक्त असते आणि पुढच्या कल्पात परत व्यक्त रूपाला येते. ज्या वेळेस सृष्टी अव्यक्त असते त्यास महाप्रलय असे म्हणतात. महाप्रलय–व्यक्तसृष्टी–महाप्रलय हे अनादी काळापासून सुरू आहे. सर्वात प्रथम सृष्टी कोणती? हे सांगताच येत नाही. विहीरीतून पाणी उपसण्यासाठी एका चक्रावर अनेक गाडगी बांधलेली असतात. चक्र फिरवले की ती गाडगी देखील फिरतात. चक्राकार फिरणाऱ्या गाडग्यांपैकी प्रथम कोणते गाडगे? हे सांगता येत नाही. त्याप्रमाणे, प्रथम सृष्टी कोणती? हे सांगता येत नाही. पूर्वीच्या सृष्टीचे बीज उत्तर सृष्टीस कारण असते. एवढेच सांगता येते. सध्या सृष्टी व्यक्त रूपात आहे. महाप्रलयाच्या कालावधीत काय असते? त्या काळात मनुष्य, इतर प्राणी, सूर्य, पृथ्वी, देवादिकांची स्थूलशरीरे नसतात. महाप्रलय काळात समष्टी स्थूलशरीर आणि समष्टी सूक्ष्मशरीर हे माया म्हणून राहतात. माया म्हणजे समष्टी कारणशरीर. कारणशरीर हे सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म असते. म्हणून, महाप्रलय काळात नामरूपे अव्यक्त असतात. समष्टी स्थूलदेहाचा लय समष्टी सूक्ष्मदेहात झालेला असतो व समष्टी स्थूलांसह सूक्ष्मदेह मायेत लय पावलेला असतो. बीजामध्ये झाड असते, पण ते अव्यक्त असते. त्याप्रमाणे महाप्रलय काळात माया आणि ब्रह्मचैतन्य असते. सृष्टी व्यक्त रूपाला येणे आणि महाप्रलय होणे यास कारण ब्रह्मचैतन्य आहे.

महाप्रलयाचा काळ संपतो, तेव्हा, ब्रह्म अनिर्वचनीय मायेशी युक्त होऊन सृष्टीला व्यक्त रूपात आणण्यासाठी 'मी बहुकाळ एकटाच होतो. आता मी सृष्टी निर्माण करून अनेक होईल' असा संकल्प करते.

प्रमाण –

१) तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति । ६–२–३

– छान्दोग्य उपनिषद्

२) एकले न कंठेचि म्हणोनियां येणे ।
केली निर्माण चौदाहि भुवनें ॥

– श्री संत निळोबाराय गाथा

भगवंत असा संकल्प का करतो? जगताची उत्पत्ती ही प्राणीकर्मसापेक्ष असते. असंख्य जीव काही ना काही कर्म करीत राहतात व फलाची आकांक्षा धरून असतात.

मोजकेच जीव ब्रह्मज्ञान प्राप्त करून मुक्त होतात. पूर्वीच्या व्यक्त सृष्टीत ज्या असंख्य जीवांचे कर्मफळ भोगायचे राहून गेले, ते सर्व जीव (म्हणजे सर्व सृष्टी) महाप्रलयात कारण रूपात जाते. एक कल्पानंतर जेव्हा सृष्टी व्यक्त रूपात येणार असते, तेव्हा, जीवांच्या कर्मफळ देण्याच्या उद्देशाने 'मी सृष्टी निर्माण करीन' असा संकल्प ब्रह्म करते. खरेतर! असा संकल्प करणारे ब्रह्मच, ब्रह्मदेव ठरते. शुद्ध ब्रह्म काही करीत नाही. ब्रह्म चेतन असून इच्छा करणे हा चैतन्याचा धर्म आहे. प्राणीकर्मामुळे तशी इच्छा ब्रह्माला होते.



नंतर त्रिगुणात्मक प्रकृतीशी ब्रह्म युक्त होते. प्रकृतीचे दोन भाग पडतात. एक तमःप्रधान आणि दुसरी सत्त्वप्रधान. तमःप्रधान प्रकृतीपासून अपंचीकृत पंचमहाभूते, सूक्ष्मदेह, पंचीकृत पंचमहाभूते आणि स्थूलदेह बनतात. सत्त्वप्रधान प्रकृती पुढे दोन प्रकारची होते – शुध्दसत्त्वप्रधान माया आणि मलिनसत्त्वप्राधन अविद्या. **आकृती क्रमांक ५९** मध्ये सृष्टी उत्पत्तीचा क्रम दाखविलेला आहे.




आकृती क्रमांक ५९ – सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम

तमप्रधान प्रकृतीमध्ये तमोगुण जास्त असून सत्त्वगुण आणि रजोगुण कमी असतात. ईश्वराच्या इच्छेने तमप्रधान प्रकृतीपासून अपंचीकृत पंचमहाभूते तयार होतात. शुद्ध रूपात असलेल्या महाभूतांना अपंचीकृत महाभूते म्हणतात. आकाश, वायु, अग्नी, जल आणि पृथ्वी ही शुद्ध रूपात असतात. ही भूते निर्माण होण्याचा क्रम असतो.

प्रमाण –

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः।
आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। २–१
– तैत्तिरीय उपनिषद्

तैत्तिरीयोपनिषदातील ब्रह्मवल्ली या दुसऱ्या वल्लीतील वरील मंत्र आहे. ब्रह्मापासून आकाश तयार होते. त्यानंतर, आकाशोपहित चैतन्य वायूला उत्पन्न करते. वायुपहित चैतन्य अग्नीला उत्पन्न करते. अग्नोपहित चैतन्य जलाला उत्पन्न करते. जलोपहित चैतन्य पृथ्वीला उत्पन्न करते.

प्रत्येक भूतांमध्ये चैतन्य अनुस्यूत असतेच. या पाच अपंचीकृत महाभूतांपासून सूक्ष्मदेह तयार होतो. या पाच अपंचीकृत महाभूतांच्या सत्त्वांशापासून पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच अंतःकरणे तयार होतात. या पाच अपंचीकृत महाभूतांच्या रजोंशापासून पंचप्राण आणि पंचकर्मेंद्रिये तयार होतात. अपंचीकृत पंचमहाभूतांच्या तमोगुणापासून शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय बनतात.

अपंचीकृत पंचमहाभूतांचे पंचीकरण होऊन पंचीकृत पंचमहाभूते तयार होतात. पंचीकृत पंचमहाभूतांपासून स्थूलदेह तयार होतो. अशाप्रकारे समष्टी सूक्ष्मदेह आणि समष्टी स्थूलदेह तयार होतात.

ईश्वरनिर्मित या सृष्टीला जगत् असे म्हणतात. जगतान्तर्गत तीन गोष्टी येतात – देश, काल आणि पदार्थ. देश, काल, पदार्थ मिळून सृष्टी. सृष्टीमध्ये 'देश'ची व्याप्ती किती अफाट आहे ते प्रथम पाहू. देश म्हणजे जागा किंवा ठिकाण. सृष्टीमध्ये किती ठिकाणे आहेत? सृष्टीमध्ये चौदा ठिकाणे आहेत असे शास्त्र सांगते. ती ठिकाणे कोणती? पृथ्वीसह सात स्वर्ग आणि सात पाताळ असे मिळून चौदा लोक आहेत. पृथ्वीच्या वर सहा स्वर्ग आणि पृथ्वीच्या खाली सात पाताळ आहेत. सर्वश्रेष्ठ स्वर्ग ब्रह्मलोक. यापासून गणना याप्रकारे – १) ब्रह्मलोक (२) तपोलोक (३) जनलोक (४) महर्लोक (५) स्वर्लोक (६) भुवर्लोक (७)भूलोक (पृथ्वी–इहलोक) (८) अतल (९) वितल (१०) सुतल (११) तलातल (१२) महातल (१३) रसातल (१४) पाताल.

सृष्टी 'एक कल्प' या काळात व्यक्त रूपात असते व एक कल्पापर्यंत महाप्रलयकाल असतो. एक कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस आणि ४.३२ अब्ज सौर वर्ष. देश, काल दर्शवणारे सृष्टीचे रूपक **आकृती क्रमांक ६०** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ६० – सृष्टीचा देश आणि काल

या रूपकात उभ्या रेषेत 'देश' दाखवला असून त्यात क्रमाने चौदा भुवने दाखविली आहेत. आडवी रेष म्हणजे 'काल'. काल एक कल्प दाखविला आहे. या चौदा भुवनांचा आणि मनुष्याचा संबंध काय? हे लक्षात घेणे गरजेचे आहे की केवळ पृथ्वीवरच, मनुष्य देहात असलेल्या जीवाला कर्म करण्याचा अधिकार आहे. विविध कर्म करीत राहिल्याने त्यांचे फल निर्माण होते. कोणत्या कर्माचे फळ केव्हा मिळावे हे ईश्वर ठरवतो आणि सुख–दुःखात्मक भोग देतो. पृथ्वीवर कमविलेल्या पुण्याच्या श्रेष्ठत्व, कनिष्ठत्वानुसार मृत्यूनंतर मनुष्याला भूलोकाच्यावरील स्वर्गांपैकी एक स्वर्ग प्राप्त होतो. शुभकर्माचे आचरण जितक्या जास्त प्रमाणात, निष्कामभावाने असेल तेवढ्या प्रमाणात उच्च स्वर्ग प्राप्त होतो. ब्रह्मलोक हा सर्वश्रेष्ठ स्वर्ग असून त्यासापेक्ष भुवर्लोक हा कनिष्ठ स्वर्ग आहे. साधकाने हे लक्षात घ्यावे की ब्रह्मलोक ते पाताल हे सर्व लोक मिथ्या असून कुठलाही स्वर्ग प्राप्त करणे हे वेदांतशास्त्राचे प्रयोजन नाही. वरील सर्व लोकांत राहणाऱ्या जीवांना परत परत जन्मावे आणि मरावे लागते.

प्रमाण –



**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ।।१६।। अध्याय ८**

– श्रीमद्भगवद्गीता

ब्रह्मलोकासह सर्व लोक पुन्हा पुन्हा नाश पावून उत्पन्न होणार आहेत. म्हणून, त्या लोकी गेलेले जीव पुन्हा पुन्हा जन्म घेतात. पृथ्वीवर ज्या साधकाला दृढ अपरोक्ष ब्रह्मज्ञान होते, म्हणजेच जो मला प्राप्त होतो, त्याचाच पुनर्जन्म होत नाही.

आता, ब्रह्मलोक या सर्वश्रेष्ठ स्वर्गाबद्दल थोडे विवेचन करू. ब्रह्मलोक कसा असतो? ब्रह्मलोकातले पदार्थ कसे असतात? पृथ्वीवरील कोणत्या जीवांना मृत्यूनंतर ब्रह्मलोक प्राप्त होतो? चौदाही भुवने पंचीकृत पंचमहाभूतांचे कार्य आहे. पृथ्वीवरील पदार्थांमध्ये घनता जास्त असते. पृथ्वीवरील पदार्थ वजनाने जड असतात. त्याचे कारण असे की पृथ्वीवरील बहुतेक पदार्थांमध्ये पंचीकृत पृथ्वीचे प्रमाण जास्त आहे. इतर चार महाभूतांच्या मानाने पृथ्वी या भूताची घनता जास्त आहे. म्हणून, पंचीकृत पृथ्वीप्रधान पदार्थ डोळ्यांनी सहज दिसतात. घरे, रस्ते, मनुष्यांचे स्थूलदेह, मनुष्येतर प्राण्यांचे स्थूलदेह इत्यादी असंख्य पदार्थ डोळ्याने दिसतात. भुवर्लोक पासून उत्तरोत्तर ब्रह्मलोकापर्यंत पंचीकृत पृथ्वीचे प्रमाण कमी कमी असते व पंचीकृत वायू आणि पंचीकृत आकाशाचे प्रमाण वाढत वाढत जाते. वायू आणि आकाश हे पृथ्वीतत्त्वापेक्षा व्यापक आहेत, हलके आहेत. पंचीकृत वायू आणि पंचीकृत आकाश यांची घनता पंचीकृत पृथ्वीपेक्षा फारच कमी आहे. ब्रह्मलोक हा प्रामुख्याने पंचीकृत वायू आणि पंचीकृत आकाशापासून बनलेला आहे. ब्रह्मलोकातले जीव, पदार्थ हे हलके, तरल असतात. आकाश आणि वायू फार व्यापक असल्यामुळे ब्रह्मलोकाची व्याप्ती पृथ्वीपेक्षा जास्त आहे. ब्रह्मलोकातील दृश्य कसे असते? मनुष्याला स्वप्न पडते तेव्हा त्याला जसे दृश्य दिसते त्याप्रमाणे त्या दृश्यामध्ये घनता, जडता जाणवत नाही, हलकेपणा जाणवतो. पृथ्वीवर कोणते कर्म करणाऱ्या मनुष्याला त्याच्या मृत्यूनंतर ब्रह्मलोक प्राप्त होतो? आयुष्यभर निष्कामभावाने कायिक, वाचिक आणि मानसिक तप करणाऱ्या मनुष्याला मृत्यूनंतर ब्रह्मलोक प्राप्त होतो. यज्ञयागादि वेदोक्त कर्मे निष्कामभावाने करता करताच मृत्यू पावला, तर त्याला ब्रह्मलोक प्राप्त होतो. पृथ्वीवर निष्ठेने ज्ञानमार्गाची साधना करणारा मुमुक्षु ब्रह्माचे अपरोक्षज्ञान न होताच मृत्यू पावला, तर, तो ब्रह्मलोकी जातो. ब्रह्मलोकाला सत्यलोक असेही म्हणतात. पृथ्वीवर ज्या उपासकाने तीव्रतेने आणि निष्ठेने विष्णूची उपासना केली असेल तर मृत्यूनंतर तो ब्रह्मलोकी जातो. ब्रह्मलोक हाच त्याला विष्णूलोक म्हणून दिसतो. त्याचप्रमाणे, शंकराच्या निष्ठावान उपासकाला मृत्यूनंतर ब्रह्मलोकच कैलासलोक म्हणून दिसतो. जीव ब्रह्मलोकी किती वर्ष राहतो? काही जीव ब्रह्मलोकात हजारो वर्ष, तर, काही जीव ब्रह्मलोकात लाखो वर्ष वास्तव्य करतात. हे कशावर अवलंबून असते? पृथ्वीवर जितक्या तीव्रतेने, निष्ठेने शुभकर्म जास्त प्रमाणात

निष्कामभावाने केले असेल तितक्या जास्त काळ तो ब्रह्मलोकी राहतो.


ब्रह्मलोकातील जीवाला स्थूलदेह असतो का? ब्रह्मलोकातील जीवाला स्थूलदेह असतो. परंतु, पृथ्वीवरच्या मनुष्याच्या स्थूलदेहापेक्षा तो फार हलका असतो. कारण ब्रह्मलोकी पंचीकृत आकाश आणि पंचीकृत वायूचे प्रमाण जास्त आहे. पृथ्वीवर पुण्यवान मनुष्य मेला की त्याचा स्थूलदेह पृथ्वीवरच पडून राहतो. परंतु, सूक्ष्म, कारण, महाकारण हे तीन देह मिळून असलेली वासनेची गाठ ब्रह्मलोकी गेल्याबरोबर तेथे त्या गाठीभोवती ब्रह्मलोकातील स्थूलदेहाचे वेष्टन मिळते. ब्रह्मलोकातील जीवांचा स्थूलदेह प्रकाशमान असतो. पृथ्वीवरच्या शरीरात जसे हाड, मांस, मल, मूत्र असतात तसे, ब्रह्मलोकातील जीवांच्या शरीरात ते नसतात. पृथ्वीवरील जीवाला आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक या तीन प्रकारचे दुःख असते. ब्रह्मलोकातील जीवांना हे त्रिताप नसतात. मात्र त्यांचे बीज असते. त्यांच्या अंतःकरणात त्यांना सतत सुखाचाच अनुभव असतो. ब्रह्मलोकातील घरे प्रकाशमान असतात. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्यासाठी ब्रह्मलोकातील जीवांना कोणत्या वाहनाची गरज नसते. केवळ संकल्पशक्तीने ते एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जातात. त्यांना ब्रह्मलोकातील कोणता पदार्थ हवा असेल, तर, त्यांनी संकल्प केल्याबरोबर तो पदार्थ त्यांच्याजवळ प्रकट होतो. अशाप्रकारे, त्यांच्या पुण्याचा क्षय होत जातो. ब्रह्मलोकात कोणतेच नवीन कर्मफळ तयार होत नाही. पृथ्वीवर कमविलेल्या पुण्याचा क्षय ब्रह्मलोकातील जीवांचा होत राहतो. पृथ्वीवर ज्या प्रकारचे पुण्य कर्म त्यांनी केलेले असते, त्याप्रकारची क्रिया करण्याची प्रवृत्ती त्यांची ब्रह्मलोकीही असते. समजा, कोणत्या जीवाने पृथ्वीवर ध्यानच केलेलं असेल, तर, ब्रह्मलोकीही तो एका ठिकाणी बसून ध्यानमग्न असतो. ब्रह्मलोकातील काही जीव एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी उडत उडत संचार करतात. ब्रह्मलोकी सुद्धा परमार्थ सांगणारे गुरू आणि त्यांची विद्या ग्रहण करणारे शिष्य असतात. ब्रह्मलोकी सर्वत्र अत्यंत सुखकारक आणि मंगलमय वातावरण असते. ब्रह्मलोकातील जीवांना सतत तीव्र सुखाचा अनुभव असतो. परंतु, त्याची अविद्या निवृत्त झालेली नसते. त्यांचा कारणदेह शिल्लकच असतो. त्यांचे नाम-रूपात्मक अस्तित्व टिकलेले असते. म्हणून, ते जरी सुखी असले, तरी, संसार दुःखाचे मूळ जी अविद्या ती निवृत्त झालेली नसते. म्हणून, ब्रह्मलोकात सुख आहे. परंतु, दुःखाचे बीजही शिल्लक राहते. ब्रह्मलोकातील जीवाच्या पुण्य कर्माच्या फलाचा भोग पूर्ण झाल्यावरच तो जीव परत पृथ्वीवर जन्माला येतो. पृथ्वीवर त्याला मनुष्यदेहच मिळेल असा नियम नाही. मनुष्येतर प्राण्याचाही देह मिळू शकतो.

प्रमाण –

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ।।२१।। अध्याय ९

– श्रीमद्भगवद्गीता

कर्माच्या योगाने स्वर्गलोकास प्राप्त झालेले, ते विस्तीर्ण स्वर्गलोकाचा उपभोग घेवून पुण्य क्षीण झाल्यावर पृथ्वीवर परत येतात. सकामभावाने शुभकर्म करणाऱ्यांची ही गती होते.

ब्रह्मलोकासह सर्व स्वर्ग आणि नरक अनित्य आहेत. सृष्टीतील सर्व पदार्थ मिथ्या आहेत.

पृथ्वीवरील जीवांना स्वर्ग, नरकातील जीव दिसू शकतात का? हो दिसू शकतात. चौदाही भुवने ही पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेली असल्यामुळे तसे होऊ शकते. पृथ्वीवर उपासना करणाऱ्या काही उपासकांना स्वर्गातील जीव दिसतात.

पृथ्वीवर ज्यांनी सकामभावाने शारीरिक, मानसिक, वाचिक तप निष्ठेने केलेले असेल, तर मृत्यूनंतर ते तपोलोकात जातात. पृथ्वीवर ज्यांनी निष्ठेने समाजसेवा केलेली असेल तर ते जनलोकात जातात. 'पृथ्वीवर यज्ञ, यागादि करून मी इंद्रलोकी जाईन' अशा दृढ वासनेने जो पुण्य कर्म करतो, तो मृत्यूनंतर स्वर्गलोकी जातो. परमार्थाचा गंध नसलेला परंतु, आई-बापाने सांगितल्याप्रमाणे नीट संसार करणाऱ्यास मृत्यूनंतर पितृलोक प्राप्त होतो.

शास्त्र सांगते की चौदा लोक आहेत. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांनी एकवीस स्वर्ग आहेत असे सांगितलेले आहे. प्रत्येक मनुष्याचे आचार-विचार भिन्न असतात. व्यक्ती तितक्या प्रकृती. याचा अर्थ असा की लोक असंख्य आहेत. मोजता येणार नाहीत इतके स्वर्ग-नरक सृष्टीत आहेत. हे सर्व लोक मिथ्या आहेत. असे पक्के जाणून साधकाने या सर्व लोकांच्या वासनेचा त्याग करावा. स्व-स्वरूपाचा निःसंदेह निश्चय होण्याकडेच साधकाने लक्ष द्यावे. हे स्वर्ग-नरकांचे वर्णन साधकांसाठी केवळ माहिती असावी म्हणून सांगितलेले आहे.

सृष्टी म्हणजे देश, काल, पदार्थ. आतापर्यंत आपण 'देश' किती अफाट आहे हे पाहिले. सृष्टीत असंख्य लोक आहेत. 'देश' किती व्यापक आणि अचिंत्य आहे हे समजण्यासाठी आपण पृथ्वीवरून दिसणाऱ्या ग्रह, तारका, उल्का, धूमकेतु यांचा विचार करू.

सूर्य आणि त्याच्याभोवती फिरणारे नऊ ग्रह यांना मिळून 'सूर्यमाला' असे म्हणतात. या नऊ ग्रहांपैकी एक ग्रह म्हणजे पृथ्वी. पृथ्वीचा व्यास १२,८०० कि.मी. आहे. सूर्याचा व्यास ६,९५,५०० कि.मी. आहे. सूर्य ते पृथ्वी हे अंतर १५०,०००,००० (०.१५ अब्ज) कि.मी. आहे. सूर्य ते प्लुटो हे अंतर ५,९०६,३७६,२७२ (५.९ अब्ज) कि.मी. आहे.

करोडो तारका, ग्रह, उल्का, धूमकेतु यांच्या समूहाला 'आकाशगंगा' असे म्हणतात. या आकाशगंगेत आपली सूर्यमाला आहे, त्या आकाशगंगेला पाश्चात्य शास्त्रज्ञांनी 'श्वेतमार्ग' (Milky Way) असे नामकरण केले आहे. श्वेतमार्ग- आकाशगंगेत ४०० अब्ज तारका आहेत आणि त्यापैकी एक तारा म्हणजे आपला सूर्य! कोणताही तारा स्थिर नाही. आकाशगंगेतील सर्व पदार्थ गतीमान आहेत. समजा, आपण खूप वर गेलो आणि तेथून खाली

पाहिले तर, ही श्वेतमार्ग–आकाशगंगा कशी दिसते? वरून पाहिल्यास ही आकाशगंगा गोलाकार आणि चक्राकार दिसते. दिवाळीत रात्रीच्या अंधारात भूईचक्र नावाचा फटाका पेटविला तर, जसे दिसते त्याप्रमाणे, ४०० अब्ज तारका पसरलेल्या आहेत. श्वेतमार्ग–आकाशगंगेला समोरून पाहिले, तर, कसे दिसते? एक आडवा पट्टा दिसतो. **आकृती क्रमांक ६१(अ) व आकृती क्रमांक ६१(ब)** मध्ये श्वेतमार्ग–आकाशगंगेचे समोरून आणि वरून पाहिलेले दृश्य दाखविलेले आहे.






आकृती क्रमांक ६१(अ) – श्वेतमार्ग आकाशगंगा समोरून अशी दिसते




आकृती क्रमांक ६१(ब) – श्वेतमार्ग आकाशगंगा वरून अशी दिसते

श्वेतमार्ग–आकाशगंगेची लांबी, रुंदी आणि जाडी यावर विचार करू. त्यासाठी, आपल्याला प्रथम अंतर मोजण्याचे सर्वात मोठे परिमाण 'प्रकाशवर्ष' हे समजून घ्यावे लागेल. एक प्रकाश वर्ष म्हणजे किती किलोमीटर? प्रकाश एका क्षणात ३,००,००० कि.मी. अंतर एवढ्या गतीने प्रवास करतो. याप्रमाणे, एका वर्षात प्रकाश जेवढे अंतर जाईल, तेवढ्या अंतरास एक प्रकाशवर्ष असे म्हणतात. एका मिनिटात ६० सेकंद. एका तासात ३६०० सेकंद. एका दिवसात २४×३,६००=८६,४०० सेकंद. अशाप्रकारे, एका वर्षात ८६,४००×३६५=३,१५,३६,००० एवढे सेकंद असतात. सेकंदाला ३,००,००० कि.मी. या गतीने एका वर्षात प्रकाश किती अंतर प्रवास करील? ३,१५,३६,००० × ३,००,००० =९४६०.८ अब्ज कि.मी. याचा अर्थ एक प्रकाशवर्ष बरोबर ९४६०.८ अब्ज कि.मी.

श्वेतमार्ग–आकाशगंगा गोलाकार आहे. या आकाश गंगेची लांबी एक लाख प्रकाशवर्ष आहे. या आकाशगंगेची रुंदीही एक लाख प्रकाशवर्ष आहे. म्हणजेच, आकाशगंगेचा व्यास एक लाख प्रकाशवर्ष आहे. समजा, एखादा मनुष्य प्रकाशाच्या गतीने प्रवास करू लागला, तर त्याला आकाशगंगेच्या एका टोकापासून ते शेवटच्या टोकापर्यंत जाण्यास एक लाख वर्ष लागतील. एक लाख प्रकाशवर्ष=९.४६०८×१०$^{१७}$ कि.मी.

आकाशगंगेला समोरून पाहिल्यास तिची जाडी लक्षात येते. आकाशगंगेची जाडी दोन हजार प्रकाशवर्ष इतकी मोठी आहे. एवढ्या प्रचंड आकाशगंगेत आपली सूर्यमाला एका बाजूला आहे व ती एका टिंबाच्या रूपाने आकृतीमध्ये दाखवलेली आहे. या सूर्यमालेत कुठेतरी पृथ्वी आहे, पृथ्वीवर भारत देश, भारत देशात महाराष्ट्र आणि महाराष्ट्रात पुणे व पुण्यात एका ठिकाणी आळंदी व आळंदीत एका ठिकाणी असलेल्या चैतन्य आश्रमात आपण आहोत.

सूर्य हा सूर्यमालेसह श्वेतमार्ग–आकाशगंगेच्या केंद्रबिंदूभोवती फिरत असतो. सूर्याला श्वेतमार्ग–आकाशगंगेभोवती एक फेरा पूर्ण करण्यास ०.२२६ अब्ज वर्ष लागतात. सूर्यमाला ही श्वेतमार्ग–आकाशगंगेच्या केंद्रबिंदूपासून ३०,००० प्रकाश वर्ष अंतरावर आहे.

**आकृती क्रमांक ६२** मध्ये श्वेतमार्ग–आकाशगंगेचे खगोलशास्त्रज्ञांनी काढलेले चित्र दाखविलेले आहे.





आकृती क्रमांक ६२ – श्वेतमार्ग आकाशगंगेचे खगोलशास्त्रज्ञांनी काढलेले चित्र

आतापर्यंत, आपण श्वेतमार्ग–आकाशगंगेचा विस्तार किती प्रचंड आहे ते पाहिले. ब्रह्मांण्डात अशा असंख्य आकाशगंगा आहेत. याशिवाय ब्रह्मलोक, तपोलोक यांसारखी असंख्य भुवनेही आहेत. हे सर्व मिळून ईश्वराचा स्थूलदेह आहे. बायको, मुले, वित्त या क्षुद्र संसारालाच घेऊन मनुष्य नाचत असतो. सृष्टीचा पसारा कसा अचिंत्य आहे हे कळून मनुष्याने देह आणि देहादिकांचा अहंकार सोडावा.

*****

## चिंतन क्रमांक – १९
## सृष्टीचा स्थिती–प्रलय कालावधी

सृष्टी म्हटली की देश, काल आणि पदार्थ येतातच. आतापर्यंत आपण देशाची व्याप्ती किती अफाट आहे ते पाहिले. आता, 'काल' म्हणजे 'काळ' कसा आहे यावर विचार करू. भूत, वर्तमान आणि भविष्य अशी काळाची विभागणी आपल्याला माहीत आहे. व्यवहारात मनुष्य काळाला सत्यत्व देतो. 'अमूक वेळेत कार्यालयात पोहचायचेच आहे', 'गुरूवारी माझा उपवास आहे', 'अमूक दिवशी अमूक तीर्थक्षेत्री गेलो तर पुण्य मिळेल', 'मी या वर्षी अमूक काम करीन' इत्यादी व्यवहार साध्य करण्यासाठी दिवस, महिना, वर्ष अशी काळाची विभागणी मनुष्याने केलेली आहे.

साधारणपणे, मनुष्य दिवसा जागतो व रात्री झोपतो. दिवसभरात त्याला व्यावहारिक पदार्थाची प्रतिती असते व तो शरीराच्या सहाय्याने काही ना काही क्रिया करीत राहतो. रात्री गाढ झोपेत व्यावहारिक पदार्थांची प्रतिती नसते. गाढ झोपेत स्वप्न आणि जागृतीतील पदार्थ नसतात. संपूर्ण सृष्टीचे व्यक्त–अव्यक्त होणे याप्रकारे आहे. सृष्टी काही काळ व्यक्त रूपात असते व काही काळ अव्यक्त रूपात असते. हा 'काही काळ' म्हणजे 'एक कल्प'. कल्प हे काळ मोजण्याचे मोठे परिमाण आहे. व्यक्त सृष्टी एक कल्पापर्यंत, नंतर महाप्रलय एक कल्पापर्यंत, परत सृष्टी व्यक्त रूपात एक कल्पापर्यंत, अशी साखळी आहे.

प्रमाण –

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम्।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ।।७।। अध्याय ९**

–श्रीमद्‌भगवद्‌गीता

हे अर्जुना! कल्प संपल्यावर प्रलयसमयी सर्व भूते सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म म्हणजे मायारूपाने राहतात. नवीन कल्प सुरू होताच मी सर्व जीवांना परत व्यक्तरूपात आणतो. **आकृती क्रमांक ६३** मध्ये अज्ञानी जीवासाठी सृष्टीचा प्रवाह अनादी अनंत आहे हे दाखविलेले आहे.

ब्रह्मदेव, विष्णू, शंकर ह्या सृष्टी अभिमानी देवता आहेत. ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे एक कल्प आणि ब्रह्मदेवाची एक रात्र म्हणजेही एक कल्प एवढा कालावधी असतो. अर्थात, ब्रह्मदेवाच्या एका दिवसापर्यंत सृष्टी व्यक्त रूपात असते व ब्रह्मदेवाच्या एका रात्रीपर्यंत सृष्टीचा महाप्रलय काळ असतो. एक दिवस एक रात्र मिळून २ कल्प. ब्रह्मदेवाचे ३० संपूर्ण दिवस म्हणजेच ६० कल्प. म्हणजे ब्रह्मदेवाचा एक महिना. ब्रह्मदेवाचे १२ महिने,

म्हणजेच ३६० दिवस म्हणजे ब्रह्मदेवाचे १ वर्ष. ब्रह्मदेवाचे आयुष्य १०० वर्षे असते.


|← १ कल्प →|← १ कल्प →|← १ कल्प →|← १ कल्प →|← १ कल्प →|← १ कल्प →|




|← ब्रह्मदेवाचा एक दिवस →|

आकृती क्रमांक ६३ – अज्ञानी जीवासाठी सृष्टीचा प्रवाह अनादी अनंत आहे

पृथ्वीवर ज्याला आपण 'एक वर्ष' किंवा 'एक सौर वर्ष' म्हणतो त्या कालगणनेच्या रूपात ब्रह्मदेवाचा दिवस, महिना, वर्ष आणि संपूर्ण आयुष्य खालील प्रमाणे –

१) ब्रह्मदेवाचा एक दिवस = १ कल्प = पृथ्वीवरील ४.३२ अब्ज वर्ष
२) ब्रह्मदेवाची एक रात्र = १ कल्प = पृथ्वीवरील ४.३२ अब्ज वर्ष
३) ब्रह्मदेवाचा एक महिना = ब्रह्मदेवाचे ३० संपूर्ण दिवस = ६० कल्प
= पृथ्वीवरील २५९.२ अब्ज वर्ष
४) ब्रह्मदेवाचे एक वर्ष = ब्रह्मदेवाचे १२ महिने
= पृथ्वीवरील ३.११०४ महापद्म वर्ष
५) ब्रह्मदेवाचे शंभर वर्ष = पृथ्वीवरील ३११.०४ महापद्म वर्ष

(१ अब्ज वर्ष = $१०^{९}$, १ महापद्म वर्ष = $१०^{१२}$)

आता, १ कल्प = ४.३२ अब्ज वर्ष. हे गणित कसे ते बघू. कृत(सत्य), त्रेता, द्वापर, कली या चार युगांना मिळून एक महायुग असे म्हणतात. एका महायुगात किती वर्ष ? यासाठी चारही युगांच्या काळाची बेरीज करावी लागेल.

कृतयुग = पृथ्वीवरील १७,२८,००० वर्ष
त्रेतायुग = पृथ्वीवरील १२,९६,००० वर्ष
द्वापरयुग = पृथ्वीवरील ८,६४,००० वर्ष
कलीयुग = पृथ्वीवरील ४,३२,००० वर्ष

त्यांची बेरीज केली, तर, १ महायुग = ४३,२०,००० वर्ष हे **आकृती क्रमांक ६४** मध्ये दाखविलेले आहे. एक हजार महायुग मिळून एक कल्प.




आकृती क्रमांक ६४ – चार युग मिळून एक महायुग

ब्रह्मदेवाचा एक दिवस = १ कल्प = १००० महायुग= ४.३२ अब्ज वर्ष. हे आकृती क्रमांक ६५ मध्ये दाखविलेलेआहे.




आकृती क्रमांक ६५ – १ कल्प बरोबर १००० महायुग

आता 'मन्वंतर' म्हणजे काय ते पाहू. एका कल्पात म्हणजेच १००० महायुगात १४ मन्वंतर असतात. प्रत्येक मन्वंतराच्या अधिपतीला 'मनू' म्हणतात. या चौदा मनूंची क्रमवार नावे पुढीलप्रमाणे १) स्वयंभू मनू २) स्वारोचिष मनू ३) उत्तम मनू ४) तामस मनू ५) रैवत मनू ६) चाक्षुष मनू ७) वैवस्वत मनू ८) सावर्णि मनू ९) दक्ष सावर्णि मनू १०) ब्रह्म सावर्णि मनू ११) धर्म सावर्णि मनू १२) रुद्र सावर्णि मनू १३) रौत्य मनू १४) मौत्यक मनू

एक मनू म्हणजे एक मन्वंतर = ७१ महायुगे = ३०,६७,२०,००० वर्ष.

अशाप्रकारे, एक कल्पात १००० महायुगे असतात. १००० महायुगांतर्गत १४ मनू असतात. प्रत्येक मन्वंतरात ७१ महायुगे असतात.

एका कल्पात १ आदी–संधिकाल, १४ मन्वंतर व १४ संधिकाल असतात. संधिकालात आंशिक प्रलय झालेला असतो. प्रत्येक मन्वंतरानंतर एक संधिकाल असतो.

कल्पाच्या आरंभी आदी–संधिकाल असतो. याचा कालावधी १७,२८,००० वर्ष असतो. त्यानंतर पहिले मन्वंतर आणि मग पहिला संधिकाल असतो. हा संधिकालही १७,२८,००० वर्ष असतो. त्यानंतर दुसरे मन्वंतर दुसरा संधिकाल. त्यानंतर तिसरे मन्वंतर तिसरा संधिकाल. याप्रकारे चौदावे मन्वंतर आणि व चौदावा संधिकाल पर्यंत एक कल्प

असते. यासाठी आपण आकृती क्रमांक ६६ व ६७ पाहू.






आकृती क्रमांक ६६ – १ कल्प बरोबर १४ मन्वंतर अधिक १५ संधिकाल




आकृती क्रमांक ६७ – १४ मन्वंतर अधिक १५ संधिकाल

ब्रह्मदेवाचा १ संपूर्ण दिवस (म्हणजेच १ दिवस, १ रात्र) = २ कल्प. असे ब्रह्मदेवाचे ३० संपूर्ण दिवस म्हणजे ब्रह्मदेवाचा एक महिना.

ब्रह्मदेवाच्या ३० संपूर्ण दिवसांची नावे क्रमानुसार पुढीलप्रमाणे –

१) श्वेतवाराह कल्प २) नील लोहित कल्प ३) वामदेव कल्प ४) गाथांतर कल्प ५) रौरव कल्प ६) प्राण कल्प ७) वृहत्कल्प ८) कंदर्प कल्प ९) सत्य कल्प १०) ईशान कल्प ११) ध्यान कल्प १२) सारस्वत कल्प १३) उदान कल्प १४) गारूड कल्प १५) कौर्म कल्प १६) नारसिंह कल्प १७) समाधी कल्प १८) आग्नेय कल्प १९) विष्णुज कल्प २०) सौर कल्प २१) सोम कल्प २२) भवन कल्प २३) सुप्तमाली कल्प २४) वैकुंठ कल्प २५) अचीकि कल्प २६) वाल्मीकि कल्प २७) वैराज कल्प २८) गौरी कल्प २९) माहेश्वर कल्प ३०) पितृ कल्प

ब्रह्मदेवाचे आयुष्य म्हणजे ब्रह्मदेवाचे शंभर वर्ष. ब्रह्मदेवाच्या शंभर वर्षांना मिळून एक महाकल्प म्हणतात. एका महाकल्पाचा कालावधी म्हणजे पृथ्वीवरील ३११.०४ महापद्म वर्षे. हे आकृती क्रमांक ६८ मध्ये दाखविलेले आहे.

१ महाकल्प

७२००० कल्प

३११.०४ महापद्म वर्ष

आकृती क्रमांक ६८ – ब्रह्मदेवाचे आयुष्य एक महाकल्प

आतापर्यंत किती ब्रह्मदेव आणि किती महाकल्प होऊन गेले हे सांगताच येत नाही.

सृष्टी अनादी आहे. सध्याच्या महाकल्पाचा किती काळ गेला आहे आणि सध्या आपण कोणत्या कल्पात आहोत ?

सध्याचा जो महाकल्प आहे, त्याचा ५० टक्के काळ व्यतीत झालेला आहे. म्हणजेच, ब्रह्मदेवाच्या १०० वर्ष आयुष्यापैकी ५० वर्षे लोटली आहेत. आपण ब्रह्मदेवाच्या ५१ वर्षाच्या पहिल्या दिवसामध्ये म्हणजे श्वेतवाराह कल्पात आहोत. एका कल्पात १४ मन्वंतरे असतात. या श्वेतवाराह कल्पातील ६ मन्वंतरे उलटली असून आपण ७ व्या मन्वंतरात, म्हणजे वैवस्वत मन्वंतरात आहोत. प्रत्येक मन्वंतरात ७१ महायुगे असतात. वैवस्वत मन्वंतरातील २७ महायुगे उलटली असून आपण २८ व्या महायुगात आहोत. या २८ व्या महायुगातील कृत (सत्य), त्रेता, द्वापर ही युगे उलटली असून, आपण सध्या कलीयुगात आहोत. सध्याचे कलीयुग सुरू होवून ५,१२३ वर्षे झालेली आहेत.

सध्याचा महाकल्प सुरू होऊन आतापर्यंत किती वर्षे झालीत त्याचे गणित पुढीलप्रमाणे–

ब्रह्मदेवाचे १ वर्ष = पृथ्वीवरील ३.११०४ महापद्म वर्ष

ब्रह्मदेवाचे ५० वर्ष = ५०×३.११०४ महापद्म वर्ष

= १५५.५२ महापद्म वर्ष

सध्याच्या कल्पातील ६ मन्वंतर आणि ७ संधिकाल मिळून

(६×७१×४.३२×१०$^{६}$ + ७×१.७२८×१०$^{६}$) = १.८५२ अब्ज वर्ष.

७ व्या मन्वंतरातील २७ युगे उलटली आहेत.

म्हणजे, २७×४३,२०,००० = ०.११६६४ अब्ज वर्ष.

२८ व्या महायुगातील कृत (सत्य), त्रेता, द्वापर युगे उलटली आहेत.

१.७२८×१०$^{६}$ + १.२९६×१०$^{६}$ + ८,६४,००० = ३.८८८×१०$^{६}$ वर्ष.

सध्याच्या कलीयुगातील ५,१२३ वर्षे झाली आहेत.

अशाप्रकारे सध्याच्या महाकल्पात आतापर्यंत –

१५५.५२×१०$^{१२}$+१.९७३×१०$^{९}$+०.१२०५३३११३×१०$^{९}$

= (१५५.५२ महापद्म + २.०९३५३३ अब्ज) वर्षे झाली आहेत.

या २८ व्या महायुगामध्ये १८ फेब्रुवारी इसवी सन पूर्व ३१०२ या दिवशी श्रीकृष्णलीला समाप्त झाली. या दिवशी द्वापर युग संपले व कलीयुग सुरू झाले. इ. स. पूर्व ३१०२ ते इ. स. ०००० हे ३१०२ वर्षे होतात. सध्या इ. स. २०२१ सुरू आहे. म्हणून ३१०२ + २०२१ = ५१२३ वर्षे सध्याच्या कलीयुगात उलटली आहेत. हे आकृती क्रमांक ६९ मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ६९ – सध्याच्या कलीयुगात ५१२३ वर्ष उलटली आहेत

अशाप्रकारे, काळ किती मोठा आहे हे आपण पाहिले. ज्याप्रमाणे, देश मिथ्या आहे, त्याप्रमाणे, काळही मिथ्या आहे हे साधकाने लक्षात घ्यावे. सृष्टीतील असंख्य पदार्थ मिथ्या आहेत.

प्रमाण –

नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप ।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ।।४०।। अध्याय १०

– श्रीमद्भगवद्गीता

अर्जुना! ईश्वराच्या दिव्य विभूतींची मर्यादा कोणालाही सांगणे किंवा जाणणे शक्य नाही, त्याचा अंत कोणालाही लागलेला नाही. त्यामुळे पूर्णपणे कोणालाही तो सांगता येत नाही. हा विभूतींचा विस्तार मी तुला थोडक्यात सांगितला आहे.

देश–काल–पदार्थात्मक जगताचे ओझरते अवलोकन आपण केले. या जगताची सामग्री काय? हे जगत् कोणापासून बनले आहे? जगत् व्यवहार चालतो कोणामुळे? जगताचे स्वरूप काय? हे जगत् ईश्वर आणि माया या दोघांपासून झालेले आहे. जगतामध्ये चैतन्याचा अंश आणि जडाचा अंश दोन्ही सोबत आहेत. अस्ति, भाती, प्रिय हे ईश्वराचे स्वरूप आणि नाम, रूप हे मायेचे स्वरूप आहे. कोणताही पदार्थ घ्या, उदाहरणार्थ – घट. घटाचा विशिष्ट आकार असतो व त्याला 'घट' हे नाव दिलेले आहे. त्याचे रूप व नाम हे मायेचे स्वरूप, तर, अस्तित्व(असणे), भातीत्व(कळणे) आणि प्रियत्व(प्रिय वाटणे) हे ईश्वराचे स्वरूप आहे.

एकटा ईश्वर जगत् उत्पन्न करू शकतो का? नाही. चैतन्याच्या अंशाने ईश्वर पूर्ण आहे. पण जगत् रूपाने अपूर्ण आहे. ईश्वर असंग आहे. त्याच्यात नानात्व नाही. त्याचप्रमाणे, एकटी मायाही जगत् उत्पन्न करू शकत नाही. माया जगत् रूपाने पूर्ण आहे. परंतु, तिला स्वतःची सत्ता नाही. माया ज्ञानहीन आहे. या कारणांमुळे ईश्वर आणि माया एकमेकांच्या सहाय्याविना जगत् उत्पन्न करू शकत नाहीत. ईश्वर–माया मिळून हे जगत् झाले आहे. 'जग मायेचे आहे' असे जरी म्हटले तरी त्यात ईश्वर अनुस्यूत असतोच. 'जग ईश्वराचे आहे' असे म्हटले तरी माया असतेच.

प्रमाण –

**हा ठाववरी वियोग भेडे। जे बाळ जगा येवढें।**
**वियालीं परी न मोडे। दोघुलेपण।।६।। प्रकरण १**

– श्रीअमृतानुभव

ईश्वर आणि माया वियोग सहन करू शकत नाहीत. ते त्यांच्यातील द्वैतपणा बिघडू देत नाहीत. म्हणजे जगत्रूपी 'तिसरा' पदार्थ सिद्ध होत नाही. कारण जगत् हे ईश्वर आणि माया यांच्यापासून वेगळे नाही. जीवांना त्यांच्या पूर्वकर्माचे फळ देण्याकरिता ईश्वर मायेचे द्वार करून सृष्टी निर्माण करतो. ईश्वर आणि माया यांच्यामुळे जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होतात. सृष्टी व्यक्त रूपात असणे हे ईश्वर आणि माया यांचे विशेषरूप आहे. प्रलयकाली ईश्वर आणि माया हे दोघे सामान्यरूपाने राहतात. ईश्वर मायेला प्रकाशन करतो आणि माया ईश्वराला व्यवहार्य करते. ईश्वराला संसारधर्म नाहीत. माया व्यवहार करते. परंतु, तो व्यवहार ती ईश्वराच्या सत्तेवर करते. राजा एका ठिकाणी बसलेला असतो. परंतु, प्रधान राज्याचे व्यवहार करतो. सत्ता राजाची असते. ईश्वर, माया, जगत् असे तीन नाहीत. जगत् निर्माण करूनही ईश्वर–माया दोघेच राहतात. जगत् हे तिसरे सिद्ध होत नाही. ईश्वर–माया मिळूनच जगत् आहे. उदाहरणार्थ – पती, पत्नी आणि त्यांचे मूल. आई–बापाला त्यांचे मूल त्यांच्यापासून वेगळे वाटत नाही. त्यांना त्यांच्या मुलाची अडचण वाटत नाही. ईश्वर आणि माया दोन्ही अनादी आहेत. म्हणून जगत्ही अनादी आहे. ईश्वर– माया–जगत् रूपक आकृती क्रमांक ७० मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ७० – जगताचे रूपक

मायेने दाखविलेल्या नानात्वाला भूलल्याने मनुष्य व्यवहारच करत राहतो. तो मायाकार्य पदार्थांना सत्य समजतो आणि त्यांच्यातच गुरफटून राहतो. जगत्, माया, ईश्वर यांच्यापैकी कशाचाच विचार त्याच्या अंतःकरणात येत नाही. कल्पानुकल्पे सुरू असलेल्या या जगताच्या प्रवाहातून नेहमीसाठी सुटण्याचा काही मार्ग आहे का ? आहे. जीवाने प्रथम द्वैत सोडावे. त्याने अशास्त्रीय द्वैत सोडावे आणि कर्म, उपासना, योग हे द्वैतही सोडावे आणि माया कल्पित आहे, हे शास्त्र आणि सद्गुरूंच्या सहाय्याने जाणावे. एक सत्य आहे आणि एक मिथ्या आहे. ईश्वर आणि माया दोन्ही पूर्ण आहेत असे म्हटले तर कोणाही मनुष्याला मोक्ष मिळणार नाही. ईश्वर आणि माया हे एकच आहेत असे म्हटले तर जगत् आणि जगत् व्यवहार होणार नाही.

प्रमाण –

जिया दोघांमाजी येखादें । विपायें उमजलें होय निदे ।
तरी घरवात गिळूनि नुसधें। काहीं ना कीं।।१४।। प्रकरण १
– श्रीअमृतानुभव

ईश्वर आणि माया दोहोंपैकी साधकाने एकाचा जरी तात्त्विक विचार पूर्ण केला, तर, तो साधक मुक्त होतो. मायेशिवाय ईश्वराचे ज्ञान होत नाही. ईश्वराशिवाय माया कळत नाही. ईश्वर आणि माया यांपैकी एक जरी तात्त्विकरूपाने कळले, तरी द्वैत खंडित होते. ईश्वराचा विचार करत गेला, तर, ब्रह्मनिश्चय होतो आणि माया मिथ्या ठरते. मायेचाच विचार करीत गेला तर माया मिथ्या आहे असा निश्चय होऊन ब्रह्मच उरते. माया–ईश्वर एकाच वेळेस झोपत नाहीत. अन्यथा जगत्व्यवहार होणारच नाही. माया जेव्हा जागी असते तेव्हा ईश्वर झोपलेला असतो. याचा अर्थ मनुष्य संसारात रमलेला असतो, तेव्हा त्याला ईश्वर–ब्रह्म

यांचा पत्ताही नसतो. साधकाच्या दृष्टीने ईश्वर जागा होणे म्हणजे ब्रह्मनिश्चय होणे. तेव्हा त्याच्यासाठी माया आणि मायाकार्य राहत नाही. साधकासाठी माया जागी असणे म्हणजे मायेचे कल्पित स्वरूप त्याला यथार्थपणे कळणे. तेव्हाही साधकाचा ब्रह्मनिश्चयच होतो. म्हणून एक तर साधकाला माया यथार्थपणे कळावी किंवा ईश्वर यथार्थपणे कळला तरी त्याची जीवन्मुक्ति सिद्ध होते.



मागे आपण जीवाच्या तीन देहांचा व तीन आभासांचा अभ्यास केला होता. कारण, सूक्ष्म, स्थूल अशी जीवाची तीन शरीरे आहेत. कूटस्थाचा प्रकाश कारणदेहात येतो, त्या चैतन्य आभासाला 'प्राज्ञ' असे म्हणतात. सूक्ष्मदेहावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'तैजस' म्हणतात. स्थूलदेहावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'विश्व' म्हणतात.

ईश्वराचेही तीन देह आणि तीन आभास आहेत. समष्टी कारणशरीर (माया), समष्टी सूक्ष्मशरीर आणि समष्टी स्थूलशरीर हे ईश्वराचे तीन देह आहेत. ब्रह्माचा प्रकाश मायेत पडतो. मायेतील ब्रह्माच्या आभासाला 'ईश्वर' म्हणतात. समष्टी सूक्ष्मदेहातील ब्रह्माच्या आभासाला 'हिरण्यगर्भ' अथवा 'सूत्रात्मा' अथवा 'प्राण' म्हणतात. समष्टी स्थूलशरीरात असलेल्या ब्रह्मचैतन्याच्या आभासाला 'विराट' किंवा 'वैश्वानर' असे म्हणतात. हे सर्व **आकृती क्रमांक ७१** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ७१ – ईश्वराचे तीन देह आणि तीन आभास

जीवाचे स्थूलशरीर पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेले आहे आणि ईश्वराचा स्थूलदेह देखील पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेला आहे. जीवाचा सूक्ष्मदेह अपंचीकृत

पंचमहाभूतांचे कार्य आहे आणि ईश्वराचा सूक्ष्मदेहही अपंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेला आहे. परंतु, एका चैतन्याचाच अन्वय जीव आणि ईश्वरामध्ये आहे. जीवाचा स्थूलदेह छोटा, ईश्वराचा स्थूलदेह मोठा आहे. म्हणून काय झाले? दोघांमध्ये एकच चैतन्य व्याप्त आहे हे महत्त्वाचे आहे.

आता, ईश्वराचे तीन देह आणि तीन आभासांमुळे सृष्टीचा महाप्रलय कसा होतो ते पाहू. कल्प संपल्यावर समष्टी स्थूलदेहाचा लय समष्टी सूक्ष्मशरीरात होतो. तेव्हा माया ईश्वराचा 'विराट' हा आभास नाहीसा करते आणि ईश्वराने मायेचा समष्टी स्थूलदेह नाहीसा केलेला असतो. समष्टी सूक्ष्मदेहाचा लय समष्टी कारणदेहात होतो म्हणजे मायेत होतो. तेव्हा मायेने ईश्वराचा 'हिरण्यगर्भ' हा आभास नाहीसा केलेला असतो आणि ईश्वराने मायेचा समष्टी सूक्ष्मदेह नाहीसा केलेला असतो. म्हणजेच माया ईश्वराचे कर्तृत्व संपुष्टात आणते व ईश्वर मायेचा व्यापकपणा नाहीसा करतो आणि ईश्वर–माया महाप्रलयकाळात सामान्यरूपाने राहतात.

आता, ईश्वराचे तीन देह आणि तीन आभासांमुळे सृष्टीची उत्पत्ती कशी होते ते बघू. नवीन कल्पाच्या आरंभी मायेतून समष्टी सूक्ष्मदेह व्यक्तरूपाला येतो, तेव्हा माया ईश्वराचा 'हिरण्यगर्भ' हा आभास व्यक्त करते व ईश्वर मायेचा समष्टी सूक्ष्मदेह व्यक्तरूपाला आणतो. समष्टी सूक्ष्मदेहातून समष्टी स्थूलदेह येतो. तेव्हा माया ईश्वराचा 'विराट' हा आभास व्यक्त करते आणि ईश्वराने मायेचा समष्टी स्थूलदेह व्यक्तरूपाला आणलेला असतो. अशाप्रकारे, उत्पत्ती काळात माया ईश्वराला कर्तृत्ववान बनविते व ईश्वर मायेला व्यापकता प्रदान करतो. सृष्टीच्या स्थिती काळात ईश्वर–माया दोघे विशेषरूपाने राहतात.

ईश्वर म्हणजे कोणी मानव आकृती असणारा किंवा शंख, चक्र, गदा, पद्म धारण करणारा, असे नसते. नुकतेच आपण ईश्वर–माया दोघे मिळून जगत् कसे चालवतात ते पाहिले. हेच सृष्टीव्यवहाराचे यथार्थ कारण आहे.

आता श्रीब्रह्मा, श्रीविष्णू, श्रीशंकर कोण आहेत? यावर विचार करू. काही जीव कल्पानुकल्पे केवळ पुण्यच करत राहतात. जेव्हा त्यांना मनुष्य देह मिळतो, ते आग्रह धरून पुण्यच करतात. ते हजारो कल्प पुण्यच करत राहतात. त्यांच्या पुण्याचा साठा प्रचंड वाढतो. त्यांच्यामध्ये मुमुक्षत्व नसते. आपले नाम–रूपात्मक अस्तित्व संपवावे, असे त्यांना वाटत नाही. हे जीव प्रगती करता करता महाकारणदेहावर सत्यत्वाने राहतात. महाकारणदेह म्हणजे माया. माया या पातळीवर असलेला जीव सृष्टीच्या पातळीवर विचार करायला लागतो. असा प्रचंड पुण्याचा साठा असलेला जीव पुढील सृष्टीत श्रीब्रह्मदेव, श्रीविष्णू अथवा श्रीशंकर होतो. हे तिघेही सृष्टीचा अभिमान धरणारे जीव आहेत. 'मी सृष्टीची उत्पत्ती करतो' असा श्रीब्रह्मदेवांचा अभिमान असतो. 'मला सृष्टीचे पालन केले पाहिजे' असा संकल्प श्रीविष्णूंचा असतो. 'सृष्टीचा प्रलय करावा' असा अभिमान श्रीशंकरांचा असतो. श्रीब्रह्मदेव ब्रह्मलोकी राहतात. श्रीविष्णूंचा वैकुंठलोक आणि श्रीशंकरांचा कैलासलोक हे त्याच पातळीचे लोक आहेत. पृथ्वीवर या तिघांचे करोडो भक्त आहेत. शेवटी ब्रह्मलोक, वैकुंठ, कैलास हे स्वर्गच

आहेत. भक्त स्वर्गात जरी पोहचला, तरी त्याला पुढे पृथ्वीवर जन्म मिळणारच. पुनरावृत्ती टळत नाही. श्रीब्रह्मदेव, श्रीविष्णू, श्रीशंकर हे तिघेही 'ब्रह्म' नाहीत. त्यांचे नाम-रूपात्मक अस्तित्व टिकून आहे. त्यांना सृष्टीविषयी वैराग्य वाटले नाही तर पुढच्या सृष्टीत परत ते त्याच पदावर राहतात. श्रीब्रह्मा, श्रीविष्णू, श्रीशंकर या प्रत्येकाचे आयुष्य ७२,००० कल्प म्हणजेच ब्रह्मदेवाचे शंभर वर्षे म्हणजेच पृथ्वीवरचे ३११.०४ महापद्म वर्षे असते.



पृथ्वीवर जीवाला जसा त्रास असतो, तसा या तिघांनाही त्रास होतो. त्यांचा व्यवहार व्यापक असतो. पृथ्वीवर जीवासमोर अनेक समस्या असतात. तसेच, ब्रह्मलोक, वैकुंठ, कैलास येथे अनेक अडचणी असतात. श्रीविष्णू वैकुंठात बसलेले आहेत. लक्ष्मी त्यांचे पाय चेपीत आहे. आता जर, श्रीविष्णूंना वाटले की पृथ्वीवर अवतार घ्यावा, तर, लक्ष्मी त्यांना जाऊ देत नाही. त्यांनी अवतार घेतला, तर, ती सुद्धा अवतार घेते. कैलासात अनेक समस्या आहेत. श्रीशंकर तपाला बसण्याची तयारी करतात, त्याचवेळेस कोणी देव त्यांच्याजवळ येऊन स्वतःची समस्या सांगतो. कधी राक्षस देवांवर हल्ला चढवितात. कधी देवा-देवांमध्येच भांडणे होतात. कधी इंद्र श्रीशंकरांकडे धावत येतो आणि म्हणतो, 'मला वाचवा! दुसरा देव माझी सत्ता घेऊ पाहतोय'. अशा समस्यांमुळे श्रीशंकर स्मशानात जाऊन बसतात. स्मशानात देव किंवा मानव येत नाहीत. त्यामुळे श्रीशंकरांना तेथे निवांतपणे बसता येते.

प्रमाण –

त्यागुनी कैलास सर्वही संपत्ती । स्मशानांत वस्ती रुद्र करी ।
कासया कारणें ब्रह्म शोधावया । आलों कोठूनियां माझा मीचि ।
तयाशीही पूर्ण नकळेची कांहीं । अद्यापी संदेहीं पडियले ।

– श्री ज्ञानदेव महाराज गाथा

स्मशानात जाऊन ते ध्यान करतात. कारण, त्यांचा स्व-स्वरूपाचा निश्चय झालेला नाही. ते 'आलो मीच माझा कोठोनिया' असा विचार करत राहतात. परंतु, 'अद्यापि संदेही पडला असे' म्हणजे अजूनही श्रीशंकरांना निःसंदेह अपरोक्ष ब्रह्मज्ञान झालेले नाही. म्हणून, ते साधना करतात.

*****

## चिंतन क्रमांक – २०
## ब्रह्मावतार आणि ईश्वरावतार

आता, ईश्वरावतार आणि ब्रह्मावतार कसे असतात? कोण आहेत? त्यांचे प्रकटीकरण कसे होते? त्यांचे कार्य कसे असते? यावर विचार करू.




आकृती क्रमांक ७२ – ब्रह्मावतार आणि ईश्वरावतार

श्रीराम, कृष्णादि दहा अवतार प्रसिद्धच आहेत. ते ईश्वराचे अवतार आहेत. ईश्वराचा आभास म्हटला की त्याच्या पाठीमागे सृष्टीव्यवहार लागलेला असतोच. ईश्वराला ब्रह्मज्ञान आहे. ईश्वराला स्व–स्वरूपाची भ्रांती नाही. परंतु, विक्षेप आहे. जगताचा व्यवहार प्राणीकर्मसापेक्ष चालावा याबद्दल ईश्वर दक्ष असतो. जीवांना त्यांच्या कर्मांची फळे देणे हा ईश्वराचा संकल्पच आहे.

कोणत्या परिस्थितीत ईश्वर पृथ्वीवर अवतार घेतो? पृथ्वीवर अनेक जीव ईश्वराच्या आभासाची उपासना करत असतात. त्यांना त्यांच्या कर्मांची फळं देण्याची वेळ आलेली असते. त्याचवेळेस पृथ्वीवर बहुसंख्य लोकांमध्ये रजोगुण, तमोगुण वाढलेला असतो. त्यांचे निर्दालन करण्याची वेळ आलेली असते. अशा वेळेस ईश्वर अवतार घेतो. पृथ्वीवर त्यांचा जन्म स्त्री–पुरुष संबंधातून होत नाही. त्यांचा अयोनिसंभव असतो. केवळ संकल्पानेच ते त्यांच्या मातेच्या गर्भात प्रवेश करतात. त्यांचा देह मायाजनित असतो. जीवाच्या देहाप्रमाणे पंचीकृत पंचमहाभूतात्मक नसतो. माया शुद्धसत्त्वगुणी असल्यामुळे षड्ऐश्वर्य अवतारांमध्ये दिसून येते. अवतारांचे स्वतःचे कोणतेही कर्म नसते आणि म्हणून त्यांच्या कर्मांच्या फलाचा प्रश्नच येत नाही. पृथ्वीवर ज्या जीवांशी त्यांचा संबंध येतो, त्या

जीवांच्या पाप–पुण्यात्मक कर्मांप्रमाणे अवतारांचा व्यवहार होतो. म्हणून, कंसाचा वध करणे, स्वतःच्या आई–वडिलांना त्यांचे राज्य परत मिळवून देणे, वृन्दावनात गोपिकांसोबत लीला करणे असे कृष्णावतारात कार्य दिसून येते. एकीकडे शबरीची उष्टी बोरं खाणे व दुसरीकडे रावणाचा वध करणे हे रामावतारात दिसून येते.



मायेला द्वार करून ईश्वर अवतार घेतो. ईश्वरावताराला माया ही उपाधी ठरलेली असते. ईश्वरावताराने मायेचा स्वीकार उपाधी म्हणून केलेला असतो. जी स्वतः वेगळी राहून, ज्याला ती असते त्याचे व इतरांचे ज्ञान करून देते, तिला 'उपाधी' असे म्हणतात. उदाहरणार्थ – काठी हातात असलेला पुरुष. काठी पुरुषाचा अविभाज्य भाग नाही. काठी पुरुषापासून वेगळी राहून, त्या पुरुषाचे व इतर काठी नसलेल्या पुरुषांचे ज्ञान करून देते. त्या पुरुषाला इतर पुरुषांपासून वेगळे करून दाखविते.

उपधेय + उपाधी = उपहित
पुरुष + काठी = काठीवान पुरुष

पुरुष उपधेय असून काठी उपाधी आहे. उपाधी आपले धर्म उपधेयावर चालवत नाही. काठी तिचे धर्म पुरुषावर चालवत नाही. तात्पर्य – पुरुष आणि काठी यांच्यामध्ये संसर्ग असतो, तादात्म्य नसते.

त्याप्रमाणे, ईश्वरावतारास माया ही संसर्गरूपाने असते, तादात्म्यरूपाने नसते. शुद्ध ब्रह्म हे उपधेय, माया ही उपाधी आणि ईश्वर हे उपहित असते.

उपधेय + उपाधी = उपहित
शुद्ध ब्रह्म + माया = ईश्वर

माया आपले धर्म शुद्ध ब्रह्मावर चालवत नाही.

माया संसर्ग ठरून ईश्वरावतार कार्य करतात. त्या कार्याचा संबंध अवतारांना लागत नाही, कारण ते कार्य जीवांच्या पाप–पुण्यावर अवलंबून असते. ईश्वरावतार कर्ता असूनही अकर्ता ठरतात. 'जगत् व्यवहाराबद्दल दक्षता' हे त्यांच्यात प्रकर्षाने दिसून येते.

श्रीराम, कृष्णादिंच्या दिव्य शरीराचे दर्शन होणे म्हणजे ब्रह्मज्ञान नव्हे. उपासकाला अवताराच्या देहाचे दर्शन झाले, तर, त्यास सगुणसाक्षात्कार म्हणतात. सगुणसाक्षात्कार म्हणजे ब्राह्मी स्थिती नव्हे. ज्ञानमार्गातील ज्या साधकाला ईश्वरादि सर्व जगताचा दृढ मिथ्यत्वाने निश्चय होतो तोच ब्रह्मरूप होतो.

ईश्वरावतार हे सर्वज्ञ असतात. ते सर्वशक्तिमानही असतात. त्यांनी जसा संकल्प केला असेल, तसे लगेच सहजपणे होते. श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत करंगळीवर सहजपणे उचलला. जयद्रथ वधाच्या वेळेस श्रीकृष्णाने सूर्याला सुदर्शन चक्राने लीलया झाकले.

योग्यांचे काही चमत्कार पाहून सामान्य माणसांना योगी म्हणजे ईश्वरावतार वाटतात. योग्याला अष्टमहासिद्धी जरी प्राप्त असल्या, तरी ईश्वराच्या मानाने तो अतिशय कमी शक्तिवान असतो. योग्याला अलौकिक कार्य करण्यासाठी संकल्प, अहंकार आणि योगिक शक्तीचा वापर करावा लागतो. जे कमवलेले पुण्य असते त्याचा त्या कार्यासाठी ऱ्हास होतो. योग्याची शक्ती क्षीण होत जाते. शिवाय, योगी हा जन्म–मरण बंधनमुक्त नसतो.

श्रीराम, कृष्णादिक यांचे कार्य सत्यत्वाने नसते, नाटकातील नटाप्रमाणे असते. दहा अवतारांना स्व–स्वरूपाची भ्रांती कधीही नसते. जन्मापासूनच त्यांना स्व–स्वरूपाचे ज्ञान असते. त्यांना सद्गुरूंकडून उपदेश घेण्याची आवश्यकताच नसते. श्रीकृष्णाचे सांदीपनी मुनींकडे अध्ययनास जाणे किंवा श्रीरामाने वसिष्ठ मुनींकडून तत्त्वबोध श्रवण करणे हे त्यांनी केवळ लोकांना धडा घालून देण्यासाठी शास्त्रमर्यादा पाळली आहे.

लीला समाप्त झाल्यानंतर ईश्वरावतारांचा देह कोणालाही सापडत नाही. ते देहाला परत मायेत लीन करतात. पृथ्वीवरून त्यांचा देह अदृश्य होतो. देह अदृश्य करण्यासाठी ते कोणते ना कोणते निमित्त करतात. श्रीकृष्णाला एका पारध्याचा बाण लागणे किंवा श्रीरामाला काळाने लीला संवरण (आटोपणे) करण्यास सांगणे हे केवळ निमित्त होते.

ईश्वरावतारांना माया ही उपाधी असून ते जगत् व्यवहाराला प्राधान्य देतात. जगत् व्यवहाराला प्राधान्य देणे ही काही आदर्श गोष्ट नाही. पृथ्वीवरील जीवांना केवळ परमार्थाचाच बोध मिळून ते जीवन्मुक्त होणे हीच एकमेव आदर्श गोष्ट आहे. मायाकार्य प्रपंचात फेरफार करणे हे गौण आहे. जगत् व्यवहाराविषयी दक्षता ही आदर्श गोष्ट नाही.

आता, ब्रह्मावतार म्हणजे काय? कोण ब्रह्मावतार आहेत? ब्रह्मावतारांचे प्रकटीकरण, कार्य आणि लीला संवरण कसे असते? यांवर विचार करू. सर्वप्रथम ब्रह्मावतार कोण? हे बघू. भगवान श्रीव्यास, भगवान श्री आद्य शंकराचार्य, भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज, भगवान श्रीतुकाराम महाराज, भगवान श्रीएकनाथ महाराज, भगवान श्रीनिवृत्तीनाथ, भगवान श्रीनामदेवराय इत्यादी काही ब्रह्मावतारांची उदाहरणे आहेत.

ब्रह्मावतार देखील मायेला द्वार करून देहरूपाने प्रकट होतात. ज्या अर्थी ७०० वर्षांपूर्वी भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांचा देह दिसला होता. त्यावरून पाहणाऱ्या जीवांच्या दृष्टीने माया मानावी लागते. ब्रह्मावतार मायेचा स्वीकार 'उपलक्षण' म्हणून करतात. ते मायेचा स्वीकार 'उपाधी' म्हणून करत नाहीत.

उपलक्षण म्हणजे काय? आपण एक दृष्टांत पाहू. यज्ञदत्त नावाचा मनुष्य देवदत्त नावाच्या मनुष्याचे घर शोधत होता. एक मनुष्य यज्ञदत्ताला म्हणाला, 'ते तिकडे बघा, ज्या घरावर तुम्हांला कावळा बसलेला दिसतोय, ते देवदत्ताचे घर आहे'. यज्ञदत्ताने त्या दिशेने पाहिले. एका घरावर त्याला कावळा बसलेला दिसला. यज्ञदत्ताला देवदत्ताचे घर कोणते हे कळले. तो देवदत्ताच्या घराच्या दिशेने चालू लागला. तेवढ्यात देवदत्ताच्या घरावरील कावळा उडून गेला. परंतु, यज्ञदत्तावर त्याचा काडीमात्र परिणाम झाला नाही. कारण त्याने पूर्वीच, 'कावळा बसलेले ते देवदत्ताचे घर' हे जाणलेले होते. देवदत्ताचे घर जाणल्यावर कावळा राहो

अथवा उडून जावो फरक पडत नाही. दृष्टांतामधील 'कावळा' म्हणजे 'उपलक्षण', 'देवदत्ताचे घर' हे 'उपलक्ष्य' आणि 'कावळा बसलेले देवदत्ताचे घर' म्हणजे 'उपलक्षित'.



| | | | | |
|---|---|---|---|---|
| उपलक्ष्य | + | उपलक्षण | = | उपलक्षित |
| देवदत्ताचे घर | + | कावळा | = | कावळा बसलेले देवदत्ताचे घर |

जे कधी असते कधी नसते, कार्यापासून वेगळे राहून जे कार्याला इतरांपासून वेगळे दाखवते त्यास उपलक्षण म्हणतात. कावळा हा जरी देवदत्ताच्या घरावर बसलेला आहे, तरी, तो घरापासून वेगळा आहे. कावळा हा देवदत्ताच्या घराला इतर कावळा न बसलेल्या घरांपासून वेगळा करून दाखवितो. कावळा कधी असतो, कधी नसतो. तात्पर्य– एकदा का देवदत्ताचे घर लक्षात आले की कावळ्याला महत्त्वच नाही. तो उडून गेला तरी चालते, नाही गेला तरी चालते.

ब्रह्मावतारांनी मायेचा स्वीकार उपलक्षण म्हणून केलेला असतो. उपलक्षण जावो किंवा राहो फरक पडत नाही. माया जावो किंवा राहो फरक पडत नाही. ते मायेला किंमतच देत नाहीत. मानायचीच असेल, तर, नाममात्र किंमत देतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| उपलक्ष्य | + | उपलक्षण | = | उपलक्षित |
| शुद्ध ब्रह्म | + | माया | = | सापेक्ष ब्रह्म |

ब्रह्मावतार हे सापेक्ष ब्रह्मच असतात. जणू काही ब्रह्मालाच श्रीज्ञानेश्वर महाराजांचा, श्री आद्य शंकराचार्यांचा आकार आलेला होता. ते माया आणि मायाकार्याला किंमतच देत नाहीत. 'तुम्ही संसार नीट करा' किंवा 'जगत्व्यवहार नीट चालला पाहिजे' असा कोणताही उपदेश ते सत्यत्वाने देत नाहीत. ते केवळ ब्रह्मच गातात. ते लोकांना केवळ परमार्थाचाच बोध देतात. ब्रह्मावतारांना 'सापेक्षिताने प्रकाशित' असेही म्हणतात. माया त्यांच्यासाठी नावापुरतीच असते. म्हणून, ब्रह्मावतार साक्षात ब्रह्मच असतात. मुमुक्षुंना ब्रह्माचा बोध प्रदान करणे हेच त्यांच्या अवतारकार्यात प्रामुख्याने दिसून येते.

ब्रह्मावतारांचे पृथ्वीवर प्रकटीकरण अयोनिसंभव असते. ते मायेला किंमत देत नसल्यामुळे त्यांच्यात षडैश्वर्य प्रकट होईलच असे नाही. सहसा ते सामान्यरूपाने राहतात. श्रीज्ञानेश्वर महाराज व श्री आद्य शंकराचार्य यांनी भिक्षावृत्तीचा अवलंब केला होता. त्यांना स्वतःचे कोणतेही कर्म अथवा कर्मफल नसते. ब्रह्मावतारांचे आगमन केवळ साधकांच्या निष्काम पुण्याला फळ देण्यासाठी असते. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांचा अवतार १४५० वर्षे वय असलेल्या श्रेष्ठ श्रीचांगदेव योगींच्या उद्धारासाठी प्रामुख्याने झाला होता. ब्रह्मावतारांना स्व–स्वरूपाची भ्रांती कधीही नसते. ब्रह्मावतार हे 'कोणाचा नाश' करण्यासाठी अवतार घेत नाहीत. मायाकार्यात सहसा ते फेरफार करत नाहीत. ब्रह्मावतारही सर्वज्ञ

असतात. ते सर्वशक्तिमानही असतात. त्यांनी जसा संकल्प केला असेल, ते लगेच सहजपणे होते. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांनी सहजच भिंत चालविली, रेड्यामुखी वेद वदविले.

लीला समाप्त झाल्यावर ब्रह्मावतारांचा देह कोणाच्याही हाती लागत नाही. ते देहाला मायेत परत लीन करतात. पृथ्वीवरून त्यांचा देह अदृश्य होतो. भुयारात समाधीसाठी प्रवेश करण्याचे निमित्त करून भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांचा देह त्यांनी अदृश्य केला. केदारनाथ पर्वताच्या पुढे भगवान श्री आद्य शंकराचार्य एकटेच चालत गेले व अदृश्य झाले.

ब्रह्मवतार हे ईश्वरावतारांप्रमाणे ठराविक कालावधी नंतर, परत परत प्रकट होत नाहीत. ईश्वरावतारांपैकी या त्रेतायुगात श्रीरामाचा अवतार व द्वापरयुगात श्रीकृष्णाचा अवतार झाला. पुढील त्रेतायुगात श्रीराम व द्वापरयुगात परत श्रीकृष्ण यांचा अवतार होईल.

अवतारांच्या विषयाचा उपसंहार करताना आपण जीव आणि अवतार यांच्यातील फरक **कोष्टक क्रमांक ५** मधून जाणून घेऊ.

| निकष | जीव | ईश्वरावतार आणि ब्रह्मावतार |
|---|---|---|
| कर्म | पूर्वीच्या पाप-पुण्यात्मक कर्मांचे फळ पुढच्या जन्मी भोगावे लागते | स्वतःचे कर्म नसते |
| देह | मलिन सत्त्वगुण प्रधान अविद्याकल्पित | शुद्ध सत्त्वगुण प्रधान मायाकल्पित |
| ज्ञान | व्यवहार आणि परमार्थाचे ज्ञान फार कमी (अल्पज्ञ) | सर्वज्ञ |
| स्थिती | अज्ञाननिवृत्तीसाठी शास्त्र आणि सद्गुरूंच्या कृपेची आवश्यकता असते | सदैव ब्रह्मस्थिती |
| शक्ति | अल्प शक्तिमान | सर्व शक्तिमान |
| व्यवहार | सत्यत्वाने व्यवहार होऊन सुख-दुःख भोगतात | मिथ्यत्वाने नाटकातल्या नटाप्रमाणे |
| देहनाश | मृत्यूनंतर देह दिसतो | अवतार कार्य समाप्त झाल्यावर देह अदृश्य होतो |

कोष्टक क्रमांक ५ – जीव आणि अवतार

समाजामध्ये काही परमार्थ सांगणाऱ्या तथाकथित आचार्यांभोवती प्रचंड गर्दी दिसते. त्यांचे लाखो अनुयायी असतात. हे आचार्य स्वत:ला 'अवतार' म्हणवून घेतात. प्रत्यक्षात तसे नसते. स्वत:ला अवतार मानणे हा त्यांचा भ्रम असतो. कर्म, उपासना अथवा योग या मार्गांमध्ये बरीच प्रगती केलेल्या काही साधकांमधील शक्ती वाढत जाते. त्या शक्तीच्या बळावर त्यांना प्रसिद्धी मिळते, हजारो अनुयायी मिळतात. त्यामुळे, 'लोकांच्या उध्दारासाठी माझा जन्म झालेला आहे' असा भ्रम त्यांना होतो. प्रत्यक्षात ते स्वतः साधकच असतात. उपासनामार्ग किंवा योगमार्गात प्रगती असलेल्या काही साधकांमध्ये शक्ती काही अंशात प्रकट होते. त्यांचे प्रशंसक त्यांच्याभोवती जमतात. हे साधक लोकांसमोर 'मी श्रीरामाचा अंश अवतार आहे' किंवा 'जो कृष्ण होता, तोच मी आहे' अशी वल्गना ते लोकांसमोर करतात. त्यांचा स्वत:चाच उद्धार झालेला नसतो. बहुतेकांना ब्रह्मज्ञानाबद्दल माहितीच नसते. माहिती असली तरी त्यास ते महत्त्व देत नाहीत. भ्रमामुळे स्वत:ला अवतार समजणे हे 'प्रतिईश्वरभाव' तयार झाल्यामुळे होते. हे साधक स्वत:ला भ्रमाने सर्वशक्ति, सर्वज्ञ आणि लोकांचे उध्दारकर्ता मानतात. त्यांची अविद्या निवृत्त झालेली नसते. त्यामुळे या साधकांचे जन्ममरण चक्र कायम राहते.

*****

## चिंतन क्रमांक – २१
## वेदांतदर्शनाची मूलतत्त्वे

आता आपण अद्वैत वेदांताची मूलतत्त्वे, विवर्त आणि कार्य व कारण यांची एकता यांवर विचार करणार आहोत.

भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी दहा उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि श्रीमद्‌भगवद्गीतेवर भाष्य रचून मुमुक्षुंवर अनंत उपकार केले आहेत. जन्माभाव मोक्ष कोणत्या मार्गाने मिळतो? त्या मार्गावर मुमुक्षुने कसे चालावे? हे त्यांनी रचलेल्या इतर अनेक प्रकरण ग्रंथामध्येही सुबोधरित्या दृष्टांतासह सुस्पष्ट केले आहे.

अपौरुषेय, परमविश्वसनीय आणि सर्वांना जीव की प्राण असावे अशा वेदांवर, अद्वैत वेदांताचे सिद्धांत आधारित आहेत. श्रुती म्हणजे वेद. जीवन्मुक्त महापुरुषांचा अनुभव व युक्ती अशा भक्कम पायांवर, वेदांतशास्त्र अनादीकाळापासून श्रीगुरु–शिष्य सांप्रदायिक पद्धतीने चालत आलेले आहे आणि पुढेही अनंतकाळ ही परंपरा सुरूच राहणार आहे.

वेदाच्या 'उपनिषद' या भागामध्ये प्रामुख्याने अद्वैत वेदांताचे प्रतिपादन आहे. वेदांतशास्त्राचा सिद्धांत औपनिषदिक आहे. ब्रह्मसूत्रांचाही आधार वेदांतशास्त्राला आहे. उपनिषदातील मंत्रांचा निश्चित योग्य अर्थ ब्रह्मसूत्रांनी केला जातो. वेदांतशास्त्राचा सिद्धांत त्यांचा स्वतःचा नसून तो शास्त्रांवर आधारित आहे, असा उल्लेख भाष्यामध्ये भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी अनेक ठिकाणी केलेला आहे.

'आत्यंतिक दुःखाच्या निवृत्तीसह परमानंद प्राप्ती' हे वेदांतशास्त्राचे प्रयोजन आहे. दुःखाचा परिचय मनुष्याला आहे. परंतु, 'आत्यंतिक दुःख' म्हणजे काय? आत्यंतिक दुःख म्हणजेच 'विषाद'. दुःख गुणिले दुःख, गुणिले दुःख असा अनंत वेळा गुणाकार केल्यानंतर जे उत्तर येईल त्याला 'आत्यंतिक दुःख' असे म्हणतात. अनंत कल्पांपासून जीव अनंत दुःखे भोगीत आला आहे. परंतु, ज्या जीवाला विषाद होतो तोच मुमुक्षु होतो. त्याचा दुःखांचा घडा पूर्ण भरलेला असतो. संप्रदायपूर्वक वेदांतशास्त्राचे अनुशीलन मुमुक्षुने केले तर, तो जीवन्मुक्त होतो. प्रत्यक्ष प्रमाणाला महत्त्व देऊन, मनुष्य पदार्थांच्या मागे लागून, 'मी कर्ता', 'मी दुःखी', 'मी पुण्यवान' असे सत्यत्वाने समजू लागला. कोणताही पदार्थ प्रिय अथवा अप्रिय नसतो. पदार्थांबद्दलच्या अनुकूल–प्रतिकूल अशा भ्रमात्मक निश्चयाने मनुष्य त्यांच्याबद्दल राग–द्वेष बाळगतो. मनुष्याचा स्थूलदेह अविद्याकल्पित आहे. आत्म्याचे ब्रह्मरूपाने सम्यग्ज्ञान हाच अविद्येच्या निवृत्तीचा उपाय असून तेच वेदांतशास्त्राच्या अनुशीलनाचे फल आहे. प्रत्यक्ष प्रमाणापेक्षा शब्द प्रमाण बलवत्तर आहे. 'वेदांत प्रतिपादन करणारे शास्त्र आणि श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ महापुरुषांची वाक्ये' केवळ यांचाच अंतर्भाव शब्द प्रमाणामध्ये होतो.

काही पदार्थांना अनुकूल मानून त्यात सुख आहे, असे मनुष्य समजतो. वैषयिक

सुख अत्यंत तुच्छ आहे. पृथ्वीवरील भौतिक पदार्थांना अनुकूल समजून जे सुख मनुष्याला वाटते, त्यापेक्षाही एकोत्तरएक श्रेष्ठ सुख आहेत. आब्रह्मस्तंभपर्यंत जीवांना होणारे विषयसुख हा खरेतर ब्रह्मानंदाचाच लेश आहे. हे विषयसुख बाह्य व आध्यात्मिक सुखसाधनांच्या अधिन असल्यामुळे, अस्थिर व सामग्रीच्या योग्यतेप्रमाणे न्यूनाधिक असते. पण, अकामहत – निष्काम श्रोत्रियाचा आनंद स्थिर व साधननिरपेक्ष असतो.

विहितानुष्ठान करणारा, तरुण, सुदृढ, सद्विद्या व सच्छिल यांनी संपन्न, पृथ्वीवर राज्य करणारा जो सार्वभौम राजा, त्याचा जेवढा आनंद असतो त्यास एक मानुष–मनुष्याचा सर्वोत्कृष्ट आनंद अर्थात एक मानुषानंद म्हणतात. त्याच्यापेक्षा शंभरपट आनंद मनुष्यगंधर्वाचा व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. गायनविद्येत पृथ्वीवर जो मनुष्य सर्वात जास्त निपुण असून, जो विशेष प्रकारचे कर्म व उपासना यांच्या योगाने गंधर्वत्वास प्राप्त होतो त्यास, मनुष्यगंधर्व म्हणतात. पृथ्वीच्या वर असणाऱ्या गंधर्वलोकातील देवगंधर्वाचा आनंद मनुष्यगंधर्वापेक्षा शंभरपट असतो व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. सृष्टीच्या आरंभी देवलोकी उत्पन्न झालेल्या गायकांना देवगंधर्व म्हणतात. त्यापेक्षा शतपट आनंद चिरकाल राहणाऱ्या लोकांचा (पितृलोक) अनुभव घेणाऱ्या पितरांना असतो व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. पितरांपेक्षा शतपट आनंद आजानजान देवांचा असतो व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. पितृलोकावर 'आजान' या नावाचा कोणी एक देवलोक आहे. त्यांत उत्पन्न झालेल्या देवांना 'आजानज देव' म्हणतात. आजानजदेवांपेक्षा शंभरपट आनंद कर्मदेवाला असतो व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. आजानज देवांच्या भोगाहूनही उत्तम भोग संपादन करावयासाठी जे केवल वैदिक अग्निहोत्रादि कर्मांचे अनुष्ठान करतात व देवांस प्राप्त होतात ते कर्मदेव होत. त्यांपेक्षा शंभरपट आनंद हविर्भाग घेणाऱ्या तेहतीस देवांना असतो व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. त्यापेक्षाही शतपट आनंद इंद्रलोकातील इंद्राला असतो व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. इंद्रापेक्षाही शंभरपट आनंद बृहस्पतीचा म्हणजे इंद्राच्या आचार्याचा आहे व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. बृहस्पतीपेक्षाही शंभरपट आनंद प्रजापतीचा आहे व निष्काम श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. प्रजापति म्हणजे विराट् पुरुष. त्रैलोक्य हेच ज्याचे शरीर आहे, असा समष्टी–व्यष्टीरूप संसारमंडलव्यापी ब्रह्मदेव हाच येथील प्रजापति आहे. प्रजापतीपेक्षा शंभरपट आनंद ब्रह्मलोकांतील–हिरण्यगर्भशरीरांतील असून निष्कामत्वाच्या आधिक्यामुळे अनुभविला जाणारा व श्रोत्रियालाच प्रत्यक्ष ज्ञात होणारा आहे.

सार्वभौमादिकांचे आनंद उत्तरोत्तर शतपट अधिक जरी असले तरी समुद्रातील एका जलबिंदूप्रमाणे ते, अखंड एकरस ब्रह्मानंदाचे–परमानंदाचे लेश–अंश आहेत. दोषदृष्टीने निष्काम श्रोत्रिय या सर्वांचा त्याग करतो व केवळ परमानंदाची अपेक्षा करतो. गंधर्वादि सर्व आपापल्या प्राप्त अवस्थेत तृप्त असतात. ते या परमपदाची अपेक्षा करीत नाहीत.
ही आनंदाची मीमांसा **आकृती क्रमांक ७३** मध्ये दाखविलेली आहे.




आकृती क्रमांक ७३ – आनंदाची मीमांसा

वेदांतशास्त्राची मूलतत्त्वे खालीलप्रमाणे आहेत.


१) एक ब्रह्मच पारमार्थिक तत्त्व आहे.

२) सृष्टी मिथ्या आहे.

३) जगताचे मूळ कारण ब्रह्म असून त्याचा निश्चय करून घेणे हे मनुष्याचे आद्य कर्तव्य आहे.

४) उपाधीमुळे भेद वाटतो, वास्तव अभेद आहे.

५) जीवाच्या ठिकाणी असलेल्या अविद्येमुळे ब्रह्म या अधिष्ठानावर संसार अध्यस्त झालेला आहे.

६) आत्म–ब्रह्मैक्य ज्ञानाने अध्यास निरास होतो.

७) अध्यास निरास म्हणजेच मोक्ष आणि मोक्ष हा कर्माने, योगाने अथवा उपासनेने प्राप्त होत नाही.

८) असा मोक्ष प्राप्त असलेल्या महापुरुषांना 'जीवन्मुक्त' म्हणतात. त्यांचे शेवटच्या जन्माचे प्रारब्ध संपले की ते विदेहमुक्त होतात.

ब्रह्मावतार किंवा श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ महापुरुष ज्या संप्रदायाचे प्रवर्तक असतात, केवळ त्या संप्रदायांनाच खऱ्या अर्थाने 'संप्रदाय' म्हणतात. अशा संप्रदायातील सद्गुरूंकडून ब्रह्मज्ञानाचा बोध उत्तम अधिकारी सत्‌शिष्याला मिळतो. असा सत्‌शिष्य सद्गुरूपदावर आरूढ होतो व त्याच्याकडे आलेल्या शिष्यांना ब्रह्मज्ञानाचा बोध देतो. अनादीकाळापासून अशी अखंड सद्गुरू–सत्‌शिष्य यांची परंपरा सुरू आहे. भगवान श्री आद्य शंकराचार्यांपासून सुरू झालेला दशनामी संप्रदाय आणि भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांचा वारकरी संप्रदाय ही संप्रदायाची दोन उदाहरणे आहेत. संप्रदायामध्ये अद्वैत वेदांताचा अंगीभावाने स्वीकार असतो व तत्संबंधी शास्त्रग्रंथांचेच अध्यापन–अध्ययन केले जाते. वेदांतशास्त्राचे फल ज्याला स्वतःच्या जीवनात प्रत्यक्ष हवे असेल, त्याने संप्रदायपूर्वक वेदांतशास्त्राचे अध्ययन करावे. सद्गुरूंची सेवा करण्यास सदा तत्पर, अंतर्बाह्य पवित्र, पुत्रेषणा, वित्तेषणा, लोकेषणेचा त्याग केलेला, दुसऱ्यांचे दोष प्रकट न करता त्यांचे सद्गुणच प्रगट करणारा, कृतज्ञ, सद्गुरूंशी द्रोह न करणारा, यम नियमात सावधान, धारणाशक्तिमान ही शिष्याची काही लक्षणे आहेत.

उत्तम अधिकारी साधकांना श्रीगुरूंच्या श्रीमुखातून ब्रह्मनिरूपण एकदाच ऐकूनही तत्काळ ब्रह्माचे अपरोक्ष ज्ञान होऊन ते कृतार्थ होतात. मंद आणि मध्यम अधिकार असलेल्या साधकांना श्रीगुरूंच्या उपदेशाने ब्रह्माचे परोक्षज्ञान होते. त्यांना पुढे मनन आणि निदिध्यास बहुकाळ करणे गरजेचे असते. पुढे त्यांचे तत् त्वम् पदार्थ शोधन पूर्णत्वास गेले की तेही कृतार्थ होतात. शब्दज्ञान, परोक्षज्ञान आणि अपरोक्षज्ञान या क्रमाने साधक सिद्ध होतो. प्रमाणगत असंभावना, प्रमेयगत असंभावना आणि प्रमातृगत विपरीत भावना असे तीन दोष परोक्षज्ञान होण्यापूर्वी असतात. यावर उपाय म्हणजे साधकाने क्रमाने श्रवण, मनन आणि निदिध्यासन करावे. परोक्षज्ञान झाले आहे अशा साधकांना कुतर्क, बुद्धीमांध्य आणि विपर्यय असे तीन दोष असू शकतात आणि त्यामुळे स्व–स्वरूपाचा निश्चय होऊ शकत नाही. सद्गुरूंचे वाक्य

ऐकल्यावर त्यावर स्वबुद्धीने भलतेच तर्क लढविणे म्हणजे कुतर्क. बुद्धी मंद असेल, तर सिद्धांत ऐकूनही कळत नाही, याला बुद्धीमांध्य म्हणतात. विपर्यय म्हणजे श्रीगुरूंच्या शब्दांचा चुकीचा अर्थ लावणे व तसे समजणे. या तीन दोषांवर उपाय म्हणजे श्रीगुरू आणि शास्त्र यांवर अनन्य श्रद्धा आणि विश्वास ठेवणे. याचा आलेख **आकृती क्रमांक ७४** मध्ये दाखविलेला आहे.




आकृती क्रमांक ७४ – कालानुसार साधकाची प्रगती

स्व–स्वरूपाचा निश्चय न होण्यास भूत, वर्तमान आणि भविष्य असे तीन प्रकारचे प्रतिबंधही साधकाला असू शकतात. नोकरी, व्यवसाय, तसेच दैनंदिन कामे करीत असताना येणाऱ्या अडचणी, आवडणारे पदार्थ खाण्याची वासना इत्यादी वर्तमान प्रतिबंधाची उदाहरणे आहेत. भूतकाळात घडलेल्या चांगल्या–वाईट घटना वारंवार आठवणे, भूतकाळी कोण्या मनुष्यावर किंवा पदार्थावर आसक्ती असेल तर त्याचे संस्कार इत्यादी उदाहरणे भूत प्रतिबंधात येतात. कळत–नकळत वर्तमानकाळी केलेल्या पाप किंवा पुण्यकर्मांमुळे भविष्यात अशा घटना घडतात की त्यामुळे ब्रह्मनिश्चय होऊ शकत नाही, यास भविष्यकाळातील प्रतिबंध म्हणतात.

स्वतःच्या घरी राहून साधना करणाऱ्या साधकाला गृहस्थाश्रमी साधक म्हणतात. त्याचा बहुतांश वेळ व्यवहार करण्यातच जातो. त्यामुळे, वेदांत विचार करण्यास कमी वेळ मिळतो. या कारणासाठी तो ब्रह्मनिष्ठ होऊ शकत नाही. अनिच्छेमुळे एखाद्या गृहस्थाश्रमीला आश्रमसंन्यास स्वीकारता येत नाही. घरातला कर्ता पुरुष मेला आणि कुटुंबाची जबाबदारी साधकावर येऊन पडली, तर, त्यामुळे त्याला ज्ञाननिष्ठ होणे कठीण होऊन बसते.

कर्मांचा त्याग करून कर्मफलांचाही त्याग करणे, याला 'संन्यास' असे म्हणतात. कर्म करत असताना केवळ कर्मफलाचाच त्याग करणे, याला 'त्याग' असे म्हणतात. आश्रमसंन्यास म्हणजे काय? जो मनुष्य त्याची बायको, मुले, सर्व संपत्ती इत्यादींचा त्याग

करून पांढरे अथवा भगवे वस्त्र धारण करून आश्रमात राहतो, त्यास आश्रमसंन्यासी असे

म्हणतात. असा साधक वेदांत विचार करण्यास बराच वेळ देऊ शकतो. शास्त्राभ्यास करण्यासही त्याला पुष्कळ वेळ मिळतो.

परंतु, आश्रमसंन्यासी होणे म्हणजे जीवन्मुक्त होणे असे नाही. सिद्ध होण्यास विद्वत्संन्यास म्हणजे फलीभूतसंन्यास होणे अनिवार्य आहे. आत्म्याचा ब्रह्मरूपाने निःसंशय दृढ अपरोक्ष निश्चय म्हणजे फलीभूतसंन्यास. फलीभूतसंन्यासानेच अध्यासाचा निरास होतो.

ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम आणि संन्यासाश्रम हे उत्तरोत्तर एकूण चार आश्रम प्रसिद्ध आहेत. एखाद्याला क्रमाने कुठल्याही आश्रमात राहता येते किंवा एक अथवा दोन आश्रम वर्जित करून एकदमच पुढील आश्रम स्वीकारता येतो. उदाहरणार्थ – एखादा ब्रह्मचर्याश्रमातून एकदमच संन्यासाश्रम स्वीकारू शकतो. मात्र, विशिष्ट आश्रमात राहणे हे त्या साधकाच्या अवस्थेवर अवलंबून असते. फलीभूतसंन्यास होण्यास आश्रमसंन्यास गरजेचाच आहे असे नाही. विद्वत्संन्यासी सिद्ध महापुरुषांना गृहादिक सोडण्याची गरज नसते.

संन्यासाची विभागणी आपण पुढील प्रकारेही करू शकतो. १) स्थूलसंन्यास, २) सूक्ष्मसंन्यास, ३) कारणसंन्यास आणि ४) महाकारणसंन्यास. घरामध्ये रहा किंवा आश्रमात रहा, चार प्रकारचे संन्यास साध्य झाले तरच साधक जीवन्मुक्त होतो.

साधकाने त्याला आकर्षित करणाऱ्या बाह्य पदार्थांपासून आणि गोतावळ्यातून वृत्ती काढून वृत्ती स्वतःच्या शरीरावर केंद्रित करावी. 'माझी बायको', 'माझी संपत्ती' इत्यादी विचार त्यागावेत. लग्नसमारंभ, दशक्रिया, नामकरणाचे कार्यक्रम, वाढदिवसाचे कार्यक्रम, सिनेमे, नाटक, विविध निमित्ताने आयोजित केलेल्या पार्ट्या, दूरचित्रवाणी संचावरील कार्यक्रम इत्यादी सर्वांचा हळुहळू त्याग करावा. साधकाने असे निष्ठेने केले तर, त्याची वृत्ती स्थूलशरीरावर येईल. पुढे त्याने 'मी ब्राह्मण', 'मी गृहस्थ', 'मी ठेंगणा', 'मी गोरा' इत्यादी स्थूलदेह धर्मांचा त्याग करावा. येथपर्यंत ज्या साधकाची प्रगती होते त्याचा स्थूलसंन्यास होतो.

आता पुढे त्याने सूक्ष्मसंन्यास साधावा. 'मी दुःखी', 'मी पुण्यवान', 'मी चांगला', 'मी दयाळू', 'मी क्रोधिष्ट' इत्यादी सूक्ष्मदेहाच्या असंख्य धर्मांचा त्याग करावा. अंतःकरणातून अहंकाररूपी 'मी आणि माझे' काढून टाकावे. हे साध्य होणे म्हणजे सूक्ष्मसंन्यास साध्य होणे होय.

आता, साधकाने कारणसंन्यास प्राप्त करण्यासाठी प्रयत्न करावा. 'मी अज्ञानी आहे' किंवा 'मी मलाच ओळखत नाही' किंवा 'मी भगवंताला ओळखत नाही' हा कारणदेहाचा धर्म आहे. या धर्माचा साधकाने प्रयत्नपूर्वक त्याग केला, तर, कारणसंन्यास साध्य झाला असे समजावे.

कारणसंन्यास प्राप्त झाल्याबरोबर साधकाला 'मी ज्ञानी आहे' असे वाटू लागते. म्हणजे, तो महाकारणदेहावर जातो. सद्गुरूंच्या कृपेने 'मी ज्ञानी' असा अहंकार गेला तर

महाकारणसंन्यास सिद्ध होतो. महाकारणसंन्यास झाला तर, त्यालाच विद्वत्संन्यास म्हणजेच फलीभूतसंन्यास म्हणतात आणि या संन्यासानेच जीवन्मुक्ति सिद्ध होते.

'ब्रह्म' या शब्दाचा व्याकरणाच्या आधारे अर्थ काय? 'बृह' या धातूपासून ब्रह्म हा शब्द बनला आहे. 'अतिशय, सर्वात मोठे' असल्यामुळे त्याला 'ब्रह्म' असे म्हणतात.

प्रमाण –

बृहत्तमत्वात् ब्रह्म । २–१–१

– तैत्तिरीय उपनिषदावरील शांकरभाष्य

जड, मर्यादित वस्तू ही 'उत्पत्ती, स्थिती, प्रलयवान' असते. परंतु, हे तीन दोष ब्रह्मात नाहीत. म्हणून, ब्रह्माला 'अतिशय मोठे' असे म्हणतात.

इंद्रियांना अगोचर असलेल्या ब्रह्माच्या अस्तित्वाला प्रमाण काय? ब्रह्म, आत्मा, मोक्ष इत्यादी इंद्रियांस न कळणाऱ्या विषयांचे ज्ञान केवळ उपनिषदे, ब्रह्मसूत्र इत्यादी शास्त्रांद्वारे होते. अनंत जन्मांपासून मनुष्याला पदार्थ आणि व्यवहार यांचाच परिचय असल्यामुळे ब्रह्म, मोक्ष इत्यादी विषयांकडे त्याचे लक्ष जात नाही. त्यांची ओळख करण्यासाठी शास्त्राभ्यासाची अत्यंत आवश्यकता आहे. ब्रह्म, मोक्ष, ईश्वर, जीव इत्यादी विषय मनुष्य बुद्धीतून निघणाऱ्या तर्काने कधीही निर्णित केले जाऊ शकत नाहीत. जीवन्मुक्त महापुरुषांचा ब्रह्मसाक्षात्कार हे ब्रह्माचे सर्वश्रेष्ठ प्रमाण आहे. ही मुक्ती देह पडल्यावर मिळत नसते. जीवंत असतानाच या मुक्तीचा निःसंशय निश्चय असतो. याला सद्योमुक्ती असेही म्हणतात. जीवन्मुक्त म्हणजे 'न जीव न मुक्त' म्हणजेच 'ना बंध ना मोक्ष'. जीवन्मुक्त महापुरुष हे जीव तर नसतातच आणि त्यांची मुक्ती ही बंध सापेक्ष मुक्ती नसते. बंध–मोक्षातीत जो मोक्ष ती जीवन्मुक्ति. ही मुक्ती कर्माने साध्य होत नाही. श्रीगुरुंच्या श्रीमुखातून 'तत्त्वमसि' महावाक्याचे निरूपण श्रवण करून तत् त्वम् पदार्थ शोध पूर्णत्वास गेला, तर, साधक जीवन्मुक्त होतो.

लौकिक अथवा वैदिक कर्म 'करणे, न करणे अथवा विपरीत करणे' हे पुरुषाच्या हाती आहे. परंतु, ब्रह्म ही सिद्ध वस्तू आहे. 'ब्रह्म आहे' किंवा 'ब्रह्म नाही' असे विकल्प पुरुषबुद्धीचे आहेत. यांवर ब्रह्माची सिद्धी अजीबात अवलंबून नाही. ब्रह्माचे ज्ञान हे पुरुषाच्या बुद्धीवर अवलंबून नसून ते ब्रह्मावरच अवलंबून आहे. ब्रह्मविषयी 'ब्रह्म असे आहे की तसे आहे' अशा विकल्पांना तत्त्वज्ञान म्हणत नाही. साधकाची 'मी ब्रह्म आहे' ही वृत्तीसुद्धा जेव्हा मावळते तेव्हाच यथार्थ ब्रह्मनिश्चय म्हणजे तत्त्वज्ञान होते. ब्रह्म कळण्यासाठी स्वतःच ब्रह्मरूप होणे हाच उपाय आहे.

तात्पर्य– ब्रह्माचा साक्षात अनुभव हेच ब्रह्माचे बलवत्तर प्रमाण आहे. प्रत्यक्ष, अनुमान, शब्द, उपमान, अर्थापत्ती आणि अनुपलब्धि ही सहा प्रमाणे ब्रह्माला प्रकाशित करू शकत नाहीत.

प्रमाण –



यं वाङ्‌न वेद । यं चक्षुर्न वेद । यं श्रोत्रं न वेद । यं मनो न वेद । ३-७-(१७-२०)

– बृहदारण्यक उपनिषद्

प्रत्यक्ष प्रमाणाला ब्रह्म अगोचर आहे. बाकीची पाच प्रमाणे जवळपास प्रत्यक्षप्रमाणासारखीच थोड्या भेदाने आहेत. म्हणून, त्या पाच प्रमाणांच्या कक्षेतही ब्रह्म येत नाही.

ब्रह्म हे इंद्रियांस गोचर नाही. परंतु, साधकाला ब्रह्माचा बोध तर करून घ्यावा लागणार आहे. माहीत नसलेल्या, न दिसणाऱ्या वस्तूबद्दल त्या वस्तूची लक्षणे सांगावी लागतात. त्यामुळे, त्या वस्तूचे स्वरूप स्पष्ट होण्यास सहाय्य होते. ब्रह्म कसे आहे? याचा शोध घेण्यासाठी लक्षण, तटस्थलक्षण आणि स्वरूपलक्षण या पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या समजून घेणे गरजेचे आहे.

*****

## चिंतन क्रमांक – २२
## ब्रह्माची तटस्थलक्षणे आणि स्वरूपलक्षणे

केवळ मनुष्यबुद्धीने ब्रह्म, ईश्वर, जीव यांच्या व्याख्या करणे हे योग्य नाही. त्यांच्या व्याख्या स्पष्ट करण्यासाठी प्रथम त्यांची लक्षणे जाणावी लागतात आणि उपनिषदातील मंत्र प्रमाण म्हणून पाहायचे असतात. म्हणजेच, वेदांतशास्त्रात पदार्थांच्या स्वरूपाचा निश्चय करण्यास लक्षण आणि प्रमाण द्यावी लागतात.

लक्षण कशाला म्हणावे? लक्षण म्हणजे असाधारण धर्म. 'जो धर्म एका विशिष्ट पदार्थातच असतो आणि अन्य पदार्थात तो धर्म मुळीच नसतो' तो त्या पदार्थाचा असाधारण धर्म असतो. आता, लक्षण या शब्दाची दुसरी व्याख्या बघू. ज्या धर्मात अव्याप्ती, अतिव्याप्ती आणि असंभव हे तीन दोष नसतात, त्या धर्माला 'लक्षण' असे म्हणतात.

जर लक्षण लक्ष्याच्या काही भागातच असेल, तर, त्या लक्षणावर अव्याप्ती दोष येतो. उदाहरणार्थ – 'जो लाल असतो तो घोडा असतो' असे घोड्याचे लक्षण केले, तर, जो घोडा पांढरा अथवा अन्य रंगाचा असतो तेथे 'लालपणा' हे लक्षण राहत नसल्यामुळे त्या घोड्यांना घोडा म्हणता येत नाही. म्हणजेच या लक्षणावर अव्याप्ती दोष येतो.

अतिव्याप्ती म्हणजे जे लक्षण लक्ष्यात तर असतेच आणि अलक्ष्यातही आढळते. उदाहरणार्थ – 'जिला शिंगे असतात ती शेळी' असे शेळीचे लक्षण केले तर गाय, म्हैस यांनाही शिंगे असल्यामुळे त्या ठिकाणी अतिव्याप्ती दोष येतो.

असंभव म्हणजे 'शक्यच नसणे'. 'सशाला शिंगे असतात' असे म्हटले तर, असंभव हा दोष येतो. कारण आपल्याला हे माहीत आहे की सशाला शिंगे असणे हे शक्यच नाही.

तटस्थलक्षण आणि स्वरूपलक्षण असे लक्षणाचे दोन प्रकार आहेत. प्रथम तटस्थलक्षण कशाला म्हणतात ते पाहू. 'जे लक्षण त्याच्या लक्ष्याच्या ठिकाणी काही काळ राहते आणि लक्ष्याला इतर पदार्थांपासून वेगळे दाखवते, त्या लक्षणाला तटस्थलक्षण म्हणतात'. देवदत्ताच्या घरावर बसलेला कावळा घरापासून वेगळा असून इतर घरांपासून देवदत्ताचे घर वेगळे करून दाखवितो. म्हणून, कावळा हे देवदत्ताच्या घराचे तटस्थलक्षण आहे.

स्वरूपलक्षण म्हणजे काय? 'जे लक्षण लक्ष्यात नेहमीसाठी राहते व इतरांपासून लक्ष्याला भिन्न करून दाखवते त्या लक्षणाला लक्ष्याचे स्वरूपलक्षण म्हणतात'. दाहकता हे अग्नीचे स्वरूपलक्षण होय. शीतलता हे पाण्याचे स्वरूपलक्षण आहे.

आता प्रथम, ब्रह्माचे तटस्थलक्षण म्हणजे काय ते बघू.

जगताच्या उत्पत्ती, स्थिती, प्रलयाचे कारण ब्रह्म आहे.

प्रमाण –

**यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति ।**
**यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ।। ३-१**

– तैत्तिरीय उपनिषद्

ज्याच्यापासून ही भूते उत्पन्न होतात, उत्पन्न झालेली भूते ज्याच्या योगाने जिवंत राहतात आणि विनाशसमयी ज्यामध्ये प्रवेश करतात त्यास ब्रह्म असे म्हणतात. हे ब्रह्माचे तटस्थलक्षण होय. ब्रह्म हेच जगाच्या उत्पत्तीचे, स्थितीचे आणि प्रलयाचे कारण आहे. उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय ही लक्षणे काही काळ दिसून येतात, म्हणून त्यांना तटस्थ लक्षणे असे म्हणतात. संसारी जीव, माया किंवा परमाणू अशा कोणत्याच कारणांपासून जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होऊच शकत नाही. सृष्टी अफाट आणि अचिंत्य आहे. पृथ्वीवरील असंख्य जीवांना 'त्यांच्या त्यांच्या कर्मांचे फळ अमुक ठिकाणी, अमुक काळात, अमुक निमित्ताने देणे' हे संसारी जीव, माया किंवा परमाणू यांना शक्यच नाही. जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय ज्या सर्वशक्ति, सर्वज्ञ चैतन्यापासून होते तेच ब्रह्म होय.

'कारण' हे वेदांतशास्त्रात दोन प्रकारचे आहे. एक म्हणजे उपादानकारण आणि दुसरे म्हणजे निमित्तकारण होय. कार्याच्या एक क्षण पूर्वी तरी 'कारण' असतेच.

ज्या कारणापासून पदार्थ उत्पन्न होऊन त्यातच लीन होतो, त्यास उपादानकारण असे म्हणतात. उदाहरणार्थ – वृक्ष हा पृथ्वीतून उत्पन्न होतो व शेवटी पृथ्वीतच लय पावतो. तसेच, जे कारण कार्याशी एकरूप असून ज्याशिवाय कार्य राहत नाही, त्यास उपादानकारण म्हणतात. ओल्या मातीच्या एका मोठ्या गोळ्यापासून घट, भांडी, मूर्ति बनविता येतात. माती हेच घट, भांडी आणि मूर्ति यांचे उपादानकारण आहे. हे **आकृती क्रमांक ७५** मध्ये दाखविलेले आहे.




आकृती क्रमांक ७५ – उपादान व निमित्त कारण

जे कारण कार्यापासून वेगळे राहून कार्यास सहाय्यक असते ते निमित्तकारण होय. मातीपासून घट तयार करण्यासाठी कुंभाराचे सहाय्य लागते. कुंभार हा घटाचा निमित्तकारण

आहे. घट या कार्यापासून कुंभार वेगळा असतो. घटरूपी कार्याचा लय कुंभाररूपी निमित्तकारणात होत नाही.

ब्रह्म हेच जगताचे निमित्तकारण आहे आणि उपादानकारणही आहे. **जगदाचित्वात्** (१–४–१६) या ब्रह्मसूत्राच्या आधारे ब्रह्म हेच जगताचा कर्ता आहे असे सिद्ध केले आहे. **अन्तर्याम्यधिदैवादिषु तद्धर्मव्यपदेशात्** (१–२–१८) या ब्रह्मसूत्राच्या आधारे स्थितीकाली प्राण्यांचे नियमन करणारे ब्रह्म आहे असा निर्णय दिला आहे. उपनिषदांमध्ये 'ब्रह्माचा अन्तर्यामित्व हा धर्म आहे' असा निर्देश केलेला आहे. **अत्ता चराचरग्रहणात्** (१–२–९) या ब्रह्मसूत्राच्या आधारे ब्रह्म हे चराचरात्मक जगताला खाणारे आहे. म्हणजे, जगताचा लय ब्रह्मात होतो असे सिद्ध केलेले आहे.

आता ब्रह्माच्या स्वरूपलक्षणांचा विचार करू. सत्, चित् आणि आनंद ही ब्रह्माची स्वरूपलक्षणे आहेत. ही लक्षणे सर्वकाळी, सर्व अवस्थांमध्ये, सर्व ठिकाणी ब्रह्मामध्ये असतातच. या ठिकाणी 'सत्' म्हणजे व्यवहारातील 'सत्य भाषण' असे नव्हे. ज्यामध्ये तिन्ही काळी कोणताही बदल होत नाही, त्यालाच सत् म्हणतात. असे फक्त ब्रह्मच आहे.

प्रमाण –

**यद्रूपेण यन्निश्चितं तद्रूपं न व्यभिचरति तत्सत्यम् ।। २–१–१**

– तैत्तिरीय उपनिषदावरील शांकरभाष्य

ज्या रूपाने जे निश्चित झालेले असून ज्यात बदल होत नाही, त्यास 'सत्' म्हणतात. ज्यामध्ये बदल होतो, त्यास 'अनृत' म्हणतात. जगामध्ये आपल्याला सर्व पदार्थांमध्ये बदल होताना दिसतो.

एका पदार्थापासून दुसरा पदार्थ उत्पन्न होत नाही. एक सत्च विविध नाम, रूपात्मक पदार्थांच्या रूपाने भासते. ज्याप्रमाणे मातीच घट, भांडी, मूर्ति या रूपाने भेद पावल्यासारखी वाटते, त्याचप्रमाणे, सत् हेच 'इदं' (जगत्) व 'इदं बुद्धी' (जगत् आहे असे वाटणे) या रूपाने भासत आहे, यालाच विवर्त असे म्हणतात.

ब्रह्म चित्रूप आहे. चित् अथवा चिद् म्हणजे जाणणे किंवा प्रकाशन करणे. चित्रूप म्हणजे प्रकाशरूप. येथे 'प्रकाश' म्हणजे सूर्य, चंद्रादिकांचा प्रकाश अथवा मानवनिर्मित दिव्यांचा प्रकाश असा अर्थ नाही. कारण ते सर्व जड आहेत. ब्रह्माचे 'चित्' हे स्वरूपलक्षण नसते, तर, जगतातील पदार्थांचा आकार, रंग इत्यादी मनुष्याला कळले नसते. ब्रह्म सर्वांचे प्रकाशक असून, स्वत: दुसऱ्याकडून प्रकाशित न होणारे आहे. ब्रह्म म्हणजेच आत्मा चेतन आहे. ज्याअर्थी पदार्थांची प्रचीती येते त्याअर्थी 'इदं' म्हणजे 'हे' म्हणजे जड जगताच्या पाठीमागे त्यांना प्रकाश देणारा असा कोणी चेतन आहेच आणि ते म्हणजे ब्रह्म. उपनिषदांमध्ये 'त्याने इच्छा केली', 'त्याने विचार केला' या अर्थाचे मंत्र आहेत. इच्छा करणे, विचार करणे हे चैतन्याशिवाय शक्य नाही.

प्रमाण –



**नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानाम् ।। २-२-१३**

– काठकोपनिषद्

ज्याप्रमाणे पाण्याचा संबंध अग्नीशी आल्यावर पाण्यात उष्णता येते, त्याचप्रमाणे, ब्रह्मचैतन्यामुळे सूर्य, चंद्र इत्यादी प्रकाशमान आहेत.

अग्नीचा गोळा या रूपाने ज्या सूर्याची आपल्याला प्रतिती आहे ते सूर्याचे स्थूल शरीर आहे. जागृती अवस्थेत सूर्याच्या प्रकाशाच्या सहाय्याने मनुष्याला पदार्थ दिसतात व तो व्यवहार करतो. खरेतर, पदार्थ जाणण्यास चैतन्यच मूळ कारण आहे. समजा, अमावस्येच्या रात्री आकाशात मेघ जमा झालेले आहेत, मानवनिर्मित कोणताही दिवा नाही, काजवेही नाहीत. अशा ठिकाणी आपण एकटे बसलेलो आहोत. तेव्हा आपल्याला कोण प्रकाशित करतो, कोण जाणतो? स्वप्नामध्ये अनेक व्यक्ती दिसतात, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी गेलो असे वाटते – या दृश्याला प्रकाशन करणारा, जाणणारा कोण आहे? मनुष्य गाढ झोपेतून उठल्यावर 'मी सुखाने निजलो होतो. काही कळले नाही' असे म्हणतो. गाढ झोपेत सुखाची अनुभूती कोणामुळे होते? या तिन्ही अवस्थेत कोणी एकच प्रकाशक असला पाहिजे आणि तो आत्माच ज्योति-प्रकाश आहे. हा आत्मा अन्य कोणत्याही ज्योतिने प्रकाशित होत नाही. ती ज्योति शरीरातच असून शरीरापासून भिन्न आहे.

प्रमाण –

**अयं पुरुषः स्वयं ज्योतिर्भवति ।।४-३-९**

– बृहदारण्यक उपनिषद्

आत्मा हा स्वयंप्रकाश असून चैतन्यज्योतिने सर्व प्रकाशित करतो.

आनंद हे देखील ब्रह्माचे स्वरूपलक्षण आहे. आवडत्या पदार्थांचा भोग घेतल्याने जे सुख होते त्या सुखाला सुरूवात आणि शेवट असतो. ते सुख अनित्य असते. या सुखाचे मूळ स्त्रोत हे आनंदरूप ब्रह्मच आहे. तप, विद्या, श्रद्धा इत्यादींची वृद्धी ज्या साधकामध्ये होते त्याला नित्य आनंदरूप ब्रह्माचा साक्षात्कार होतो.

भूमा – निरतिशय महत्तत्त्व म्हणजे ब्रह्म ते आनंदरूप आहे. वैषयिक सुख हे अल्प असते. वैषयिक सुखाला मर्यादा असते. ब्रह्मसुख हे अमर्यादित आहे.

प्रमाण –

**यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति ।।७-२३-१**

– छांदोग्य उपनिषद्

तसेच, ब्रह्म हे नित्य, सर्वात मोठे, सर्वगत, सर्वात सूक्ष्म व अव्यय आहे.



प्रमाण –

नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं ।। १–१–६

– मुंडक उपनिषद्

ब्रह्म हे अणूपेक्षाही छोटे आणि मोठ्यापेक्षाही मोठे आहे. म्हणजेच ब्रह्म सर्वव्यापक आहे.

प्रमाण –

अणोरणीयान्महतो महीयान ।। १–२–२०

– काठकोपनिषद्

ब्रह्मात भूत, वर्तमान, भविष्य हे तीन काळ नाहीत. ब्रह्म कालातीत आहे. ब्रह्म भूत, वर्तमान, भविष्य यांवर शासन करणारे आहे.

प्रमाण –

ईशानं भूतभव्यस्य ।। २–१–५

– काठकोपनिषद्

ब्रह्म हे त्रिकालातीत आहे. हे श्वेताश्वतर उपनिषदात आले आहे. ब्रह्मात पदार्थ भेद नाही. ब्रह्माला अवयव नाहीत.

प्रमाण –

परस्त्रिकालादकलोऽपि दृष्टः ।। ६–५

– श्वेताश्वतर उपनिषद्

सृष्टीच्या पूर्वी जे अखंड एकरस ब्रह्म असते, त्याला कारणब्रह्म म्हणायचे. ते स्वरूपाने पूर्णच असते. सृष्टीच्या उत्पत्तीनंतर नाम, रूपात्मक उपाधी असलेल्या ब्रह्माला कार्यब्रह्म म्हणतात. हे कार्यब्रह्महीी स्वरूपाने पूर्णच आहे. नंतर, परत जेव्हा महाप्रलय होतो तेव्हा ते कारण ब्रह्म हे पूर्णच राहते.

प्रमाण –


ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।

– ईशावास्य उपनिषद्

ब्रह्म हे नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभाव आहे. देश, काल, पदार्थांनी ब्रह्मात खंड पडत नाही, म्हणून ते नित्य आहे. माया आणि मायाकार्याचा संबंध लागत नाही, म्हणून ब्रह्म शुद्ध आहे. ब्रह्म स्वयंप्रकाश आहे, म्हणून बुद्ध आहे. सापेक्ष बंध–मोक्ष ब्रह्माच्या ठिकाणी नाही. ब्रह्म निरपेक्ष मुक्त आहे.

आपल्याला वेदांतशास्त्राप्रमाणे कारण आणि कार्य हे एकच आहेत याचा निश्चय करायचा आहे. त्यासाठी आरंभ, परिणाम आणि विवर्त असे तीन प्रकारचे उपादानकारण प्रथम समजून घ्यायला पाहिजे. न्याय, वैशेषिक, योग, सांख्य, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा (वेदांतशास्त्र) यांना षट्दर्शने (सहा दर्शने) म्हणतात. ही सहा शास्त्रे जगत्रूपी कार्याचे कारण काय आणि कार्य–कारण संबंध कसा आहे ? याबद्दल भिन्न भिन्न मते मांडतात. न्याय व वैशेषिक दर्शन आरंभवाद मानतात. योग व सांख्य परिणामवाद मानतात. पूर्वमीमांसकाचा आरंभवाद आहे. वेदांताचा विवर्तवाद हा सिद्धांत आहे.

पूर्वी आपण निमित्तकारण आणि उपादानकारण यांचा अभ्यास केला. जे कार्यापासून भिन्न राहते आणि कार्यास सहाय्य करते, त्यास निमित्तकारण म्हणतात. जे कार्याशी एकरूप असते व ज्याशिवाय कार्य राहतच नाही, त्यास उपादानकारण म्हणतात. आरंभी, परिणामी आणि विवर्त हे उपादानकारणाचे तीन प्रकार आहेत.

आरंभवाद म्हणजे काय ? आरंभवादात कार्य हे कारणाहून भिन्न आहे. कार्यापेक्षा भिन्न असलेल्या कारणापासून, कारणापेक्षा भिन्न असलेल्या कार्याची उत्पत्ती होते. त्यासाठी 'तंतू–पट' हा दृष्टांत दिला जातो. तंतू–पट म्हणजे धाग्यांपासून कापड तयार करणे. तंतू या कारणापासून तंतूपेक्षा वेगळे असे पटरूपी कार्याची उत्पत्ती होते.

परिणाम कशाला म्हणतात ? पदार्थाची अवस्था बदलून दुसरी अवस्था प्राप्त होणे, याला परिणाम असे म्हणतात. यासाठी दृष्टांत म्हणजे दुधाचे दही होणे. दुधाची अवस्था वेगळी आणि दह्याची अवस्था वेगळी. दह्याचे रूपांतर परत दुधात करता येत नाही. ज्या कार्याची सत्ता ही कारणाच्या सत्तेसारखी असते, त्यास परिणाम म्हणतात. दुधाचे दही हा परिणाम होतो. दुधाची सत्ता व्यावहारिक आहे. दह्याचीही सत्ता व्यावहारिक आहे. खरोखरच एका पदार्थाचे रूपांतर दुसऱ्या पदार्थात होते, त्यास परिणाम म्हणतात. परिणामवादात जगत् या कार्याला सत्यत्व दिलेले आहे.

विवर्त म्हणजे काय ? पूर्वरूपाचा परित्याग न करता रूपांतराचे भान होणे म्हणजे विवर्त. समजा, मंद अंधारात रज्जूवर साप भासला. येथे रज्जूचे रूपांतर सर्पामध्ये होत नाही. रज्जू जशी आहे तशीच पडून आहे. सर्परूपाने रज्जूच्या रूपांतराचा भास होतो. कंदीलाच्या

उजेडात सर्पाचा भास जातो व 'दोरीच आहे' असे स्पष्टपणे दिसते. ज्या कार्याची सत्ता ही कारणाच्या सत्तेपेक्षा भिन्न असते, त्यास विवर्त असे म्हणतात. दोरी या कारणाची सत्ता व्यावहारिक आहे. सर्प या कार्याची सत्ता प्रातिभासिक आहे. म्हणून, सर्प हे दोरीचे विवर्त आहे. जगत् हे ब्रह्माचे विवर्त आहे. एका पदार्थावर दुसऱ्या पदार्थाचा भास होतो, तो दुसरा पदार्थ खरा नसतो यास विवर्त म्हणतात. विवर्तवादात जगत् हे भासलेले आहे. जगत् या कार्याला मिथ्यात्व आहे.

पुढे आपण वेदांतशास्त्राप्रमाणे कारण आणि कार्य यांची एकता सिद्ध करण्यासाठी 'पूर्वपक्ष' आणि 'सिद्धांतपक्ष' अशा रितीने अभ्यास करणार आहोत.

*****

## चिंतन क्रमांक – २३

## ब्रह्म हेच जगताचे अभिन्न निमित्तोपादान कारण

जगत् या कार्याचे ब्रह्म हे कारण आहे. याचा अर्थ असा की जगत् हे ब्रह्मस्वरूप आहे. पण, ब्रह्म हे जगत्‌रूप नाही. उदाहरणार्थ – घट हा मातीस्वरूप आहे. पण, माती घटस्वरूप नाही. वेदांतशास्त्राच्या 'कार्य आणि कारण एक आहेत' या सिद्धांतावर इतर मतवादी आक्षेप घेतात, त्याला 'पूर्वपक्ष' म्हणतात. वेदांती त्याचे समाधान सांगतात, त्याला 'सिद्धांतपक्ष' म्हणतात. आता कार्य व कारण यांचे ऐक्य सिद्ध करण्यासाठी पूर्वपक्ष – सिद्धांतपक्ष पाहू.

पूर्वपक्ष–१ : तुम्ही अद्वैतवेदांती 'ब्रह्मापासून जगत् झाले' असे सांगता. परंतु, तसे नसून जगत् होण्याची प्रक्रिया आरंभवादाप्रमाणे आहे.

सिद्धांतपक्ष–१ : 'अनेकांपासून एक झाले' असे आरंभवादाचे मत आहे. पूर्वी दोन अणू होते. त्यांचा संयोग होऊन द्वयणुक झाले. अशाप्रकारे, अणूंच्या संयोगापासून जगत् झाले, असे आरंभवादी सांगतात. परंतु, ब्रह्म तर एकच आहे. ब्रह्मासारखे दूसरे चैतन्य नाही. त्यामुळे संयोग होऊन जगत् निर्माण होत नाही. म्हणून, जगताचे उपादान आरंभी नाही. जगताचे उपादान विवर्त आहे. जगत् हे ब्रह्मावर विवर्त आहे.

पूर्वपक्ष–२ : तुम्ही अद्वैतवेदांती, 'जगताची उत्पत्ती झाली' असे म्हणता, त्या जगताचे उपादान परिणामी आहे.

सिद्धांतपक्ष–२ : 'उपादानाच्या समस्वभाववान आणि अन्यथारूप' ही 'परिणामा'ची व्याख्या आहे. परिणामवादाचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे दूधाचे दही होणे. यात दूध व दही यांची समान सत्ता म्हणजे व्यावहारिक सत्ता आहे. दूध आणि दही यांचे रूप वेगळे आहे, म्हणून 'अन्यथारूप' आहेत. परिणामवादात कार्याचे रूपांतर पुन्हा कारणात होत नाही. उदाहरणात, दह्याचे रूपांतर परत दूधात होत नाही. ब्रह्माचा परिणाम जगत् मानावा, तर मग प्रलयकाळी जगत् ब्रह्मस्वरूप कसे होईल? शिवाय परिणामवादात कार्य हे सत्य असते. परंतु, जगत् हे सत्य नाही, मिथ्या आहे. तसेच, निरवयव पदार्थाचा परिणाम होत नसतो. ब्रह्म हे चेतन, निर्गुण, क्रियाशून्य आणि निरवयव आहे. या कारणांमुळे ब्रह्म हे जगताचे परिणामी उपादान कारण नाही. ब्रह्म आणि जगताची सत्ता भिन्न आहे. म्हणून, ब्रह्म हे जगताचे विवर्तोपादान कारण आहे.

पूर्वपक्ष–३ : ब्रह्म हे क्रियाशून्य असल्यामुळे जगत् उत्पन्न करू शकत नाही.

सिद्धांतपक्ष–३ : शुद्ध ब्रह्म हे अविकारी असल्यामुळे जगताचे कारण नाही. परंतु, माया उपाधीवान ब्रह्म हे जगताचे कारण आहे. जगत्‌रूपी विवर्ताचे मायोपहित ब्रह्म हे अधिष्ठान आहे. जगताला स्वत:ची सत्ता नाही. ब्रह्माच्या सत् या स्वरूप लक्षणामुळे जगत् सत्य वाटते.

पूर्वपक्ष–४ : समसत्तावान पदार्थांमध्ये उपादान, उपादेय भाव होणे शक्य आहे. उदाहरणार्थ – माती आणि घट यांची सत्ता एकच आहे. माती उपादान असून घट उपादेय आहे. ब्रह्म चेतन आणि जगत् जड असल्यामुळे ब्रह्म हे जगताचे उपादान कारण नाही.

सिद्धांतपक्ष–४ : उपादानकारण म्हणजे प्रत्यक्ष, मुख्यकारण. तसेच, 'ज्यापासून उत्पत्ती होते त्यातच प्रलय होणे' ही उपादानाची व्याख्या आहे. उपादानकारणापासून झालेल्या कार्याला उपादेय असे म्हणतात. 'ब्रह्मापासून आकाशादि सर्व प्रपंचाची उत्पत्ती झाली' आणि 'मी बहु व्हावे' असे श्रुती सांगते. म्हणजे जगताचे कारण ब्रह्म आहे. 'नाशामध्ये सृष्टी ब्रह्मात लय पावते' अशी श्रुती आहे. यामुळे ब्रह्म हे जगताचे उपादानकारण आहे. मायोपहित ब्रह्माचे ज्ञान, इच्छा, प्रयत्न हे गुण मिथ्या आहेत. सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, प्रलय हे ब्रह्माच्या तटस्थ लक्षणांतर्गत येतात.

पूर्वपक्ष–५ : ब्रह्म हे जगताचे निमित्तकारण नाही.

सिद्धांतपक्ष–५ : पूर्व सृष्टीतील असंख्य जीवांनी फलेच्छा ठेऊन केलेल्या कर्मांची फळं मिळावीत, म्हणून महाप्रलयानंतर मायोपहित ब्रह्म पुन्हा देश, काल, पदार्थात्मक जगताला व्यक्त रूपावर आणते. 'प्राणीकर्मसापेक्ष जगत् उत्पत्ती' यावरून 'कर्माचे फळ जीवांना द्यावे' हे निमित्त आहे. म्हणून, ब्रह्म हे जगताचे निमित्तकारणही आहे.

पूर्वपक्ष–६ : ब्रह्माचे स्वरूप आणि जगताचे स्वरूप भिन्न आहे. ब्रह्म हे चेतन आहे, शुद्ध आहे. जगत् हे जड असून सापेक्षित सुख–दु:खेही अनुभवात येतात. ब्रह्म आणि जगत् यांची लक्षणे भिन्न आहेत. विलक्षण पदार्थांमध्ये कार्यकारणभाव नसतो. म्हणून, ब्रह्म हे जगताचे कारण असू शकत नाही.

सिद्धांतपक्ष–६ : हे बरोबर नाही. चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या जीवांमध्ये पृथ्वीवर व्यवहारदृष्टीने मनुष्याला 'चेतन' म्हणतात. परंतु, अशा 'चेतन' मनुष्यामध्ये नख आणि केस हे 'अचेतन' पदार्थ वाढताना दिसतातच. या

दृष्टांतप्रमाणे चेतन ब्रह्मापासून जड जगत् निर्माण होते.


पूर्वपक्ष–७ : ब्रह्माची सर्व लक्षणे जगतात दिसत नाहीत, म्हणून ब्रह्म हे जगताचे कारण नाही.

सिद्धांतपक्ष–७ : दोन पदार्थांमध्ये कमी–जास्तपणा असेल तर कार्यकारणभाव संभवतो. ब्रह्माची सर्वच लक्षणे जगतात उतरली तर ब्रह्म आणि जगतामध्ये सर्व दृष्टीने साम्य राहील आणि कार्यकारण भाव राहणार नाही. म्हणून, ब्रह्माची सर्व लक्षणे जगतात दिसत नसूनही ब्रह्म हेच जगताचे कारण आहे.

पूर्वपक्ष–८ : ब्रह्माचे एकही लक्षण जगतामध्ये दिसून येत नाही, म्हणून ब्रह्म जगताचे कारण नाही.

सिद्धांतपक्ष–८ : फुलांच्या हारामध्ये दोरा जसा व्याप्त असतो त्याप्रमाणे ब्रह्माचे 'सत्' हे स्वरूपलक्षण जगतामध्ये दिसून येते. या कारणामुळे मनुष्याला जन्मापासून मरेपर्यंत अनेक पदार्थांबद्दल कुतूहल आणि जिज्ञासा असते. ते सर्व पदार्थ त्याला सत्‌रूप म्हणजेच खरे वाटतात.

पूर्वपक्ष–९ : ब्रह्माचा चैतन्य हा धर्म जगतामध्ये दिसून येत नाही. म्हणून, ब्रह्म हे जगताचे कारण नाही.

सिद्धांतपक्ष–९ : जर प्राणी आणि पदार्थांमध्ये चैतन्य नसते, तर सर्वकाही ज्या ठिकाणी आहे त्याच ठिकाणी राहिले असते आणि त्याच अवस्थेत राहिले असते. चैतन्य हा धर्म नसता तर प्राण्यांनी एकमेकांना अथवा पदार्थांना जाणले नसते. चैतन्य हा धर्म नसता तर प्राण्यांमध्ये अनुकूल–प्रतिकूलतेचा भाव राहिला नसता आणि सापेक्षित सुख–दुःखे जाणवलीच नसती. कोणी म्हणेल – 'दगड, लाकडाचा ठोकळा आणि तत्सम् पदार्थांमध्ये ब्रह्म नाही'. पदार्थांमध्ये आणि प्राण्यांच्या शरीरामध्ये सतत सूक्ष्मपणे बदल होत असतो. यास कारण ब्रह्मचैतन्य आहे. लाकडाच्या ठोकळ्याच्या रंगामध्ये आणि इतर लक्षणांमध्ये कालांतराने बदल दिसून येतो. पदार्थांच्या उत्पत्ती, स्थिती, प्रलयास ब्रह्मचैतन्य कारण आहे. पदार्थांना स्वतंत्र अस्तित्व नाही.

पूर्वपक्ष–१० : 'ब्रह्म' इंद्रियांनी कळण्याच्या कक्षेत येत नाही, म्हणून ब्रह्माची सिद्धी होत नाही.

सिद्धांतपक्ष–१० : 'ब्रह्माची सिद्धी इंद्रियांनी केली' असे कोणी म्हणेल, तर ते 'पुत्राने पित्याची सिद्धी केली' असे ठरेल. ब्रह्माच्या ठिकाणी रूप, अवयव

नसल्यामुळे ते डोळा, कान, नाक, त्वचा, जीभ या ज्ञानेद्रिंयांना, तसेच हात, पाय, वागेंद्रिय, गुद आणि शिश्न या कर्मेंद्रियांना गोचर नाही. ब्रह्माच्या ठिकाणी कोणतेही चिन्ह नाही म्हणून अनुमान प्रमाणाचेही ते विषय नाही. तसेच, तर्क केल्यानेही ब्रह्माची सिद्धी होत नाही.

प्रमाण –

**नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्ताऽन्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ। १–२–९**

**– काठकोपनिषद्**

आत्म्याचा बोध स्पष्ट होण्यास जी बुद्धी लागते, ती तर्क करत राहिल्याने प्राप्त होत नाही किंवा तर्काने त्या आत्ममतीचा त्याग करू नये. सद्गुरू आणि वेदांताचे प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रातून बोध प्राप्त झाला तर ती मति ब्रह्मनिश्चयाला कारण होते.

पूर्वपक्ष–११ : जगतातील पदार्थांमध्ये स्थूलत्व जाणवते. पदार्थांना विविध आकार असतात. पदार्थ हे मर्यादित असतात आणि अचेतन वाटतात. महाप्रलयकाळी जेव्हा जगत् ब्रह्मात लीन होईल, तेव्हा जगताच्या त्या दोषांमुळे ब्रह्म कलुषित होईल.

सिद्धांतपक्ष–११ : कार्य कारणात लय पावते तेव्हा कार्य त्याचे गुणधर्म कारणाला देत नाही. ओल्या मातीच्या गोळ्यापासून घट, भांडी इत्यादी बनवितात. घट, भांडी यांचे आकार, उंची, जाडी, वजन हे भिन्न–भिन्न असतात. आता घट, भांडी इत्यादी एकत्र करून परत मातीचा गोळा केला तर त्यांचा आकार उंची, जाडी, वजन या गुणधर्मांचा दोष त्या मातीच्या गोळ्यात नसतो. घट, भांडी इत्यादी त्यांच्या विकारांचा लेप त्यांचे कारण जी माती तिला लावत नाहीत. घट, भांडी इत्यादी मातीस्वरूप आहेत. कार्य हे कारणस्वरूप होते. कारण हे कार्यस्वरूप नाही. जगत् ब्रह्मरूप आहे. ब्रह्म हे जगत्‌रूप नाही.

पूर्वपक्ष–१२ : जगताच्या स्थितीकाली जगताचे दोष ब्रह्माला लागतात.

सिद्धांतपक्ष–१२ : जादूगार त्याच्या जादूच्या प्रयोगांनी इतर लोकांना मोहित करतो. परंतु, तो स्वत: त्या जादूने मोहित होत नाही व जेवढ्या कालावधीत जादूचे प्रयोग सुरू असतात, तेवढ्या कालावधीतच लोक मोहित झालेले असतात. ब्रह्म हे स्वत:च्या मायेने जगत् निर्माण करते, पण ते स्वत: मायेने लिप्त होत नाही. जेव्हा दोरीवर सर्प भासतो तेव्हा तेथे सर्प

प्रत्यक्षात नसतो. दिसणारा सर्प मिथ्या आहे. म्हणून, भासलेल्या सर्पाचा दोष दोरीला लागत नाही. त्याप्रमाणेच, सृष्टीच्या उत्पत्ती, स्थिती, प्रलय या तीन अवस्था मिथ्या असून ब्रह्माला त्याचा स्पर्श होत नाही.

पूर्वपक्ष–१३ : 'प्रलयकाळी जगत् हे ब्रह्मस्वरूप होते' असे तुम्ही अद्वैत वेदांती मानता. 'ब्रह्म हे निराकार आणि अकर्ता आहे' असेही तुम्ही वेदांती म्हणता. याचा अर्थ प्रलयानंतर परत नवीन सृष्टी उत्पन्न होण्यास कोणतेही कारण नाही.

सिद्धांतपक्ष–१३ : दिवसा मनुष्य जागा असतो. तो रात्री झोपतो आणि दुसऱ्या दिवशी परत जागा होतो. त्याचप्रमाणे, सृष्टी–महाप्रलय–सृष्टी असा हा विषय आहे. 'मी अज्ञानी', 'मी कर्ता, भोक्ता' इत्यादी अनेक देहधर्म अज्ञानामुळे मनुष्य स्वतःवर आरोपित करत असतो. हेच विचार घेऊन तो झोपी जातो आणि म्हणून दुसऱ्या दिवशी उठल्यानंतर परत त्याच देहधर्मांचा आरोप स्वतःवर करणे सुरू ठेवतो. त्याचप्रमाणे, चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या असंख्य जीवांपैकी ज्या जीवांनी जीवन्मुक्ति प्राप्त केलेली नाही, असे असंख्य अज्ञानी जीव महाप्रलयात बीजरूपाने राहतात व पुढील सृष्टीत परत व्यक्त रूपाला येऊन समस्त संसार पूर्ववत सुरू होतो. जीव अज्ञानाला आणि द्वैताला सत्य समजतो म्हणून त्याची अशी दैन्य अवस्था होते.

प्रमाण –

**त इह व्याघ्रो वा सिंहो वा वृको वा वराहो वा कीटो**
**वा पतंगो वा दंशो वा मशको यद्यद्भवन्ति तदाभवन्ति । ६–९–३**

**– छांदोग्य उपनिषद्**

या पृथ्वीवर जे जीव पूर्वी वाघ, किंवा सिंह, किंवा लांडगा, किंवा डुक्कर, किंवा किटक, किंवा पतंग, किंवा डास, किंवा चिलट अशा संस्काराने युक्त असतात, पुढे ते तेच होतात.

पूर्वपक्ष–१४ : पूर्वीच्या सृष्टीत जे जीव जीवन्मुक्त झाले ते परत पुढच्या सृष्टीत उत्पन्न होतात.

सिद्धांतपक्ष–१४ : तसे नाही. ज्या जीवांचा द्वैतनिश्चय कायम राहतो, ते उत्तर सृष्टीत परत जन्माला येतात. त्या जीवांचे अज्ञान महाप्रलयकालीही कायम असते आणि म्हणून उत्तर सृष्टीत त्यांचा जन्म होतो. परंतु, पूर्व सृष्टीत जे जीवन्मुक्त होतात त्यांची अविद्या निवृत्त झालेली असते. त्यांचा

अभेदनिश्चय असतो. त्यांचे प्रारब्ध संपुष्टात आले की त्यांचा स्थूल, सूक्ष्मदेह पंचमहाभूतात नेहमीसाठी विलीन होतो आणि त्यांचा परत कुठेही कधीही पुनर्जन्म होत नाही. या कारणांमुळे पूर्व सृष्टीत जे जीवन्मुक्त झाले ते उत्तर सृष्टीत परत येत नाहीत.

पूर्वपक्ष–१५ : जगामध्ये मनुष्य हा भोक्ता आणि तो भोगीत असलेला भोग्य पदार्थ असा भेद सर्वत्र दिसून येतो. समजा, एखाद्या मनुष्याला जिलेबी आवडते. मनुष्य हा भोक्ता व जिलेबी ही भोग्य ठरते. तुम्ही अद्वैत वेदांती म्हणता की भोक्ता हा ब्रह्म आहे आणि जिलेबी ही पण ब्रह्म आहे. असे झाले तर भोक्ता व भोग्य एक होऊन एकमेकांचे धर्म एकमेकांना लागतील! भोक्ता व भोग्य यांचा भेद पूर्वी होता, आता आहे आणि पुढेही राहील. या कारणामुळे 'ब्रह्मच जगताचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहे' असे सिद्ध होत नाही.

सिद्धांतपक्ष–१५ : जगतामध्ये दोन पदार्थांमध्ये संयोग आणि त्याच दोन पदार्थांमध्ये वियोग दोन्हीही दिसून येतात. समुद्रावर मोठ्या लाटा, लहान तरंग दिसतात. कधी लाटा समुद्रापासून अभिन्न असतात, कधी भिन्नही दिसतात. परंतु, शेवटी लाट ही समुद्रस्वरूप आहे. त्याप्रमाणे भोक्ता आणि भोग्य हे ब्रह्मापासून भिन्न नाहीत.

प्रमाण –

**तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत् । २–६**

– तैत्तिरीय उपनिषद्

ब्रह्म जगताला उत्पन्न करून त्यात प्रविष्ट होते. ब्रह्म या कारणापासून जगत् या कार्याला वेगळे अस्तित्व नाही, याला कार्य–कारणाचे एकत्व म्हणतात. पारमार्थिकदृष्ट्या भोक्ता–भोग्य असा भेद करता येत नाही. मातीचे ज्ञान झाले तर मातीपासून बनलेल्या विविध वस्तूंचेही ज्ञान होते.

प्रमाण –

**यथा सोम्यैकेन मृत्पिण्डेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्याद्वा–**
**चाऽऽरम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् । ६–१–४**

– छांदोग्य उपनिषद

'वाचारम्भणं' म्हणजे 'वाणीपासून आरंभ' म्हणजे 'बोलण्यापुरते' म्हणजे 'नाममात्र'. समजा, मातीपासून घट, पळी, मूर्ती इत्यादी वस्तू

तयार केल्या. घटाकडे बोट दाखवून कोणी म्हणतो 'हा घट आहे'. घटाला एक विशिष्ट रूप आहे आणि रूपावर 'घट' या नामाची कल्पना मनुष्याने केली आहे. घटाचे स्वरूप मातीच आहे. पळीला 'पळी' हे नाम मनुष्याने दिले आहे. परंतु, पळी ही देखील मातीरूपच आहे. मातीचे आकार आणि नामे खोटी असून माती हीच खरी आहे. या दृष्टांतातील मातीच्या ठिकाणी ब्रह्म घ्यावे. जगतातील पदार्थांचे विविध आकार आणि नामे जरी लक्षात येतात तरी सर्व पदार्थ ब्रह्मस्वरूपच आहेत. ब्रह्मच सत्य असून जगत् मिथ्या आहे. साधकाने एका ब्रह्माचाच नि:संशय दृढ निश्चय केला तर पदार्थ मिथ्या आहेत हे निश्चितपणे लक्षात येईल.

पूर्वपक्ष–१६ : ब्रह्माच्या ठिकाणी एकत्व आणि नानात्व दोन्ही आहेत. मातीपासून बनलेल्या वस्तूंच्या रूपाने नानात्व आहे आणि एकच माती या रूपाने एकत्व आहे.

सिद्धांतपक्ष–१६ : तसे नाही. ब्रह्माचे एकत्व हेच सत्य आहे. त्यामुळे नानात्वाला जागाच नाही. मातीच्या दृष्टांतात 'मातीच सत्य' असे श्रुती सांगते. घट, पळी इत्यादींना 'नाममात्र' ठरवून नाम, रूपांना मिथ्यत्व सांगितलेले आहे. नानात्व अजीबात नाही.

प्रमाण –

**नेह नानास्ति किञ्चन । ४–४–१९**

– बृहदारण्यक उपनिषद्

ज्या माणसांचा नानात्वाचा निश्चय असतो, त्यांचे जन्म–मरण चक्र कायम राहते.

प्रमाण –

**मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति । ४–४–१९**

– बृहदारण्यक उपनिषद्

जीवन्मुक्त महापुरुषांना 'आत्मा ब्रह्मरूपच आहे' असा निश्चय असल्यामुळे ते कोणाला कशाने पाहणार?

प्रमाण – 

यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत् तत्केनकं पश्येत् ।। २–४–१३

– बृहदारण्यकउपनिषद्

पूर्वपक्ष–१७ : लोक लौकिक आणि वैदिक कर्म करताना दिसतात. कृषी, वाणिज्य, अध्यापन, सेवा इत्यादी लौकिक कर्म आहेत. स्वर्गप्राप्तीसाठी केलेले कर्म, उपासना आणि योग हे वैदिक कर्म आहेत. लौकिक, वैदिक कर्म करण्यासाठी भेद मानणे गरजेचे आहे. तुम्ही अद्वैत वेदांती म्हणता, 'एक, निर्गुण, अकर्ता ब्रह्मच आहे'. एकत्वाच्या निश्चयाने लौकिक, वैदिक कर्म होणार कसे ?

सिद्धांतपक्ष–१७ : जोपर्यंत मनुष्याची अज्ञान अवस्था असते, तोपर्यंत लौकिक, वैदिक व्यवहार होणारच आणि ते सत्यत्वाने होणार. जोपर्यंत मनुष्य स्वप्न पाहत असतो तोपर्यंत ते स्वप्न त्याला खरे वाटत असते. जीवन्मुक्त स्थिती प्राप्त झाल्यास म्हणजे ब्रह्माच्या एकत्वाचा ठाम निश्चय झाल्यावरही प्रारब्धामुळे लौकिक, वैदिक कर्म सुरू राहू शकतात. तात्पर्य, ब्रह्माचे एकत्व मानल्यास लौकिक, वैदिक कर्म करण्यास प्रतिबंध होत नाही.

पूर्वपक्ष–१८ : तुम्ही अद्वैत वेदांती 'जगत् मिथ्या आहे' असे मानता. त्यामुळे वेदांतशास्त्र हेही मिथ्या ठरते आणि ब्रह्म प्रतिपादन करणारी शास्त्रेही मिथ्या ठरतात. मिथ्या शास्त्राने सत्य ब्रह्माचे ज्ञान होणार कसे ?

सिद्धांतपक्ष–१८ : मिथ्या पदार्थांपासून सत्य वस्तूचे ज्ञान होत नाही असे नाही. समजा, एका माणसाला स्वप्न पडले की एक वाघ त्याच्या पाठीमागे लागला आणि तो माणूस घाबरून पळू लागला. स्वप्न अचानक भंग पावून जर तो मनुष्य जागा झाला तर त्याची छाती धडधडत आहे, असे स्पष्टपणे त्याला जाणवते. सापेक्षित मिथ्या वाटणाऱ्या स्वप्नामुळे सापेक्षित सत्य वाटणाऱ्या जागृतीत छाती धडधडण्याचा परिणाम जाणवतो. त्याप्रमाणे मिथ्या शास्त्राने सत्य ब्रह्माचे ज्ञान होते.

पूर्वपक्ष–१९ : तुम्ही अद्वैत वेदांती ब्रह्माचे एकत्व मानता. त्यामुळे सृष्टी निर्माण करणारा व सृष्टीचे नियमन करणाऱ्या ईश्वराला जागा कुठे आहे ?

सिद्धांतपक्ष–१९ : जगत् हे केवळ जड मायेपासून झालेले नाही आणि परमाणूंपासूनही झालेले नाही.

प्रमाण – 

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः।
आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। २-१
– तैत्तिरीय उपनिषद्

त्या या आत्म्यापासून आकाश, आकाशापासून वायू, वायूपासून अग्नी, अग्नीपासून जल आणि जलापासून पृथ्वी आली असे स्पष्टपणे श्रुती सांगते. ईश्वर मायेशी युक्त होऊन सृष्टी निर्माण करतो. ईश्वर आणि माया भिन्न आहेत, असे म्हणता येत नाही. जड मायेला सत्ता ईश्वराची आहे. परंतु, अज्ञानी जीवांना ईश्वर आणि माया यांचा विवेक नाही. माया ईश्वरस्वरूप आहे असेही म्हणता येत नाही. ईश्वराने मायेची कल्पना केली आहे. ती माया जगताचे बीज असून नाम, रूपाने व्यक्त झालेली आहे. ईश्वरत्व हे माया या उपाधीवर अवलंबून आहे. तो ईश्वर सर्व प्रकारची नाम, रूपे करून व्यवहार करतो.

पूर्वपक्ष–२० : कारणामध्ये कार्याचे अस्तित्व असणे शक्य नाही.

सिद्धांतपक्ष–२० : कारण असेल तर कार्य होते. कारण नसेल तर कार्य उपलब्ध होत नाही. उदाहरणार्थ – माती असेल तर घट तयार होतो. कार्य–कारण संबंध सिद्ध होण्यासाठी कारणामध्ये विशिष्ट कार्यांची क्षमता पाहिजे. कुत्रा आणि सोन्याचे दागिने यांच्यामध्ये कार्य–कारण संबंध असणे शक्यच नाही. परंतु, माती या कारणापासून घट हे कार्य होते. उत्पत्तीच्या पूर्वी जगत् हे कार्य, ब्रह्म या कारणात कारणरूपाने म्हणजे ब्रह्मरूपानेच होते.

प्रमाण –

आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्। १-१-१
– ऐतरेय उपनिषद्

पूर्वी जगत् हे आत्माच होते. म्हणजे महाप्रलयकाली कारण–कार्याची एकता होती. ब्रह्म हे कारण त्याच्या सत्, चित्, सुख या स्वरूपलक्षणांना कधीही सोडत नाही. उत्पत्ती झाल्यानंतर जगत् या कार्यामध्येही ही लक्षणे अनुस्यूत होतात. म्हणून, जगताच्या स्थितीकालीही कार्य–कारण ऐक्य असते. घटामध्ये मातीच असते. घटाचे रूप आणि नाम हे मिथ्या आहेत. जगत् हे कार्य, ब्रह्म या कारणरूपाने सत्य आहे. जगत्‌रूपाने जगत् हे मिथ्या आहे. ज्याप्रमाणे, मातीचे घट, पळी इत्यादी झाले आहेत,

पूर्वपक्ष–२१ : सोनार हा सोन्यापासून वेगळा राहून दागिने घडवतो, म्हणून सोनार दागिन्याचा निमित्तकारण आहे. त्याप्रमाणे 'त्याने विचार करून सृष्टी निर्माण केली' या श्रुतीप्रमाणे ब्रह्म हे जगताचे केवळ निमित्तकारणच होऊ शकते. उपादानकारण हे कार्याशी एकरूप असल्यामुळे कार्य निर्माण करू शकत नाही.

सिद्धांतपक्ष–२१ : ब्रह्म हे जगताचे अभिन्ननिमित्तोपादानकारण आहे. 'त्याला जाणले की बाकी सर्व जाणले जाते' अशी एक श्रुती आहे. निमित्तकारण कार्यापासून वेगळे राहते म्हणून निमित्तकारण जाणल्याने सर्व कार्य जाणता येत नाही. कुंभार हा घटाचे निमित्तकारण आहे. कुंभाराला जाणल्याने मातीपासून बनलेले सर्व पदार्थ जाणता येत नाहीत. सृष्टी निर्माण करण्यासाठी वेगळ्या निमित्तकारणाची गरज ब्रह्माला नाही कारण ब्रह्म हे एकमेवाद्वितीय आहे. 'त्याने ईक्षण करून सृष्टी केली' या श्रुतीप्रमाणे ब्रह्माने विचारपूर्वक सृष्टी केली म्हणून ब्रह्म हे जगताचे निमित्तकारण आहे आणि 'मी बहु व्हावे' या श्रुतीप्रमाणे ब्रह्मच जगत्‌रूपाने नटलेले आहे. म्हणून ब्रह्मच जगताचे उपादानकारणही आहे.

पूर्वपक्ष–२२ : मनुष्य इंद्रियांनी कर्म करतो हे व्यवहारात प्रसिद्धच आहे. एखादे यंत्र बनवायचे जरी ठरविले तरी त्या क्षेत्रात पारंगत असलेले लोक एकत्र येऊन ते यंत्र तयार करतात. जगत् हे अफाट आहे आणि ते मनुष्याच्या बुद्धीला आकलन होण्यासारखे नाही. छोट्या कार्यासाठीच जेथे अवयवांची गरज दिसून येते, तेथे जगत्‌रूपी मोठे कार्य करण्यासाठी अवयवयांची आवश्यकता असणारच. परंतु, तुम्ही अद्वैत वेदांती म्हणता की 'ब्रह्माला अवयव नाहीत' आणि असेही म्हणता की 'ब्रह्म जगताचे कारण आहे'. ब्रह्म हे इंद्रियांशिवाय एवढे मोठे जगत् कसे काय निर्माण करणार?

सिद्धांतपक्ष–२२ : ब्रह्म हे अनेक प्रकारच्या शक्तींनी युक्त आहे.

प्रमाण –

**सर्वकर्मा सर्वकामः सर्वगंधः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽवाक्यनादर। ३–१४–४**

– छांदोग्य उपनिषद

ब्रह्म सर्व कर्मे करणारे, सर्व इच्छांनी युक्त, सर्वगंधरूप, सर्वरसरूप असून वाक् इंद्रियरहित आणि संभ्रमरहित आहे. ब्रह्म इंद्रियरहित जरी असले तरी मायेशी युक्त होऊन ते जगत् प्रपंच मांडते.

प्रमाण –

**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षु: स शृणोत्यकर्ण: ।**
**स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम् ।।३–१९**

– श्वेताश्वतर उपनिषद्

पाय नसूनही तो वेगवान आहे. हात नसूनही तो ग्रहण करतो. डोळे नसूनही तो पाहतो आणि कान नसूनही तो ऐकतो. तो सर्वांना जाणतो पण कोणी त्याला जाणणारा नाही. सर्वांचे कारण असल्यामुळे ब्रह्मवेत्ता मुनी त्याला 'प्रथम' आणि 'महान' म्हणतात.

पूर्वपक्ष–२३ : मनुष्यदेहातील बहुसंख्य जीव अन्न, धन, मान मिळविण्याच्या प्रयोजनाने कर्म करत असतात. व्यावहारिक स्वार्थ साधतांना मनुष्य दिसतो. दैनंदिन जीवनातील अत्यंत साधारण व्यवहारामागेही सकाम भाव असतो. म्हणून अचिंत्य अशा जगत्कार्यामागे ब्रह्माचे प्रयोजन असायला पाहिजे. प्रयोजन असेल तर 'ते सदा तृप्त आहे' हे लक्षण खोटे ठरेल. वेडा मनुष्य जसे प्रयोजन नसतांना एखादे काम करतो, तसे ब्रह्म जर जगत् निर्माण करत असेल तर ब्रह्म हे सर्वज्ञ ठरत नाही.

सिद्धांतपक्ष–२३ : एक निरोगी, स्वस्थ मनाचा राजा आहे. तो राजमहालात राहतो आणि सेवेत अनेक दास, दासी आहेत. राजा म्हटला की ऐश्वर्य आलेच. आता तो राजाच असल्यामुळे कधी दरबार भरवेल किंवा एखाद्या दिवशी दरबार भरविणार नाही. त्याला वाटले तर पंडितांना आणि कलाकारांना दान देईल. त्याला वाटले तर अचानक शिकार करण्यास जाईल किंवा उद्यानामध्ये सहज फिरत राहील. अशाप्रकारे, प्रयोजनाशिवाय व्यवहार करणे, यास 'लीला' असे म्हणतात.

प्रमाण –

**लीलाश्वासवृथाचेष्टा अनुद्दिश्य फलं यत: ।**
**अनुन्मत्तैर्विरच्यन्ते तस्मात्तृप्तस्तथा सृजेत् ।।२–१–११**

– स्वामी सदाशिवेंद्र सरस्वतीकृत ब्रह्मसूत्रभाष्यटीका

स्वस्थ मनाच्या मनुष्याच्या श्वासोच्छ्वासाची क्रिया सहजपणे प्रयोजनाशिवाय म्हणजे लीलेने चालते. त्याप्रमाणे, ईश्वर लीलेने सृष्टी करतो. लीला करणे हा ईश्वराचा स्वभाव आहे. ईश्वर लीला का करतो ? – असा प्रश्न विचारता येत नाही. स्वत:ला निष्काम समजणाऱ्या साधकाकडून थोडे तरी सकाम कर्म घडतेच. परंतु, ईश्वराच्या संबंधात कोणतेच प्रयोजन मानता येत नाही. जीवाच्या दृष्टीने जगत्कार्य अचिंत्य, अफाट असले तरी ईश्वर हा सर्वशक्ती, सर्वज्ञ असल्यामुळे त्याच्यासाठी जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय करणे ही लीलाच आहे. श्रुतीत अनेक ठिकाणी 'जगताची उत्पत्ती होते' हे सांगितले आहे. ते जगत् ईश्वराने मायेद्वारा कल्पिलेले आहे. जगत् हे पारमार्थिक सत्य नाही. सृष्टी व्यवहार सांगण्यामागे 'आत्मा हा ब्रह्मस्वरूपच आहे' हाच सिद्धांत साधकाच्या मनावर ठसविण्याचा उद्देश श्रुतीचा आहे.

*****

## चिंतन क्रमांक – २४
## अध्यास

उपनिषदांमध्ये 'अविद्या' हा शब्द आलेला आहे. अविद्या म्हणजे 'आत्म्याचे अज्ञान'. परंतु , एवढ्याच शब्दांनी अविद्येचे स्वरूप साधकाला लक्षात येणे कठीण आहे. ब्रह्मसूत्रभाष्याच्या आणि जो स्वयंस्फूर्त उपोद्घात भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी लिहिला, त्यास अध्यासभाष्य म्हणतात. अध्यासभाष्यात साधारणपणे ४०० शब्दच आहेत. परंतु , त्यात वेदांतदर्शनाचे सार अत्यंत सुगम्य पद्धतीने दिलेले आहे. अध्यास आणि अविद्या हे समानअर्थी शब्द आहेत. अध्यासाची एक निश्चित व्याख्या श्री आचार्यांनी दिलेली आहे. अध्यास दैनंदिन व्यवहारात कसा व्यक्त होतो याचे वर्णन त्यांनी सुस्पष्ट आणि हृदयग्राह्य रितीने केलेले आहे. अविद्या ही परत परत जन्मणे आणि परत परत मरणे या अनर्थास कारण आहे. ब्रह्म आणि आत्मा यांच्या ऐक्यनिश्चयाने अविद्येचा संपूर्ण उच्छेद होतो.

'मिथ्या' या शब्दाचा अर्थ 'नाश करण्यायोग्य' असा नाही. ब्रह्माच्या दृष्टीने जगत् नाहीच. परंतु, जगत् तर दिसते. ज्याच्या ठिकाणी जे नाही त्याच्या ठिकाणी ते दिसणे म्हणजे 'मिथ्या' होय, यालाच 'भ्रम' किंवा 'अध्यास' असे म्हणतात. ज्या पदार्थाचा अध्यास झालेला असतो त्या पदार्थाला आणि त्या पदार्थाच्या ज्ञानाला 'अध्यस्त' असे म्हणतात. ज्यावर अध्यास झालेला असतो, त्याला 'अधिष्ठान' असे म्हणतात. समष्टीने ब्रह्म या अधिष्ठानावर जगत् अध्यस्त आहे. व्यष्टीने आत्मा या अधिष्ठानावर चार देह (स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण) अध्यस्त आहेत. अध्यासाचा निरास करण्यासाठीच मनुष्य देह मिळालेला आहे. अध्यास निरासानेच आत्यंतिक दु:खाची निवृत्ती आणि शाश्वत परमसुखाची प्राप्ती होते.

ब्रह्म या अधिष्ठानावर जगत् आरोपित आहे. आरोपित पदार्थ मिथ्या असतो. अधिष्ठान ब्रह्म हे सत्य आहे. मिथ्या पदार्थ हा अधिष्ठानावर भासतो, अधिष्ठानाएवढा भासतो आणि अधिष्ठानाचे ज्ञान झाले की अधिष्ठानरूप होतो.

एक उदाहरण पाहू. संध्याकाळच्या वेळेस धड प्रकाश नाही व धड अंधार नाही अशी परिस्थिती आहे. समजा, रस्त्यावर एके ठिकाणी दोरी पडलेली आहे. एक मनुष्य त्या रस्त्याने जात असताना त्या दोरीजवळ आला. 'इथे काहीतरी लांबट, नागमोडी आकाराचे पडलेले आहे' असे दोरीबद्दल सामान्य ज्ञान त्याला झाले. सोबतच 'ही दोरीच आहे' असे दोरीचे विशेष ज्ञान त्याला नसल्यामुळे त्याला दोरीच्या ठिकाणी सर्प दिसतो. दोरीच्या सामान्य ज्ञानात आणि दोरीच्या विशेष ज्ञानाच्या अज्ञानात दोरीवर सर्पाचा अध्यास म्हणजे भ्रम होतो. सर्प तेथे प्रत्यक्षात नाही, भासलेला आहे. परंतु, तो मनुष्य त्या सर्पाला सत्य समजून पळू लागतो. पुढे अनेक वेळा पडतो. त्याला अनेक जखमा होतात. त्याचे पुष्कळ हाल होतात.

दृष्टांतातील मंद अंधकाराच्या ठिकाणी स्व-स्वरूपाचे अज्ञान घ्यावे. मनुष्याच्या ठिकाणी जीव घ्यावा. दोरीच्या ठिकाणी ब्रह्म आणि सर्पाच्या ठिकाणी जगत् घ्यावे. जगत् हे ब्रह्मस्वरूपच आहे. परंतु, जीवाला 'हे काहीतरी' असे ब्रह्माचे सामान्य ज्ञान असते. सोबतच 'जगत् ब्रह्मस्वरूपच आहे' असे ब्रह्माचे विशेष ज्ञान त्याला नसते. म्हणून, त्याचा ब्रह्मनिश्चय न होता त्याला जगत् दिसते. जगत् प्रत्यक्षात नाही, भासलेले आहे. परंतु, तो जीव जगताला सत्य समजून जगतातील पदार्थांमागे धावू लागतो. त्याला सुख-दुःखाचे असंख्य धक्के बसतात. सामान्याच्या ज्ञानात आणि विशेषाच्या अज्ञानात अध्यास-भ्रम होतो. भ्रमाला खरे समजल्यामुळे जीवाचे अनंत काळापासून हाल होत आहेत.

समजा, उदाहरणातील त्या मनुष्याला पुढे एक सद्गृहस्थ भेटला. सद्गृहस्थाच्या हातात कंदील होता. सद्गृहस्थ त्या मनुष्याला जिथे दोरी पडली होती तेथे घेऊन गेला आणि त्याने कंदीलाच्या प्रकाशात 'ही दोरीच आहे' असे दाखवून दिले. आता तो मनुष्य निश्चिंत होतो.

त्याचप्रमाणे, संसारात सैरावैरा धावणाऱ्या जीवाला काकताल न्यायाप्रमाणे श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ आणि दयाळू सद्गुरू भेटले, तर त्यांच्या कृपेने जीवाला अधिष्ठान ब्रह्माचे ज्ञान होऊन अध्यासाचा निरास होतो.

ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्वांना 'मी आहे' असे वाटते. कोणत्याही प्रापंचिक धर्मांशी संबंधीत नसलेला जो 'मी' आहे तोच आत्मा आहे, म्हणजेच ब्रह्म आहे. चारही वाणींनी ज्या 'मी'चा उच्चार होऊ शकत नसून, जे 'मी' चारही वाणींच्या पलीकडे आहे, ते 'मी' हा आत्मा म्हणजेच ब्रह्म आहे. परंतु, ब्रह्मदेवापासून मनुष्यापर्यंत आणि मनुष्यापासून मुंगीपर्यंत सर्वजण या 'मी'चा संबंध देह आणि देह धर्मांशी सत्यत्वाने जोडतात. याचे कारण म्हणजे अनात्म्यावरचा आत्म्याचा अध्यास. बाह्य पदार्थांशी संबंध जोडणे हा अध्यास आहे. उदाहरणार्थ – 'स्त्री, धन, पुत्र ही माझी आहेत', तसेच, 'मी गोरा आहे', 'मी बाप आहे', 'मी राम देशपांडे आहे' अशाप्रकारे, स्थूलदेहावरील आरोपित धर्मांना सत्यत्व देणे हाही अध्यास आहे. 'मी दुःखी', 'मी पुण्यवान' हे सूक्ष्मदेहाच्या धर्मांना सत्यत्व देणे हेही अध्यासामुळे होते. 'मी मलाच ओळखत नाही' हे कारणदेहाच्या धर्माला सत्य समजल्यामुळे अध्यासमूलकच आहे. महाकारणदेहाच्या धर्माला सत्यत्व देऊन 'मी ज्ञानी आहे' ही समज देखील अध्यासामुळेच होते. जीवन्मुक्त महापुरुष वगळता अज्ञानी मनुष्यांचा लौकिक, वैदिक सर्व व्यवहार अध्यासामुळे होतो. अनंत जन्मांपासूनच्या स्व-स्वरूपाच्या अज्ञानामुळे निर्माण झालेल्या सूक्ष्म, स्थूलप्रपंचात गुरफटल्याने 'अध्यास म्हणून काही असते' याचे ज्ञानच बहुसंख्य जीवांना नाही. 'इतर लोक व्यवहार करताना दिसतात म्हणून आपणही तसाच व्यवहार करत रहावा' असा अज्ञानी जीवांचा संकल्प असतो.

अज्ञानी मनुष्य देहाला 'मी' समजतो. सोबतच इंद्रिये, देहधर्म, बाह्य पदार्थ इत्यादींना 'माझे' समजतो. म्हणूनच, अध्यास होतो. देहावर 'मी' असा अभिमान आणि इंद्रियादिकांवर 'माझे' असा अभिमान ठेवल्याने अध्यास दृढ होतो.

प्रमाण –


**मुक्त होतां परि बळें झाला बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ।।**

**– श्री संत तुकाराम महाराज गाथा**

देह जड असल्यामुळे तो बाह्य पदार्थांशी स्वतःहून व्यवहार करत नाही. देहावर आत्म्याचा अध्यास होतो म्हणून व्यवहार होतो.

आत्मा या धर्मीचे सत्, चित्, आनंद इत्यादी धर्म आहेत. देह या धर्मीचे जडपणा, अनित्यत्व इत्यादी धर्म आहेत. आत्मा आणि शरीर हे दोन धर्मी एकमेकांच्या दृष्टीने उजेड–अंधार याप्रमाणे भिन्न आहेत, विरुद्ध आहेत. आत्मा आणि देह या धर्मींचे तादात्म्य नाहीच हे निःसंशयपणे जाणणे, याला विवेक म्हणतात. त्याचप्रमाणे सत्, चित्, आनंद या धर्मांचे जडपणा, अनित्यत्व या धर्मांसोबत मिश्रण होऊच शकत नाही, याला विवेक म्हणतात.

प्रमाण –

**परमार्थतो धर्मिणोरतादात्म्यं विवेकः। धर्माणां चासंकीर्णता विवेकः।।**

**– वाचस्पति मिश्रकृत भामती**

परमार्थतः दोन धर्मींचे तादात्म्य नसणे, याला विवेक असे म्हणतात. तसेच, धर्मांची असंकीर्णता म्हणजेच मिश्रण न होणे, याला विवेक असे म्हणतात. परंतु, जीवन्मुक्त महापुरुष सोडून इतर सर्व जीवांना हा विवेकच नसल्यामुळे आत्म्याचा अनात्म्यावर अध्यास आणि अनात्म्याचा आत्म्यावर अध्यास होतो. त्यामुळे 'मी पुरुष आहे', 'मी सुखी आहे' इत्यादी अध्यासमूलक व्यवहार होतो.

प्रमाण –

**सत्यानृते मिथुनीकृत्य, 'अहमिदं ममेदं' मिति नैसर्गिकोऽयं लोकव्यवहारः ।**

**– भगवान श्री आद्य शंकराचार्यकृत अध्यासभाष्य**

'सत्य' म्हणजे आत्मा. 'अनृत' म्हणजे मिथ्या. अनृत हा शब्द देह, इंद्रिय, बाह्य पदार्थ इत्यादी मिथ्या पदार्थ दाखवतो. सत्य आणि अनृत यांचे मिथुनीकरण–एकत्रीकरण होऊन अध्यास संभवतो. 'बाह्यपदार्थ, इंद्रिये, देहधर्म ही माझीच आहेत', याला मिथुनीकरण म्हणतात. देह आणि आत्मा या दोन धर्मींचे मिथुनीकरणामुळे अज्ञानी जीवांच्या संबंधी अध्यास सिद्ध होतो. असे मिथुनीकरण झाल्यामुळे 'अहं इदं' म्हणजे 'मी पुरुष आहे', 'मी पापी आहे' आणि 'मम इदं' म्हणजे 'पदार्थ माझे आहेत' असा अध्यास होतो.

मंद अंधकारात दोरीवर सर्प दिसल्यावर 'इदं सर्पः' – 'हा सर्प आहे' असा अध्यास होतो. या ठिकाणी 'इदं' म्हणजे 'हा' आणि 'आहे' हे अंश दोरीचे आहेत आणि ते खरे आहेत.

परंतु, 'सर्प' हा अंश मिथ्या आहे.

दैनंदिन व्यवहारात एखादा मनुष्य 'मी चांगला आहे' असे समजत असेल तर 'मी' ही जाणीव आणि 'आहे' हे अस्तित्व, हे दोन्ही आत्म्याचे आहेत आणि 'चांगला' हा अंत:करणाचा धर्म असल्यामुळे तो मिथ्या आहे. सत्य आणि मिथ्या यांच्या मिथुनीकरणामुळे 'मी चांगला आहे' असा निश्चय असतो. तो अध्यासमूलक आहे. या प्रकारच्या असंख्य आध्यासिक प्रत्ययांना सत्य समजून मनुष्य त्याप्रमाणेच वर्तन करतो किंवा त्यात बदल करण्यातच धन्यता मानतो.

**स्मृतिरूप: परत्र पूर्वदृष्टावभास:** असे अध्यासाचे मुख्य लक्षण आहे. 'स्मृतिरूप' म्हणजे 'स्मरणातल्या पदार्थासारखे'. 'पूर्वदृष्ट' म्हणजे पूर्वी पाहिलेला. 'परत्र' म्हणजे सत्य अधिष्ठानाच्या ठिकाणी. 'अवभास' म्हणजे मान्य नसलेला भास. पूर्वीचे प्रत्यय मनुष्याच्या चित्तात संस्काररूपाने असतात. मंद अंधारात मनुष्याला दोरीवर साप का दिसला? पूर्वी केव्हातरी पाहिलेल्या सापाचे स्मरण झाले आणि समोरची दोरी साप म्हणून भासू लागली. प्रत्यक्षात व्यावहारिक दोरीवर प्रातिभासिक साप दिसला – हाच अवभास म्हणजे मान्य नसलेला भास. सर्प हा स्मरणातला आहे. स्मरणातला पदार्थ प्रत्यक्षात समोर नसतो, केवळ आठवणीतला असतो. म्हणून सर्प मिथ्या ठरतो. या दृष्टांताप्रमाणे मनुष्याला अनंत जन्मांपासून जगतातल्या असंख्य पदार्थांची स्मृती आहे. त्याला 'परत्र' म्हणजे सत्य अधिष्ठान ब्रह्माची ओळख नाही. अज्ञानी जीवासाठी जगत् हे पूर्वी पाहिलेले म्हणजे 'पूर्वदृष्ट' आहे. अज्ञानामुळे सत्य ब्रह्मावर जगताचा अध्यास होतो, यालाच 'अध्यास' म्हणजे मान्य नसलेला भास म्हणतात.

पूर्वीच्या चिंतनात आपण पाहिले की जागृती प्रपंच आणि स्वप्न प्रपंच हे एकमेकांपासून अत्यंत भिन्न आहेत. जागृतीतील प्रमाता–प्रमाण–प्रमेय आणि स्वप्नातील प्रमाता–प्रमाण–प्रमेय यांच्यामध्ये संबंध नसतो. जागृतीतील स्थूलदेह हा पंचीकृत पंचमहाभूतांचे कार्य आहे व स्वप्नातील देह हा निद्रादोषसहित अविद्येचे कार्य आहे. अध्यास जागृत अवस्थेतही होतो आणि स्वप्न अवस्थेतही होतो. देहाला 'मी' व इंद्रियादिकांना 'माझे' समजल्याने अध्यास होतो. असा अभिमान जागृती अवस्थेत असतो आणि स्वप्न अवस्थेतही असतो. म्हणून, जागृत आणि स्वप्न या दोन अवस्थेत अध्यास होतो.

अध्यासाचे वर्गीकरण 'कारणाध्यास' आणि 'कार्याध्यास' असे आहे. पूर्वी आपण अभ्यास केला की कारणदेहापासून म्हणजेच अविद्येपासून सूक्ष्मदेह आणि स्थूलदेह आले आहेत. कारणदेहाला 'कारण' आणि सूक्ष्म, स्थूलदेहांना 'कार्य' म्हणतात. 'मी स्वत:ला जाणत नाही' असा निश्चय असणारा साधक आत्म्यावर आत्म्याच्याच अज्ञानाचा आरोप करतो, याला 'कारणाध्यास' म्हणतात. सूक्ष्म, स्थूलदेह आणि त्यांच्या धर्मांच्या आत्म्यावरील अध्यासाला 'कार्याध्यास' म्हणतात.

अध्यासाचे वर्गीकरण 'स्वरूपाध्यास' आणि 'संसर्गाध्यास' असेही आहे. आत्म्यावर अनात्म्याचा अध्यास म्हणजे 'स्वरूपाध्यास' व अनात्म्यावर आत्म्याचा अध्यास

म्हणजे 'संसर्गाध्यास' होय, यांना मिळून 'अन्योन्याध्यास' असे म्हणतात. जगातील अज्ञानी जीवांचा व्यवहार अन्योन्याध्यासात चाललेला आहे.



स्वरूपाध्यास म्हणजे काय? आत्म्यावर अनात्म्याचा अध्यास म्हणजे स्वरूपाध्यास. रज्जूच्या ठिकाणी सर्प भासतो तेव्हा रज्जू हे अधिष्ठान असून त्यावर सर्प अध्यस्त आहे, याला स्वरूपाध्यास असे म्हणतात. सिद्धांतात, ब्रह्मावर जगताच्या अध्यासाला 'स्वरूपाध्यास' म्हणतात.

संसर्गाध्यास म्हणजे काय? दोरीच्या ठिकाणी सर्प भासला म्हणून 'हा सर्प आहे' असे समजतो. येथे 'हा' वास्तविक दोरीला उद्देशून वापरलेला आहे. परंतु, भ्रमाने तो दोरीच्या 'हा'चा संबंध सर्पाशी जोडतो. सर्पाच्या ठिकाणी दोरीचा अध्यास नसून, सर्पाशी दोरीच्या 'हा'चा संबंध अध्यस्त आहे. म्हणून, या अध्यासाला संसर्गाध्यास म्हणतात. सिद्धांतामध्ये, ब्रह्मस्वरूप असलेल्या जगताला 'हे जगत् आहे' असे समजतो. जगताच्या ठिकाणी ब्रह्माचा अध्यास नसून जगताशी ब्रह्माच्या 'हे'चा संसर्ग अध्यस्त आहे, म्हणून या अध्यासाला 'संसर्गाध्यास' असे म्हणतात.

या अन्योन्याध्यासामुळे जीव बंधनात अडकलेला आहे. जीवन्मुक्त स्थितीसाठी अध्यासनिरास होणे गरजेचे आहे. श्रीगुरूंच्या श्रीमुखातून महावाक्याचे निरूपण साधकाने श्रद्धापूर्वक श्रवण केले तर अध्यासाचा निरास होतो. अध्यासाचा निरास झाल्याने 'ब्रह्म सत्य आणि जगत् मिथ्या' असा ठाम निश्चय होतो. 'ब्रह्म सत्य आणि जगत् मिथ्या' या सिद्धांताला 'विवर्त' असे म्हणतात आणि हा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे.

भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी 'जगत् मिथ्या' असे म्हटले आहे. 'जगत् असत्य' असे म्हटलेले नाही. असत् पदार्थ नसतोच. सत् पदार्थ असतोच. जगत् नाही म्हणावं तर दिसते. जगत् आहे म्हणावं तर ब्रह्मज्ञानाने जगताचा बाध होतो. म्हणून, जगताला सत् म्हणावं की असत् म्हणावं असा प्रश्न पडतो. सत् व असत् पदार्थ एका ठिकाणी राहत नाहीत. म्हणून, जगत् हा एक विलक्षण पदार्थ असून त्याला 'सतासत्विलक्षण', 'अनिर्वचनीय' अर्थात 'मिथ्या' असे म्हटले आहे.

जगताचे मिथ्यत्व शास्त्रात चार प्रकारे सांगितले आहे –

**१) नाशिवंत :** जगतात दिसून येणारी नाम, रूपे ही नाश पावणारी आहेत.

प्रमाण –

**हा संसारवृक्षु तैसा । मोडतु मांडतु सहसा ।**
**न देखोनि लोकु पिसा । अव्ययो मानी ।।१३८।। अध्याय १५**

**– श्रीज्ञानेश्वरी**

**२) स्वप्नवत् :** जगत् स्वप्नासारखे आहे. व्यवहारात मनुष्य जागृतावस्थेच्या तुलनेत स्वप्नावस्थेला खोटे समजतो. जागृत अवस्थेतील व्यवहार व्यवहाराच्या दृष्टीने सत्य,

पण पारमार्थिक दृष्टीने मिथ्या आहेत. स्वप्नातले पदार्थ हे दिसण्यापुरतेच असतात, प्रत्यक्षात नसतात.



प्रमाण –

स्वप्नींही मानिलें लटिकें । तरी निर्वाहो कां एकसारिखें ।
तेवीं आभासु हा क्षणिकें । रिताचि गा ।।२४३।। अध्याय १५

– श्रीज्ञानेश्वरी

३) रज्जू–सर्पवत् : ब्रह्म या अधिष्ठानावर जगत् भ्रमाने भासलेले आहे. 'स्वप्नवत्' पेक्षा 'रज्जू–सर्पवत्' जगताची प्रचीती ही श्रेष्ठ स्थिती आहे. कारण रज्जू–सर्प दृष्टांतात अधिष्ठान रज्जूलाच किंमत आहे. म्हणजे सिद्धांतात जे ब्रह्म त्यालाच किंमत आहे. 'स्वप्नवत्' मध्ये स्वप्न कशावर दिसते ? असा प्रश्न येतो. 'रज्जू–सर्पवत् जगत्' असा निःसंशय निश्चय असलेल्या महापुरुषांना जीवन्मुक्त म्हणतात. विवर्तवादात सिद्धांत समजाविण्यासाठी रज्जू–सर्प हा दृष्टांत दिला जातो.

प्रमाण –

जैसें शिंपीपण हारपे । तंव तंव खरें होय रूपें ।
कां दोरी लपतां सापें । फार होइजे ।।३१०।। अध्याय १५

– श्रीज्ञानेश्वरी

४) वंध्यापुत्रवत्, आकाशपुष्पवत्, शशविषाणवत् (शिंग असलेल्या सशासारखे) : वंध्यापुत्र नसतोच, आकाशाचे फुल नसतेच, सशाला शिंगे नसतातच. त्याप्रमाणे, जगत् नाहीच. जगत् नव्हतेच आणि पुढे होऊच शकत नाही.

प्रमाण –

प्रपंचु एक जाला होता । हे समूळ मिथ्या वार्ता ।
पुढें होईल मागुता । कदा कल्पांता घडेना ।।११६।।

– श्री संत एकनाथ महाराजकृत हस्तामलक

केवळ ब्रह्मच आहे आणि मग ब्रह्माला 'ब्रह्म' हे नाव तरी कसे द्यावे ? या सिद्धांताला 'अजातवाद' असे म्हणतात. अशाप्रकारचा निश्चय ज्या महापुरुषांचा असतो, त्यांना 'विदेहमुक्त' म्हणतात. ते देहात असतानाच विदेह स्थितीत असतात.

पूर्वरूपाचा परित्याग होऊन रूपांतर होणे आणि ते रूपांतर सत्य असणे, याला परिणाम म्हणतात. परिणामात रूपांतरीत पदार्थ पुन्हा पूर्वरूपावर येऊ शकत नाही. ब्रह्माची

सत्, चित्, आनंद ही स्वरूपलक्षणे आहेत. जगत् हे जड आणि दुःखरूप आहे. 'ब्रह्माचा परिणाम जगत् झाले' असे म्हणावे, तर ब्रह्म हे जड, दुःखरूप ठरेल आणि ब्रह्माचे सच्चिदानंद हे स्वरूपलक्षण राहणार नाही. दूधाचे दही होणे हा परिणामासाठी दृष्टांत दिला जातो. दह्याचे परत दूधात रूपांतर होत नाही. त्यामुळे परिणामाला प्राप्त झालेले जगत् महाप्रलयात परत ब्रह्म कसे होईल ? तात्पर्य – ब्रह्माचा परिणाम जगत् नाही.

पूर्वरूपाचा परित्याग न होता रूपांतराचे भान होणे म्हणजे विवर्त. रज्जूमध्ये कुठलाही बदल न होता रज्जूवर सर्पाचा भास होतो. ब्रह्माच्या सच्चिदानंद स्वरूपलक्षणाला धक्का न लागता जगत् भासते. ब्रह्मात कोणताही बदल होत नाही. ब्रह्म या कारणात कोणताही बदल न होता जगत् हे कार्य भासते. जगत् हे ब्रह्मस्वरूप आहे. म्हणून, कार्य–कारणाचे ऐक्य सदैव आहे. म्हणून, जगत् हे ब्रह्माचे विवर्त आहे.

नवीन साधकाला एकदमच 'मी ब्रह्म' अशी खात्री होईलच असे नाही. बराच काळ ब्रह्म ज्ञेय वाटते आणि 'ते ब्रह्म' असा भाव साधकाचा असतो. साधकाने 'ते ब्रह्म' वरून 'मी ब्रह्म' या बोधावर यावे. सद्गुरूंचे वाक्य आणि शास्त्रवाक्य यांचा विचार करून 'मी ब्रह्म' असे परोक्षरूपाने संशयरहित स्पष्टपणे जाणावे. पुढे श्रीगुरुकृपेने ब्रह्माचे अपरोक्ष ज्ञान होते.

सर्व जीवांना स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव आहे. प्रत्येकाकडे 'मी' आहे. 'निरुपाधिक मी' आणि 'आध्यासिक मी' असे दोन प्रकारचे 'मी' आहे. 'निरुपाधिक मी' म्हणजेच कूटस्थ म्हणजेच आत्मा. कूटस्थ असंग आहे. त्याच्या ठिकाणी देश, काल आणि पदार्थ नाहीत. कूटस्थामध्ये वृत्ती नाही. देह आणि देहधर्मांशी 'निरुपाधिक मी'चा यत्किंचित्ही संबंध नाही. चारही वाणींनी 'निरुपाधिक मी'चा उच्चार होऊ शकत नाही. जीवन्मुक्त महापुरुषांचा 'निरुपाधिक मी'चा निःसंदेह आणि दृढ निश्चय असतो. परोक्ष, अपरोक्षातीत जे अपरोक्ष ब्रह्म, ते म्हणजेच 'निरुपाधिक मी' हा जीवन्मुक्त महापुरुषांना प्रत्यक्ष असतो.

अज्ञानी जीवांचा 'आध्यासिक मी'चा निश्चय असतो. 'महाकारण, कारण, सूक्ष्म, स्थूलदेह आणि बाह्य पदार्थांशी 'मी'चा सत्यत्वाने संबंध' एवढी मोठी व्याप्ती 'आभासिक मी'ची आहे. व्यष्टीने जागृत अवस्थेतील विविध लौकिक व्यवहारापासून ते मोक्षापर्यंतचा संसार जीवाने कल्पिलेला आहे. देह, देहधर्म आणि बाह्य पदार्थांशी 'मी आणि माझे' अशी दृढ समज या 'आध्यासिक मी'मुळे होते. कूटस्थ आणि चिदाभास यांचा विवेक नसणे म्हणजेच 'आध्यासिक मी' होय. त्यामुळे, 'संसारधर्म हे माझे आहेत' असे जीव समजतो. जणू काही चेतन आणि जड यांची पक्की गाठ पडलेली आहे, ग्रंथी तयार झालेली आहे. कूटस्थ आणि चिदाभास यांचा अन्योन्याध्यास म्हणजे 'आध्यासिक मी'. 'आध्यासिक मी' हा जीवाच्या बंधास कारण आहे. **आकृती क्रमांक ७६** वरून 'निरुपाधिक मी' आणि 'आध्यासिक मी' कळण्यास सोपे होईल.




आकृती क्रमांक ७६ – निरुपाधिक मी आणि आध्यासिक मी

बंधनकारक 'आध्यासिक मी' जाणार कसा? 'आध्यासिक मी' घालविण्यासाठी बाह्य पदार्थांचा द्वेष करणे हा उपाय नाही. उपवास, तप इत्यादी करून देहाला दंड देणे हाही उपाय नाही. सफेद, भगवे इत्यादी विशिष्ट वस्त्र धारण करणे हाही खरा उपाय नाही. वेदांत मार्गाचा अवलंब करणे हाच खरा उपाय आहे. वेदांत हा 'विचार' मार्ग आहे.

प्रमाण –

आम्ही कापडी रे आम्ही कापडी रे। पापें बारा वाटा पळती बापडी रे।।
पंढरपुरीचे आम्ही कापडी रे। उत्तरपंथीचे आम्ही कापडी रे।।
आजी पाहालें रे आजी पाहालें रे। संतसंगति सुख जालें रे।।
समता कावडी रे समता कावडी रे। माजी नामांमृत भरिलें आवडी रे।।
येणें न घडे रे जाणें न घडे रे। निजसुख कोंदलें पाहतां चहूंकडे रे।।
नलगे दंडणें रे नलगे मुंडणें रे। नाम म्हणोनी कर्माकर्म खंडणें रे।।
दुःख फिटलें रे दुःख फिटलें रे। बापरखुमादेविवर विठ्ठलें रे।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

'आध्यासिक मी' घालविण्यासाठी प्रपंचाचा नाश करणे हा उपाय नाही. प्रपंचाचा 'बाध' व्हायला पाहिजे. 'उपादानकारणासह कार्याचे भान नष्ट होणे' म्हणजे बाध. उदाहरणार्थ – मंद अंधारात दोरीवर सर्प भासतो. हा सर्पभ्रम का झाला? दोरीचे अज्ञान होते म्हणून सर्पभ्रम झाला. सर्पभ्रमाचे उपादानकारण दोरीचे अज्ञान आहे. कंदीलाच्या प्रकाशात 'ही दोरीच आहे' असा ठाम निश्चय जेव्हा होतो, तेव्हा 'दोरीचे अज्ञान' हे उपादानकारण राहत नाही व सर्प हे कार्यही निवृत्त होते, यालाच बाध असे म्हणतात.

याचप्रमाणे, जगत्‌भ्रम झालेला आहे. जगत्‌भ्रम का झाला? ब्रह्माचे अज्ञान होते म्हणून जगत्‌भ्रम झाला. ब्रह्माचे अज्ञान हेच जगत्‌भ्रमाचे उपादानकारण आहे. श्रीगुरूंच्या श्रीमुखातून महावाक्याचे श्रद्धापूर्वक श्रवण साधकाला घडले, तर ब्रह्माचे अज्ञान या उपादानकारणासह कार्य जे जगत् याची बाधरूप निवृत्ती होते.

मनुष्य दोरीजवळ येण्याच्या आधी तेथे सर्प नव्हता. नंतर कंदीलाच्या प्रकाशात 'सर्प नाही' हा निश्चय झाला. मधल्या काळात सर्प भासला, प्रत्यक्षात तेथे सर्प नव्हता. मधल्या काळात जे नाही ते दिसले. म्हणजे मधल्या काळात सर्प प्रत्यक्षात नसूनही तो दिसला. 'सर्प दिसत असूनही तो नाहीच' या निश्चयाला बाध असे म्हणतात. तसेच, शुक्तीवर रजत दिसत असूनही ते तेथे नाहीच असा निश्चय म्हणजे बाध होय. दिसतेकाळीच नाहीचा निश्चय म्हणजे बाध होय. 'जगत् प्रतितीकाळीही जगत् नाहीच' असा निश्चय म्हणजे जगताचा बाध होय.

सोन्यापासून विविध अलंकार बनविले जातात. सोनार त्याकडे 'सोने' या दृष्टीने पाहतो. इतर माणसे त्याकडे 'अलंकार' या दृष्टीने पाहतात. सोनाराच्या संगतीत राहिल्याने एखाद्या मनुष्याची 'अलंकारा'ची दृष्टी बाधित होते व अलंकार दिसत असतानाच त्याचा 'सोने' आहे असाच निश्चय होतो. 'अलंकार दिसतेकाळी सोनेच आहे', अशा निश्चयालाच बाध असे म्हणतात.

समजा, भिंतीवर चित्र लावलेले आहे. त्या चित्रात वाघ आहे. कोणी मनुष्य त्या वाघाच्या चित्राजवळ गेला तर तो वाघ कोणतीच हालचाल करीत नाही. चित्रातला वाघ हा दिसण्यापुरताच आहे, खरा नाही. मनुष्याच्या दृष्टीनें त्या वाघाचा बाध निश्चय आहे.

बाध करून ऐक्यनिश्चय याला बाधसमानाधिकरण म्हणतात. चिदाभासाचा बाध होऊन चिदाभास हा कूटस्थरूपच आहे, असा निश्चय म्हणजे बाधसमानाधिकरण.

ज्याचे ज्याच्याशी सदैव ऐक्य असते, त्याला मुख्यसमानाधिकरण म्हणतात. व्यष्टीने कूटस्थ आणि समष्टीने ब्रह्म हे सदैव एकच आहे. कारण कूटस्थ ब्रह्मरूपच आहे. या कारणांसाठी कूटस्थ आणि ब्रह्म यांचे मुख्यसमानाधिकरण आहे.

अविद्या निवृत्त झाली म्हणजे ब्रह्मनिश्चय होऊन प्रपंचाचा बाध होतो. यासाठी महावाक्याचे निरूपण श्रवण करण्याची गरज असते. त्यामुळे जीवब्रह्मैक्य निश्चय होतो. महावाक्याच्या श्रवणाने असा तात्पर्य निश्चय होण्याची प्रक्रिया लक्षात येण्यासाठी प्रथम मनुष्याला शब्दाचा अर्थ कसा कळतो हे समजून घेतले पाहिजे.

★★★★★

## चिंतन क्रमांक – २५

## तत्त्वमसि महावाक्य निरूपणाच्या प्रक्रिया

अक्षरांच्या समुहास 'पद' म्हणतात. पदांच्या समुहाला 'वाक्य' म्हणतात. उदाहरणार्थ – 'देवदत्त जात आहे' या वाक्यात 'देवदत्त', 'जात' आणि 'आहे' ही पदे आहेत. प्रत्येक पदात अक्षरे आहेत.

पदाच्या ठिकाणी अर्थाचा बोध करून देणाऱ्या दोन वृत्ती असतात – शक्तिवृत्ती आणि लक्षणावृत्ती. शक्तिवृत्ती कळली तर पुढे लक्षणावृत्ती स्पष्ट होईल. तत्त्वमसि महावाक्यापासून तात्पर्य निश्चय लक्षणावृत्तीने होतो.

प्रथम शक्तिवृत्ती म्हणजे काय? यावर विचार करू. समजा, देवदत्त नावाच्या मनुष्याने यज्ञदत्त नावाच्या मनुष्यासमोर 'साप' या पदाचा उच्चार केला, तर यज्ञदत्ताला 'लांबट, चावा घेणारा, सरपटणारा प्राणी' असा बोध होतो. 'साप' या पदाचा आणि 'लांबट, चावा घेणारा' या अर्थाचा जो संबंध आहे, त्याला शक्तिवृत्ती म्हणतात. सर्व पदार्थांच्या ठिकाणी आपापल्या अर्थाचे ज्ञान करून देण्याची शक्ती आहे.

कार्यावरून शक्तीचा अविष्कार कळतो. एखादा मनुष्य दहा किलो वजन उचलू शकत नाही. दुसरा मनुष्य शंभर किलो वजन सहजपणे उचलतो. ज्याच्याकडे सामर्थ्य असते, त्याला समर्थ म्हणतात. 'वाघ' हे पद ऐकल्यावर ऐकणाऱ्याला 'काळे–पिवळे पट्टे असलेला, चार पायांचा हिंस्त्र प्राणी, इतर प्राण्यांचा शिकार करणारा' अशा सामर्थ्यरूप शक्तीचा परिचय होतो. पदाच्या ठिकाणी असणाऱ्या शक्तीने ज्या अर्थाचे ज्ञान होते, त्या अर्थास 'शक्य अर्थ' असे म्हणतात. घट या पदाचा 'निमुळते तोंड, मोठ्या पोटासारखा' असा अर्थ आहे. घट पदाच्या ठिकाणी 'निमुळते तोंड, मोठ्या पोटासारखा' या अर्थज्ञानाची शक्ती आहे. म्हणून घट पदाचा 'निमुळते तोंड, मोठ्या पोटासारखा' हा शक्यार्थ आणि वाच्यार्थ आहे.

पदाच्या अर्थबोधकतेला 'वाचकता' म्हणतात. पदामध्ये वाचकता असते. पद हे 'वाचक' आहे आणि पदाचा अर्थ हा 'वाच्य' आहे. पदाचा जो वाच्य अर्थ असतो, तीच वाचकता म्हणजे अर्थाची बोधकता त्या पदार्थामध्ये राहते. अर्थ हा वाच्य आहे, म्हणून त्यामध्ये वाचक पदाची वाच्यता राहते. पदाचा अर्थ आणि पद यांमध्ये जो वाच्य–वाचक भावसंबंध आहे तीच शक्ति. उदाहरणार्थ – 'अग्नी' या पदाचा 'दाहकता' हा अर्थ आहे. अग्नी हे वाचक आहे आणि दाहकता हे वाच्य आहे. अग्नी या पदार्थामध्ये दाहकता या अर्थाची बोधकता असते. दाहकता या वाच्यामध्ये अग्नी या पदाची वाचकता राहते. दाहकता आणि अग्नी यांच्या वाच्य–वाचक भावसंबंधाला शक्ति म्हणतात.

ज्या वाक्यांचा अर्थ शक्तिवृत्तीने निश्चित होत नाही, त्या वाक्यांचा अर्थ लावण्यासाठी लक्षणावृत्ती वापरावी लागते. अशा वाक्यांच्या पदांचा शक्तिवृत्तीने वाच्यार्थ

माहिती असेल, तरच लक्षणावरून तात्पर्य निश्चय करता येतो. या कारणासाठी शक्तिवृत्ती विस्ताराने सांगितली. महावाक्याचा तात्पर्य निश्चय लक्षणावृत्तीने होतो. परंतु, तत्पूर्वी वाच्यार्थाचा विचार करावा लागतो आणि 'वाच्यार्थाने महावाक्याचा योग्य अर्थ लागत नाही' हे कळले की मग लक्षणावरून तात्पर्य निश्चय केला जातो. लक्षणा केल्याने वाक्याचा लक्ष्यार्थ निश्चित होतो. 'हा मुलगा सिंह आहे' या वाक्याचा अर्थ 'मुलगा सिंह आहे' असा नाही. 'मुलगा सिंहाप्रमाणे शूर आहे' असा योग्य अर्थ आहे. 'सिंह' पदाचा 'शूर' हा लक्ष्यार्थ आहे.

'तत्त्वमसि' या महावाक्यात 'तत्', 'त्वम्' आणि 'असि' अशी तीन पदे आहेत. तत् म्हणजे 'ते', त्वम् म्हणजे 'तू' आणि असि म्हणजे 'आहेस' – ते तू आहेस. प्रथम तत्त्वमसि महावाक्याच्या वाच्यार्थावर विचार करू. 'ते' म्हणजे ईश्वर, 'तू' म्हणजे जीव आणि 'असि' म्हणजे आहे. तत्पदाचा वाच्यार्थ जो ईश्वर तो सर्वज्ञ, व्यापक, स्वतंत्र, अकर्ता, अभोक्ता, निर्वैर, निष्प्रपंच असा आहे. त्वम्पद वाच्यार्थ जो जीव तो अल्पशक्ति, अल्पज्ञ, मर्यादित, नियम्य, कर्ता, भोक्ता, सवैर, प्रपंची असा आहे. 'ते तू आहेस' याचा अर्थ 'ईश्वर जीव आहे' असा लागतो. ईश्वर आणि जीव यांची एकता संभवत नाही. कारण दोघांचे धर्म विरुद्ध आहेत. वाच्यार्थाने तत्त्वमसि महावाक्याचा योग्य अर्थ लागत नाही.

शक्तिवृत्तीने वाक्याचा योग्य अर्थ लागला नाही, तर लक्षणा करावी लागते. 'तत्त्वमसि' म्हणजे 'ते तू आहेस' या महावाक्याच्या लक्ष्यार्थ निश्चयासाठी तत्पद लक्ष्यार्थ आणि त्वम्पद लक्ष्यार्थ यावर विचार करावा लागेल. तत्पद वाच्यार्थ जो ईश्वर आणि त्वम्पद वाच्यार्थ जो जीव यांच्या विरुद्ध धर्मांचा त्याग करून केवळ चैतन्याचाच स्वीकार केल्याने लक्ष्यार्थाचा निश्चय होतो. ईश्वराचे अधिष्ठान ब्रह्म आहे आणि जीवाचे अधिष्ठान कूटस्थ आहे. तत्पद लक्ष्यार्थ ब्रह्म आहे आणि त्वम्पद लक्ष्यार्थ कूटस्थ आहे. 'ते तू आहेस' म्हणजे 'ब्रह्म कूटस्थ आहे', हा लक्ष्यार्थ बरोबर जुळतो. कारण कूटस्थ हा सदैव ब्रह्मरूपच आहे. लक्षणावृत्तीने महावाक्याच्या लक्ष्यार्थाचा निश्चय होतो.

तत्त्वमसि महावाक्याचा वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ थोडक्यात सांगितला. पुढील चिंतनापासून यावर विस्तारपूर्वक विवेचन करू. शास्त्रानुसार तत्त्वमसि महावाक्य निरूपणाच्या ज्या प्रक्रिया आहेत, त्यांचा एक विशिष्ट क्रम आहे. त्या क्रमानुसार प्रक्रिया सांगितल्या, तर वेदांतशास्त्राकडे नव्यानेच आलेल्या साधकालाही विषय कळणे सोपे होईल. महावाक्य निरूपणाचा क्रम पुढीलप्रमाणे :

**तत्त्वमसि महावाक्य निरूपण प्रक्रिया – १ :**

तत् आणि त्वम् या पदांच्या लक्ष्यार्थ निर्णयासाठी –

अ) अन्वय व्यतिरेक न्याय

ब) तत् आणि त्वम्पदांचा सोबतच विचार करून, लक्ष्यार्थाचे लक्षणावृत्तीने ग्रहण

**चिंतन क्रमांक २६ ते ३४, चिंतन क्रमांक ४८ ते ५३**

क) आणि यासाठी संबंधत्रयाचा सहकार –

१) विशेषण–विशेष्यभाव संबंध, उपाधी–उपधेयभाव संबंध आणि
उपलक्षण–उपलक्ष्यभाव संबंध
**चिंतन क्रमांक ४३ ते ४७**

२) लक्ष्य–लक्षणभाव संबंध
- जहल्लक्षणा (जहत् किंवा जहती लक्षणा)

**चिंतन क्रमांक ३५**

- अजहल्लक्षणा (अजहत् किंवा अजहती लक्षणा)

**चिंतन क्रमांक ३६**

- जहदजहल्लक्षणा (जहताजहत् किंवा जहताजहती लक्षणा)

**चिंतन क्रमांक ३७ ते ४२**

३) सामानाधिकरण्य संबंध
- बाधसामानाधिकरण्य संबंध (गौण सामानाधिकरण्य संबंध)

**चिंतन क्रमांक ५४ आणि ५५**

- मुख्यसामानाधिकरण्य संबंध

**चिंतन क्रमांक ५६**

**तत्त्वमसि महावाक्य निरूपण प्रक्रिया – २ :**

तत् आणि त्वम् या पदांच्या लक्ष्यार्थ निर्णयासाठी देह, आभास आणि अधिष्ठानचैतन्य यांचा एकत्रित विचार (लोखंड+अग्नी तप्त गोळा दृष्टांतासह)

१) जीवाचे तीन देह, तीन आभास आणि या सर्वांचे अधिष्ठान चैतन्य
**चिंतन क्रमांक ५७ ते ५९**

२) ईश्वराचे तीन देह, तीन आभास आणि या सर्वांचे अधिष्ठान चैतन्य
**चिंतन क्रमांक ५७ ते ५९**

तत्त्वमसि महावाक्याचा तात्पर्य निश्चय लावण्यासाठी या दोन प्रक्रियेमध्ये अनेक पारिभाषिक शब्द येतात. या चिंतनात त्या पारिभाषिक शब्दांचा अर्थ पाहू आणि पुढील चिंतनापासून तत्त्वमसि महावाक्याचा विस्तारपूर्वक अभ्यास सुरू करू.

पहिल्या प्रक्रियेला 'संबंधत्रय' असे म्हणतात. विशेषण–विशेष्यभावसंबंध, लक्ष्य–लक्षणभावसंबंध आणि सामानाधिकरण्यसंबंध हे तीन मिळून 'संबंधत्रय' म्हटले जाते. पहिल्या प्रक्रियेत अन्वय–व्यतिरेक न्याय आहे. अन्वय आणि व्यतिरेक समजून घेण्यासाठी एक दृष्टांत पाहू. दोऱ्यामध्ये अनेक फुले गुंफून फुलांचा हार बनविण्यात येतो. एक फूल, नंतर दुसरे फूल, नंतर तिसरे फूल असे एका पाठोपाठ एक अशी अनेक फुले गुंफलेली असतात. पहिले फूल दुसऱ्या फूलापासून भिन्न असते. दुसरे फूल तिसऱ्या फूलाहून वेगळे असते. सर्व फुले परस्परांहून भिन्न असतात. फुलांमध्ये असलेल्या परस्पर भेदाला 'व्यतिरेक' म्हणतात.

व्यतिरेक म्हणजे भिन्नत्व. परंतु, हारातील सर्व फुलांमध्ये एकच दोरा व्यापक असतो, या व्यापकतेला 'अन्वय' असे म्हणतात. फुलांच्या हारामध्ये दोऱ्याचा अन्वय आणि फुलांचा व्यतिरेक असतो.

स्थूलदेह आणि त्याचे धर्म, सूक्ष्मदेह आणि त्याचे धर्म, कारणदेह आणि त्याचा धर्म व महाकारणदेह आणि त्याचा धर्म असे चार प्रकारचे प्रपंच आहेत. हे चार प्रपंच एकमेकांहून भिन्न आहेत. साधकाने या चार प्रपंचांचा क्रमाने व्यतिरेक करत जावा. हा व्यतिरेक वेदांत विचाराने करावा. प्रपंचाचा व्यतिरेक करण्यासाठी देहाचा नाश करणे हा उपाय नाही. चार देहांचा व्यतिरेक केल्यावर 'मी आत्मा आहे' असा निर्णय होतो. परंतु, येथे परमार्थ संपत नाही. चारही प्रपंचांमध्ये आत्म्याचा अन्वय आहे, हे साध्य झाले तर 'आत्मा ब्रह्मरूप आहे' असा निश्चय होतो.

विशेषण–विशेष्यभाव संबंध म्हणजे काय? जे तिन्ही काळी असते, ज्याचा कार्यामध्ये अन्वय असतो व जे व्यावर्तक असते, म्हणजे कार्याला वेगळे करून दाखवते त्याला विशेषण असे म्हणतात. ज्याला विशेषण असते त्याला विशेष्य असे म्हणतात व विशेषणासह असलेल्या विशेष्याला विशिष्ट असे म्हणतात. जर आत्मा या विशेष्याला स्थूल, सूक्ष्मदेह आणि त्यांचे धर्म हे विशेषण ठरत असतील तर त्या मनुष्याचा 'जीवपणा' सिद्ध होतो. इंद्रिये आणि पदार्थांबद्दल 'मी आणि माझे' हे दृढ असते. अशा मनुष्याचे देह, देहधर्म, बाह्य पदार्थ आणि प्राण्यांशी तादात्म्य असते. जर, आत्मा या विशेष्याला अविद्या (म्हणजे कारणदेह) विशेषण ठरली असेल, तर असा मनुष्य 'जीव' या पदावर असतो. 'मला ब्रह्माचे अज्ञान आहे' असे तो सत्यत्वाने समजत असतो. त्याचे अविद्येशी तादात्म्य असते.

उपाधी–उपधेयभाव संबंध म्हणजे काय? जे तिन्ही काळी असते, ज्याचा कार्यामध्ये अन्वय नसतो व जे व्यावर्तक असते, त्याला उपाधी असे म्हणतात. ज्याला उपाधी असते, त्याला उपधेय असे म्हणतात व उपाधीसह असलेल्या उपधेयाला उपहित असे म्हणतात. जर आत्मा या उपधेयाला स्थूल, सूक्ष्मदेह आणि त्यांचे धर्म उपाधी ठरत असतील, तर अशा मनुष्याचे देह, देहधर्म, बाह्य पदार्थ आणि प्राणी यांच्याशी तादात्म्य नसते, संसर्ग असतो. जर, आत्मा या उपधेयाला अविद्या (म्हणजे कारणदेह) उपाधी ठरली असेल तर अशा मनुष्याचा अविद्येशी संसर्ग असतो. असा मनुष्य 'साक्षी' या पदावर असतो. अविद्येचा स्वीकार तो सत्यत्वाने करत नाही.

उपलक्षण–उपलक्ष्यभाव संबंध म्हणजे काय? जे कधी असते, कधी नसते (भूत व वर्तमानकाळी असते पण भविष्यकाळी असले, नसले तरी चालते), ज्याचा कार्यामध्ये अन्वय नसतो व जे व्यावर्तक असते, त्याला उपलक्षण म्हणतात. ज्याला उपलक्षण असते त्याला उपलक्ष्य असे म्हणतात व उपलक्षणासह असणाऱ्या उपलक्ष्याला उपलक्षित असे म्हणतात. आत्मा या उपलक्ष्याला स्थूल, सूक्ष्मदेह आणि त्यांचे धर्म उपलक्षण ठरले असतील तर असा मनुष्य त्यांना किंमतच देत नाही. 'देह जावो अथवा राहो' असा त्याचा भाव असतो. आत्मा या उपलक्ष्याला अविद्या (म्हणजे कारणदेह) ही उपलक्षण ठरली असेल तर 'अविद्या राहो अथवा

जावो, फरक पडत नाही' असा भाव असतो. तो अविद्येला सत्तावान समजत नाही. असा मनुष्य 'मी कूटस्थ आहे' या निश्चयावर असतो. **(कोष्टक क्रमांक ६).**

| भावसंबंध | काल | | | कार्यात अन्वय | व्यावर्तक | मनुष्याची अवस्था |
|---|---|---|---|---|---|---|
| | भूत | वर्तमान | भविष्य | | | |
| विशेषण – विशेष्य | ✓ | ✓ | ✓ | ✓ | ✓ | बद्ध |
| उपाधी – उपधेय | ✓ | ✓ | ✓ | × | ✓ | जीवन्मुक्त |
| उपलक्षण – उपलक्ष्य | ✓ | ✓ | ✓ किंवा × | × | ✓ | विदेहमुक्त |

विशेषण, उपाधी किंवा उपलक्षण यांचे – असणे = ✓, नसणे = ×

कोष्टक क्रमांक ६ – भावसंबंध

लक्ष्य–लक्षणभाव संबंधांतर्गत 'जहल्लक्षणा' म्हणजे काय यावर विचार करू. जहल्लक्षणेत पदाच्या वाच्यार्थाचा त्याग करून वाच्यार्थाशी जो संबंधीत शक्य अर्थ आहे त्याचा स्वीकार करायचा असतो. 'गंगेवर गौळवाडा आहे' हे वाक्य विचारात घेऊ. 'गंगेवर' या पदाचा वाच्यार्थ 'गंगेचा प्रवाह' असा आहे. गंगेच्या प्रवाहावर गौळवाडा असू शकत नाही. म्हणून वाच्यार्थाचा त्याग करायचा असतो आणि गंगेच्या प्रवाहाशी संबंधीत जे 'गंगेचे तीर' याचा स्वीकार करायचा असतो. तीराच्या ठिकाणी जी लक्षणा झाली त्याला जहल्लक्षणा म्हणतात. **आकृती क्रमांक ७७ (अ) आणि (ब).**




आकृती क्रमांक ७७(अ)–'गंगेवर गौळवाडा आहे' याचा वाच्यार्थ




आकृती क्रमांक ७७(ब) 'गंगेवर गौळवाडा आहे' याचा लक्ष्यार्थ

तत्त्वमसि महावाक्याला जहल्लक्षणा लावून पाहू. तत्त्वमसि महावाक्याचा वाच्यार्थ 'ईश्वर जीव आहे' असा होतो. जहल्लक्षणेत वाच्यार्थाचा पूर्ण त्याग करायचा असतो. म्हणजे 'ईश्वर जीव नाही' असे वाक्य तयार होते. बरे! 'ईश्वर जीव नाही' तर मग नक्की काय आहे? असा प्रश्न निर्माण होतो. योग्य अर्थ लागत नाही. दोघेही नाही म्हटल्यास शून्यवादाचा आक्षेप येऊ शकतो. म्हणून, जहल्लक्षणेने महावाक्याचा तात्पर्य निश्चय होत नाही.

अजहल्लक्षणा म्हणजे काय? जहत् म्हणजे त्याग आणि अजहत् म्हणजे त्याग न करणे. अजहत् लक्षणेत वाच्यार्थाचा त्याग करायचा नसतो. वाच्यार्थाचा संपूर्ण स्वीकार करायचा असतो. ज्या पदाने वाच्यार्थाचे ज्ञान तर होतेच आणि सोबतच अधिक वाच्याच्या संबंधीचेही ज्ञान होते, त्या पदाच्या ठिकाणी अजहत् लक्षणा असते. उदाहरणार्थ – एका ठिकाणी काही घोडे मोकळे सोडलेले आहेत. घोड्यांपैकी केवळ एकच घोडा संपूर्णपणे लाल रंगाचा आहे. एक मनुष्य त्या घोड्याच्या समूहाकडे पाहत आहे. सर्व घोडे त्यांच्या जागी उभे आहेत. अचानक लाल रंगाचा घोडा धावू लागला. तेव्हा तो मनुष्य म्हणतो, 'लाल धावतो'. या वाक्याचा वाच्यार्थ 'लाल रंग धावतो' असा होतो. अजहत् लक्षणेत वाच्यार्थाचा स्वीकार करायचा असतो. लाल रंग जड असल्यामुळे धावू शकत नाही. म्हणून 'लाल' या वाच्याच्या संबंधी जो घोडा याचेही 'लाल' सोबत ग्रहण केलेच पाहिजे. 'लालपणा' या वाच्यार्थाचा स्वीकार करून अधिक लालपणाशी संबंधीत घोड्याचाही स्वीकार असल्यामुळे हे अजहत् लक्षणेचे उदाहरण आहे. अजहत् लक्षणा तत्त्वमसि महावाक्याला वापरून बघू. तत्त्वमसि महावाक्याचा वाच्यार्थ 'ईश्वर जीव आहे' असा होतो. अजहत् लक्षणेत वाच्यार्थाचा स्वीकार

करायचा असतो. 'ईश्वर जीव आहे' असे शक्य नाही, कारण ईश्वर आणि जीव यांचे धर्म परस्परभिन्न आहेत, म्हणून तत्त्वमसि महावाक्याचा तात्पर्य निश्चय अजहत् लक्षणा वापरून होत नाही.

जहदजहल्लक्षणा अर्थात जहताजहती लक्षणा म्हणजे काय? जहदजहल्लक्षणेत पदाच्या वाच्यार्थातील काही भागाचा त्याग आणि काही भागाचा स्वीकार केला जातो. जहताजहती लक्षणेला भागत्याग लक्षणा असेही म्हणतात. उदाहरणार्थ – यज्ञदत्त नावाच्या मनुष्याची देवदत्त नावाच्या मनुष्याशी एकदा भेट झाली. त्यानंतर बऱ्याच वर्षांचा कालावधी उलटला. पुढे एके ठिकाणी यज्ञदत्ताला देवदत्त दिसला तेव्हा तो विचार करू लागला. 'तो हा देवदत्त'. येथे 'तो' हे पद भूतकाळात विशिष्ट ठिकाणी पाहिलेला मनुष्य असे दाखविते. 'हा' हे पद वर्तमानकाळी जवळच्याच ठिकाणी पाहिलेला मनुष्य असे दाखवते. जहताजहती लक्षणेत वाच्यार्थातील जो विरुद्ध भाग असतो त्याचा त्याग करून अविरुद्ध भागाचा स्वीकार केला जातो. 'वर्तमानकाळ' आणि 'भूतकाळ' या विरुद्ध वाच्य भागांचा त्याग करून 'देवदत्त' भागाच्या लक्ष्यार्थाचा स्वीकार करायचा असतो. **कोष्टक क्रमांक ७(अ).**

| अंश ↓ | तो ↓ | हा ↓ | देवदत्त ↓ |
|---|---|---|---|
| विरुद्ध | त्या देशी त्या काळी × | ह्या देशी ह्या काळी × | देवदत्त |
| समान | देवदत्त ✓ | देवदत्त ✓ | देवदत्त ✓ |

कोष्टक क्रमांक ७(अ) – दृष्टांतासाठी जहदजहल्लक्षणा

आता, तत्त्वमसि महावाक्याला जहताजहती लक्षणा वापरू. तत्पद वाच्यार्थ ईश्वर आहे. त्वम्पद वाच्यार्थ जीव आहे. ईश्वराचे अधिष्ठान ब्रह्मचैतन्य आहे. जीवाचे अधिष्ठान कूटस्थचैतन्य आहे. जहताजहती लक्षणा वापरताना पदांमधील विरुद्ध वाच्य भागांचा त्याग करावा. ईश्वराचा वाच्य भाग जो सर्वज्ञ, सर्वशक्ति, अकर्ता, अभोक्ता इत्यादी आणि जीवाचा वाच्य भाग जो अल्पज्ञ, अल्पशक्ती, कर्ता, भोक्ता इत्यादींचा त्याग करावा. ईश्वर आणि जीव दोघांमध्ये असलेल्या अविरुद्ध चैतन्यभागाच्या एकत्वाचा निश्चय करावा, म्हणजे 'ब्रह्म कूटस्थ आहे' असा निश्चय करावा. तत्पद वाच्यार्थ ईश्वराचा त्याग करून ब्रह्माच्या ठिकाणी लक्षणा करावी व त्वम्पद वाच्यार्थ जीवाचा त्याग करून कूटस्थाच्या ठिकाणी लक्षणा करावी. कूटस्थ हा ब्रह्मरूप आहेच. म्हणून 'ब्रह्म कूटस्थ आहे' हे लक्ष्यार्थाने जुळते. जहताजहती लक्षणेने तत्त्वमसि महावाक्याचा तात्पर्य निश्चय होतो. **कोष्टक क्रमांक ७(ब).**

| अंश ↓ | तत् ↓ | त्वम् ↓ | असि ↓ |
|---|---|---|---|
| विरुद्ध | सर्व शक्ती × | अल्प शक्ती × | आहे |
| समान | ब्रह्म ✓ | कूटस्थ ✓ | आहे ✓ |

कोष्टक क्रमांक ७(ब) – सिद्धांतासाठी जहदजहल्लक्षणा

विरुद्ध अंशांचा त्याग करून समान तत्त्वांचा स्वीकार केल्याने लक्ष्यार्थ लागतो.

आकृती क्रमांक ७८ मध्ये महावाक्य निरूपण प्रक्रिया–१ दाखविलेली आहे. याच प्रक्रियेत सामानाधिकरण्य संबंधानेही सिद्धांत निश्चय होतो.




आकृती क्रमांक ७८ – महावाक्य निरूपण प्रक्रिया १

दोन पदांची जेव्हा एका अर्थामध्ये प्रवृत्ती होते तेव्हा त्या दोन शब्दांना समानाधिकरण शब्द म्हणतात व त्यांच्या संबंधाला सामानाधिकरण्य संबंध असे म्हणतात. उदाहरणार्थ – 'काळा घट' या दोन पदांचा विचार करू. 'निमुळता गळा, मोठे पोट' असा घट असतो. 'काळा' आणि 'घट' या दोन शब्दांचे 'निमुळता गळा, मोठे पोट' हे एकच अधिकरण आहे. 'काळा' आणि 'घट' हे दोन पदे एका घटाचाच बोध करून देतात. 'काळा' आणि 'घट' या दोन शब्दांना समानाधिकरण शब्द म्हणतात आणि त्यांच्या संबंधाला सामानाधिकरण्य संबंध म्हणतात.

मुख्यसमानाधिकरण आणि बाधसमानाधिकरण असे समानाधिकरणाचे दोन प्रकार आहेत. ज्या वस्तूचे ज्या वस्तूशी सदा एकत्व असते, म्हणजेच ज्या दोन किंवा अधिक वस्तूंची सत्ता व स्वरूप एकच असते, त्यांचे त्याच्याशी मुख्य समानाधिकरण असते. उदाहरणार्थ – घटाकाश आणि महाकाश. घटामध्ये व्याप्त असलेले आकाश म्हणजे घटाकाश आणि सर्वत्र व्याप्त असलेले आकाश म्हणजे महाकाश. दोन्ही आकाशांचे स्वरूप एकच आहे आणि दोन्ही आकाशांची एकच व्यावहारिक सत्ता आहे. घटाकाश आणि महाकाश यांचा सदैव अभेद आहे.

घटाकाश आणि महाकाश यांच्यामध्ये मुख्यसामानाधिकरण्य संबंध आहे. सिद्धांतात कूटस्थ आणि ब्रह्म यांचे मुख्यसमानाधिकरण आहे.

बाधसमानाधिकरण म्हणजे काय ? ज्या दोन किंवा अधिक पदार्थांचे स्वरूप भिन्न असून सत्ताही भिन्न असते, त्यांचे ऐक्य जी पदे दाखवितात त्या पदांमध्ये बाधसमानाधिकरण असते व त्या पदांच्या संबंधाला बाधसामानाधिकरण संबंध म्हणतात. ज्या वस्तूचा बाध करून दुसऱ्या वस्तूशी अभेद होतो, त्या वस्तूचे त्या दुसऱ्या वस्तूशी बाधसामानाधिकरण्य असते. उदाहरणार्थ – 'स्थाणू – पुरुष'. स्थाणू म्हणजे खांब. मंद अंधकारात दूर अंतरावर असलेल्या खांबाच्या ठिकाणी पुरुषाचा भास होतो. स्थाणूची सत्ता व्यावहारिक आणि पुरुषाची सत्ता प्रातिभासिक आहे. स्थाणू आणि पुरुष यांचे स्वरूपही भिन्न आहे. खांबाच्या जवळ जाऊन पाहिले की लक्षात येते की तेथे पुरुष नसून खांब आहे. पुरुषाचा बाध होऊन खांबाचा निश्चय होतो. सिद्धांतात कूटस्थ आणि चिदाभास यांच्यामध्ये बाधसमानाधिकरण आहे. अज्ञान अवस्थेत साधकाला चिदाभास आणि चिदाभासाने प्रकाशित केलेले पदार्थ सत्य वाटतात. श्रीगुरूंच्या कृपेने चिदाभासाचा बाध होऊन 'मी कूटस्थ आहे' असा निश्चय होतो. कूटस्थ ब्रह्मरूप आहेच. **आकृती क्रमांक ७९** मध्ये मुख्यसमानाधिकरण आणि बाधसमानाधिकरण दाखविलेले आहे.







आकृती क्रमांक ७९ – सामानाधिकरण्य संबंध

महावाक्य निरूपण प्रक्रिया–२ **आकृती क्रमांक ८०** मध्ये दाखविलेली आहे. ईश्वराचे समष्टी स्थूलशरीर, समष्टी सूक्ष्मशरीर आणि माया हे तीन देह असून वैश्वानर (अथवा विराट), हिरण्यगर्भ (अथवा प्राण, सूत्रात्मा) आणि ईश्वर हे तीन आभास आहेत. हे सर्व

एकरूप प्रतीत होते आणि यालाच तत्पदाचा वाच्यार्थ म्हणतात. तीन देह आणि तीन आभासांचे एक अखंड ब्रह्मचैतन्य हे अधिष्ठान आहे. ब्रह्मचैतन्य हे तत्पदाचा लक्ष्यार्थ आहे.






आकृती क्रमांक ८० – महावाक्य निरूपण प्रक्रिया – २

तापवलेल्या लोखंडाच्या गोळ्यात सर्वत्र अग्नी व्याप्त असतो. लोखंडात अग्नीचा अन्वय आहे. अग्नीमध्ये लोखंडाचा व्यतिरेक आहे. लोखंडाच्या ठिकाणी ईश्वराचे तीन देह आणि तीन आभास घ्यावेत. अग्नीच्या ठिकाणी ब्रह्मचैतन्य घ्यावे. ईश्वराच्या तीन देह, तीन आभासांचा व्यतिरेक करून ब्रह्मचैतन्याच्या अन्वयाचा निश्चय करावा.

जीवाचे स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर आणि कारणशरीर हे तीन देह असून विश्व, तैजस आणि प्राज्ञ हे तीन आभास आहेत. हे सर्व एकरूप प्रतीत होते आणि यालाच त्वम्पदाचा वाच्यार्थ म्हणतात. तीन देह आणि तीन आभासांचे एक कूटस्थचैतन्य हे अधिष्ठान आहे. कूटस्थचैतन्य हे त्वम्पदाचा लक्ष्यार्थ आहे. लोखंडाच्या गोळ्याच्या ठिकाणी जीवाचे तीन देह आणि तीन आभास घ्यावेत. अग्नीच्या ठिकाणी कूटस्थचैतन्य घ्यावे. जीवाच्या तीन देह, तीन आभासांचा व्यतिरेक करून कूटस्थ चैतन्याचा निश्चय करावा.

तत् त्वम् पदार्थ शोधन पूर्णत्वास गेले, तर साधकाचा व्यवहार आणि परमार्थ दोन्हीही संपुष्टात येतात. साधक जीवन्मुक्त होतो. जीवन्मुक्त स्थितीत व्यवहार घडत नाही असे नाही. तेव्हा बाधित अनुवृत्तीने प्रारब्ध संपेपर्यंत व्यवहार घडतो. व्यवहार आणि परमार्थातील कोणतेही कर्तव्य जीवन्मुक्तांचे शिल्लक नसते.

वेदांतशास्त्राचे फल पदरात पाडून घ्यायचे असेल, तर प्रथम स्थूल, सूक्ष्म प्रपंचामध्ये रममाण होणे सोडून द्या. जगातील बहुसंख्य लोकांचा व्यवहार कार्याध्यासातच चाललेला आहे. कार्याध्यासात रजोगुणी लोकांचे प्रमाण सर्वात जास्त आहे, त्यानंतर तमोगुणी लोक जास्त आहेत आणि सत्त्वगुणी लोकांचे प्रमाण अल्प आहे. स्थूल, सूक्ष्मदेह

आणि त्यांचे धर्म यांना व्यष्टी पातळीवरचा कार्याध्यास म्हणतात. सूक्ष्म, स्थूलदेहांशी तादात्म्य ठेऊन लोकांचा व्यवहार सुरू असतो. 'मी अमुक गोष्ट करायची ठरवली आहे' याप्रकारचे संकल्प तुम्ही करता. 'मी' कधी संकल्प करतो का ? संकल्प करणे हे मनाचे काम आहे आणि मन हा सूक्ष्मदेहाचा एक अवयव आहे. 'मी केले', 'मी करीन' असा अहंकार तुम्ही धरता. अहंकार देखील सूक्ष्मदेहाचाच एक अवयव आहे. 'मी श्रेष्ठ', 'माझी वस्तू' असे स्वतःच्या स्थूलदेहाला 'मी' समजून आणि तेही सत्यत्वाने समजून तुमचा व्यवहार सुरू आहे. म्हणजे तुमचा 'जीवपणा' सिद्ध होतो. खरेतर, तुम्ही 'जीव' या पदावरही नाही.

साधकाने स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचा त्याग करावा. त्याग कसा करायचा ही एक कला आहे. साधकाने शास्त्र, सद्गुरूंना शरण राहून कार्याध्यासातून कारणाध्यासावर यावे. कारणदेह म्हणजेच अविद्येच्या पातळीवर जो साधक येतो तो 'जीव' ठरतो. असा साधक स्थूल, सूक्ष्म प्रपंचामध्ये नावापुरता वावरतो. त्याला बाह्य प्रपंचाशी घेणे–देणे नसते. 'माझ्या ठिकाणी प्रतीत होणारे आत्म्याचे अज्ञान केव्हा निवृत्त होईल ?' याची काळजी त्याला जागा झाल्यापासून झोपेपर्यंत लागलेली असते. असा साधक शास्त्राभ्यास करतो. श्रीगुरूंची तन, मन, जीवाने सेवा करतो व परमार्थविषयक शंकांचे निरसन करून घेतो.

शिष्याने सद्गुरूंना स्वतःचा जीव दिला तर सद्गुरू जीवाला ब्रह्मरूप करतात. त्यामुळे 'मी ब्रह्म आहे' असे शिष्याचे वृत्तीगत ब्रह्मज्ञानही मावळून तो सहज स्थितीत प्रतिष्ठित होतो. त्रिपुटीचेच खंडन झाल्यामुळे मग 'सद्गुरू सेव्य, मी सेवक' असा भावही संभवत नाही.

त्वम् म्हणजे काय ? सूक्ष्म, स्थूलदेह म्हणजे त्वम् नाही. जीव म्हणजे त्वम्. मनुष्य आणि मनुष्येतर प्राणी हुशार आहेत. ते आपला जीव इतरांना देत नाहीत. मनुष्य इतरांना अनेक पदार्थ देईल, परंतु, स्वतःचा जीव तो स्वतःसाठीच राखून ठेवतो.

साधारणपणे मनुष्याचा जीव स्वतःच्या देहाकडे, देहधर्मांमध्ये आणि स्त्री, धन, पुत्रादिकांमध्ये लागलेला असतो. त्यांच्यासाठी जीव तळमळतो. परंतु, परमार्थासाठी जीवच लागतो. त्याशिवाय परमार्थाचे फल हाती लागत नाही. म्हणून, प्रपंचातून जीव काढून तो श्रीगुरूंना दिला पाहिजे. तुम्ही या ठिकाणी चिंतन श्रवण करण्यासाठी तुमचा जीव घेऊन बसलेले आहात की सूक्ष्म, स्थूलदेह घेऊन आला आहात ? पंढरपूरची वारी करणारे बहुतेक लोक स्थूलदेह घेऊनच पंढरपूरला जातात. त्यांचे मन आणि त्यांचा जीव घरीच ठेवतात. अवतार महापुरुष 'परमार्थ जीवाने करा' असा बोध आपल्याला देतात.

प्रमाण –

**माझे जिवींची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ।**

**– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा**

परंतु, साधारण मनुष्य पंढरपूरला जाणे अवघड आहे. त्याहीपुढे जीव पंढरपूरला नेणे फारच अवघडआहे.

प्रमाण –



परिसें गे सुनेबाई । नको वेचूं दूध दहीं ।।१।।
आवा चालिली पंढरपुरा । वेशीपासुनि आली घरा ।।२।।
ऐकें गोष्टीं सादर बाळें । करीं जतन फुटकें पाळें ।।३।।
माझे हातींचा कलवडू । मजवांचुनि नको फोडूं।।४।।
वळवटक्षिरीचें लिंपन । नको फोडूंमजवांचून ।।५।।
उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ।।६।।
भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ।।७।।
भक्षीं मपित आहारु । नको फारसी वरु सारुं ।।८।।
सून म्हणे बहुत निकें । तुम्ही यात्रेसी जावें सुखें ।।९।।
सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ।।१०।।
सूनमुखीचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ।।११।।
सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेसें इला वाटे ।।१२।।
आतां कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ।।१३।।
मुलें लेकरें घर दार । माझें येथेंचि पंढरपुर ।।१४।।
तुका म्हणे ऐसे जन । गोवियेलें मायेंकरुन ।।१५।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

एकदा एक म्हातारी पंढरपूरला जाण्यास निघाली. गावाच्या वेशीपर्यंत जाऊन परत माघारी घरी आली आणि सूनेला सांगू लागली, 'मी ज्या शेणाच्या गोवऱ्या एकावर एक रचून ठेवल्या आहेत त्या 'कलवडू'ला धक्का लावू नकोस, घरातल्या वस्तू नीट जपून ठेव, कोणालाही काहीही वाटत सुटू नकोस, संन्याशी दारात आला तर त्याला काही वाढू नकोस, साधू म्हणून भोंदू लोकच जगात मिरवतात'. अनेक प्रकारे ती सूनेला उपदेश देऊ लागली आणि शेवटी ठरवते – 'पंढरपूरात जाऊन काय पाहू? मुलं–बाळं हा संसार भगवंताचीच तर कृपा आहे ना? मग हा संसारच तर माझे पंढरपूर नाही का?' अशारितीने मोहात गुंतून तिने पंढरपूरला जाणेच रद्द केले.

असो! तर प्रथम जीवावर या. त्यानंतर श्रीगुरू तत् त्वम् लक्ष्यार्थाचा निश्चय करून देतील. तो लक्ष्यार्थ म्हणजे ब्रह्म. देव म्हणजे ब्रह्म. देव म्हणजे 'देहात वसलेला'. चारही देहात वसलेला तो देव म्हणजे 'ब्रह्म'. त्यालाच सोप्या भाषेत 'मी' म्हणतात. निरुपाधिक मी सर्वांकडे आहे. तोच देव आहे. 'मी पुरुष', 'मी बायको', 'मी दुःखी' इत्यादी भलतेच आरोप जे तुम्ही स्वतःवर करता ते वेदांत विचाराने काढा. मग खाली निरुपाधिक मी उरेल. जो उरतो तोच देव आहे.

प्रमाण –



अर्जुनपण न घेतां । मी ऐसें जें पांडुसुता ।
उठतसे तें तत्त्वता । तयाचें रूप ।।१३१५।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

'अर्जुनपण' म्हणजे 'जीवपणा' आणि 'जीव' हे सोडले, तर निरुपाधिक 'मी'चा निश्चय होईल. अवतार महापुरुष मनुष्याला त्याच्या आद्य कर्तव्याची जाणीव करून देतात, की तुम्ही या 'मी'रूपी पंढरीनाथाला शरण जा आणि जन्म–मरणाची व्यथा संपवा.

प्रमाण –

उठा जागे व्हा रे आता । स्मरण करा पंढरीनाथा ।
भावे चरणी ठेवा माथा । चुकवी व्यथा जन्माच्या ।।

– श्री संत नामदेव महाराज गाथा

दुर्लभ असा हा मनुष्य जन्म मिळालेला असताना प्रपंचाचा व्यतिरेक करून चैतन्याच्या अन्वयाचा निश्चय करा. हा निश्चय मरण येण्याच्या आत करा.

(या चिंतनामध्ये तत्त्वमसि महावाक्य निरूपणाच्या ज्या दोन प्रक्रिया वर्णित आहेत, त्यांचाच विस्तार पुढील ३५ चिंतनांमध्ये आहे. आकृति क्रमांक ७८, ७९ आणि ८० ह्या ठामपणे लक्षात ठेवायला हव्यात. त्यांचा संदर्भ पुढे वारंवार येणार आहे. पुढील चिंतनापासून तत्त्वमसि महावाक्य निरूपणाला प्रत्यक्ष सुरुवात होणार आहे.)

*****

।। ॐ तत् सत् ।।

## चिंतन क्रमांक २६
## त्वम्पदाचा वाच्यार्थ–१

'तत् त्वम् असि' या महावाक्यासंबंधी विचार सुरू आहे. वेद चार आहेत. प्रत्येक वेदात एक महावाक्य आहे. परमार्थ म्हणजे चार महावाक्यांचा निर्णय लावणे होय. कोणी या महावाक्यांचा लक्ष्यार्थ जाणून त्याप्रमाणे आचरण केले तर ती व्यक्ती जन्म–मृत्यूच्या संसारातून मुक्त होते. प्रत्येक मनुष्याला महावाक्यांचा यथार्थ बोध करून घेणे आवश्यक आहे. म्हणूनच, महावाक्याला अवगत करून देणाऱ्या सद्गुरुंना शरण जावे.

प्रमाण –

अखण्डमंडलाकारं व्याप्तं येन चराचरम् ।
तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ।। ३

– गुरूगीता

श्रवण, मनन, निदिध्यासन आणि तत्, त्वम् पदार्थ शोधन ही ज्ञानमार्गातील साधना आहे. तत्, त्वम् पदार्थाचा शोध लागणे हे परमार्थाचे फल आहे.

कोणाला जर विचारले – 'तुम्ही कोण आहात?' तर तो उत्तर देतो – 'मी राम आहे' अथवा 'मी मामा आहे', आणि हे सर्व तो सत्यबुद्धीने म्हणत असतो. साधूची समजूत आणि अज्ञान्याच्या समजूतीमध्ये १८० अंशाचा फरक आहे. साधूला पारमार्थिक बोध असतो. 'मी अमुक आहे' असे साधू जरी म्हणाला तरी ते सत्यत्वाने म्हणत नाही.

देहांच्या धर्मांचा त्याग केला पाहिजे. पण, धर्मामध्ये बदल करणे हा धर्माचा समूळ त्याग नव्हे, त्याने फक्त धर्मांतर होते. दुसरा धर्म आरूढ होतो. उदाहरणार्थ – नाव बदलणे हा नावाच्या त्यागाचा उपाय नाही. पहिले नरेंद्र नाव होते, नंतर झाले विवेकानंद. नाव बदलण्यात नावाचा त्याग झाला असे वाटते. कालांतराने तसे दृढही होईल. पण, नरेंद्र हे नाव आरोपित आहे असे लक्षात आल्यानंतरच खऱ्या अर्थाने नावाचा त्याग होईल. स्थूल आणि सूक्ष्मदेहांच्या धर्मांची निवृत्ती झाली तर मनुष्य कारणदेहावर येतो, म्हणजे 'जीवा'वर येतो. कारणदेह म्हणजे व्यष्टी अज्ञान.

'त्वम्'ची ओळख केली पाहिजे. जीव म्हणजे 'त्वम्'. जागृत अवस्थेत 'जीव' कोठेही जाईल. 'जीव' आई, वडील इत्यादींकडे जातो. पण कधीपर्यंत? जोपर्यंत स्वतःच्या जीवावर संकट येत नाही तोपर्यंत. जीवावर मोठे संकट आले तर मनुष्य इतर लोकांचा विचार न करता स्वतःचा जीव वाचविण्याचा प्रयत्न करतो. पुराचे पाणी जोपर्यंत तोंडापर्यंत येत नाही, तोपर्यंत माकडीण तिच्या पिल्लाला स्वतःजवळ ठेवते. पाण्याची पातळी नाकातोंडापर्यंत

आल्यावर हीच माकडीण स्वतःच्या पिल्लाला पायाखाली ठेवते व स्वतःचा जीव वाचविण्याचा प्रयत्न करते.


जीव ज्या देहाला चिकटलेला असतो, त्या देहासाठी लागणाऱ्या पदार्थांचा विचार करतो. स्थूलदेहाला जीव चिकटला असेल, तर त्याचा विचार करतो. काहींचा जीव सूक्ष्मदेहाला चिकटलेला असतो. जे अन्न ग्रहण केले जाते त्याच्या सूक्ष्म भागाप्रमाणे मन, बुद्धी बनतात. पण, बुद्धीजीवींची संख्या कमी असते. आपण त्याहीपुढे जीवाचा विचार केला पाहिजे. वेदांतशास्त्रामध्ये कारणदेह व त्याच्या पलीकडचा विचार आहे. कारणदेह व्यापक आहे. त्यापेक्षा महाकारणदेह व्यापक आहे. कारणदेह म्हणजे जीव. महाकारणदेह म्हणजे शिव. ज्याप्रमाणे पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश उत्तरोत्तर सूक्ष्म आहेत, त्याप्रमाणे स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण हे देह उत्तरोत्तर सूक्ष्म आहेत. जोपर्यंत दैनंदिन व्यवहार सुरळीत सुरू आहे, तोपर्यंत जीव लक्षात येत नाही. अचानक मोठे संकट कोसळले तर जीव जागा होतो. 'त्वम्' दुःखाने कळतो. म्हणूनच, अर्जुनविषादयोगाने श्रीमद्‌भगवद्‌गीतेची सुरुवात होते. काहीजण ज्यांची स्थूल, सूक्ष्मदेहासंबंधीची वासनापूर्ती होत नाही ते त्या दुःखामुळे आत्महत्या करतात. (येथे आत्महत्या हा व्यवहारातील प्रचलित शब्द वापरला आहे. खरे पाहता आत्म्याची हत्या कधीही होत नसते.) परंतु, जीवाची ओळख करण्याचा प्रयत्न करीत नाहीत. विवेकाने जीवाची ओळख करणे श्रेष्ठ आहे. 'त्वम्' म्हणजे जीव. तो कोठेकोठे जातो? जागृतीमध्ये, स्वप्नात कोठे जाईल? सुषुप्तीमध्ये कोठे जातो?

प्रमाण –

**जगत्र धांवताहे सैरा म्हणोनी धांवसी । थोर कष्टलासी वायांवीण ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

जागृतीत जीव कोठेही धावत राहतो आणि थोर कष्टाला प्राप्त होतो, तेही विनाकारण. स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचा त्याग केला, त्यातून जीव काढला, तर 'त्वम्' कळेल. ज्याला जीव कळत नाही त्याला शिव कळू शकत नाही. साधारणपणे महाराजांना लोक संसारातलेच प्रश्न विचारत असतात. ज्याला परमार्थच साधायचा आहे त्याचा विचार येथे आहे. संसारातच गुंतून मरणाऱ्यांचा येथे विचार नाही. आपण स्थूल, सूक्ष्मामध्ये रमलो तर काही खरे नाही. परमार्थाचा विचार तरुणपणातच करायचा असतो. म्हातारपणी होत नाही. 'त्वम्'चा शोध तारुण्यात केला पाहिजे.

प्रमाण –

**आणि तयाचिपरी जरा । न टेंकतां शरीरा ।**
**तारुण्याचिया भरा–। माजीं देखें ।।५५५।। अध्याय १३**

– श्रीज्ञानेश्वरी

आपण आपलाच विचार करू शकतो. याला काही अडथळा नाही. विचार बुद्धीने केला जातो. स्थूलाला बांधता येते. बुद्धीला, जीवाला बांधता येत नाही. म्हणून, जीवाने परमार्थ करायला हरकत नाही. पण, आपणच आपला घात करत असतो. वित्त, पुत्र, कलत्र, नातलग इत्यादींकडे जीव धावत राहतो. जीव बाहेर इतरत्र गुंतला तर संपला.

या 'त्वम्' पदाची लक्षणे कोणती? अल्पज्ञ – कमी ज्ञान असणे. आपल्या घरात काय आहे याची माहिती घेता येते. पण, अमेरिकेत काय होत आहे हे सांगता येत नाही. तेही कदाचित् सांगता येईल. पण, स्वर्गात काय चालले आहे हे सहज कळू शकत नाही. म्हणजेच जीवाला अल्पज्ञत्व आहे. तसेच, जीव हा कर्ता–भोक्ता आहे. कर्ते–भोक्तेपणामुळे आपल्याला जीवपणा आहे. विकार असणे, स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचा संबंध असणे, ही जीवपणाचीच लक्षणे आहेत. ही लक्षणे ज्याला आहेत तो जीव आहे. एवढेच नव्हे तर जोपर्यंत आत्म्याचे अज्ञान आहे तोपर्यंत जीव आहे. म्हणजेच ज्याला स्थूल, सूक्ष्म, कारणदेहांचे धर्म चिकटलेले आहेत, त्याला जीव म्हणतात. हा 'त्वम्' आहे. 'त्वम्' कळण्यासाठी तिन्ही देहांवर लक्ष ठेवावे. उदाहरणार्थ – एखाद्या मुलाचा जन्म गरीबीत झाला आहे. जेव्हा तो श्रीमंताच्या घरी जातो तेव्हा त्या मुलाला स्वतःच्या गरीबीविषयी जाणीव होते. उजेड–अंधार हे दुसरे उदाहरण. सदैव उजेडात असणाऱ्या मनुष्याला अंधारात गेलं की उजेडाची जाणीव होते. उजेड कळतो. विरुद्ध धर्म लक्षात आले, तर, स्वतःच्या धर्मांची जाणीव होते. प्रथम जीवत्वाची ओळख व्हावी लागते. 'त्वम्'चे–जीवाचे कर्ता, भोक्ता, अल्पज्ञ, दुःखी इत्यादी धर्म केव्हा कळतील? जेव्हा 'तत्'च्या धर्मांचा विचार करू तेव्हा. अकर्ता, अभोक्ता, सर्वज्ञ इत्यादी 'तत्'चे धर्म आहेत.

आपण 'तत्' आहोत की 'त्वम्' आहोत? याविषयी जगात कोणालाही काही घेणं देणं नाही. 'तत्'चा शोध करा अथवा 'त्वम्'चा शोध करा. मनुष्य संसार करत राहतो. त्यातच गुरफटून राहतो. जणू काही डोळ्यांना झापडं लावली आहेत. आई, वडील परमार्थ शिकवीत नाहीत. मात्र, व्यवहारात प्रगती करण्यासाठी तत्परता दाखवतात. मजा करावी हे चार्वाकाचे मत आहे. त्यालाच अनुसरावे असे अनेकांना वाटते. भोगता भोगता पुढे मरण येईल याची अनेकांना चिंताच नाही. भविष्यात आपले मरण येणार नाही, तर ते आताच सुरू आहे. प्रत्येक क्षणाला खरेतर आपण मरतच आहोत. बाबांनो! मनुष्य देह दुर्मिळ आहे. या मनुष्य देहाचा संबंध सुटायच्या आत परमार्थ पूर्ण करायला हवा. आपण एक दिवस मरणार हे नक्की आहे. मरणाचा धसका बसला तरच आपण जागे होऊ. आपल्याकडे वेळ शिल्लक नाही. फक्त अन्न, धन, मान यांमध्येच गुंतून मरू नका. हे सर्व का सुरू आहे याचा विचार करा. बायको, पोरं, संपत्ती इत्यादींना घेऊन, त्यांच्याच विचारात मरू नका. इतर कोणत्याही देहात परमार्थाचा विचार करता येत नाही. आपण त्रिलोकाला अधिष्ठान होतो, आता देहापुरते संकुचित झालो. परमार्थ साध्य झाला नाही, तर, पुढे मुंगीच्या देहात आणखी संकुचित व्हावे लागेल. संसाराचाच अहंकार वाढला तर काय करावे हे सुचत नाही. अहंकारापोटी अनंत जन्म फिरावे लागते. म्हणून, परमार्थ करावा लागतो.

काही लोक देव मानत नाहीत. काही हरकत नाही. कमीतकमी त्यांनी 'मी कोण आहे?' असा प्रथम शोध घेतला पाहिजे. स्वतःचाच विचार करायला काय हरकत आहे? नंतर आपोआपच देवाविषयी उत्सुकता निर्माण होईल. पुढे देव म्हणजे अकर्ता, सर्वज्ञ हे कळेल. पुढे तेच तुम्ही आहात हे कळेल. समजा, एखादा गरीब मुलगा आहे. त्याला एका राजाने सांगावे की 'तू माझा मुलगा आहेस'. त्याच क्षणी त्या मुलाची गरीबी जाते. तो श्रीमंत होतो. तसेच, श्रीगुरू सांगतात की 'तू अमर, निर्भय, निवैर, जन्मरहित आहेस', त्याचक्षणी तो भगवद्रूप होतो. पण, माणसे यावर विश्वास ठेवत नाहीत. काय करावे? जन्मरहित असताना जन्मदिवस साजरा करण्यात रमतात. जन्मदिवस साजरा करणे म्हणजे विटाळ साजरा करणे आहे. जन्माला आलास, विटाळ झाला. कारण आपण भूल पाडणाऱ्या मायाकार्यांत पदार्पण केले.

इतिहास, साहित्याचा आधार घेऊन काही माणसे श्रीज्ञानेश्वर महाराजांचा, श्रीतुकाराम महाराजांचा शोध करतात. त्यांचा शोध अशाप्रकारे होईल का? त्यांच्याच वचनांचा पूर्ण अभ्यास केला तर ते कळतील. 'मी कोण आहे?' हे श्री आद्य शंकराचार्य निर्वाणषटकात सांगतात. त्याचा अभ्यास करा.

प्रमाण –

अहं निर्विकल्पो निराकाररूपो ।
विभुर्व्याप्य सर्वत्र सर्वेन्द्रियाणि ।
सदा मे समत्वं न मुक्तिर्न बंधः ।
चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ।।

–श्री आद्य शंकराचार्य रचित निर्वाणषट्कम्

पण, हे नुसतं पाठ केल्याने कोणी देव होणार नाही. लक्ष्यार्थ कळून घ्यावा लागेल. तो अंगी बाणवावा लागेल. पण, यापेक्षा विपरीत घरातील लोक शिकवतात. तरीही सर्वांना असेच लोक पसंत आहेत. समजा तुम्ही ठरवले, 'मी घरात नुसता बसून राहीन. काम करणार नाही. परमार्थ करीन.' मग बघा घरातील लोकांचा तुमच्या विषयीचा विचार कसा बदलतो ते. जोपर्यंत तुम्ही व्यवहारात सर्वांच्या उपयोगाचे; तोपर्यंतच सर्वजण जवळ करतील. अन्यथा कोणी जवळ करणार नाही. म्हणूनच, सावध व्हा.

स्थूल, सूक्ष्मदेहांना 'मी' समजून 'मी परमार्थ सांगतो' असे मला वाटले की मी जीव ठरलो. त्याचप्रमाणे, 'मी परमार्थ श्रवण केला' असे तुम्हांला वाटले की तुम्ही जीव ठरता. कोणी शिवी दिली तर ती जीवाने ऐकली जाते. परंतु, साधूसंताचे वाक्य मन आणि कान ऐकतात. 'मी स्थूल, सूक्ष्म शरीर नाही', 'देहांचे धर्म हे माझे धर्म नाहीत' असे म्हणा. ते तुम्हांला जाणीव करून देतील 'तू देह आहेस'. तरीपण वारंवार म्हणत राहा की 'मी देह नाही', 'मी आई, बाप इत्यादी नाही', असे शास्त्र, साधूसंत शिकवतात. पण, नातलग आणि

मित्र विपरीत शिकवतील. तिकडे लक्ष देऊ नका. त्यांना परमार्थाशी देणे–घेणे नसते. तुम्ही मेले तर हे सगळे दोन दिवस रडतील. पुन्हा आपल्या व्यवहारात रमतील. मृत्यूपासून आपणहून दूर व्हा. अन्यथा यमदूत तुम्हांला घेऊन जातील. यम हा जगाचा सगळ्यात मोठा गुरू आहे. तो सर्वांना शरण यायला भाग पाडतो. श्रेष्ठ कोण यम की श्रीगुरू? श्रीगुरू आपल्याला यमापासून आणि मृत्यूपासून वाचवतात. म्हणूनच श्रीगुरू सामर्थ्यवान आहेत. त्यांना शरण जावे. मनुष्य पुत्र, वित्त, नातलग इत्यादींची व्यवस्था लावून मग वेळ मिळाला तर श्रीगुरुंकडे जातो. येथे हिशोब नसावा. पुत्र, वित्त, नातेवाईक इत्यादी राहतील की जातील याचा विचार नसावा. तत्परता हवी.

प्रथम शास्त्राला शरण जा, नंतर श्रीगुरूंना शरण जा. जीव शास्त्रात गुंतला पाहिजे. प्रथम शास्त्र, नंतर श्रीगुरू. 'त्वम्' पद शास्त्रातून कळते. श्रीगुरु 'तत्' पद सांगतात. श्रीगुरूंना प्रार्थना करावी, 'मी अल्पज्ञ जीव आहे, संसार करून थकलो, वैतागलो. पदरात घ्या'. नंतर श्रीगुरू 'तत्' पद सांगतात. आपण वारंवार जन्म घेऊन, मरून संसारात गुरफटलो. हाल झाले. फजिती पावलो. आता सावध व्हा. सद्‌गुरूंना शरण जा.

प्रमाण –

**किती वेळां जन्मा यावे । नित्य व्हावें फजीत ।।**
**म्हणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोसी ।।**

–श्री संत तुकाराम महाराज गाथा

जन्म–मरणाच्या चक्राला जीव भ्याला पाहिजे. आपली अल्पज्ञता, कर्तेपण इत्यादी आपणच ओळखावे लागतात. स्वतःचे हे दोष सद्‌गुरूंकडे प्रांजळपणे कबूल करायचे असतात. काही लोक श्रीगुरूंना म्हणतात 'मी चांगला आहे'. पण, जो दोषांची जाणीव होऊन 'मी पापी दोषसहित आहे' असे श्रीगुरूंकडे कबूल करतो तोच खरा शिष्य होतो. अहंकार, विकारांची जाणीव ज्याला आहे तो जीव आहे. तोच जीव परमार्थाचा खरा अधिकारी आहे.

स्थूल, सूक्ष्मदेह परमार्थाचे अधिकारी नाहीत. 'जन्म–मरणाच्या फेऱ्यात अडकलेलो आहोत' या जाणीवेने जो दीन झाला आहे, तो जीव उत्कृष्ट आहे. जो संसारात रमला, पुढे केवळ शास्त्र पाठ केले, तो जीव श्रेष्ठ नाही. संसार जिव्हाग्री टोचत असेल तर तो जीव खरा परमार्थाच्या उपयोगाचा आहे. एखाद्या स्त्रीचा लहान मुलगा मेला तर तिच्या मनाची संसाराविषयी अवस्था कशी असते? तसा संसार नीरस ज्याला वाटतो, तो जीव परमार्थाचा अधिकारी आहे.

तुम्ही असे जीव आहात काय? आहोत की नाही हे आपले आपणच ठरवावे. तुमचा जीव कोठे आहे हे तुम्हांला माहीत आहे, दुसऱ्याला नाही. तुम्ही जीव ठरलात तर पुढे 'तत्' पदाचा विचार करायचा असतो. त्यासाठी शास्त्र आणि सद्‌गुरूंना जीव दिला पाहिजे. जीवाला परमार्थाची गोडी हवी.

प्रमाण –



माझे जिवींची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

जीव घेऊन येथे या. पण, येथे आल्यासारखे भासवू नका. फक्त स्थूल, सूक्ष्मदेह येथे आणून स्वतःलाच फसवू नका. असा व्यवहारातील जीव लबाड असतो. आपली उत्पत्ती लबाडीमुळे, पाप–पुण्यामुळे झाली. आई, बाप हे केवळ निमित्त आहेत. लबाडी सुरू असल्यामुळेच व्यवहार चालू आहे. परमार्थात लबाडी चालत नाही. जेथे लबाडी तेथे परमार्थ नाही. शेवटी, जन्म–मरणाची भीती ज्याला वाटते तोच 'त्वम्' आहे. 'जीव' पदावर या. स्थूल, सूक्ष्मावर राहू नका. यानंतरच 'तत्'चा विचार करता येईल. पण त्यापूर्वी 'त्वम्' कळलाच पाहिजे.

*****

।। ॐ तत् सत् ।।

## चिंतन क्रमांक २७
## त्वम्पदाचा वाच्यार्थ – २

'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अभ्यासाचे उद्दिष्ट जन्ममरणाच्या चक्रातून सुटका करून घेणे हे आहे. अनंत जन्मांत भोगलेले जन्म–मरणाचे दुःख जिव्हाग्री लागले पाहिजे. वेदांतात अंतरंग साधनांमध्ये श्रवण करणे ही पहिली पायरी आहे. श्रवणाने सहजच मोक्षाची प्राप्ती होते.

प्रमाण –

तैसा मनाचा मार न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां ।
येथ मोक्ष असे आयता । श्रवणाचि माजी ।।२२४।। अध्याय ४
– श्रीज्ञानेश्वरी

श्रवणानंतर मनन, निदिध्यासन्, तत्–त्वम् पदार्थ शोधन ही उत्तरोत्तर अंतरंग साधने आहेत.

तत्–त्वम् पदार्थ शोधन करणे फार कमी लोकांना शक्य आहे. ज्यांना तत्–त्वम् पदार्थ शोधन जमत नाही त्यांनी निदिध्यासन करावे. ज्यांना निदिध्यासन जमत नाही त्यांनी मनन करावे. ज्यांना मनन जमत नाही त्यांनी श्रवण करावे. हेही जमेना, तर इतर बहिरंग साधनांचा अवलंब करावा.

'त्वम्' म्हणजे मी. परंतु, मनुष्य स्थूल, सूक्ष्मदेहांच्या धर्मात गुंततो व त्या धर्मांनाच मी समजतो. 'मी क्रोधिष्ट आहे', 'मी प्रेमळ आहे', 'मी शांत आहे', 'मी मामा आहे' असे सर्वजण सहज म्हणत असतात. अधिक सत्यत्वाने म्हणत असतात. आरोपित धर्मांना सत्यत्व देत राहिल्याने पुन्हा पुन्हा जन्म–मरण ओढवते.

चार देह आणि त्यांच्या धर्मांमध्ये गुरफटल्याने खूप हाल होतात. धर्मांमध्ये अडकून राहू नये. यावर उपाय करावा लागेल. येथे श्रीगुरुंच्या कृपेची आवश्यकता आहे. स्वप्रयत्न आणि श्रीगुरुंची कृपा यांची आवश्यकता आहे. कृपा होत नसते. कृपा करून घ्यावी लागते. नुसते बसून राहिलात तर काही मिळणार नाही. तुम्ही व्यवहारात राबत आहात म्हणून तुमची मजा आहे. घरामध्ये नुसते बसून राहण्याचा निर्णय घेतला तर घरातले लोक तुम्हांला हाकलून देतील. शास्त्रसेवा आणि श्रीगुरुंची सेवा केल्याने शरीरात सात्त्विक बळ येते. त्यामुळे परमार्थात साधक डगमगत नाही. मग पुढे जीवत्व कळते. जीवाला जीवत्व असते. परमार्थ–व्यवहार या खेळामध्ये प्रमुख जीव आहे. परमार्थ करणे सात्त्विक व्यवहार आहे. आपले खरे उद्दिष्ट त्रिगुणातीत होणे हे आहे.

'त्वम्' म्हणजे जीव. आपण कोण आहोत? जीव आहोत. जीवपदावर पहिले आलो पाहिजे. जीवाचे धर्म कोणते? अल्पज्ञ, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादी दुसऱ्याचे करणे आपल्या डोक्यावर घेऊन नाचणाऱ्याला जीव असे म्हणतात.

प्रमाण –

**प्रकृति करी कर्मे । ती म्यां केलीं म्हणें भ्रमें ।**
**येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीव ।।३२६।।अध्याय १८**

– श्रीज्ञानेश्वरी

प्रकृतीचे करणे 'मी करतो' अशी समज ज्याची आहे तो जीव आहे. सात्त्विक, राजसिक, तामसिक कर्मे हे प्रकृतीचे करणे जीव स्वतःच्या डोक्यावर घेतो. प्रकृती कळावी लागते. तिच्याबद्दल माहिती नाही म्हणून जीव झालो. कर्तेपणा कोणाचा? कर्तृत्व कोणावर अवलंबून आहे? प्रकृतीचे काय काय अवयव आहेत? हे कळले पाहिजे. काय काय क्रिया होतात? हे कळले पाहिजे.

एका राजाला असे स्वप्न पडले की तो भिकारी आहे आणि भीक मागत आहे. तो स्वतःला भिकारी समजतो. ही पहिली चूक आहे. परत कोणी भिक्षा वाढली नाही तर आणखी दुःख होते. नसलेल्या भिकारपणामुळे राजा असून दीन होतो. त्याचप्रमाणे, जीव कर्तृत्ववान नसतानाही कर्तृत्व मानतो. कर्तव्याभाव स्थिती असावी. पण नाही, सर्वजण मायेने गुरफटलेले आहेत. कर्तव्य–कर्तृत्व, जीव–जीवपणा हेच टिकून आहे. कर्तव्याची जाणीव आहे म्हणजे कर्तेपणा आलाच. बरं, दुसऱ्याचे कर्तव्य घेतले हे तर अजूनच वाईट. आता ते भोक्तृत्वरूपाने भोगावेच लागेल. 'कर्तृत्व' म्हणूनच भोक्ता. भोगतांना पुन्हा कर्तेपण, परत भोक्तेपणा...असे अनादीकाळाचे चक्र आहे. झाडापासून बीज, बीजापासून झाड, पुन्हा बीज, पुन्हा झाड.

प्रमाण –

**बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजीं सामाये ।**
**ऐसेनि कल्पकोडी जाये । परी जाति न नशे ।।५९।। अध्याय १७**

– श्रीज्ञानेश्वरी

याप्रमाणे, पुढे असंख्य धर्मांचा स्वीकार व त्यायोगे असंख्य दुःखांचा स्वीकार करावा लागतो.

'तत् त्वम् असि' या महावाक्यातील 'असि' हे पद एकत्व दाखविते. परंतु, हे समजण्यासाठी 'त्वम्' पदाचा नीट शोध आणि त्यानंतर 'तत्' पदाचा शोध करावा. स्थूल, सूक्ष्म प्रपंचांच्या धर्मांशी स्वतःचा संबंध जोडणाऱ्यांच्या तुलनेत 'मी अज्ञानी आहे' असे

समजणारा साधक श्रेष्ठ आहे. 'देव कळत नाही' असे म्हणणे, जीवपणा दर्शविणारे श्रेष्ठ लक्षण आहे. तुम्ही जीव ठरला, तरच 'तत्'चा विचार करता येईल. खरेतर तत् आणि त्वम्चे एकत्व आहे. 'त्वम्' पदार्थ लक्षात घ्या. 'ते तू आहेस' असे शास्त्र सांगते. पण, 'मी कोण' याचा आपण काय विचार करतो? 'मी महाराज' असे महाराजाला वाटत असेल तर तो गाळात जाणार. कारण तो आरोपित धर्मालाच मी समजतो. आपल्याला जीव–ब्रह्मैक्य साधायचे आहे. येथे जीव म्हणून या व परमार्थ जीवाने करा.

व्यवहारात जीव लबाडी करतो. शेजाऱ्याचे पोर याला जीवलग नसते. याचे पोर शेजारच्याला जीवलग नसते. दोघेही लबाड. म्हणून जगत् कार्य सुरू आहे. ज्यांच्यात जीव ओतणार त्याप्रमाणेच सर्व काही होणार आहे. पोरात जीव गुंतवला तर पोराचे संस्कार आपल्यात आज नाही तर उद्या येतीलच. हे सर्व पाण्यात टाकलेल्या रंगाप्रमाणे आहे. पाण्याचा संबंध ज्या रंगाशी होतो, त्याच रंगाचे पाणी होऊन जाते. तसेच, ज्यांच्याशी आपला संबंध होतो त्याच रंगाचे–संस्काराचे आपण होऊन जातो. कॉम्प्युटरमधील 'कट' आणि 'पेस्ट' सारखे येथे छापणे नाही. तर 'कॉपी' आणि 'पेस्ट' यासारखे छापणे आहे. म्हणजेच, एका कागदावरील अक्षर खोडून दुसऱ्या कागदावर लिहीणे असे नाही. तर, एका कागदावरचे अक्षर तसेच ठेऊन दुसऱ्या कागदावर तीच अक्षरे काढण्यासारखे आहे. त्याप्रमाणे, मुलाचे संस्कार मुलामध्येच राहतात. बापाने त्याच्यात जीव ओतला तर मुलाचे संस्कार बापात जसे आहे तसे छापले जातात. 'कॉपी–पेस्ट'. जगातील असंख्य पदार्थांचे संस्कार आपण असेच छापून घेत असतो.

परमार्थात लबाडी चालत नाही. केली तर जास्त काळ टिकत नाही. आपणहून साधूमध्ये जीव गुंतवला, परमार्थ केला तर त्या जीवाला साधू स्वतंत्र करतात. घर, धन, दारा इत्यादींमध्ये जीव गुंतवला तर तो पारतंत्र्यात जातो. तुम्ही स्वतंत्र आहात की परतंत्र आहात? पारतंत्र्यात असाल तर काही खरे नाही. दुसऱ्यांप्रमाणे जगत राहणे (कळत नकळतपणे) म्हणजेच पारतंत्र्यात असणे. मग आईच्या, मुलाच्या, बायकोच्या की देहाच्या? हे तुम्ही शोधा. लोक शास्त्र, साधूसंतांच्या तंत्रात राहतील? असे शहाणपण लोकांमधे नाही. तुमचा जीव कोठेही गुंततो, मग महाराजांनी त्याची काळजी का करावी? त्यांनी तुम्हांला त्यांच्या तंत्रात का वागवावे? आपण स्वतः कोणाच्या तंत्रात राहयचे आणि आपल्या तंत्राप्रमाणे कोणाला ठेवायचे? हे ज्याला कळले, अवगत झाले तो स्वतंत्र. या निश्चयालाच स्वातंत्र्य म्हणायचे. भारत अमेरिकेच्या म्हणण्याप्रमाणे चालतो. मग, भारत स्वतंत्र आहे का?

आपण धन, बायको इत्यादींच्या तंत्राप्रमाणे चालत असू तर परतंत्र आहोत. क्रोध आला तर मी त्याच्या आहारी जाणार नाही. मला वाटेल तेव्हाच क्रोध करीन – हे स्वातंत्र्य आहे. दुःख कोसळले तर मी दुःखी होणार नाही. मला वाटले तर दुःखी होईन – हे स्वातंत्र्य आहे. पण, हे एवढे सोपे नाही. ऐकणे सोपे आहे, आचरणात येणे अवघड आहे.

जीव शास्त्र, श्रीगुरू यांच्यात गुंतवावा. स्थूल, सूक्ष्मदेहांना कोठेही ठेवा. असंख्य जन्मांपासून स्थूल, सूक्ष्मदेहांनी परमार्थ केल्याने हळुहळू प्रगती होते. पण, जीवाने परमार्थ

केला तर अत्यंत वेगाने प्रगती होते. जो 'त्वम्' म्हणून परमार्थ करतो त्यालाच ब्रह्मपद घेता येते. खरेतर, स्वरूपतः जीव चैतन्यरूप, प्रकाशरूप आहे, शरीर नाही. जीव आला म्हणून स्थूल, सूक्ष्मदेहांना किंमत आली. या जीवाची खरी ओळख व्हायला हवी. पण, परमार्थात कोणी जीव द्यायला तयार होत नाही. स्थूल, सूक्ष्मदेहप्रपंचातच सर्व गुंतून राहतात. यातून बाहेर पडायला हवे.



प्रमाण –

**सांगते तुम्हां वेगळे निघा । वेगळे निघून संसार बघा ।।**

**– श्री संत एकनाथ महाराज गाथा**

या संसारातच अडकून राहिल्याने अनंत जन्म गटांगळ्या खाव्या लागतात. आता तरी शहाणे व्हा आणि पारतंत्र्य सोडा. पारतंत्र्यातच ठेऊ पाहणाऱ्यांच्यात राहू नका. त्यांच्यापासून वेगळे व्हा. जीवांनो! संसारातून वेगळे निघा आणि मग संसार बघा. त्यासाठी साधूसंतांना जीवलग करा.

प्रमाण –

**आतां तुम्ही कृपावंत । साधुसंत जीवलग ।**
**गोमटें ते करा माझें । भारओझें तुम्हांसी ।।**

**– श्री संत तुकाराम महाराज गाथा**

जे साधूसंताच्या सानिध्यात राहतील, त्यांना जे जीव देतील त्यांचे गोमटे म्हणजेच भले होईल. साधूसंताना जीव दिलात तर भार–ओझे त्यांच्यावर.

जीवाचा प्रमुख धर्म 'मी अज्ञानी आहे' असे समजणे हा होय. म्हणजेच आपणच आपल्याला विसरणे होय. आपणच आपल्या विस्मृतीमध्ये प्रकृतीरूप होऊन तिच्यातच गुरफटून जातो.

प्रमाण –

**तैसा आपलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती–।**
**सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ।।३५४।। अध्याय १५**

**– श्रीज्ञानेश्वरी**

स्वतःची अनोळख ज्याला असते तोच जीव होय. मग, येथून पुढे जे काही आहे ते कार्य आहे, तो जीवपणा आहे. आपण स्वतःला कर्ता, भोक्ता, चांगला, वाईट असे काहीतरी समजतो हाच जीवपणा, जीवत्व होय.

जागृतीत जीव अनेक ठिकाणी जातो. ही जागृती श्रेष्ठ आहे. का? कारण चार देहांसकट आत्मा जागृतीमध्ये आहे. स्वप्नामध्ये स्थूलदेह नाही. सुषुप्तीत स्थूल, सूक्ष्मदेह नाहीत. समाधीत स्थूल, सूक्ष्म, कारणदेह नाहीत. आत्म्यात चारही देह नाहीत. आत आत गेल्यावर बाहेरचे देह असून नसतात. बाहेर बाहेर आल्यावर आतले देह असून नसल्यासारखे होतात. आत्मा असून नाहीच वाटतो. हाच भ्रम. आत्मा आणि चार देह अशा पाच पदार्थांचा अभ्यास जागृतीत करता येतो.

जागृतीत हा जीव अनेक ठिकाणी गेल्यामुळे काय होते? एक दृष्टांत पहा. चार प्रखर दिव्यांच्या झोतात रात्री क्रिकेटचा खेळ सुरू असेल, तर प्रत्येक खेळाडूच्या चार सावल्या दिसतात. मग, खेळाडू एक की चार? एका दिव्यामुळे एक सावली. एकच खेळाडू चार ठिकाणी भासतो. सहा दिवे लावले तर सहा सावल्या दिसतील. त्याचप्रमाणे आई, बाप, मुलगा, नवरा, संपत्ती यांमध्ये जीव जातो. या सर्वच पदार्थांमुळे जीवाची सावली तयार होते. जीवच त्या सावलीत, त्या त्या पदार्थांच्या ठिकाणी आहे असं वाटतं. पण, यांमध्ये नक्की जीव कुठे आहे? या सावल्यांमुळे, पदार्थांमुळे मनुष्याची धावपळ होते, गोंधळ उडतो. एक सूर्य एक सावली बरी. चैतन्याकडून आपल्याकडे बघावे. मग एकच प्रतिबिंब दिसते. आई, बाप इत्यादींकडून स्वतःकडे पाहिले तर गोंधळ उडतो.

जीव आणि जीवत्व कशामुळे आले हे कळणे कठीण आहे. आई-बापामुळे जीव झालास काय? नाही. तुझ्या अज्ञानामुळे तू जीव झालास. अज्ञानाचा स्वीकार केला म्हणून जीव झालो? की देहांमुळे झालो? देहांमुळे असेल तर देह सोडावे लागतील. आई, वडील, नातलग इत्यादी सर्व त्यागावे लागतील. पुढे एखादा श्रेष्ठ योगी असेल तर तो देहत्यागही करतो. साधारणपणे स्थूल त्याग कपड्यांच्या त्यागापर्यंत होऊ शकतो. 'त्वम्' कसे झालो? – हा जीवाचा शोध आहे. देहामुळे जीव झालो नाही. देहांमुळे जीवाचा व्यवहार झाला. दृष्टांतातील राजा भिकारी कशामुळे झाला? झोपेत पडलेल्या स्वप्नामुळे झाला.

प्रमाण –

अगा अज्ञानाचिया निदा। जो घोरत होता बदबदा॥
तो स्वरूपीं प्रबुद्धा। चेइला कीं ॥३०४॥ अध्याय १४

– श्रीज्ञानेश्वरी

जीवपणा कशामुळे आला? अज्ञानरूपी निद्रेमुळे जीव होऊन त्याने जीवपणारूपी घोरणे सुरू केले. जीव तर दूर, आपण जीवकार्यातच गुंतलो आहोत. धन, घर, बायको, पोरं इत्यादींमध्येच फसलो. एखादा परमार्थ करू लागलाच तर परमार्थदेखील कार्यातच करतो. जीव झाला कारणामुळे आणि जीवपणा आला कार्यामुळे. ज्याला जीव जाणायचा आहे त्याला कार्य जाणून घ्यायची गरज नाही. पलीकडच्या घराला रंग दिला आहे की नाही याच्याशी आपल्याला घेणे-देणे नसते. कारण आपल्याला स्वतःच्या घरावर लक्ष केंद्रित करायचे

असते. त्याप्रमाणेच, जीव जाणण्यासाठी स्थूल–सूक्ष्मदेह, अनेक पदार्थ जाणून घेण्याची काही गरज नाही. कार्याची गरज नाही. त्यामुळे मी जीव झालो नाही. म्हणून स्थूल–सूक्ष्म प्रपंचात तल्लीन होऊ नका. प्रपंचात राहिलात तर 'मोले घातले रडाया' असे राहा.



प्रमाण –

**मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

काही ठिकाणी घरातले कोणी मेले की रडण्यासाठी मोलाने माणसं आणतात. आपण अशा घरी गेलो तर ओळखताच येत नाही की घरचे कोण आणि बाहेरचे कोण ? ते असे काही रडून दाखवितात की आपल्याला वाटते खरंच त्यांच्या जीवाभावाचा मनुष्य मेला. त्यांचे अश्रु आणि माया असूनही खरी नाहीच, हेच लक्षात घ्यावे. त्यांच्याप्रमाणेच स्थूल, सूक्ष्म प्रपंचात साधकाने राहावे. बायको, धन, संपत्ती इत्यादी असले काय आणि नसले काय. जीव यांच्यामुळे नाही. जीवाकडे लक्ष द्या. याला स्थूल, सूक्ष्म प्रपंचाची विरक्ती असे म्हणतात. याचा अर्थ असा नाही की स्थूल, सूक्ष्म प्रपंचामध्ये रमावे. कार्यात खूपच अडकलेल्या साधकाला श्रीगुरू कार्यातील साधने सांगतात. श्रीगुरुंनी जर कार्यातला परमार्थ करायला सांगितला, तर तो निष्ठेने करावा, सोडून देऊन चालणार नाही. उदाहरणार्थ – एकादशी करणे, तीर्थयात्रा करणे इत्यादी. तो परमार्थ जरी स्थूल, सूक्ष्म प्रपंचातील असला तरीही तो करावा. पुढे जाऊन ते साधनही संपेल.

जीव व त्याचे जीवत्व अज्ञानामुळे आले. म्हणून काय घालवावे ? अज्ञान घालवावे. दोन्ही देहांचे धर्म घालवत बसू नये. असंख्य युगे निघून जातील, नव्हे गेलीत, तरीपण देहांचे धर्म जाणार नाहीत. कारण हे आरोपित धर्म खरे नसतात. ते फक्त दिसतेकाळी आहेत.

प्रमाण –

**दोराचिया सापासी । डोंबा बडिया ना गव्हाळा ऐसी ।**
**संख्या न करवे कोण्हासी । तेवीं भूतांसि मिथ्यत्वें ।।१६३।। अध्याय ७**

– श्रीज्ञानेश्वरी

दोरीवर भासलेला साप काळा आहे की लाल, विषारी आहे की बिनविषारी इत्यादी अनेक प्रकारच्या शंका ह्या निरर्थक आहेत. त्याचप्रमाणे, भूतप्रपंच निरर्थक आहे.

देह आणि त्यांचे धर्म हे नसलेले पदार्थ आहेत. ज्याची दृष्टी रज्जूवर जाते त्याच्यासाठी सर्प राहत नाही. जीवत्व कशामुळे ? अज्ञानामुळे. सर्प कशामुळे ? दोरीच्या अज्ञानामुळे. सर्प कळण्यासाठी दोरी कळून घ्या. स्थूल, सूक्ष्म प्रपंच कळण्यासाठी अज्ञान कळून घ्या. 'त्वम्' का झालो ? आई, बापामुळे ? स्थूल, सूक्ष्मदेहांमुळे ? नाही. आईचे

मुलावर प्रेम हे मुलासाठी नसून स्वतःच्या जीवासाठी असते. आईचेच नव्हे तर सर्वांचेच स्वतःच्या जीवावर अधिक प्रेम आहे. आपले घेणेदेणे जीवाशी; म्हणून जीवाचा विचार करायचा आहे. इतरांचा नाही. यात आपण काही जगावेगळं करत नाही. सगळे जीवासाठीच करतात. फक्त असे दाखवतात की तुमच्यासाठी करतो. ही लबाडी आहे. खरं ओळखा. जे काही चाललंय ते सर्व जीवासाठी सुरू आहे. मग जीवाचीच ओळख का करून घेऊ नये? स्वतःचा जीव अर्थात 'त्वम्' ओळखा. स्वतःचा लबाडपणा घालवा. दुसऱ्याचा घालवत बसू नका. ओळखलेल्या जीवाला जपून ठेवा. नको त्या ठिकाणी गुंतवू नका. पण, महाराज जर म्हणाले की 'तुझा जीव दे' तर लगेचच जीव द्यावा. मग तो जीव मरायचाच नाही. ब्रह्मरूपच होईल. जीव कसा द्यायचा? आत्महत्या करून नव्हे. जे आत्महत्या करतात ते पिशाच्च योनीला प्राप्त होतात. जीव अज्ञानामुळे झाला असे कळणे श्रेष्ठ आहे. याही पुढे जीवात जीव चैतन्यामुळे आहे हे जाणणे श्रेष्ठ आहे. जीवाला जीवरूपाने जाणा. मग, पुढे ब्रह्मरूपाने.

*****

## चिंतन क्रमांक २८
## तत्पदाचा वाच्यार्थ – १

जन्ममरणाचा फेरा चुकविणे हे प्रयोजन 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अभ्यासाचे आहे. ही एक तपस्या आहे. अनेक जन्म तपस्या करावी लागते तेव्हा बंध लक्षात येतो. जन्म-मरण हे एक चक्र आहे हे लक्षात येते. विवेक, वैराग्य, शम-दमादि षट्संपत्ती आणि मुमुक्षुत्व ही ज्ञानमार्गी साधकाची अधिकारी लक्षणे आहेत. तसेच पवित्रता पाहिजे. काय काय पवित्र असावे? जीव पवित्र असावा. म्हणजे काय? लबाडी नसावी. जो पवित्र होईल तोच जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून सुटतो. आपण स्वतःला पवित्र समजतो. पण, खरेच पवित्र असतो काय? आपली पवित्रता शास्त्र, सद्गुरूंनी ठरवावी.

'तत् त्वम् असि' हे वेदातील महावाक्य आहे. चार वेदांमध्ये प्रत्येकी एक महावाक्य आहे. एकूण चार महावाक्ये आहेत. जगात यांपेक्षा कोणतेही वाक्य मोठे नाही.

'त्वम्'चे वाच्यार्थ अनेक आहेत. पुढे 'तत्'चा अभ्यास आहे. आपला 'त्वम्' प्रत्येक क्षणाला व्यभिचार पावत असतो. 'त्वम्'च्या खऱ्या व्याख्येशी असलेला आपला संबंध आपल्याला लक्षात येत नाही. देहांच्या धर्मांशीच आपले तादात्म्य असते. हा अपराध आहे. यामुळेच जन्म-मरणाचा फेरा आहे. आपल्याशी संबंधीत असलेल्या बाह्य पदार्थामध्ये बदल झाला म्हणजे 'त्वम्'मध्ये बदल झाला असे आपल्याला वाटते. आपल्या स्थूलदेहामध्ये बदल झाला तर 'त्वम्'मध्ये बदल झाला असे आपल्याला वाटते. सूक्ष्मदेहात बदल झाला की 'त्वम्'मध्येच बदल झाला असे वाटते. यातून बाहेर कसे पडावे हा एक मोठा प्रश्न आहे.

जो कर्तेपणा घेतो तो भोक्ता ठरतो. भोगण्यात येणारे सुख-दुःख हे पुण्य-पापामुळे निर्माण होते. पुण्य-पाप हे धर्म-अधर्मामुळे तयार होतात. धर्म-अधर्म कर्मामुळे सुरू होते. कर्माची उत्पत्ती क्रियेच्या पोटात होते. कर्तेपणा घेतलेल्या या जीवाकडे खालच्या पदार्थांकडून पाहता येते व वरून चैतन्याकडूनही पाहता येते. स्व-स्वरूपाचे ज्ञान नाही तो जीव आहे. 'स्व'ला जाणून मग कर्म करा. मग बंधन नाही. स्वतःला जाणणार नसाल तर काळ तुम्हांला कचाट्यात घेईल. मी कोण? रात्रंदिवस का राबतो? इतकी धावपळ का करतो? या प्रश्नांची योग्य उत्तरे मनुष्यदेहामध्येच जाणता येतात. मग असं काहीतरी करा की या सगळ्यातून सुटका होईल.

प्रमाण –

जेणें न ये जन्म यमाची यातना । ऐसिया साधना करा काहीं ।।

– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

यमाची यातना ज्यामुळे भोगावी लागणार नाही असं काहीतरी करा. ज्यामुळे जन्म-मरण चक्र सुटेल ते करा. जन्म-मरणाचं दुःख आपल्याला आहे हे कळावं. परंतु, आपल्या यातना वेगळ्या असतात. आपल्या यातना स्थूलदेह, सूक्ष्मदेह आणि त्यांच्या धर्मांशी संबंधीत असतात. हे बघा! संसारातील प्रश्न संपतच नसतात. परमार्थ मात्र संपतो. संसारात एक प्रश्न सोडवायला गेलो तर लगेच दुसरा प्रश्न समोर उभा राहतो. दोन पैसे कसे कमवावेत हा प्रश्न. पैसा मिळाला तर त्याचा विनीमय कसा करावा हा दुसरा प्रश्न लगेच येतो. तो पैसा कसा टिकवता येंईल हा सुद्धा पुढे मोठा प्रश्न. असलेला पैसा वाढवता कसा येईल हाही प्रश्नच. अशी संसारात अडचण आहे.

मागे आपण विचार केला की प्रकृतीचे करणे स्वतःच्या डोक्यावर जो घेतो तोच जीव आहे.

प्रमाण –

प्रकृति करी कर्में । तीं म्यां केलीं म्हणें भ्रमें ।
येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीव ।।३२६।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

जीवाच्या आणखी काही व्याख्या आहेत. त्या व्याख्यांमधीलच एक व्याख्या म्हणजे 'व्यष्टीस्थूलसूक्ष्मकारणशरीरत्रयोपहीतः जीवः।' अर्थात व्यष्टीने स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर आणि कारणशरीराची उपाधी असलेल्या चैतन्याला जीव असे म्हणतात.

परंतु, हे सर्व आपल्याला माहीत नाही. जीवाची जी वरील व्याख्या आहे, त्यातील उपाधी-उपधेय-उपहीत अशी भाषा आपल्याला माहीतच नाही. आपल्याला भलतीच भाषा माहीत आहे. कसातरी संसार करत राहणे एवढेच आपल्याला कळते. दोन रुपये कसे कमवता येतील हेच जाणण्याच्या पाठीमागे आपण लागलेलो आहोत. कशामुळे काय होते हे आपल्याला माहीत नाही.

प्रमाण –

तैसीं शुभाशुभें कर्में । जियें निपजती प्रकृतिधर्में ।
तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ।।१७८।। अध्याय ३

– श्रीज्ञानेश्वरी

प्रकृती म्हणजे काय हे आपल्याला माहीत नाही. प्रकृतीधर्म म्हणजे काय हेही आपल्याला माहीत नाही. अधिक दुसऱ्याचे ओझे आपल्या डोक्यावर घेतो. मग त्या ओझ्यामुळे आपण दबणार नाही का?

प्रमाण –



देखे पुढिलाचें वोझें । जरी आपुला माथा घेइजे ।
तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ।।१७७।। अध्याय ३
– श्रीज्ञानेश्वरी

'संसार माझ्यामुळे चालला आहे' असे आपण समजतो. आपण कोणालाही चालवत नाही. ते प्रकृतीधर्माचे काम आहे. जगातील प्रत्येक पदार्थाला स्वतःचे प्रारब्ध आहे. ज्याअर्थी तुम्ही येथे बसला आहात त्याअर्थी तुम्हाला हे सर्व माहीत आहे, असे गृहीत धरून सांगणे आहे. हे सर्व माहीत नसतांना जर हे चिंतन ऐकाल तर सात्त्विक विषयानंद होईल, पण जन्म–मरण फेरा चुकणार नाही.

जागे झाल्यापासून झोपेपर्यंत, आपण स्वतःला कोण समजायला पाहिजे? जीव समजायला पाहिजे. फेरा जीवाला आहे. स्थूलदेह काही वर्षांपर्यंत राहतो. सूक्ष्मदेहाचे आयुष्य एक कल्पाचे असते. जीव अनंत कल्पांपासून फिरतो आहे.

मनुष्य देहात स्वातंत्र्य आहे. इतर देहात स्वातंत्र्य नाही. इतर देहांमध्ये फक्त सुख–दुःखाचा भोग आहे. परमार्थ केवळ मनुष्य देहात करता येतो. आपण जीव आहोत हे लक्षात घ्या. तुम्ही सगळेकाही दुसऱ्याला देऊ शकता. पण काय देता येत नाही? जीव देता येत नाही आणि खरेतर तो कोणालाही देऊ नये. साधूसंत सांगतात, 'जीव शास्त्र आणि सद्गुरू यांना द्या'. जीव देणे म्हणजे काय? जीव जसा बायको, पोरं, धन यांच्यामध्ये गुंतविला, तसाच शास्त्र आणि सद्गुरू यांच्यामध्ये ओतावा. थोडे इकडे, थोडे तिकडे अशी लबाडी चालत नाही. अशी लबाडी टिकत नाही. अन्न, धन, मान यातून निघणे कठीण आहे. प्रयत्नाने अन्नावरील आणि धनावरील जीवाची वासना निघाली तर तो मानात अडकतो. असे उत्तरोत्तर कठीण आहे. यातून निघालात तर खऱ्या अर्थाने शास्त्र, सद्गुरूंना शरण जाता येईल. तेव्हा परमार्थ खऱ्या अर्थाने सुरू होईल. हे कसे साध्य करायचे ते तुम्ही पहा. सदैव स्वतःच्या मनाला, जीवाला शिकवत राहा.

प्रमाण –

नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ।।
– श्री संत तुकाराम महाराज गाथा

फक्त चिंतन ऐकतो त्या वेळेलाच नाही, तर, सतत हे लक्षात ठेवावे. आपण नको त्या पदार्थांत अडकलेला जीव काढायला तयार आहोत काय? परमार्थ बाह्य नाही, अंतरंग आहे. बाबांनो! परमार्थ जीवाने करा. जीवाकडे लक्ष द्या. जीव कोठे जातो ते जाणा. जेथे जातो तेथून त्याच्या स्वतःच्या जागेवर आणा. जीव ब्रह्म करायचा आहे का? होय. तेच तर आपले प्रयोजन आहे. तुम्ही ज्याला ब्रह्म करायचे त्याला घेऊन येत नाहीत. यायचे असेल तर जीव

घेऊन या, नाहीतर येऊ नका. या ठिकाणी एक मनुष्य जरी जीव घेऊन आला तरी पुरे. तुम्ही

म्हणजे स्थूल, सूक्ष्मदेह हे महाराजांचे खरे शिष्य नाहीत. वेदांताची प्रक्रिया जीवावर करायची आहे. त्याला नको आणायला? जो बंधात आहे, ज्याला मुक्त करायचे त्याला घेऊन या. बाबांनो! जीवाला शास्त्र, श्रीगुरूंकडे न्या.

जीवाला श्रीगुरूंकडे का न्यावे? श्रीगुरू म्हणतात, 'तू–त्वम् कुठेच गुंतला नाहीस', हे बरं झालं. मग, श्रीगुरूंनाच विचारावे, 'आता 'त्वम्'चे काय करू? ते सांगा', असे त्यांनाच का विचारावे? हे बघा! तुम्ही जर आजारी पडलात तर डॉक्टरकडे जाऊन त्यांनाच का विचारता? कारण योग्य व्यक्तीकडे जायला पाहिजे म्हणून. तसेच श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, दयाळू श्रीगुरूंकडे, वेदांताकडे, श्रुतीमातेकडे जीव न्यावा. श्रीगुरू अशा जीवाला 'तत्' पदाचा बोध करतात. 'त्वम्' व 'तत्' पदाचा लक्ष्यार्थ समजावून सांगतात.

'तत्'चा वाच्यार्थ 'त्वम्'च्या वाच्यार्थाच्या अगदी उलट आहे. 'तत्'चा वाच्यार्थ – अकर्ता, अभोक्ता, पाप–पुण्यरहित, धर्म–अधर्मरहित, सुख–दुःखरहित असा आहे.

कोण करतो? कोण भोगतो? तुम्हीच म्हणता 'मला त्रास होतो'. यावरून शास्त्राने, महाराजांनी आपल्यावर 'त्वम्' पदाच्या वाच्यार्थाचा आरोप केला. आपणच आपल्यावर तसा आरोप करतो. कशाचाही आरोप करतो. 'मी स्त्री आहे', 'मी पुरुष आहे', 'मी सुखी आहे', 'मी दुःखी आहे' इत्यादी आपण म्हणतो.

'तत्' पदाचा वाच्यार्थ अकर्ता आहे. 'तत्' काही करत नाही. का? मायेचे सर्व करणे आहे. प्रकृतीच्या धर्मांमुळे सर्व काही होते, हे ज्या चैतन्याला कळले त्याला 'तत्' पदाचा वाच्यार्थ आहे. स्वतः अकर्ता असून सर्व करणे प्रकृतीच्या धर्मांचे आहे, असे ज्या चैतन्याला कळले तो 'तत्' पदाच्या वाच्यार्थामध्ये आहे.

'त्वम्' पदाकडून 'तत्' पदाकडे वाटचाल कशी होते? 'त्वम्'ला अहंकार असेल तर 'मी केले' असे वाटते. पुढे हुशार झाला तर 'यांनी केले' असे म्हणतो. आणखी हुशार झाला तर 'पूर्व कर्माची गती' असे म्हणतो. आणखी पुढे गेला तर 'मी अकर्ता असून सर्व करणे प्रकृतीच्या धर्मांचे आहे' या निर्णयावर येतो, त्याला 'तत्' असे म्हणतात. 'समष्टी पातळीवर उत्पत्ती, स्थिती, प्रलय मी करतो' असे तो मानत नाही. जगत् कोणामुळे राहते? 'मायेमुळे' असे ज्या चैतन्याला कळते तो 'तत्' आहे. व्यष्टी पातळीवर जगत् दिसण्यासाठी अविद्या कारण आहे. समष्टी पातळीवरचे जगत् मायेमुळे आहे. जगत् म्हणजे मायाकार्य प्रपंच. हे जगत् अचिंत्य आहे. आपल्या किती विभूती आहेत हे 'तत्'लापण माहीत नाही. तो त्या भानगडीत पडत नाही. तो त्याच्या चिंतनात पडत नाही. अशाप्रकारे, जो मायाकार्य प्रपंच आहे असे साक्षात ओळखतो, तो 'तत्' होतो. जगत् हे मायेमुळे निर्माण झाले या निश्चयावर जीव येतो त्याला 'तत्' असे म्हणावे.

श्रीज्ञानेश्वरीमध्ये प्रकृती या शब्दाचा अभ्यास आहे. अष्टधा प्रकृती म्हणजे पंचमहाभूते, मन, बुद्धी व अहंकार असे मिळून आठ. प्रकृती म्हणजे प्रकर्षेण कृती. माया हे जगत् कसे करते? ते करण्यासाठी कोणती सामग्री वापरते? हे मायेलाच माहीत.

फॅन कसा फिरतो? बटन दाबल्याने. हे खरे आहे का? विद्युत नसेल तर तो कसा फिरेल? त्यामुळे, 'बटन दाबल्यामुळे फॅन फिरतो' या समजूतीचे खंडन झाले. करंटमुळे फॅन फिरतो हे शेवटी लक्षात येते. कार्याकडून कारणाचा शोध घ्यायला वेळ लागतो. शोधता येत नाही असे नाही.



हा देह का उत्पन्न झाला हे पहिले शोधा. नवरा का झालो? बायको का झाले? अशी मीमांसा केली पाहिजे. मीमांसा म्हणजे पूज्य विचार–योग्य विचार. जो 'त्वम्'चे कारण शोधता शोधता, 'हे सर्व प्रकृतीधर्मांमुळे सुरू आहे' या निर्णयावर येतो व तसा ज्याचा दृढ निर्णय होतो, त्याला 'तत्' असे म्हणतात.

या कल्पामध्ये 'तत्'पदावर जाता जाता 'मी सृष्टी करतो' असे जो समजतो तो पुढच्या कल्पात ब्रह्मदेव होतो. या कल्पामध्ये 'तत्'पदावर जाता जाता 'मी पालन करणारा आहे' असे जो समजतो तो पुढील कल्पात विष्णू होतो. या कल्पामध्ये 'तत्'पदावर जाता जाता 'मी प्रलय करणारा आहे' असे जो समजतो तो पुढील कल्पात शंकर होतो. या कल्पामध्ये 'तत्'पदावर जाता जाता 'मी स्वर्गसुख घेणारा आहे' असे जो समजतो तो पुढच्या कल्पात इंद्रलोकी जातो. 'स्त्री–पुरुषाच्या संगमाने मुले उत्पन्न होतात' असे जो समजतो त्याला पुढे कुत्रा, मांजर, डुक्कर व्हावे लागते.

या सर्वांमागची दिव्यता ज्याला लक्षात येईल तो दिव्य होईल. व्यष्टी पातळीवर करणे अविद्येमुळे व समष्टी पातळीवरचे करणे मायेमुळे असे ओळखावे लागते. असे ज्याच्या लक्षात येते तो 'तत्' होतो.

'तत्'पदाची प्राप्ती करणे चांगले की वाईट? 'तत्'पदावर येणार की नाही? महाराज चिंतन का सांगतात? व्यासपीठावर का बसले? करंटमुळे फ्रिज फिरत का नाही? इत्यादी सर्वांची कारण मीमांसा करून जो 'मायेमुळे' या निर्णयावर येतो तो 'तत्'पदाचा अधिकारी आहे. तेथे थांबून चालणार नाही. कारण पुढे लक्ष्यार्थही शोधायचा आहे.

जो 'त्वम्' प्रयत्नाने, तपस्येने, कष्टाने 'तत्'पदापर्यंत वाटचाल करतो तो पुढच्या कल्पात अकर्ता, अभोक्ता रूपाने सृष्टी चालवतो. तो स्वतःला अकर्ता, अभोक्ता वाच्यार्थाने मानतो म्हणून त्याला मुक्त मानला. 'तत्'च्या वाच्यार्थामध्ये मुक्तता आणि 'त्वम्'च्या वाच्यार्थामध्ये बंध आहे. 'त्वम्'च्या वाच्यार्थामधून जो 'तत्'च्या वाच्यार्थापर्यंत जातो तो मुक्त. बंध–मुक्तीचा व्यवहार 'त्वम्' आणि 'तत्'च्या वाच्यार्थात चालतो.

जो 'तत्'पदावर जातो तो निर्भय असतो. निर्भय, निर्गुण हा 'तत्'पदाचा वाच्यार्थ आहे. 'तत्' म्हणजे अकर्ता.

प्रमाण –

**तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं विश्वभ्रांतीचें मसैरें फिटे ।**
**मग अकर्तृत्व प्रगटे । मज ईश्वराचें ।।८३।। अध्याय ५**

– श्रीज्ञानेश्वरी

एक वेळ अशी येते की अकर्तृत्व कळते, म्हणजेच 'तत्' कळतो.



'त्वम्' आणि 'तत्'चा वाच्यार्थ कधीही एकरूप होऊ शकत नाही. 'त्वम्' कधीच 'तत्' होऊ शकत नाही. 'तत्' झाल्यासारखे वाटते तो भ्रम असतो. असे वाटणे हा प्रती–ईश्वर भाव आहे. तो प्रत्यक्षात ईश्वर नाही. तो खरा ईश्वर नाही. जो खालून वर प्रगती करत 'तत्'पदावर जातो तो खरा ईश्वर नाही. वरून खाली येऊन प्रकट होतो तो खरा ईश्वर आहे.

अंधार–उजेड एकत्र राहत नाहीत. 'तत्' आणि 'त्वम्' यांची वाच्यार्थात जुळणी होत नाही. कोल्हा वाघ नाही. वाघ कोल्हा नाही. कारण त्यांची लक्षणे भिन्न आहेत. 'त्वम्' हा 'तत्' होत नाही. 'तत्' हा 'त्वम्' होत नाही. 'त्वम्'चे धर्म कर्तृत्व, भोक्तृत्व आणि 'तत्'चे धर्म अकर्ता, अभोक्ता हे कधीच एक होऊ शकत नाहीत. बहुतेकजण 'त्वम्'पदाच्या वाच्यार्थाचा त्याग न करताच 'तत्'पदाकडे वाटचाल करत असतात. जो 'त्वम्'पदाच्या वाच्यार्थाचा त्याग न करता 'तत्'पदाकडे वाटचाल करतो, त्याला 'तत्'पदाच्या लक्ष्यार्थाचीच काय, पण वाच्यार्थाचीही खऱ्या अर्थाने प्राप्ती होत नाही.

'त्वम्'पदाच्या वाच्यार्थाचा त्याग करावा लागतो. नीट विचार करा. स्वतःला नवरा, बायको इत्यादी समजून परमार्थ करणे सोडा. ते कसे सोडावे ही एक कला आहे. ती कला तप, गुरूभक्ती, श्रवणेच्छा आणि अनिंदा हे गुण स्वतःमध्ये प्राप्त करून मिळवता येते. ज्याच्यामध्ये ही चार लक्षणे आहेत त्याला खरा परमार्थ लक्षात येईल.

प्रमाण –

म्हणोनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा ।
वरी गुरुभक्तीचा पुरा । प्रासादु जाला ।।१५०७।। अध्याय १८
आणि श्रवणेच्छाचा पुढां । दारवंटा सदा उघडा ।
वरी कलशु चोखडा । अनिंदारत्नांचा ।।१५०८।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

पुढे आपण 'तत्'चा अभ्यास करणार आहोत.

*****

।। ॐ तत् सत् ।।



## चिंतन क्रमांक २९
## तत्पदाचा वाच्यार्थ – २

जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास सुरू आहे. 'तत्त्वमसि' हे महत्त्वाचे महावाक्य आहे. चारही महावाक्ये महत्त्वाचीच आहेत. परंतु, 'तत्त्वमसि' महावाक्याचा जास्त विचार झालेला आढळतो. 'अहं ब्रह्मास्मि', 'अयमात्मा ब्रह्म', 'प्रज्ञानं ब्रह्म' ही अन्य तीन महावाक्ये आहेत. प्रत्येक वेदात एक अशी चार वेदात चार महावाक्ये आहेत. 'तत्त्वमसि' हे महावाक्य कोणत्या वेदात आहे? सांगा बरे? आठवत नाही. का? शास्त्राभ्यास महाराजांनीच करावा असे नाही. साधकांनीही शास्त्राभ्यास करण्याची गरज आहे. पण त्यासाठी आपल्याकडे वेळ नाही. प्रपंच करण्यासाठी वेळ आहे. जन्म-मरणाचा फेरा चुकवायचा असेल तर अभ्यास करा.

प्रमाण –

**असाध्य ते साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

प्रपंचात रस सहजपणे वाटतो. परमार्थाविषयी ऐकूनही रस वाटत नाही. एक तासाच्या चिंतनाचा प्रभाव किती वेळ राहणार? म्हणून अभ्यास करणे आवश्यक आहे. सामवेदातील छांदोग्य उपनिषदामध्ये 'तत्त्वमसि' महावाक्य आहे.

'त्वम्' हे 'जीव' शब्दाचे वाचक आहे. 'जीव' म्हणजे 'त्वम्'. आपण 'त्वम्' आहोत. 'त्वम्'चे आणि 'तत्'चे वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ पाहणे गरजेचे आहे. आपण 'तत्'चा वाच्यार्थ पाहत आहोत. 'तत्' म्हणजे 'ते' वाच्यार्थाने ईश्वर आहे. ईश्वरालाच शिव किंवा पुरुष असेही म्हणतात.

ब्रह्म + माया = ईश्वर
ब्रह्म + शक्ती = शिव
ब्रह्म + प्रकृती = पुरुष

'तत्'चे धर्म 'त्वम्'च्या विरुद्ध आहेत. 'त्वम्'चा एक धर्म आहे 'अल्पज्ञ'. त्याच्या विरुद्ध 'तत्'चा धर्म आहे 'सर्वज्ञ'. 'मी अल्पज्ञ' असे ज्याला वाटते तो सर्वज्ञ होण्याचा प्रयत्न करतो. व्यवहारात देखील आपण अज्ञानी राहावे असे लोकांना वाटत नाही. म्हणून सर्वजण व्यावहारिक ज्ञान मिळवण्याचा सतत प्रयत्न करतात. परमार्थाकडे जे वळतात त्यांना देखील कधी कधी वाटते की त्यांना सर्व कळावे. दुसऱ्याच्या मनात काय चालले आहे हे कळावे असे

वाटते. त्रिकालज्ञान असावे असे वाटते. अल्पज्ञत्व घालवत घालवत सर्वज्ञता प्राप्त करणे

सोपे आहे की अवघड आहे? तुम्ही अल्पज्ञ आहात काय? आहात हे सिद्ध करण्याची गरज नाही. 'त्वम्'पदाचा वाच्यार्थ ओळखणे गरजेचे आहे. 'मला ब्रह्म ज्ञात नाही' असे ओळखणे म्हणजेच 'त्वम्'पद. सृष्टीचा सर्व कारभार जाणणे – 'तत्'पद. सृष्टीमध्ये आजपर्यंत अनेक जणांनी सर्वज्ञता प्राप्त करण्याचा प्रयत्न केला आहे. आजपर्यंत अनेक जण 'त्वम्'च्या वाच्यार्थातून निघून 'तत्'च्या वाच्यार्थात गेलेले आहेत.

'तत्'चा आणखी एक धर्म म्हणजे – अकर्ता. तुम्ही कर्ते आहात की अकर्ते? तुम्हांला काय वाटते ते सांगा. शास्त्र वाचून किंवा महाराजांचे ऐकून नाही. 'मी करतो' असे ज्याला वाटते त्याला भोक्तेपणसुद्धा आहेच. जेव्हा आपल्याला आपले अकर्तृत्व कळेल, तेव्हा आपण 'तत्' होऊ. 'ते' काहीतरी वेगळे आहे असे नाही. अकर्ता हे एक पद आहे. अकर्तेपण लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. शास्त्र वाचतांना, महाराजांचे चिंतन ऐकतांना वृत्ती शांत असते, तेव्हा कदाचित् आपण अकर्ता आहोत असे वाटते. म्हणजे कधी कर्ता तर कधी अकर्ता असे वाटते. आपले अकर्तृत्व लक्षात आले तर आपल्याला ईश्वरपद प्राप्त होईल. 'तत्' हा सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, प्रलय करूनही स्वतःवर कर्तेपणा घेत नाही. सगळं करूनही करण्याचा अभिमान धरत नाही – ते 'तत्'पद होय.

जगत् तुम्ही उत्पन्न केले आहे काय? जगत् तुम्ही बांधलय काय? नाही. म्हणून तुम्ही जगताचे अकर्ते ठरले? समजा, जगताचे आपण अकर्तृत्व घेतले, तरी घरदार, मूलेबाळे यांचे कर्तृत्व घेतोच. म्हणूनच आपण अकर्ता ठरत नाही. तुम्ही जगत् उत्पन्न करणारे नाहीत, म्हणजे तुमच्याकडे जगताचे कर्तेपण नाही असे तुम्हांला वाटते. मग प्रश्न उत्पन्न झाला. आपण कोण आहोत? हेच आपल्याला धड माहीत नाही.

ही सृष्टी आपल्यामुळे आहे असे ज्याला वाटते त्याला जगताचे कर्तृत्व आहे. जेव्हा तो स्वतःचे अकर्तृत्व जाणणार तेव्हा तो 'तत्' होईल. 'जगताची उत्पत्ती–स्थिती–प्रलय मी करतो' असे वाटणे ही प्रथम पायरी आणि नंतर 'जगताची उत्पत्ती–स्थिती–प्रलय मी करत नाही', असे जाणणे ही दुसरी पायरी. 'जगताची उत्पत्ती–स्थिती–प्रलय करूनही मी ते करत नाही' या बोधावर जो असतो, त्याला 'तत्' असे म्हणतात. म्हणून ईश्वराला सापेक्षित मुक्त मानले आहे.

'तत्' पदावर वाटचाल करताना पहिले समष्टीने जगताचे कर्तृत्व घ्यावे लागते. बराच काळ त्या कर्तृत्वाचा भोग घेतल्यावर, या सर्वाचा वैताग आल्यामुळे तो जीवपणा असलेला शिव श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ सद्गुरुंना शरण जातो.

प्रमाण –

**जीवपणाचेनी त्रासें। यावया आपुलिये दशें।**
**शिवही मुहूर्त पुसे। जया जोशियातें ॥२४॥ प्रकरण २**

– श्रीअमृतानुभव

तो श्रीगुरूंना विचारतो, 'मी उत्पत्ती-स्थिती-प्रलय करतो हे खरे आहे काय?'

श्रीगुरू सांगतात, 'हे खोटे आहे'. तेव्हा त्याचे अकर्तृत्व प्रकट होते. तेव्हा तो 'तत्' होतो. जो शिव उत्पत्ती-स्थिती-प्रलय असा भोग घेत असतांनाही भोक्तेपणा मानत नाही तो 'तत्' आहे.

'तत्'चे आणखी धर्म कोणते? निष्प्रपंच, अजर, अमर, निर्विकार, निरंजन, निर्वैर इत्यादी. प्रत्येक शब्दावर एक चिंतन सांगता येईल. त्यातील काही धर्म थोडक्यात पाहू.

तुम्ही संसारी आहात की नाही? प्रत्येक क्षणाला काय वाटते? 'मी स्त्री आहे', 'मी पुरुष आहे' हाच आपला निश्चय असतो. लग्न करणे, घर चालविणे याला संसार म्हणत नाहीत. संसार म्हणजे जन्म-मृत्यूचा फेरा. संसार म्हणजे चौऱ्यांशी लक्ष योनींचा गरका. तुम्हांला या संसारातून बाहेर पडावे वाटते काय?

प्रमाण -

असोनी संसारीं जिव्हें वेगु करीं। वेदशास्त्र उभारी बाह्या सदा।।

- श्री संत ज्ञानदेव महाराज हरिपाठ

बहुतेकजण संसारी आहेत. कल्पानुकल्पे 'मी संसारी आहे' असे जो जाणतो तो 'त्वम्' आहे. कल्पानुकल्पे 'मी संसारी नाही' असा निश्चय 'तत्'चा असतो. अजन्मा आहे असा त्याचा निश्चय असतो. आपले अजन्मापद लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. संसारात कोठेही जन्म न घेणे म्हणजे अजन्मा. जो जन्मला तो संसारात आहे. अजन्मा-तत् पद. जन्म घेऊनही जन्म घेत नाही असा अवतार पुरुषांचा निश्चय असतो.

अजर शब्दातील 'जर' म्हणजे काय? म्हातारपण. मी जर्जर नाही हे ज्याला लक्षात येते तो 'तत्'. प्रथम जर्जर लक्षात घ्या. तुम्ही शरीर आहात काय? तुम्ही जर्जर होणार काय? कोणाला, 'तू म्हातारा आहेस' असे म्हटले तर त्याला राग येतो. वयस्क माणसाला, 'तू बालक आहेस' असे म्हटले तर राग येतो. कारण सिद्धांताप्रमाणे आपण तसे नाहीत हे नकळतपणे त्याला माहीत असते. बालकच नाही तर म्हातारपणाचा प्रश्न येतोच कुठे? कोणी आपल्याला म्हातारा म्हणू नये यासाठी प्रत्येकजण त्याप्रमाणे आपल्या देहाला सांभाळत बसतो. 'शरीर माझे नाही' हे कळण्यासाठी शरीर नीटनेटके ठेवणे हे ठीक आहे. पण प्रत्येकजण घरदार, धनदौलत सांभाळण्यासाठी आपले शरीर सांभाळतो. दुसऱ्याच्या शरीराकडे, वयाकडे बघून, 'तो लहान आहे', 'तो मोठा आहे' असे आपण सर्वसामान्यपणे ठरवितो. खरेतर शरीर पाहून एखाद्याबद्दल निर्णय लावू नये. त्या शरीरात असलेले 'ज्ञान' बघितले पाहिजे. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांचे वय किती होते? आज आपण त्यांचे ज्ञान पाहतो. परंतु, त्यांच्या काळात लहान मुलगा म्हणून त्यांची फार अवहेलना झाली. असो! शरीर सांभाळण्यात वेळ घालवू नका.

'समष्टीने स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर, कारणशरीर मला नाहीत', 'बालपण, तारुण्य,

वार्धक्य हे धर्म मला नाहीत', हे ज्याला लक्षात येते तो अजर आहे. तो 'तत्' आहे. प्रथम जर्जरत्व नंतर मरण. जो जर्जर नाही, तो मरेल काय? स्थूलदेहापासून सूक्ष्मदेहाची ताटातूट म्हणजे मरण. जीव हा देहाचे मरण म्हणजे आपले मरण समजतो. पुढे सूक्ष्मदेहाचेपण मरण आहे. असंख्य शरीरांचा प्रत्येक क्षणाला प्रलय होत असतो. महाप्रलयात सर्व सृष्टीचाच प्रलय म्हणजे मरण होते. समष्टीने महाप्रलय जरी झाला तरी 'मी मरत नाही', 'मी अमर आहे' अशा बोधावर जो आहे तो 'तत्' होय.

'तत्'चा आणखी एक धर्म म्हणजे – निरिच्छ म्हणजेच इच्छा नसणे. एखादे महाराज म्हणतात, 'आता मला कसलीच इच्छा राहिली नाही. मला जेवायची सुद्धा इच्छा नाही'. बरं! हे किती वेळ चालेल? समजा, महाराजांना जेवणाबद्दल विचारलेच नाही. दुपारी आणि रात्रीही विचारले नाही. इकडे महाराजांना जेवणाची इच्छा जागृत होऊ लागेल, जी की सुप्त होती. म्हणजेच इच्छा नष्ट न होता बीजरूपाने होती. अशाप्रकारे, इच्छा नष्ट करणे म्हणजे निरिच्छ नव्हे. इच्छेचे समूळ उच्चाटन करणे म्हणजे निरिच्छ होय. जो अशाप्रकारे इच्छा संपवितो त्याला 'तत्' असे म्हणतात.

'तत्'चा आणखी एक धर्म म्हणजे – निर्विकार. काम, क्रोधादिकांना विकार म्हणतात. अहंकार हा देखील एक विकार आहे. एखादे महाराज गंभीर आणि शांत दिसतात. तोंडावरची माशी देखील हालत नाही. लोक म्हणतात, 'महाराज निर्विकार आहेत'. आता याच महाराजांना कोणी थप्पड मारली तर? मी तसे करायला सांगत नाही. फक्त कल्पना करा. काय होईल?

सर्व साधक काम, क्रोधादिक यांना घालविण्याचा सतत प्रयत्न करतात. त्यांना नाहीसे कसे करायचे ही एक फार मोठी समस्या आहे. हे विकार एवढे भयंकर आहेत की एक एक करून साधकाला लोळवतात. संपूर्ण आयुष्य खर्ची पडते पण त्यातल्या एकालाही हरविणे जमत नाही. अनेकजण एखादाच विकार घालवता घालवता स्वतःच संपतात. विकार काही संपत नाही. प्रयत्नांची पराकाष्ठा करून जो विकारांना संपवतो त्याला 'तत्' असे म्हणतात.

अनंत जन्म विविध प्रकारचे विकार घालविण्याचा प्रयत्न केला तरी ते जाणार नाहीत. बरे, विकार संपवावेत की नाही? संपवायला तर हवेत. पण कसे संपवावे ही एक कला आहे. मृगजळाच्या पाण्याविषयी निर्माण होणारे कुठलेही विकार 'मृगजळ हे मिथ्या आहे' असे ठरविल्याशिवाय संपणार नाहीत. त्यासाठी अन्य कुठलेही उपाय कामी येत नाहीत. अन्य उपायांनी ते जातच नाही. फक्त गेल्यासारखे वाटतात. हे मात्र खरे की विकारांचे मिथ्यात्व प्रकट होणे अत्यंत कठीण आहे. जोपर्यंत विकारांपासून सत्यत्वाने भयंकर त्रास होतो, तोपर्यंत त्यांचे मिथ्यात्व कळलेले नाही म्हणून समजावे.

'तत्'पदाची प्राप्ती केव्हा होते? जेव्हा विकारच नाहीत किंवा मृगजळवत् आहेत या बोधावर साधक ठामपणे येतो तेव्हा तो निर्विकार होतो. काहीजण क्षुधा–पिपासा नष्ट करायचा प्रयत्न करतात. अथक प्रयत्नाने फक्त वाराच खाऊन ते जगू लागतात. म्हणजे त्यांना विकार नसतात काय? लोक म्हणतात, 'हे महाराज काही खात–पित नाहीत. बरे

आहे! त्यांना काही द्यावे लागत नाही' अशाप्रकारची अलौकिकता पाहून त्यांच्याभोवती लोकांची गर्दी जमते. महाराजांना काही द्यावे लागते, तेथे शिष्य कमी.


विकारांचा लय, क्षय करणे म्हणजे निर्विकार होणे नव्हे. 'विकारच नाही' किंवा 'मृगजळवत् आहेत' हा बोध म्हणजे निर्विकारता. अशाप्रकारचा साधक 'तत्' होतो.

'तत्'चा आणखी एक धर्म म्हणजे – निष्कलंक. जेथे विकार तेथे कलंक लागणारच. मद, मत्सर इत्यादी विकार असतील तर तेथे कलंक असणारच. जसा विकार तसा कलंक. स्वतःला वाईट समजणे जसे कलंक आहे तसेच चांगले म्हणणे सुद्धा कलंक आहे. मला सांगा, मी पापी आहे की पुण्यवान आहे? तुम्हांला काय वाटते? जोपर्यंत मी तुमच्याशी गोड बोलतो, माझा कुठलाही त्रास तुम्हांला जाणवत नाही तोपर्यंत मला तुम्ही पुण्यवान मानाल. तुमच्या कानाखाली दोन दिल्या तर? तुम्हांला शिव्या घातल्या तर? इत्यादी नको नको ते तामस व्यवहार तुमच्याशी केले तर मला पुण्यवान मानाल का? नाही. दुसऱ्याचा आपल्याशी होणारा व्यवहार पाहून आपण ठरवतो की तो चांगला की वाईट. परंतु, खरेतर चांगला की वाईट ही मीमांसा करणे फारच कठीण आहे. नंतर प्राप्त झालेल्या फलावरून कलंक–निष्कलंक ठरवणे सोपे जाते. जो निष्कलंक आहे तो 'तत्' आहे. जेथे पापाचा तीळमात्र कलंक सहन होत नाही ते पद निष्कलंक 'तत्' आहे. आपले पाप धुवून पुण्यवानाचे शिखर गाठणारा 'तत्' आहे. तोच निष्कलंक आहे. कुठल्याही देहाची प्राप्ती होणे म्हणजे पाप आहे. प्रथम पाप घालवावे. ते नामस्मरणाने जाते.

प्रमाण –

**नामसंकीर्तन साधन पैं सोपें। जळतील पापें जन्मांतरींचीं ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

पुढे पुण्य करा, पुण्यवान व्हा. त्यानंतर पुण्यवानाचा कळस गाठा. पापाच्या कलंकाने जीव नरकात जातो. राक्षस कलंकित आहेत. उच्च उच्च स्वर्ग योग्य त्या पुण्याने मिळतात. स्वर्ग कोणाचा आहे? इंद्रादिक देवांचा आहे. साधूसंत सांगतात स्वर्ग हा सुद्धा कलंकितच आहे. स्वर्गातील देवता पुण्याने कलंकित आहेत. अशा देव–देवतांची तुम्ही पूजा करता. त्यांचे पुण्य म्हणजे खरेतर पुण्यात्मक पाप आहे.

प्रमाण –

**स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे। पापात्मकें पापें नरका जाइजे।**
**मग मातें जेणें पाविजे। तें शुद्ध पुण्य ।।३१६।। अध्याय ९**

– श्रीज्ञानेश्वरी

तुम्हांला पापात्मक पापाने नरकाला जाणे आवडेल की पुण्यात्मक पाप करून

स्वर्गाला जाणे आवडेल? पापात्मक पापाने नरक आणि पुण्यात्मक पापाने स्वर्गाची प्राप्ती होते. मिश्रणाने मृत्यू-लोक प्राप्त होतो. असा तिसरा कलंक म्हणजे पृथ्वी (मृत्यू-लोक). परंतु, मृत्यू-लोकाचे महत्त्व काय की मनुष्य हे सर्व कलंक मृत्यू-लोकात काढू शकतो. देवादिक कलंकित आहेत आणि तो कलंक काढण्यासाठी त्यांना पृथ्वीवर यावे लागते.



प्रमाण -

स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा। मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

स्वर्गातले देव देखील पृथ्वीवर जन्म घेण्यासाठी आतूर असतात. स्वर्गाला गेले की देवाला जेव्हा वाटेल तेव्हाच आपल्याला पृथ्वीवर येता येते. देव म्हणतो, 'थांब इथेच. मजा कर. तुला काय अडचण आहे येथे? सर्व ऐश्वर्य तर आहे'. खरेतर देवलोकांचा देव होऊनही उपयोग नाही. तो सुद्धा कलंकितच आहे. इंद्र, प्रजापती व त्या त्या लोकी राहणारे सर्वजण पुण्य अथवा पापाने कलंकित आहेत. 'तीन्ही लोकांचा कलंक मला नको', असे ज्याला वाटते तो तिन्ही लोकांत राहण्यात आनंद मानत नाही. ज्याला त्रिलोकाची इच्छा नाही, त्रिलोकात वास करण्याची वासना नाही, त्याच्यासाठी महावाक्य विचार आहे. पुणेकर, बाणेरवासी, आळंदीकर, काशीनिवासी, स्वर्गवासी, मृत्यूलोकवासी, नरकवासी हे काहीही आपल्याला नको. हेच पुन्हा पुन्हा लक्षात घ्या. पुढे आपण परत 'तत्'चा अभ्यास करू या.

*****

## चिंतन क्रमांक ३०
## तत्पदाचा वाच्यार्थ – ३

'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अभ्यासाचा हेतू जन्ममरणाचा फेरा चुकविणे हा आहे. सर्वसाधारणपणे कोणालाही हा फेरा माहीत नाही. हे आपल्याला साधू, शास्त्र यांनी सांगितले तरी सुद्धा आपल्या वृत्तीवर ते राहत नाही. आपण घरदारात, संसारात व्यग्र आहोत, अडकून पडलेलो आहोत. या फेऱ्यातून बाहेर पडायचे असेल तर फेऱ्याची आठवण सतत ठेवली पाहिजे. सतत घरदाराची, संसाराची आठवण ठेवल्याने आपली अवस्था विचित्र झाली आहे. आपल्या सभोवतालच्या लोकांना परमार्थात रस नाही. त्यांना बंध माहीत नाही आणि तो कळून घेण्याची इच्छाही दिसत नाही.

अशाप्रकारच्याच लोकांत आपला जास्त वेळ जात असल्यामुळे एक तास चिंतन ऐकल्यावर आपण जसे आहोत तसेच राहतो. फार तर शब्द पाठ होतील. मुक्त होणे फारच कठीण होऊन बसले आहे. केवळ एक तास चिंतन ऐकल्याने आपण मुक्त होऊ, अशा भ्रमात कोणीही राहू नका. शास्त्रग्रंथांच्या अभ्यासाचा उपयोग करा. भगवान श्री आद्य शंकराचार्यांनी लिहिलेला पंचीकरण ग्रंथ चार देह आणि त्यांच्या धर्मांचे ज्ञान करून देणारा, ब्रह्माचा बोध करणारा आहे. आपण अभ्यास करत असलेल्या या पंचीकरण ग्रंथाच्या उत्तरार्धात 'तत्त्वमसि' महावाक्याचे निरूपण आहे. महावाक्याचा विचार आणि त्याप्रमाणे आचरण घडले तर आपण मुक्त होऊ.

सुरूवातीला आपण 'त्वम्'पदाचा अभ्यास केला. आता आपण 'तत्'पदाचा अभ्यास करत आहोत. 'तत्'पदाचा वाच्यार्थ लक्षात घेणे कठीण आहे. आपण स्वतःला 'जीव' समजत असू तर ती उच्च अवस्था आहे. आपल्या वृत्तीवर जन्म–मरण चक्राचे दुःख बाणले तरच खरा उपयोग आहे. मागील चिंतनात आपण 'तत्'चे धर्म – अजर, अमर, निष्प्रपंच, निष्कलंक, अभोक्ता, अकर्ता, सर्वज्ञ इत्यादी पाहिले. तसेच निर्वैर, निरंजन, निर्गुण, निराकार, नित्य, अजन्मा अशा आणखी काही शब्दांनी 'तत्'ची ओळख करता येते.

'तत्'चा आणखी एक धर्म आहे – निर्वैर. निर्वैर म्हणजे वैर भाव नसणे. कोणाशी आपला वैर भाव असतो ? ज्याच्यापासून आपल्याला त्रास, धोका असतो त्याच्याशी आपला वैरभाव असतो. जो स्वतःच्या इच्छेप्रमाणे दुसऱ्याला वागवू इच्छितो त्याला अनेक वैरी असतात. 'तत्'ला दुसराच काय पण पहिलापण वैरी नाही. कारण 'तत्' कोणालाही माझ्या इच्छेप्रमाणे 'असेच वागा, तसेच वागा' असा हट्ट करत नाही. म्हणून त्याचे कोणाशीही वैर नाही. जेव्हा दुजाभाव येतो तेव्हा वैर येते. 'तत्' कोणाबद्दलही दुजाभाव ठेवत नाही. एक 'तत्'ला 'दुसरा' नाही म्हणून वैर नाही. हा वेगळा तो वेगळा अशा समजूतीमुळे वैरभाव असतो. जो कोणी दुजाभाव नाहीसा करेल तो निर्वैर या पदावर जाईल.

अशाप्रकारे, 'तत्' अनेक गुणांनी युक्त आहे. पण हे सर्व 'तत्'च्या वाच्यार्थात आहे. वेदांतात 'त्वम्'कडून 'तत्' पाहिले जाते. 'त्वम्'ची ओळख नसेल तर 'तत्' कळत नाही. आपले गुण, धर्म आणि 'तत्'चे गुण, धर्म कधीही एक होऊ शकत नाहीत. म्हणून 'त्वम्'चा 'तत्'शी व्यवहार होऊ शकत नाही. कारण समान गुणांत, समान धर्मात व्यवहार होतो.

चर आणि अचर सृष्टीतील पदार्थ आणि माणसं आपल्या सभोवताली काही ना काही कारणाने जमतात. ते आपल्या पूर्वकर्मांप्रमाणे असते. पूर्वकर्मांचे भोग देण्यासाठी त्यांचा आपल्याशी संपर्क येतो. आता आपल्यावर त्यांचाच प्रभाव पडत असेल, त्यांच्यातच आपण गुंतून जात असू तर आपले काही खरे नाही. आपले लक्ष 'तत्' पदार्थाकडे पाहिजे. पण, आपण जेथे आहोत तेथूनच पुढे जायचे आहे. म्हणून प्रथम मी कोण आहे? असा 'त्वम्'चा विचार करावा.

दुसऱ्याला दोष देण्यात आयुष्याची अर्धी वेळ वाया जाते. लोक आणि पदार्थ यांपासून दुःख मिळाले तर समजावे की स्वतःमध्येच काहीतरी कमतरता आहे. आपण स्वतःमध्येच बदल करत गेलो तर 'तत्'ची ओळख होईल. पदार्थांचा संग तोडणे तीन प्रकारे आहे – स्थूलाने, सूक्ष्माने व कारणाने (जीवाने). एक वेळ स्थूलाने त्याग करणे सोपे. त्यापेक्षा सूक्ष्माने (मनाने) त्याग करणे कठीण आणि त्याहीपेक्षा कठीण, जीवाने त्याग करणे आहे. 'तत्'कडे जाण्यासाठी जीवाने त्याग करणे आवश्यक आहे. एकीकडे स्थूल, सूक्ष्म आणि दुसरीकडे कारण, महाकारणदेह आहेत. आपल्याला वर किंवा खाली जाता येते. खालचा प्रवास मोठा आहे. खालचा प्रवास म्हणजे बाह्य पदार्थांत, स्थूल, सूक्ष्मदेह आणि त्यांच्या धर्मांमध्ये गुरफटणे. वरचा प्रवास लहान आहे. वरचा प्रवास म्हणजे जीव नंतर तत् व पुढे त्या दोघांचे अधिष्ठान. असा सोपा प्रवास आहे. जे बाह्य पदार्थांत गुंतलेले असतात ते 'तत्–त्वम्' पदार्थाचे चिंतन करू शकत नाहीत. बाहेरील पदार्थांची गोडी जाऊन स्थूलदेहाची गोडी केव्हा लागेल? स्थूलदेहाची गोडी जाऊन सूक्ष्मदेहाची गोडी केव्हा लागेल? त्यापुढे जीवाची गोडी केव्हा लागेल?

हे शब्द तुमच्या एका कानात जाऊन दुसऱ्या कानातून बाहेर पडतात. हे शब्द तुमच्या ह्रदयामध्ये जात नाहीत. मात्र बायको, पोराबाळांचे शब्द कानांतून ह्रदयामध्ये जातात. मनुष्य महाराजांना शरण का जातो? तर घरदार, संसार नीट चालावा म्हणून. त्यासाठीच तो महाराजांची भक्ती करतो. तरी त्रास सुरूच आहे. मग काय उपयोग महाराजांचा? अरे! महाराजांचा उपयोग तत्, त्वम् पदार्थ कळून घेण्यासाठी करा. असे करणे श्रेष्ठ आहे.

चिंतनासाठी येत असताना जर रस्त्यात अपघात होऊन तुमचा हात तुटला तर तुम्ही चिंतनाला याल काय? समजा, तुम्हांला फार मोठे सुख झाले तर याल काय? येऊ शकत नाही. हे पहा! स्वतःला 'त्वम्' समजणे हे श्रेष्ठ आहे. पण आपण तर स्थूलदेहाच्या धर्मांत अडकलो. इतक्या खाली आपण आलो. आता महाराज तरी काय करणार? काही जण समजतात की ते नियमित श्रीज्ञानेश्वरी वाचतात म्हणून त्यांना स्वर्ग तरी प्राप्त होईलच. अरे!

असे नाही. पुढचा जन्म किड्या किंवा झाड असाही मिळू शकतो. तुम्ही श्रीज्ञानेश्वरी कशी  वाचता? देहात्मबुद्धी ठेऊन? बाह्य पदार्थांवर वासना ठेवून? बाह्य पदार्थांवरील वासना निघाली तरच आपण देहावर येऊ. बाह्य पदार्थांमध्ये प्रामुख्याने आपला गोतावळा येतो. हा गोतावळा आपल्याला गोत्यात घालतो. म्हणून मायेच्या या जाळ्यात अडकू नका.

प्रमाण –

नको नको मना गुंतू मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ।।
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ।।
सोडविना बंधू पाठिची बहिण । शेजेची कामिन दूर राहे ।।
सोडविना राजा देशींचा चौधरी । आणिक सोइरी भली भली ।।
तुका म्हणे तुला सोडवीना कोणी । एका चक्रपाणिवाचूनियां ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

या जगतामध्ये पदार्थांची वासना कोणाला नाही? सर्वांनाच आहे. मग 'त्वम्', 'तत्' संबंधी विचार कसा होईल? प्रथम 'त्वम्'पदावर आले तर पुढे 'तत्'पदाचा विचार करता येईल.

देव कसा आहे? चांगला की वाईट? ईश्वरामध्ये वैषम्य–नैर्घृण्य नाही. सगळेजण देवाला घाबरतात. कारण तो आपलं काहीतरी वाईट करील अशी भीती सर्वांना असते. सर्वजण आपल्यातील दोषांचा आरोप देवावर करतात. तुम्ही श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या पाया का पडता? विठोबाच्या पाया का पडता? देवाच्या पाया पडता की दगडाच्या पाया पडता की देवाच्या फोटोच्या पाया पडता? त्याने आपल्या पोट–पाण्याची व्यवस्था नीट करावी म्हणून? अरे! आपले पोट भरणे हे आपल्या पूर्व कर्मांमुळे की देवाच्या पाया पडल्यामुळे? देवाला कशासाठी भजता? बरे! भजता तर त्याला जाणून की त्याला न जाणून? त्याला न जाणता केलेले भजन वाया जाते. म्हणून त्याला जाणण्याचा प्रयत्न करावा.

प्रमाण –

येर मातें नेणोनि भजन । तें वायाचि गा आनेआन ।।
म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ।।३५०।। अध्याय ९

– श्रीज्ञानेश्वरी

आपण आपले धर्म त्याच्यावर आरोपित करू नये. तो अकर्ता का ठरला, तुम्ही कर्ते ठरले म्हणून. तुम्ही अल्पज्ञ, म्हणून तो सर्वज्ञ ठरला. तुम्ही दुःखी, म्हणून तो सुखी ठरला. 'तत्' म्हणजे कोण नक्की? तो 'त्वम्'च पण 'तत्' झाला.

आपल्याकडे जो पदार्थ नाही तो प्राप्त करण्याची माणसाची धडपड असते.

शेजारच्या माणसाकडे बघून आपल्याकडे गाडी नाही असे कळते. मग हा गाडीसाठी धावपळ करतो. एखादा काशीला जाण्याची तयारी करतो. का? फक्त कोणीतरी तेथे जाऊन आले म्हणून आपणही गेले पाहिजे असे वाटते. दुसऱ्यांचे अनुकरण करण्यामध्येच आपली वेळ निघून जाते. अशाप्रकारे, भोग भोगण्यातच आपण मरणाच्या दारात येऊन धडकतो. कुठलाही भोग संपतच नसतो. पुनः पुनः पदार्थ भोगावेत असे वाटते. पदार्थांच्या भोगाची उणीव संपतच नाही.



आपण कर्ता आहोत. आपल्याकडे अकर्तेपण नाही. आपल्याला कर्तेपणाची आवड आहे की अकर्तेपणाची? जेव्हा कर्ता करता करता थकतो तेव्हा कळते की यात काही तथ्य नाही. मग तो शांत होतो. त्याला कळू लागते की कलंकित राहण्यात काही खरे नाही. ज्या दिवशी हे कळेल त्या दिवसापासून त्याची 'तत्'कडे वाटचाल सुरू होते.

'काहीतरी करा, बोला, भोगत राहा', असे 'जगत्' शिकवत असते. धर्मशास्त्र 'सात्त्विक कर्म करा' असे शिकवते. आई, बाप काहीतरी करायला शिकवतात. त्यांना चांगले वाईट कोठे माहीत आहे? वेदांत शिकवितो – करायचेच नाही. संसार म्हणजे चांगले–वाईट 'काहीतरी' करत राहणे. धर्मशास्त्र म्हणजे चांगले करणे. वेदांत म्हणजे काही करायचे नाही. करणे सुटले पाहिजे. वेदांत केवळ ऐकल्याने मुक्त होणार नाही. कर्ता–भोक्ता राहू नका. आपल्याला भोगावेसे वाटले तर आपली दृष्टी खाली जाईल. 'तत्'कडे दृष्टी जाणार नाही. ही इच्छा बंद करावी. उदासीन व्हावे. त्यासाठी विवेक पाहिजे. मायाकार्य पदार्थांबद्दल आपण निरिच्छ व्हावे. तेव्हा 'तत्'कडे दृष्टी जाईल. 'तत्'कडे पाहिल्यावर काय दिसेल? वाच्यार्थाने 'त्वम्'च्या विरुद्ध असलेला धर्म – अकर्ता. कारण आपण स्वतःला कर्ता समजतो. नव्हे आपण स्वतःला सत्यत्वाने कर्ता समजतो. म्हणून, 'तत्'कडे पाहिल्यावर तो अकर्ता, सर्वज्ञ इत्यादी प्रकारचा दिसतो.

आपण अल्पज्ञ का आहोत? अंटार्टिका येथे काय आहे हे माहीत नाही. काश्मिर पाहिले नाही. बघण्याची इच्छा संपत नाही. बघ किती बघतो ते. वाढव जगतातील पदार्थांचे ज्ञान. पाहत राहा मायेच्या पोटात काय काय सामावले आहे ते. पुढे मायाकार्य प्रपंचात काहीतरी करत राहा. कर्तेपणा घेतो तेव्हा कार्य संपत नाही. कार्य वाढत राहते. अल्पज्ञता घालवत राहतो तेव्हा अल्पज्ञता वाढत राहते. कर्तेपणामध्ये दृढता येते. अल्पज्ञता दृढ होते.

'त्वम्'ने 'तत्'कडे पहावे. कशा रीतीने पाहावे? 'तत्'ला विरुद्ध धर्म जसे अकर्ता, अभोक्ता यांच्यामध्ये बसवावे. तो बसेल की आपण बसवावे? आपण मंदिरात जायचे आणि म्हणायचे 'देव काहीही करत नाही'. लोकं बडवतील. देव कसा आहे? करता–करविता? हेच आपल्याला शिकवले जाते. देव काहीही करत नाही, पाहत नाही, खात नाही. समजा एखाद्या चोर नसलेल्या माणसाला 'काय चोरा' असे म्हटले तर काय होईल? पुढे दररोज सकाळी त्याची चोर म्हणून आरती केली. चोराची आरती. तर त्या माणसाला भयंकर राग येईल का नाही? 'तत्' प्रपंचात नाही. पण आपणच त्याला प्रपंचात आणतो. पोराला पास कर. पोरीचे नीट होऊ दे. तो निष्प्रपंच. त्याला प्रपंचात कोणी आणले? तो शाप देत नाही, तो कृपा करत

नाही. तो प्रपंचात येत नाही. त्याला प्रपंचात आणावे का? आपण प्रपंचात राहावे का? 'तत्' सदैव निष्प्रपंच आहे, हे न कळल्यामुळे आपण प्रपंची झालो. 'तत्' अकर्ता आहे, हे न कळल्यामुळे आपण कर्ता झालो. 'तत्' निर्गुण आहे, हे न कळल्यामुळे आपण गुणाधीन झालो. 'तत्' न कळल्यामुळे, आपण 'त्वम्' झालो. 'तत्'च्या अनोळखीने 'त्वम्' दृढ होते. बरे! 'त्वम्'पदाचीच ओळख नसेल तर काय होईल? नवरा, बायको, राजा, रंक काय काय होऊ सांगताच येत नाही. 'त्वम्' आणि 'तत्' दोघांची ओळख पाहिजे. 'तत्'ला कधीही दोष लावू नये. तो अकर्ता, निर्विकार असा आहे. असा पक्का निश्चय पाहिजे.



तो अकर्ता असा तुमचा बोध असेल तर तुमचे कर्तेपण राहत नाही. तो अभोक्ता असा तुमचा बोध असेल तर तुमचे भोक्तेपण राहत नाही. तो निर्विकार असा तुमचा बोध असेल तर तुमचे विकारीपण राहत नाही. हे जसे जसे दृढ होते, तसे तसे तुमचे पद गायब होते आणि त्याचेच पद तुम्हांला प्राप्त होते. फायदा कोणाचा? तर आपलाच. पुढे खऱ्या देवाला पाहायला गेल्यावर त्याचेच स्वरूप आपल्याला प्राप्त होते.

प्रमाण –

देव पहायासी गेलो। देव होऊनिया ठेलो ॥

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

'तत्'पदाचा निर्णय जो लावतो, तो 'त्वम्' राहत नाही. प्रथम तुमचे धर्म 'तत्'वर टाकू नका. म्हणजे आचरणात तसे नको. हात तुटला तर कोणी तोडला? स्वतःच्या कर्माने तुटला. माझ्या सुख–दुःखासाठी कारण कोण? मीच. हेच लक्षात घ्या. मी जिलेबी खाल्ली सुख झाले. मी कारले खाल्ले तर दुःख झाले. देवाच्या कृपेने, अवकृपेने नाही. जेथे बाह्य पदार्थांना दोष देता येत नाही, तेथे 'तत्'ला दोष देता येईल काय?

'तत्'ला अकर्ता, अभोक्ता समजून परमार्थ संपेल काय? हा तर 'तत्'चा वाच्यार्थ आहे. 'तत्'चा लक्ष्यार्थ नाही. जो त्याला कर्ता समजतो, तो स्वतःच कर्ता ठरतो. मनुष्यदेह कोणामुळे प्राप्त झाला? चित्तामध्ये अनंत जन्मांचे संस्कार आहेत. त्यातीलच मनुष्य देहाच्या संस्काराने आपण मनुष्य झालो. मनुष्य देहामध्ये 'तत्–त्वम्' पदार्थ शोधन करता येते. प्रथम 'त्वम्' कर्ता, भोक्ता. मग, 'तत्' अकर्ता, अभोक्ता असा निर्णय लागला, तर कर्तृत्व नाहिसे होते. निर्णय लावा. त्यासाठी कोठे आले पाहिजे? 'त्वम्'पदावर – जीवावर आले पाहिजे. जीवावर आला की नाही हे कसे तपासणार? हे ज्याचे त्याला कळते की तो नेमका कोठे आहे. 'तत्'च्या निर्णयासाठी जीव पाहिजे.

येथे कसे आले पाहिजे? फक्त स्थूल, सूक्ष्मशरीर घेऊन येऊ नका. जीव घेऊन आले पाहिजे. जो जीव घेऊन आला त्याने या मार्गावर चालावे. जे शरीर घेऊन आपण फिरतो ते शरीर दुसऱ्याचे म्हणजे काळाचे. त्याहून जीव वेगळा. जीवाच्या जोरावर दोन देह परमार्थ करतात. मिरवणे कोणाचे? दोन देहांचे. गंध, टिळा, माळा कोणाला? अरे! हा तर फक्त

वरचा रंग आहे. हे नाटक आहे. नाटक बंद करा. जीवाने परमार्थ करायला शिका. पुढे 'तत्'ला 'कर्ता – करविता' इत्यादी दोषामध्ये घेऊ नका. श्रेष्ठ व्यक्तीला दोष दिला नाही तर आपल्यावर दोष येत नाही. 'तत्'वर दोषारोप करू नका. 'तत्' शब्दाचा अभ्यास 'त्वम्' पदावर येऊन करा. 'त्वम्'पदाच्या खाली राहून 'तत्'चा निर्णय लागत नाही.

*****

## चिंतन क्रमांक ३१
## तत्पदाचा वाच्यार्थ – ४

जन्ममरण फेरा चुकविणे या हेतूने आपला 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास सुरू आहे. हा फेरा चुकविणे कठीण आहे. जेव्हा स्थूलशरीर आणि सूक्ष्मशरीर अनुकूल परिस्थितीत असतात, तेव्हा जन्ममरणाचा फेरा लक्षात येत नाही. 'मम'वर आघात झाला, दुःखाचा प्रसंग आला तर असा विचार येतो की, 'या संकटाचे निवारण झाले तर बरे होईल'. आपत्ती कोसळली तर मनुष्याची स्थिती खराब होते. तेव्हा विचार येतो की, 'जन्म–मरणाच्या चक्रातून बाहेर पडले नाही तरी चालेल, पण या दुःखाचे, आपत्तीचे निवारण झालेले बरे'. या भावातून बाहेर पडले पाहिजे.

ज्याच्या अंगी मुमुक्षुत्व असते त्याला जन्ममरणाच्या चक्रातून बाहेर पडण्याची तळमळ असते. एकतर इकडे या किंवा जड वाटत असेल तर सोडून द्या. हे नाही आणि ते पण नाही अशी स्थिती होऊ नये. मी कुत्सितपणे हसलो अथवा टोचून बोललो तर त्याचा परिणाम तुमच्यावर होईल की नाही हे सांगता येणार नाही. परखड बोल अवघड असतो. हे पहा, आधी व्यवहार धड पाहिजे. स्थूल, सूक्ष्मदेहांच्या दुःखांनी घाबरायचे नाही. एखाद्या व्यक्तीने विश्वासघात केला किंवा आपली वाईट स्थिती झाली तरी डगमगायचे नाही. दुःखासह अती सुखामध्ये देखील जन्म–मृत्यूच्या फेऱ्यातून सुटण्याची इच्छा पाहिजे. तो फेरा केवळ ज्ञानाने नाहीसा होतो. त्यासाठी क्रियेचा परमार्थ कामाचा नाही. महाराजांच्या अथवा अन्य लोकांच्या क्रियेकडे पाहू नये, स्वतःकडे बघावे. स्वतःचा उद्धार कसा होईल याकडेच लक्ष द्यावे. दुसऱ्याचे चांगले, वाईट करण्यासाठी आपल्याकडे वेळ नाही.

घर, बायको, पोरं इत्यादींचा विचार बाजूला करा. फक्त स्वतःचा विचार करा. असे का करावे? हे बघा! आई मुलाचे संगोपन कशासाठी करते? मुलासाठी कष्ट करण्यात तिला आनंद वाटतो. यातनेतही व सुखातही स्वतःला सुख मिळण्यासाठीच ती धडपडत असते. त्यातच तिला बरे वाटते. प्रत्येक जण स्वतःच्या सुखासाठीच जगत असतो. पण दाखवताना प्रत्येक जण असे दाखवतो की 'मी तुमच्यासाठीच जगतो आहे'. दुसऱ्यासाठी मरमर करण्यामध्ये त्याला सुख वाटत असते. बृहदारण्यक उपनिषदाचा अभ्यास करा म्हणजे हे सर्व कळेल. प्रत्येकाने स्वतःचा 'उद्धार' या स्वार्थासाठीच जगले पाहिजे. त्यातून निर्माण होणारी एक आश्चर्याची गोष्ट सांगतो – अशाप्रकारचा आपला स्वार्थ साधताना आपल्या सोबतच्यांचे भले आपोआपच होईल. पण हे कोणालाही लक्षात येत नाही.

बरे! आपल्या सोबतच्यांनाही याच वाटेवर आपण घेऊन चाललो तर ते सहज येतील का? समजा, आपण पंढरीच्या वारीला जायचे ठरवले. त्यासाठी आपण दुसऱ्या एका व्यक्तीला आमंत्रण दिले. त्या व्यक्तीने काही अटी सांगितल्या, 'हे बघ! वारीच्या वाटेवर

दररोज सकाळी तू मला उठवायचं. चहा, नाश्ता आणून द्यायचा, आंघोळीला पाणी तूच आणून

द्यायचे. मी थकलो तर तूच मला पाठीवर उचलून न्यायचे'. अशा अटी घातल्या तर चालेल? त्याला म्हणावे, 'अरे! येऊ नकोस ना'. असा परमार्थ करणारे लोक योग्य आहेत काय? परमार्थासाठी लागणारी भूमिका त्यांच्याकडे नाही. नाटकातील पात्राची भूमिका नटाने नीट लक्षात घेतली तर भूमिका व्यवस्थित होणार. केवळ संवाद पाठ करून नाटकामध्ये बोलले तर नाटक नीट होणार नाही. परमार्थासाठी लागणारी भूमिका लक्षात येणे अवघड आहे. परमार्थात 'साधक' ही भूमिका हवी. जो साधक झाला तो सिद्ध होईल. जो साधकाची भूमिका नीट पार पाडतो तो सिद्ध होतोच. तर सांगायचा मुद्दा असा की परमार्थासाठी कोणालाही आग्रह करू नये. मात्र स्वतः करीत राहावे.

आपण 'तत् त्वम् असि'चा विचार करत आहोत. हे महावाक्य आहे. यात काहीतरी महत्त्वपूर्ण आहे. 'त्वम्' म्हणजे काय? 'जीव'. आपण 'जीव' आहात काय? कोण कोण स्वतःला 'जीव' समजतो? आपण चुकीचे उत्तर दिले तर वाईट वाटते. बरोबर उत्तर दिले तर अहंकार येतो. आपण स्वतःला 'अमुक नाव असलेला मनुष्य' असे मानतो. अनेक वर्षे श्रवण केलेले असल्यामुळे आता तुम्ही, 'मी अमुक नावाचा मनुष्य' असे मानत नाही. पण, 'बाप आहे', 'नवरा आहे' इत्यादी भाव दृढ आहेत. 'त्वम्'ला बोधाच्या आधारे वारंवार सांगावे लागते की 'मी स्थूल, सूक्ष्मदेह अथवा त्यांचे धर्म नाही'. असे ठामपणे पाहिजे. भ्रम जाण्यासाठी विचार पाहिजे. अज्ञान घालवण्यासाठी ज्ञानाचे अवलंबन असते. आपण 'त्वम्' आहोत हे लक्षात घ्या.

कारणरूपाने 'त्वम्' कळणे आणि कार्यरूपाने 'त्वम्' कळणे यात फरक आहे. 'मी काळा, गोरा, सुखी, दुःखी' इत्यादी स्थूलदेह, सूक्ष्मदेह आणि त्यांचे असंख्य धर्म यांनाच मी असे जाणणे म्हणजे जीवाला कार्यरूपाने जाणणे. 'मी अज्ञानी आहे' असे वाटणे म्हणजे जीवाला कारणरूपाने जाणणे. कारणरूपाने 'त्वम्' कळला पाहिजे. कार्याला मी म्हणावे काय? कार्यातून बाहेर पडलो तर कारणरूपाने 'त्वम्' होऊ. तुम्ही जीव का झालात? तुम्ही स्त्री का झालात? तुम्ही पुरुष का झालात? स्त्रियांना त्रास जास्त, दुःख जास्त. 'न्यून पुण्य अधिक पाप' – स्त्री देह. 'न्युन पाप अधिक पुण्य' – पुरुष देह. स्त्री देह प्राप्त होऊनही आणखी पाप करावे का? पुरुष देखील स्वतःचा उद्धार करून घेत नाहीत. एखादी व्यक्ती ब्राह्मण कुळातच का जन्मते? त्याच्यामागे काही कारण आहे. याचा एक अभ्यास आहे. असो! जीव का झालो? काहीतरी कारण असायला पाहिजे. जीव झालो याचा तपास नाही. जीव अविद्येमुळे झालो. कुठल्या अविद्येमुळे? मूळ अविद्येमुळे. तूळ अविद्येमुळे काय काय झालो हे मोजता येणार नाही. मी अमुक नावाचा मनुष्य आहे येथपासून ते नवरा, बायको, सुखी, दुःखी, पापी, पुण्यवान इत्यादी सर्व तूळ अविद्येमुळे. ही यादी खूप मोठी आहे. मूळ अज्ञानामुळे जीव झाला. मूळ अज्ञान घालवा. जोपर्यंत मी जीव झालो हे कळत नाही, तोपर्यंत जीव झाल्याचे कारणही कळत नाही.

'तत्' म्हणजे काय? तो 'तत्' का झाला? त्याची सिद्धी कोणी केली? त्याला

अकर्ता, अभोक्ता, करुणामय आपण म्हटले. कारण आपण स्वतःला कर्ता, भोक्ता, दुष्ट

समजतो म्हणून. अकर्ता, अभोक्ता इत्यादी धर्म आपण त्याच्यावर आरोपित करतो. तो धर्मात आहे काय? संसार आपण केला, जगत् आपल्यामुळे आहे. माणसे आणि पदार्थ आपल्या संपर्कात आपल्या पाप-पुण्यामुळे येतात. जर माझा काही अपघात झाला तर त्यासाठी मी जबाबदार आहे. आपल्याच कर्मानुसार आपल्यालाच फळ. कोणी मला शिवी दिली तर तो निमित्त झाला; माझ्या पापाच्या फळासाठी.

मी स्वतःला जर कर्ता समजतो तर कोणीतरी अकर्ता असणार. 'तत्'ला मी तयार केला. तसेच आपल्या भोगासाठी अनेक 'त्वम्' तयार झालेत. उदाहरणार्थ – बायको, मुले, धनदौलत, शेतीवाडी इत्यादी. त्याप्रमाणेच 'तत्'पदावरही कोणीतरी असायला पाहिजे. आपण जसे बाप, आजा होतो, तसे 'तत्'पदावर कोण जाऊन बसतो? जो जीव स्वतःला प्रयत्नपूर्वक कर्ता, भोक्ता, पापी, सुखी, दुःखी मानत नाही तो 'तत्'पदावर जातो. तुम्हांला 'तत्' व्हायचंय का? 'तत्' व्हायला आवडेल की 'त्वम्' राहायला आवडेल? कर्ता म्हणवून घ्यायला बरे वाटेल की नाही? अकर्ता व्हायला आवडेल काय? 'घर मी बांधले' असे म्हणणार की 'घर मी बांधले नाही' असे म्हणणार? त्यातही, चांगले झाले की 'मी केले' आणि वाईट झाले की 'दुसऱ्याने केले' असा लबाडपणा आपण करतो. तरीसुद्धा आतमध्ये 'मी केले, माझ्यामुळे झाले' असे लक्षात असतेच. तुम्ही कुठल्याही कर्माचा कर्ता होऊ नका, तर तुम्ही अभोक्ता व्हाल. जीवाने म्हणायचे 'मी काहीही केले नाही'. पुढे अकर्ता अशी सर्वोच्च स्थिती तुम्हांला प्राप्त होईल. अर्थात 'तत्'पदाचा तुम्हांला अधिकार येईल. या अधिकारावर तुम्ही गेले तर पुढच्या कल्पात तुम्ही सृष्टीची उत्पत्ती करू शकता. परंतु, 'मी सृष्टी केली नाही' असे अत्यंत श्रेष्ठ असलेला 'तत्' मानतो. जीवाने कर्तेपण सोडले तर अकर्तेपणाचा अर्थात 'तत्'पदाचा अधिकार येतो.

समजा कोणी येऊन विचारले, 'महाराज, तुम्ही देशाचे राष्ट्रपती होता का?'. मी काय करावे? त्याने माझा अधिकार आहे म्हणून विचारले राष्ट्रपती होता का? आता राष्ट्रपती पद घ्यायचे की नाही हा माझा प्रश्न आहे. मी त्या पदाचा स्वीकार केला तर त्या पदाशी संबंधीत जबाबदाऱ्यांसह सर्व ऐश्वर्य अत्यंत सहजच मला प्राप्त होईल.

जर या कल्पात तुम्हांला 'तत्'चा अधिकार आला तर पुढच्या कल्पात तुम्हांला विचारण्यात येईल, 'सृष्टी चालवता का?'. तुम्ही विचारायचं, 'मी एकटाच आहे की आणखी आहेत?'. मग उत्तर मिळेल – 'होय, रांगेत अनेक जण उभे आहेत'. तेव्हा तुम्ही म्हणायचं, 'मग त्यांच्यापैकी कोणालातरी विचारा. मी सृष्टी चालविणार नाही'. असे म्हणण्याइतके वैराग्य आपल्याकडे हवे.

प्रथम तुम्हांला 'तत्' व्हावे असे वाटेल काय? त्यासाठी जीवपणाचा वीट आला पाहिजे. कर्ता, भोक्ता या दोघांचाही वीट आला पाहिजे. तर मग अकर्ता, अभोक्ता होण्याकडे वाटचाल होईल. समजा असे झाल्यास आपल्याला 'तत्' कोणी केले? आपणच आपल्या प्रयत्नाने तिकडे वाटचाल केली. जो जीव त्या अधिकारावर गेला तो 'तत्' झाला. पण

कोणालातरी अकर्ता, अभोक्ता, निष्प्रपंच, निरंजन असे 'तत्' व्हावे वाटते काय? अरे!

कर्तेपणाची वासना सोडली तरच 'तत्' व्हावे असे वाटेल.

आपण करीत करीत राहिलो तर कधीतरी कंटाळा येईल. एक क्षणासाठी का होईना वाटेल, 'आता काही करणार नाही'. या करीत राहण्याचा शेवट काय आहे? अकर्तेपणात शेवट आहे. थांबणे म्हणजे अकर्ता. पहिल्यांदा वाईट करण्यापासून थांबावे. शेवटी चांगलं करण्यातूनही अंग काढून घ्यावे. मला सांगा तुम्ही लोकांना मनातूनही शिव्या देण्यापासून थांबणार केव्हा? हेवेदेवे करण्यापासून थांबणार केव्हा? थांबावे असे वाटतच नाही. पुढे काहीतरी पाहावे, काहीतरी ऐकावे, काहीतरी करावेच असे वाटते. सर्वजण कर्तेपणात भांबावलेले आहेत. सर्व स्थूल, सूक्ष्म इंद्रियांमार्फत जाणावे, करावे, भोगावे असे वाटते. उदाहरणार्थ – मनाने संकल्प करावा असे वाटते. पण तसे होऊ नये.

या विषयाचे निरूपण पूर्ण करावेच असा माझा संकल्प नाही. ते अत्यंत सहजच झाले तर योग्य आहे. मला कर्तेपणाचा अहंकार निर्माण करून तसे होत असेल तर ते योग्य नाही. तसे होऊ नये यासाठी भगवंताच्या चरणी मी सदैव प्रार्थना करीत असतो. साधारणपणे आपल्या अंतःकरणाचे स्फुरण बंद होत नाही. त्याचे कारण अनेक जन्मांचे संस्कार आपल्या चित्तात ठाण मांडून बसलेले आहेत. तेच संस्कार फलोन्मुख होऊन अंतःकरणात स्फुरतात. या अचाट आणि अफाट स्फुरणाला दाबून धरा, बंद करा असे मी म्हणत नाही. पण त्या स्फुरणामध्ये आपला जीव गुंततो व त्यावर अहं धरतो. पुढे त्या अहंकारामुळेच निर्माण झालेल्या शोक, हर्ष, भय, क्रोध इत्यादींमुळे सर्वजण भांबावून जातात. अधिक आपल्या या विचित्र स्थितीला दृढ करण्यासाठी आपल्या शरीराच्या बाहेरही अनेकजण तयार आहेतच. कधी कळतपणे तर कधी नकळतपणे अनेकजण आपल्याला बुडवायला तयार आहेत. बाबांनो! नीट विचार केला तर हे लक्षात येईल की वास्तविक आपणच बुडायला तयार आहोत. हेच ध्यानात ठेवा की नको तेथे जीव गुंतल्यामुळे आपण भवबंधनात अडकणार हे नक्की आहे.

'जीव' राहणे चांगले नाही. 'शिव' होणे चांगले की 'जीव' राहणे चांगले? कर्तेपणाच्या सुखापेक्षा अकर्तेपणाचे सुख श्रेष्ठ आहे. पण अकर्ता व्हायला कोणाला आवडते काय? आवड निर्माण झालीच तर ती जीवाला व्हायला पाहिजे. तुम्ही अकर्ता व्हाल काय? त्यासाठी नको तेथे फसलेला 'जीव' काढाल काय? अरे! जेथे मनाच्या संकल्पामध्ये 'जीव' अडकवायला परवानगी नाही, तेथे बाह्य पदार्थांमध्ये 'जीव' गुंतविण्यासाठी संमती आहे का? एखाद्याने स्थूलदेह आणि सूक्ष्मदेहांसह त्यांच्या धर्मांतून 'जीव' काढला तर त्याला परत स्थूल, सूक्ष्मदेह मिळेल काय? तो 'तत्'पदाचा अधिकारी होईल.

वेदांतमार्गातील प्रत्येक साधकाला 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा अभ्यास पूर्ण होईपर्यंत श्रवण करणे गरजेचे आहे. 'असि'पद ज्याला अवगत करायचे आहे त्याने आधी 'तत्'पदाचा विचार करावा. ज्याला 'तत्'पदाचा विचार करायचा आहे त्याने अगोदर 'त्वम्'पदावर यावे. 'त्वम्'नेच 'तत्'चा खऱ्या अर्थाने विचार करता येतो. ज्याला 'त्वम्'पदाचा अधिकार आला त्यालाच 'तत्'पदाचा विचार करता येईल. पुढे तो 'तत्'चा

विचार करता करता 'तत्'च होईल. ज्याच्या आश्रयाला आपण जातो त्याच्यासारखेच आपण

होतो. तुम्ही 'तत्'च्या आश्रयाला गेले तर 'तत्'च व्हाल. 'त्वम्' राहण्यापेक्षा 'तत्' होणे चांगले. 'तत्'चे अधिकारी व्हा. पण त्यासाठी प्रथम 'त्वम्'पदावर या. जीवावर या.

तुम्ही जीवावर आलात का? हे कसे कळेल? श्रीज्ञानेश्वरी जीवाने वाचली पाहिजे. श्रवण तीन प्रकारांनी करता येते – कानाने, मनाने, जीवाने. जीवाने श्रवण केले पाहिजे, तर खरा फायदा होईल. त्यासाठी जे करायचे ते केले पाहिजे. कृतीच्या परमार्थाच्या तुलनेत या मार्गात कष्ट नाहीत. 'त्वम्'पदावर यायला कष्ट किती? खरेतर काहीच नाही. पण आपण ऐकत नाही. अरे! यम ठोका देईल. त्यापूर्वी जागे व्हा. यमाला स्थूलदेहातून 'जीव' काढण्याचा अधिकार आहे. पण सूक्ष्मदेहातून 'जीव' काढण्याचा अधिकार त्याला नाही. यमाला जरी वाटले की एखाद्याला कुत्र्याच्या जन्माला घालू नये, तरी त्याला ते जमणार नाही. त्याला तो अधिकार नाही. तो अचानकपणे, पटकन ठोका ठेऊन देतो. फटका जेवढा जास्त जोरात तेवढ्या वेदना जास्त होतील. तयारीत राहा. कुठल्याही क्षणी मरण येणार आहे. त्याने यातना देऊन आपला जीव देहासह बाह्य पदार्थांतून काढण्यापेक्षा आपणच 'जीव' काढून ठेवला तर बरे. त्यासाठी ज्ञानमार्गाची प्रक्रिया अवलंबावी. या जन्मी नाही झाले तर पुढच्या जन्मात नक्कीच आपण ज्ञानी होऊ. पुढे तरी मुक्ती लाभेल. माझ्या या बोलण्याने तुमचा 'जीव' निघेल काय? तो तुमचाच विषय आहे. मरायच्या आत 'जीव' काढा. सगळ्यातून 'जीव' काढा. 'जीव' काढून येथे या. काढणार? केव्हा? लगेच प्रयत्न करा. त्यासाठी अंगात बळ हवे.

प्रमाण –

**तुका म्हणे भूमंडळी । आम्ही बळी वीर गाढे ।**

**– श्री संत तुकाराम महाराज गाथा**

जे वीर आहेत त्यांचे हे काम आहे. स्थूल, सूक्ष्मदेह आणि बाह्य पदार्थांतून 'जीव' काढा. मग अत्यंत वेगाने प्रगती होईल. 'तत्'च्या अधिकारासाठी 'त्वम्'वर या. पुढे 'तत् त्वम् असि' महावाक्याचा विचार करून संसार चक्रातून बाहेर पडा.

*****

## चिंतन क्रमांक ३२
## असिपदाचा विचार

'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या चक्रातून बाहेर पडण्याच्या उद्देशाने सुरू आहे. आपण 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा विचार करीत आहोत. काही जणांना वाटते की बाकीच्या तिन्ही महावाक्यांचाही विचार करणे आवश्यकच आहे. पण एका महावाक्याचा विचार जरी पूर्णत्वाला गेला तरी आपला उद्देश गाठला जातो. महावाक्याचा अनुभव येण्यासाठी जे जे आवश्यक आहे ते ते करावे. आपल्या मनाप्रमाणे करू नये, शास्त्राप्रमाणे करावे. आपण जागे झाल्यापासून ते झोपेपर्यंत पुष्कळ विचार करीत असतो. त्याचप्रमाणे पुढे कृती करतो. कृतीतच कृतार्थता मानतो. कृतीचा विषय येथे नाही. हा विचाराचा मार्ग आहे. परंतु, विचार हा शास्त्राप्रमाणे पाहिजे. आपण कोठेही राहिलो तरी विचार करता यावा. पुणे शहरामध्ये राहूनही विचार करता येतो व आळंदीमध्ये राहूनही विचार करता येतो. ठिकाणाचा बंध या मार्गात नाही. याप्रमाणे विचार करणे जमत नाही. म्हणून उपवास, तीर्थयात्रा, आळंदी–पंढरीची वारी इत्यादी साधनं करावी लागतात.

स्थूलदेहामुळे आपण की आपल्यामुळे स्थूलदेह? हे कळेना म्हणूनच आपण अडकलो. काही जण विचार करतात की 'तत् त्वम् असि' हे महावाक्य महाराजांकडून सोडवून घेतले, आता मुक्त झालो. पण, असे नाही. जोपर्यंत अनुभव येणार नाही तोपर्यंत मुक्ती नाही. मनुष्य देह पडला की मग घर, बायको, पोरं इत्यादी प्रपंच नाही, ज्यांना आपले म्हणत होतो ते आपले नाहीत. या विचित्र कचाट्यातून वाचविणारे जे श्रीगुरू आणि शास्त्र, खरेतर, त्यांनाच आपले समजावे. ते घेतील त्या परीक्षेला त्या त्या वेळेस तोंड द्यावे. शाळेत अमूक दिवशी अमूक वेळेस परीक्षा आहे असे मास्तर आधीच घोषणा करतात. परीक्षेला बसणे न बसणे हे विद्यार्थ्यांवर अवलंबून असते. परमार्थात थोडे निराळे आहे. शास्त्र, सद्गुरू कधी परीक्षा घेतील हे सांगता येत नाही. साधक परीक्षेला बसतीलच असेही नाही.

श्रीज्ञानेश्वरीतील ओवी वाचून कोणी म्हणतो, 'चांगली ओवी लिहिली! वा!' पण त्या ओवीचा अर्थ कळला का? कळला तर कसा? का फक्त ओवीच आठवणीत आहे? तसेच, 'तत् त्वम् असि' महावाक्याची केवळ आठवण करून जमणार नाही. महावाक्याचा प्रथम वाच्यार्थ आणि नंतर लक्ष्यार्थ कळला पाहिजे. हा विषय गुप्त आहे. हा विषय कानाने ऐकता येत नाही. दहा वर्षांपूर्वी काय घडले आठवते का? मागील चिंतनात काय सांगितले आठवते का? नाही. कारण ते शब्द कानाने ऐकले होते. अनेक वर्षांपूर्वी कोणी शिवी दिली होती ते लगेच आठवते. कारण ती शिवी ह्रदयातून जीवाने ऐकली होती. परमार्थ वाक्यांचे श्रवण ह्रदयापासून घडले पाहिजे. असे घडले तर मग वैखरी वाणीची गरज राहात नाही. 'तत् त्वम् असि' महावाक्यासंबंधी श्रवण कानाशिवाय करावे.

आपण 'तत्'पदाचा विचार करत आहोत. वाच्यार्थाने ज्याला अकर्ता, अभोक्ता, निर्वैर, निष्प्रपंच हे धर्म लागतात तो 'तत्' आहे. या शब्दांच्या विरुद्ध शब्द कर्ता, भोक्ता इत्यादींच्या सापेक्ष 'तत्'चे वाच्यार्थाने धर्म सांगितले. खरेतर अकर्ता, अभोक्ता ही तर ब्रह्माचीही लक्षणे आहेत. पण कशी आहेत हे कळले पाहिजे. जो 'त्वम्'पदावर आला आहे त्याने 'तत्'पदाचा विचार करावा. अंधार–उजेड हे विरुद्ध आहेत. त्याचप्रमाणे, अकर्ता मानला तर कोठेतरी कर्ता असतो. निष्प्रपंच मानला तर कोणीतरी प्रपंची असतो. ब्रह्माला मात्र सोवळ्यात ठेवावे. शास्त्रग्रंथांमध्ये 'ब्रह्माने सृष्टी केली' असे जरी लिहिले असले तरी तेथे ब्रह्माला ईश्वर या अर्थाने सांगितले आहे. जीव कर्ता, भोक्ता आहे. जीवाचा 'प्रपंच' हाच सर्वात मोठा विषय आहे. करण्यामध्ये न करणे, प्रपंचामध्ये निष्प्रपंचत्व जो पाहतो तो ईश्वर.

संसार खरा की खोटा? सर्वच वस्तू धडधाकट दिसत आहेत. विविध पदार्थ, फुलांचा सुगंध इत्यादी जाणले जातात, मग हे सर्व खोटे कसे? परंतु, ते पदार्थ वेदांत विचारांपुढे टिकणार नाहीत. मग खरे कसे? जगत् मिथ्या आहे असे म्हटले आहे. खोटे, असत्य आहे असे म्हटले नाही. मिथ्या शब्दाचा अर्थ सतासत्‌विलक्षण असा घ्यावा. वेदांत हा विचारांचा मार्ग आहे. इतर मार्ग तसे नाहीत. रामानुजाचार्य, मध्वाचार्य यांच्या संप्रदायामध्ये सोज्वळता, सात्त्विकता या गोष्टींना फार महत्त्व दिले जाते. अमूक पद्धतीनेच वागले पाहिजे, असे पुष्कळ नियम आहेत. इतर संप्रदायांच्या मते जगत् सत्य आहे. तेथे ब्रह्म हा विषय नाही. इतर संप्रदाय जगतामध्ये कसे राहिले पाहिजे हे शिकवतात. जग कसे आहे हे शिकवत नाहीत. कोणी कसे वागावे हा मोठा प्रश्न अनेक संप्रदायांकडे पाहिले म्हणजे येतो. परंतु, त्यांच्यात एकवाक्यता सापडत नाही. प्रत्येक मनुष्य इतरांना, 'असे नाही, असे करा' असे सांगत असतो. स्वतःला पण तसेच शिकवतो. अशाप्रकारे, सारवासारव करण्यात मोठी वेळ चालली आहे.

व्यवहाराप्रमाणे परमार्थातही काहीतरी करावेच असे वाटते आणि करतातही. का करतात? का हे सर्व सुरू आहे? माहीत नाही. प्रथम व्यवहार सावरता सावरता मग परमार्थ सावरायला पाहिजे. स्वतःच्या मालकीचे एक घर रिकामे पडून आहे. परत त्यावर एक मजला आणखी चढवायचा, हे घातक आहे. आपण प्रपंचातच गुरफटलो आहोत हे कळले पाहिजे. कशावरून तुम्ही प्रपंची आहात? घर, धनदौलत, बायको, पोरे इत्यादी पदार्थांना माझे माझे म्हणता म्हणून. यापेक्षा 'स्थूलदेहधारी' आहे असे वाटणे श्रेष्ठ. यापेक्षा 'सूक्ष्मदेहधारी' आहे असे वाटणे श्रेष्ठ. असे कळत कळत अज्ञानामुळे जीव झालो हे लक्षात येते. तेथून पुढे 'तत्' पदापर्यंतचा प्रवास आहे. ईश्वर हा सृष्टीतला सर्वोच्च जीव आहे. पण ईश्वर नित्यमुक्त मानला तर तो जीव नव्हेच; ब्रह्म आहे. जीव खालून वर प्रगती करीत करीत 'तत्' अर्थात ईश्वर होतो. पूर्वी स्वतःला कर्ता, भोक्ता मानणारा पुढे सापेक्षित अकर्ता, अभोक्ता होतो. तो नित्यमुक्त नाही. सापेक्षित मुक्त आहे. परंतु, अवतार हे वरून खाली येतात. त्याचे अकर्ता, अभोक्ता हे निरपेक्ष असते. श्रीज्ञानेश्वर महाराज निरपेक्ष अकर्ता, अभोक्ता अवतार आहेत. ते नित्यमुक्त ईश्वर अर्थात ब्रह्म आहेत.

प्रमाण –

ज्ञानदेव म्हणे दिव्य मी देईन । सद्गुरूची आण स्वयंब्रह्म ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

प्रथम तत्, त्वम्, असि या तीन पदांचा पृथकपणे वाच्यार्थ लक्षात घेतला पाहिजे. त्यानंतर तत्, त्वम्, असि यांचा एकत्रित वाच्यार्थ, त्यानंतर तत्, त्वम्, असि या तीन पदांचा पृथकपणे लक्ष्यार्थ लक्षात घेतला पाहिजे. त्यानंतर तत्, त्वम्, असि यांचा एकत्रित लक्ष्यार्थ कळला पाहिजे. 'तत् त्वम् असि' म्हणजे 'ते तू आहेस', हे असे कोणाला म्हटले ? जीवाला की शिवाला? शिव साधक नाही का? असू शकतो. जो प्रयत्नाने प्रगती करत करत 'तत्'पदावर गेला तो साधकच आहे. पण वैराग्यवान आहे. वैराग्य हे फार फायद्याचे आहे. अशा 'तत्'लाही त्याच्या या जीवपणाचा अतिशय त्रास होईल. मग तोही सत्य शोधेल. ब्रह्म शोधेल.

प्रमाण –

त्यागुनी कैलास सर्वही संपत्ती । स्मशानांत वस्ती रुद्र करी ।
कासया कारणें ब्रह्म शोधावया । आलों कोठूनियां माझा मीचि ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

ही उत्तरमीमांसा आहे. मीमांसा म्हणजे पूज्य विचार. येथे कोणाचा ; जीवा–शिवाचा राग–द्वेष करण्याचा अभ्यास नाही. राग–द्वेष रहित ही ब्रह्म मीमांसा आहे.

प्रमाण –

तैसें रागद्वेष जरी निमालें । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।
मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ।।२७१।। अध्याय ३

– श्रीज्ञानेश्वरी

पण, हे सर्वांजवळ बोलून उपयोग होत नाही. बोललं तरी कोणी घेणार नाही. योग्य अधिकाऱ्याला कळेल, पटेल, रुचेल, पचेल.

प्रमाण –

जें न सांगेचि पितया वसुदेवाशीं । जें न सांगेचि माते देवकीसी ।
जें न सांगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ।।८।। अध्याय ४

– श्रीज्ञानेश्वरी

हे तत्त्व गुह्य अति गुह्य आहे. ते कोणाला सांगता येईल ? अर्जुनाला सांगता येईल. हे

श्रवण करण्यासाठी अर्जुन पाहिजे. 'अर्जुन' या विषयावर दहा तास बोलता येईल. 'अर्जुन' हाच खरा साधक आहे. 'अर्जुन' म्हणजे 'त्वम्'. प्रथम 'त्वम्'पद अंगात उतरावे. सर्वजण 'अर्जुन' व्हा. सर्वजण 'त्वम्'वर या.

'अर्जुन' विषादयोगापासून परमार्थाला सुरूवात होते. जगातील सर्व जीवांना विषाद अर्थात दुःख आहे. आपण दुःखी कशामुळे आहोत? अनेक प्रकारच्या अडचणी आपल्या दुःखाला कारण वाटतात. पण, या अडचणी ज्या अज्ञानातून तयार होतात ते अज्ञान हेच खरे दुःख आहे. साधक हा स्वरूप अज्ञानाच्या दुःखाने दुःखी असावा. पण, सर्वजणच घर, बायको, पोरं ठीक नाही, मन शांत नाही, चित्त स्थिर नाही, अशा नको नको त्या कारणांमुळे दुःखी दिसतात. स्वरूपाच्या अज्ञानामुळे दुःखी दिसत नाहीत.

शास्त्राने 'तू देह नाहीस' असे सांगूनही, 'मी देह आहे' असेच वाटते. पुढे अज्ञान प्रपंच आणि त्याचप्रमाणे ज्ञान प्रपंचही आहे. 'तत्'पदाचा विचार करण्यासाठी प्रथम 'त्वम्'पदावर आले पाहिजे. मग 'तत्'पदाचे गुज तुमच्याकडे येईल. शेतकऱ्याने मशागत करून पेरून ठेवावे, पुढचे काम वरुण राजा करतो. 'त्वम्'पदावर येऊन राहायचे. शास्त्र, सद्गुरू पुढचे सांगतील. पण 'त्वम्'च्या कळण्यात गडबड असेल, 'त्वम्' यथार्थपणे कळला नसेल, तर परमार्थ सांगणारे गुरू देखील त्याचप्रमाणे भेटतात. मग दुसऱ्याला दोष देऊन काय उपयोग? आपल्या कर्मामुळे विशिष्ट प्रकारचे शास्त्र, लोक आपल्या संबंधात येतात. इच्छा, अनिच्छा आणि परेच्छा असे प्रारब्ध कर्माचे तीन भाग असतात. त्याप्रमाणेच हा खेळ चालतो. पण शास्त्र, सद्गुरू यांच्या कृपेच्या अंशावर आपण तरणार आहोत. 'कृपा करा' असे म्हणण्यापेक्षा आपल्या सेवेने कृपा संपादन करून घ्यावी. प्रथम लढाई, नंतर कृपेची अपेक्षा. पहिले ज्ञानमार्गावरील साधनांमध्ये यथार्थपणे चालणे आणि नंतर कृपेची अपेक्षा. असा अभ्यास असावा.

'त्वम्' हा 'त्वम्'पदावरून 'तत्'पदावर जाऊ शकतो. हा वाच्यार्थ आहे. 'असि' हे पद काय सांगते? 'असि' हे तिसरे पद आहे. 'असि' म्हणजे 'आहेस'. होता येईल असे नाही. इथे वर्तमानकाळ दिसतो. बरं! काय आहेस? वेगवेगळा विचार केला तर 'तत्' अकर्ता आहे आणि 'त्वम्' कर्ता आहे असे दिसते. सरळ सरळ अर्थ लावला, तर 'आहे' कोणाला म्हटले आहे? 'अकर्ता' आहे की 'कर्ता' आहे? 'त्वम्' असि? 'तत्' असि? 'त्वम्' आहे की 'तत्' आहे? समजा, दुरून मंदिराचा कळस दिसतो, पाया दिसत नाही. मग मंदिराला पाया नाही का? बरं! एखाद्याला फक्त पायाच दिसतो मग कळस नाही का? पाया की कळस? की दोन्ही आहेत? कळस दिसतो म्हणजे पाया नाही का? पाया दिसतो म्हणजे कळस नाही का? दोन्ही कसे दिसतील? मंदिराचा संपूर्ण निर्णय लावण्यासाठी विविध पद्धतीने विचार केला पाहिजे. ज्याप्रमाणे लोणी निघेपर्यंत दही घुसळत राहावे, त्याप्रमाणेच 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा विचार एक भगवंतरूपी सार निघेपर्यंत करावा. त्यासाठी किती क्षण, वर्षे लागतील हे सांगता येत नाही. व्यवहार करत असतानाच मरेपर्यंत हे करत राहा.

काहीजण परमार्थ मध्येच सोडून देतात. नुसते देवाच्या फोटोसमोर उदबत्ती

फिरविणे याला परमार्थ म्हणत नाही. श्रीगुरूसेवा आणि शास्त्रसेवा बंद पडली तर प्रगती होत

नाही. विचार प्रबळ होण्यासाठी सेवेची गरज आहे. श्रीगुरूंना, शास्त्राला सेवेची आवश्यकता आहे असे नाही. आपल्या पारमार्थिक कल्याणासाठी त्यांची सेवा करावी. प्रथम श्रवण त्यानंतर मनन घडले पाहिजे. पुढे निदिध्यासन आणि 'तत्', 'त्वम्' पदार्थ शोधन घडले की जीव मुक्त होतो. हे समजून घ्या. यासाठी योग्य शास्त्र, सद्गुरूंच्या सेवेत रत व्हा.

प्रमाण –

**जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंठा।**
**तो स्वाधीन करी सुभटा। वोळगोनी ।।१६६।। अध्याय ४**

– श्रीज्ञानेश्वरी

सद्गुरू चर सृष्टीतील आहेत. त्यांची सेवा करणे कठीण आहे. देवाची मूर्ति, शास्त्र अचर सृष्टीतील आहेत. त्यांची सेवा करणे सद्गुरूंच्या सेवेपेक्षा सोपे आहे. बहुतेकजण श्रीज्ञानेश्वरी ग्रंथ फक्त वाचतात. परंतु, सेवा कशी करायची हे माहीत नाही.

'तत् त्वम् असि' की 'त्वम् तत् असि'? 'तत्' हा 'त्वम्' आहे की 'त्वम्' हा 'तत्' आहे? असा पुन्हा पुन्हा विचार करा. हे विचार मंथन योग्य आहे. हा कोरडा तर्क नाही. जो सद्गुरू, शास्त्र यांचा आधार सोडतो तो तार्किक बनतो. सद्गुरू, शास्त्र न सोडता विचार करत राहा. 'तत्' अकर्ता आहे. 'त्वम्' कर्ता आहे. 'तत् त्वम् असि' या वाक्याप्रमाणे 'अकर्ता कर्ता आहे', 'अभोक्ता भोक्ता आहे', 'निष्प्रपंची प्रपंची आहे', 'निर्वैर वैरी आहे' असे अनेक अर्थ लागतात. आता 'त्वम् तत् असि' याप्रमाणे 'कर्ता अकर्ता आहे', 'भोक्ता अभोक्ता आहे', 'प्रपंची निष्प्रपंची आहे', 'वैरी निर्वैर आहे', 'सभय निर्भय आहे' असे अनेक अर्थ लागतात. याचाच अर्थ असा होतो – ईश्वर जीव आहे. जीव ईश्वर आहे. अंधार उजेड आहे. उजेड अंधार आहे. हे सगळे योग्य वाटते काय?

विचार करा, करत राहा. विचारहीन म्हणून मरू नका. पुढे जन्ममरणाचा मोठा वळसा आहे. एखादा म्हणेल, 'हा विचार न करता एवढी माणसे दररोज मरतात, त्यांचे काय होते? काय फरक पडतो हा विचार नाही केला तर?' हे बघा! बाहेर पुष्कळ गवत उगवलेले दिसते. माणसे मेली गवत झाले. गवत मेले पक्षी झाले. पक्षी मेले कीटक झाले. काय काय होईल सांगता येत नाही. हे चक्र एवढे सोपे नाही. हे सर्व कळणे फारच विचित्र आणि अवघड आहे. हे जर सोपे नाही, तर 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा विचार सोपा आहे का? जेव्हा वाच्यार्थाने विचार करतो, तेव्हा 'तत् त्वम् असि' किंवा 'त्वम् तत् असि' हे काहीच जुळत नाही. 'अभोक्ता भोक्ता आहे' किंवा 'भोक्ता अभोक्ता आहे' असे जुळत नाही. जुळेना म्हणून 'वाच्यार्थ' शब्द आला. ज्याअर्थी वाच्यार्थ जुळत नाही, त्याअर्थी काहीतरी 'लक्ष्यार्थ' असला पाहिजे. विरुद्ध धर्म जुळूच शकत नाहीत, असा आतापर्यंत आपण विचार करत आलो. 'तत्' 'त्वम्' नाही आणि 'त्वम्' 'तत्' नाही, असा विचार आपण केला. तर आपण जो विचार

केला तो वाच्यार्थ आहे. यापुढे काहीतरी 'लक्ष्यार्थ' आहे. पुढे, 'तत् त्वम् असि' या महावाक्याच्या लक्ष्यार्थाचा विचार सुरू करू.


पुढच्या चिंतनाच्या आधी 'तत्' आणि 'त्वम्'च्या लक्षणांचा अभ्यास करून या. त्यामुळे सांगितलेले विषय कळायला अधिक सोपे जाईल.

*****

## चिंतन क्रमांक ३३
## तत्त्वमसि महावाक्याचा वाच्यार्थ – १

जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होण्यासाठी 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास सुरू आहे. आपण या चक्रात अडकलेलो आहोत हे लक्षात यायला बराच काळ लागतो. लक्षात आले तरी बंधनाची तीव्रता लक्षात येत नाही. रोजच्या जगण्याच्या नादात मरणाची आठवण राहत नाही. मेल्यानंतर परत जन्म मग परत मरण मग परत जन्म या दुष्ट चक्राची आठवण राहत नाही. यावर काहीतरी उपाय करायला पाहिजे. तो उपाय म्हणजे ब्रह्मज्ञान. आपण कोण? देव म्हणजे काय? जगत् काय आहे? इत्यादी विचार आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अभ्यासाच्या निमित्ताने करीत आहोत. यामध्ये प्रथम 'तत्', 'त्वम्' यांच्या वाच्यार्थाचा विचार केला पाहिजे.

मागील चिंतनात 'असि' या पदाचा 'तत्', 'त्वम्' या पदांसोबत आपण थोडासा अभ्यास केला. 'असि' म्हणजे 'आहेस'. 'ते तू आहेस' असा सरळ सरळ अर्थ आहे, की 'तू ते आहेस' असा अर्थ आहे? सद्गुरू, शास्त्रासह विचार करणे हा तर्क नाही. तार्किक स्वतःच्या मताचा हट्ट धरून बसतात. सद्गुरू, शास्त्र यांच्यासह हे विचार मंथन सुरू आहे. श्रीगुरूंचे शब्द, शास्त्रवाक्य यांच्याशी आपला अनुभव जुळवणे हा आपला मार्ग आहे. या विचार मंथनातून योग्य सार निघणे गरजेचे आहे. विचार तात्पर्य निश्चयापर्यंत गेला पाहिजे.

'त्वम्' हा कर्ता, 'तत्' हा अकर्ता आणि 'असि' म्हणजे आहे. 'तत् त्वम् असि' याप्रमाणे वाच्यार्थ केला तर 'अकर्ता कर्ता आहे'. 'त्वम् तत् असि' याप्रमाणे वाच्यार्थ केला तर 'कर्ता अकर्ता आहे'. नीट विचार केला तर दोन्ही अर्थातील विचित्रपणा आपल्या लक्षात येतो. अंधाराला उजेड म्हणणे किंवा उजेडाला अंधार म्हणणे यापैकी कोणते योग्य आहे? दोन्हीही अयोग्य आहेत, हे आपल्या लक्षात येते. अकर्ता कर्ता असेल काय? 'ईश्वर जीव आहे' किंवा 'जीव ईश्वर आहे' असे दोन्हीही असू शकत नाही. म्हणजेच 'असि' शब्दाने एकवाक्यता करण्याचा आपण प्रयत्न केला तर विरुद्ध धर्म एकत्र कसे येतील? तो करण्याचा प्रयत्न करावा का? खरेतर, करूच नये. मग योग्य तो अर्थ शोधावाच लागेल. या महावाक्याचा निर्णय लावावाच लागेल. ज्ञानमार्गात तेच साध्य केले जाते.

'मी ज्ञानमार्गी आहे' असे नुसते म्हणणे वेगळे आणि ज्ञानमार्ग कळणे वेगळे. त्याप्रमाणे वागणे त्याहूनही वेगळे. लोक म्हणतात की ज्ञानाच्या गोष्टी ऐकण्यापुरत्या बऱ्या वाटतात. मग काय अनुयायी ठरलो आपण शास्त्राचे? शास्त्राच्या विरुद्ध आपण बोलतो. शास्त्राचे खरे की आपले खरे? शास्त्राचे आणि आपले मत वेगळे आहे. अधिक ईश्वराशी आपले जुळत नाही. कारण ईश्वर, शास्त्र यांच्या गुणांशी जुळवून घेण्यात आपल्याला रस नाही. समगुण, समजातीत व्यवहार होतो. आपले रोज कोणाशी पटते? ज्याच्याशी पटते

त्याचे गुण पाहायचे. त्याच्या गुणांवरून आपल्याला आपले गुण कळतात.



शास्त्र म्हणते, 'ते तू आहेस'. पटते का? नाही पटत. बरं! पटण्याच्या आधीची पायरी कोणती? कळणे. कळले तरंच पटण्याचा प्रश्न. श्रवणानंतर कळण्यासाठी, पटण्यासाठी आपली बुद्धी का चालत नाही? बुद्धीवर घाला घालून मन सैरावैरा का धावते? कारण अपंचीकृत वायूच्या सत्त्वगुणापासून मन बनलेले आहे. समजा, घराचे खिडक्या, दारे बंद आहेत. बाहेर वादळ आहे. वारा जोरात वाहात आहे. परंतु, खिडक्या, दारे बंद असल्यामुळे घराच्या आतमध्ये असणारा वायू सापेक्षित स्थिर आहे. आता, खिडक्या, दारे उघड्या ठेवल्या तर काय होईल? घरामध्ये हवा जोरात इकडून तिकडे, तिकडून इकडे वाहायला सुरुवात होईल. अगदी त्याचप्रमाणे पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रियेरूपी खिडक्या, दारे उघड्या ठेवल्या तर वायूपासून बनलेले हे मन स्थिर राहात नाही. दहा दिशा भटकत राहते. मग ऐकलेले काही कळत नाही, पटत नाही आणि म्हणूनच वठण्याचा प्रश्नच येत नाही.

अपंचीकृत तेजाच्या सात्त्विक भागापासून बुद्धी बनली आहे. तेज म्हणजेच अग्नी. गॅस, कोरडे लाकूड आणि ओले लाकूड जाळले तर वेगवेगळ्या रंगाचा अग्नी दिसतो. गॅसचा अग्नी निळा, कोरड्या लाकडाचा पिवळा, ओल्या लाकडाचा तर अग्नी दिसतच नाही, नुसता धूर होतो. निळ्या रंगाचा अग्नी प्रखर असतो म्हणून गॅसचा अग्नी श्रेष्ठ. शरीरामध्ये जठराग्नी मुख्य आहे. आपण ज्याप्रमाणे अन्न खातो त्याप्रमाणे प्रथम अग्नी बनतो. पुढे त्याप्रमाणेच बुद्धी बनते. जसे इंधन तसा अग्नी. फळे खाल्लीत तर अग्नी वेगळा. वडापाव खाल्ला तर अग्नी वेगळा. अन्नावर बुद्धीचे व्यवस्थित चालणे, न चालणे अथवा कसेतरी चालणे अवलंबून आहे. निळसर अग्नीत जशी तीव्रता असते तशी पिवळ्या किंवा लाल अग्नीत नसते. ओलसर लाकूड नीट जळत नाही. त्याप्रमाणेच, आहार नीट तर बुद्धी नीट. चिंतन ऐकण्यासाठी प्रथम मन स्थिर पाहिजे. चिंतन संपल्यानंतर घुसळण्यासाठी, मंथन करण्यासाठी बुद्धीचे काम आहे.

बायकोने नवऱ्याचे ऐकणे हा साधारण धर्म आहे. असे करण्यात तिचे भले असते.

प्रमाण –

पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता ।
अनायासें आत्महिता । भेटेचि ते ।। ४५६ ।। अध्याय १६

– श्रीज्ञानेश्वरी

त्याप्रमाणेच, मनाने बुद्धीचे ऐकावे की बुद्धीने मनाचे? खरेतर बुद्धीप्रमाणेच मनाने वागावे. म्हणजे मन धड आहे असे म्हणता येईल. मन म्हणजेच सूक्ष्मदेह धड तर श्रवण धड. अंतःकरण जर मलिन असेल तर स्थूलशरीर मनुष्याचे पण सूक्ष्मदेह कुत्र्याचा असे म्हणावे लागेल. मग हा विचार होणार नाही.

तर, तत्त्वज्ञान पटण्याच्या आधी 'कळणे' ही पायरी असते. शास्त्र म्हणते, 'ते तू आहेस'. आपण म्हणतो 'मी अमुक नावाचा पुरुष आहे'. त्यापेक्षा स्वतःला सुखी–दुःखी

समजणे बरे आहे आणि जीव समजणे त्यापेक्षाही बरे आहे. आपण स्वतःला कर्ता, भोक्ता जेव्हा ठरवतो, तेव्हा आपण जीव ठरतो. जेव्हा आपण जीव ठरतो, तेव्हा 'मी राम देशपांडे' असे नसते. 'मी जीव आहे' असे वाटले तर मग खालचे स्थूल, सूक्ष्म आपण ठरत नाही. म्हणून स्वतःला 'जीव' अर्थात 'त्वम्' समजावे. सर्वजण जीव व्हा. बाकीचे काही राहू नका. महावाक्यामध्ये 'तत्' आणि 'त्वम्'चा विचार आहे. तुम्ही कोण आहात? नामधारी शरीर, सुखी–दुःखी हे सर्व जीवावर आरोपित आहे.



प्रथम श्रवण हवे. दुसरे कळणे आणि पुढे पटणे. कळले तर पटण्याचा विषय आहे. कळले स्वतःप्रमाणे की सांगणाऱ्याप्रमाणे? सांगणाऱ्याने ऐकणाऱ्याप्रमाणे सांगावे. पण शास्त्राचाच सिद्धांत पटवावा. तर खरा वक्ता. ऐकणाऱ्याने सांगणाऱ्याप्रमाणे ऐकावे, स्वतःप्रमाणे नाही. तर खरा श्रोता. जर श्रोता स्वतःप्रमाणे ऐकणार तर मुक्त होणार नाही. वक्ता मुक्तच असावा.

आपण एक तर 'त्वम्' असावं किंवा 'तत्' असावं. आपण 'तत्' नाही हे नक्कीच. मग राहिला 'त्वम्'. 'त्वम्' सहजपणे ज्ञात होऊ शकतो. आपण 'तत्' असणे शक्य नसल्यामुळे 'त्वम्' म्हणून तरी धड राहा. जो 'त्वम्' म्हणून जगतो तोच खरा साधक आहे. असा साधकच 'तत्'चा विचार करू शकतो. 'तत् त्वम् असि' किंवा 'त्वम् तत् असि' हे वाच्यार्थाने तीळमात्र योग्य वाटत नाही. वाच्यार्थ योग्य नाही हे केव्हा व का पटते? महाराज म्हणतात म्हणून? शास्त्र सांगते म्हणून?

समजा, दोन जावा एकत्र राहत आहेत. एका जावेने तिच्या स्वतःच्या नवऱ्याला आवडणारी भाजी गुप्तपणे केली. दुसऱ्या जावेला कळले तेव्हा तिला दुसरीचा खूप राग आला. कारण ती भाजी तिच्या नवऱ्याला अजीबात आवडणारी नव्हती. म्हणून तिचा त्रागा झाला. तसे तुम्हांला न आवडणारे जेवण दिले व ते आपण खाल्ले तरी रूचेल का? केवळ 'हो' म्हणून चालणार नाही. तुम्हांला शिव्या देत देत 'तत् त्वम् असि' असे सांगितले तर पटेल काय? पटणार नाही. कारण शिव्या, निंदा, स्तुती यामध्येच आपण गुंतून पडतो. आपला निर्णय पक्का पाहिजे. आपण जीव आहोत हा निर्णय पक्का नसेल तर 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा वाच्यार्थही पटणार नाही. येथे तर आपला 'त्वम्'चा निर्णय ठाम नाही. मग 'तत् त्वम् असि' पटण्याचा किंवा न पटण्याचा विषय येतोच कुठे?

'तत्' व 'त्वम्' यांचे धर्म भिन्न असल्यामुळे 'अकर्ता कर्ता असू शकत नाही' आणि 'कर्ता अकर्ता असू शकत नाही'. परंतु, 'तत् त्वम् असि' असे महावाक्य असल्यामुळे 'असि'ने आपला गोंधळ उडवला आहे. ज्याअर्थी हे वेदातील महावाक्य आहे, त्याअर्थी शास्त्राचे बरोबर की आपले म्हणणे बरोबर? 'माझी शास्त्रावर श्रद्धा आहे' असे आपण फक्त तोंडाने म्हणतो. आपली श्रद्धा चुकीची, आपल्या स्वतःलाच फसवणारीही असू शकते. बरं! एखाद्याने हे महावाक्य मान्य जरी केले तरी त्याला अकर्तेपणाचे आचरण करून दाखवता येईल का? हे फक्त ऐकण्यासाठी बरे वाटते.

'विष हे अमृत आहे' हे वाक्य बरोबर आहे काय? अत्यंत विरुद्ध धर्मांचे पदार्थ एक

असू शकतात का? समजा 'अंधार हा उजेड आहे'. तर तुम्ही अंधारातच राहाल काय? मग कोणी उजेडाकडे जाईल काय? 'दुःख सुखरूप आहे' असे म्हटले तर दुःखाचा नाश करण्यासाठी धावपळ कराल काय? या सर्व उदाहरणांवरून असे लक्षात येते की वाच्यार्थाने फारच अडचण निर्माण होते. मग असा विचार येतो की महावाक्याचा काहीतरी एक निश्चित योग्य अर्थ असणारच. ज्या अर्थाने कुठल्याही प्रकारची अडचण निर्माण होणार नाही. त्यासाठी पुन्हा या महावाक्याचा सद्गुरूंच्या सहाय्याने सगळ्या बाजूने विचार केला पाहिजे. 'असि' या पदाचाही आपल्याला शोध करावा लागेल. 'तत्' आणि 'त्वम्'च्या वाच्यार्थाचा विचार करून त्या पदांना 'असि' शब्द लावल्याने आपला गोंधळ झाला. आपल्या पदरात भेद पडला. पण ते योग्य नाही. भेद हाच जन्ममरणाला कारण आहे. परंतु, वाच्यार्थात आपल्याला भेदाशिवाय काही दिसत नाही. म्हणून 'असि' या पदाने एकत्व सिद्ध करता येते का? याचा विचार आवश्यक आहे. म्हणून परत 'त्वम्'चा विचार करायचा. पुन्हा 'तत्'चा विचार करायचा. पण आता लक्ष्यार्थाने 'तत्' आणि 'त्वम्' या पदांकडे पाहायचे आहे.

कर्ता हा 'त्वम्'चा वाच्यार्थ आहे. समजा, लक्ष्यार्थ शोधण्यासाठी या वाच्यार्थाला उलट करून बघू या. 'त्वम्'च्या या वाच्यार्थाचा उलट म्हणजे अकर्ता. पण हा तर 'तत्'चा वाच्यार्थ झाला. 'त्वम्'चा वाच्यार्थ उलट केल्याने जे मिळेल ते म्हणजे 'अकर्ता'. याला जर 'त्वम्'चा लक्ष्यार्थ मानला तर ते म्हणजे 'तत्'चा वाच्यार्थ आहे.

अशाप्रकारे, जो 'त्वम्'च्या या कर्तेपणातून बाहेर पडतो आणि लक्ष्यार्थासाठी विरुद्ध धर्मांचा स्वीकार करतो तो 'तत्' होतो. पण 'असि'वर येऊ शकत नाही, तो 'तत्' पदाच्या वाच्यार्थात अडकतो. ही फार मोठी भीती आहे. मग 'त्वम्' म्हणजे कर्ता की अकर्ता? असे म्हणावे तर 'जीव', तसे म्हणावे तर 'शिव'. जो जीवभाव ठेऊन जगतो तो पुढे अनंत जन्म विविध जीवच होतो. जो जीवभावाचा वरीलप्रमाणे नाश करतो तो 'तत्'पदावर जातो. पण वाच्यार्थानेच. आपण 'त्वम्' म्हणून जगलो तर 'त्वम्'च राहू. पापामुळे नरक, पुण्यामुळे स्वर्ग, पाप-पुण्याच्या मिश्रणामुळे भूलोक अशी 'त्वम्'ची गती होते आणि हे सोडून जगलो तर 'तत्'कडे आपण वाटचाल करू. समजा, एखाद्याचा कुठलाही गुन्हा सिद्धच होत नाही आणि त्याने मान्यही केला नाही, तर त्याला काय शिक्षा देणार? त्याप्रमाणेच, आपण स्वर्ग, नरक अथवा भूलोकाचे भोग भोगण्याचे कर्ताच ठरलो नाही तर? म्हणजेच आपण अकर्ता ठरलो. जेव्हा कर्ता नाही तेव्हा 'तत्'पदाचा अधिकार येतो.

'त्वम्'पदाचा अभ्यास करणे सोपे की अवघड? हा महावाक्याचा अभ्यास आहे. त्रिलोकातील कुठलेही वाक्य याच्यापेक्षा श्रेष्ठ नाही. म्हणून हे एवढे सोपे नाही. परंतु, श्रीगुरू सानुकूल असतील तर नक्कीच हे सोपे होईल.

समजा, एक अत्यंत वयस्क मनुष्य आहे. तो कायम घरात बसून असतो. तो कुठलेही काम करत नाही. परंतु, त्याच्या इशाऱ्यावरच सर्व व्यवहार होतात. मग तो म्हातारा कर्ता आहे, अकर्ता आहे की की नुसताच आहे? कर्ता हा कलंक आणि अकर्ता हा सुद्धा कलंकच आहे. कर्ता आणि अकर्ता हे दोन्ही वजा केल्यामुळे खाली 'असि' राहते. या

'असि'ला किंमत आहे. चेहऱ्याला काळा रंग लावला तर काळा दिसेल. चेहऱ्याला पीठ लावले तर गोरा दिसेल. काळा अथवा गोरा रंग महत्त्वाचा नाही. मूळ चेहरा महत्त्वाचा आहे. अंधारात राहायचे नाही, त्याच्या सापेक्ष असलेल्या उजेडात जायचे नाही. कर्ता राहू नका, अकर्ता होऊ नका. कर्ता, अकर्ता दोन्हीही वाच्यार्थ. म्हणून 'असि' व्हा. 'त्वम्' न होनी, 'तत्' न होनी 'असि' होईजे.



प्रमाण –

यालागीं मौनेंचि बोलिजे । कांहीं नहोनी सर्व होईजे ।।
नव्हतां लाहिजे । कांहींच नाही ।। ३३ ।।

– श्रीचांगदेव पासष्टी

पण हा विषय कोणाचा आहे? एखादा सूरपेटी वाजवत आहे. दुसरा ज्याला सूरपेटीबद्दल, गाण्याबद्दल काहीही माहीत नाही, तो त्याची स्तुती करू लागला तर उपयोग काय? तसेच, 'तत् त्वम् असि' तुमचा विषय आहे काय? तुम्ही येथे श्रवणाला का आलात? घरामध्ये कोणी डिवचलं म्हणून? मन अस्थिर झाले म्हणून? की महाराजांचे शब्द आवडतात म्हणून? जरी आपण येथे आलो तरी हा विषय आपल्यासाठी आहेच असे नाही. एक साधक आळंदीला निघाला. दुसरा एक जण, ज्याचे आळंदीशी काही घेणेदेणे नाही तो सुद्धा याच्या सोबत निघाला. फक्त जोडीदार म्हणून. आळंदीला जाणे एकाचाच विषय होता. दुसऱ्याला फक्त हेलपाटा. त्याप्रमाणेच आपले होत आहे का याचा विचार करा.

आपण परमार्थ करायला का लागलो? परमार्थ आपला विषय आहे की नाही हेच माहीत नाही. पंडीत भीमसेन जोशींना अभंगातील मधुरता कळते, राग कळतो. परंतु, अध्यात्म कळेलच असे नाही. अभंगातील राग ओळखणे हा सर्वसामान्यांचा विषय नाही. सर्वसामान्यांना अभंगातील केवळ मधुरता कळते. राग आणि अध्यात्म दोन्हीही कळत नाही. अशाप्रकारे, प्रत्येकाचा विषय ठरलेला आहे.

येथे जो परमार्थ विषय सांगण्यात येतो तो तुमचा विषय आहे का? तुम्ही स्वतःच हे तपासून बघा. तुम्हांला चिंतन ऐकायला तर बरे वाटते. तुम्ही म्हणता, 'तत् त्वम् असि बद्दल आता फक्त ऐकू तर द्या, कधीतरी पुढे कळेल नाहीतर नाही कळणार'. अरे! असा भाव असेल तर येऊ नका. तुम्ही पहिले 'त्वम्' व्हा. नवरा, बायको, सुखी, दुःखी इत्यादी राहू नका. 'महावाक्य' हा विषय कारणदेहाचा आहे. बाकी खाली सूक्ष्म, स्थूलदेहांचा नाही.

जीवाचा विषय कळणे कठीण आहे. जीवाचे ठिकाण कोणते? वाघाचे ठिकाण गुहा आहे. नवरा, बायकोचे ठिकाण घर आहे. प्रत्येकाची जागा ठरलेली आहे. जीवाने कोठे राहावे? घाणीत? न संपणारा बायको, पोरं, धनदौलतादि संसार ही घाण आहे. जीवाने कमीत कमी स्वतःच्या जागेवर म्हणजे जीवावर राहावे. राजा सिंहासनावर बसतो, तेव्हा राजा असतो. लोकांमध्ये फिरू लागला तरी राजाच असतो. राजाने राजासारखे फिरावे.

सिंहासनावरून उतरल्यावर जर राजाला, 'आता मी राजा नाही' असे वाटत असेल तर त्याने

सिंहासनावरच बसून राहावे. त्याप्रमाणे कोण्या साधकाला स्थूल, सूक्ष्मदेहांच्या धर्मांमुळे, बायको, पोरं, धनदौलतादि कार्यावर आल्यामुळे परमार्थात त्रास जाणवत असेल तर कमीत कमी त्याने कारणावर म्हणजे जीवावर राहावे.

आपल्या जागेवरून जीव खाली आला तर कुठेही भटकतो. नको तेथे भीक मागतो. नको तेथे जो जातो त्यालाच जीव म्हणावे. या जीवाला कधी डोळा घेऊन जातो. कधी कान घेऊन जातो. कोणीही त्याला इकडून तिकडे नेतो. हाच मनुष्य झालेला जीव इकडून तिकडे तिकडून इकडे फिरत राहतो. उदाहरणार्थ – संसारात मुलाचे उनाड मित्र त्याला कुठेही घेऊन जातात. मग तो रात्री १२ नंतरच घरी येतो. सकाळी उशीरा उठून परत त्याचे मित्र त्याला कोठेही नको तेथे घेऊन जातात. हळुहळू मुलगा वाह्यात होतो. त्याप्रमाणेच, जीव कोठेही फापलतो. जीवाने स्वतःच्या जागेवरच राहावे. जीवाने कुठे राहिले पाहिजे? खरेतर स्वरूपावर राहिले पाहिजे. खाली आला तर? बुद्धीत आला तर, बुद्धीप्रमाणे वागेल. मनात आला तर मनाप्रमाणे वागेल. मुलगा फापलला असेल तर त्याच्या बापाने त्याला सतत म्हणावे, 'अमुक करू नकोस, तसे करू नकोस'. शेवटी वैतागून मुलगाच म्हणेल, 'तर काय करू?' तेव्हा बापाने म्हणावे 'इथेच राहा, असेच कर, असाच वाग'.

जीव फापलतो, वाया जातो, आयुष्य बरबाद होते. कोणी सावरावे? जीव भलत्याच ठिकाणी नेऊ नका. व्यष्टीने कारणदेहामध्ये जीव. त्याचे राहण्याचे स्थान आहे – हृदय. जीवाने हृदयात राहावे. राजा सिंहासनावर बसून असतो तेव्हा प्रजा आपली कामे करत नाही का? करते. त्याचप्रमाणे, जीव कारणदेहावर जरी राहिला तरी सूक्ष्म, स्थूल पातळीवरील व्यवहार होतच राहतील. तसेही मनुष्याच्या बऱ्याच क्रिया अशा सुरू आहेत की त्यात जीव नसतो.

राजा प्रजेसोबत जरी फिरू लागला तरी राजाच असतो. पण राजाने राजा प्रमाणेच राहावे. त्याप्रमाणे जीव कार्यामध्ये जरी आला तरी त्याने जीवाप्रमाणेच राहावे. कार्याच्या अधीन होऊ नये. मग तुम्ही बायको, पोरं, घर, धन इत्यादींमध्ये राहिले तरी भीती नाही.

महाराज वाचेने चिंतन सांगतात की जीवाने? वाचेने सांगतात असे तुम्ही समजता. तुम्ही श्रवण कशाने करता? कानाने की जीवाने? कानाने करता. म्हणून तर महाराजांचे आणि तुमचे जुळलेले आहे. नाही का? कारण समान सत्तेत व्यवहार असतो. मात्र परमार्थ करताना सर्वांनीच साधूसंताच्या शब्दात जीव गुंतवावा. महाराजांनी जीवाने सांगावे आणि शिष्यानेही जीवानेच ऐकावे. कारण हा विषय जीवाचा आहे. परंतु, साधारणपणे असे होत नाही. लोकं व्यवहार जीवाने करतात आणि परमार्थ शरीराने. समजा, तुमचा मुलगा आणि महाराज तुमच्या जवळ उभे आहेत. महाराज शंभर वाक्ये बोलले. ते तुम्ही कानाने ऐकता. तुमचा मुलगा एकच वाक्य बोलतो. ते तुम्ही जीवाने ऐकता. मग परमार्थ कसा होईल? सांगा.

जीवाला शास्त्र आणि श्रीगुरूंमध्ये अडकवा. त्यांच्यात जीव अडकवल्याने पुढे जीव जीव राहणार नाही. घरादारामध्ये जीव गुंतवला तर चांगले होईल की वाईट? आज चांगले होत

आहे असे वाटेल. परंतु, पुढे अनेक जन्मांची हानी होईल. हे बारकाईने लक्षात घ्या. स्थूल, सूक्ष्मदेह अथवा देहांच्या धर्मांनाच जो मी समजतो तो संसार कार्यात गुरफटत जातो. जो स्वतःला जीव समजतो, तो कार्यात गुंतत नाही. 'संसार प्रवाह चाललेला आहे' असे तो समजतो.



तर 'त्वम्'ने 'त्वम्'सारखे राहावे. पुढे महाराजांकडे जीव घेऊन जावा. जीवच साधक असावा आणि सद्गुरुंना फक्त जीवच हवा असतो.

प्रमाण –

जिवू घेतलिया उणें। चालों नेदिसी साजणें।
भृत्यु उरे स्वामीपणें। तेहि नव्हे ।। ३९।। प्रकरण २

– श्रीअमृतानुभव

'तत् त्वम् असि' या महावाक्याचा अभ्यास गळी उतरण्यासाठी येथे जीव म्हणून या. शिष्य जीव पाहिजे. नाम, रूपात्मक देह शिष्य नसावा. जीव–ब्रह्मैक्य हा आपला विषय आहे. जीव घेऊन येत नाही, मग हे ऐक्य कसे होणार? जो जीव म्हणून येईल तो जीव–ब्रह्मैक्य कळून मुक्त होईल. पहिले व्हा जीव, मग राहू नका जीव, बनू नका शिव. खाली कोण राहिल? उर्वरित ते ब्रह्म. त्याचाच आपण अभ्यास करत आहोत.

*****

## चिंतन क्रमांक ३४
## तत्त्वमसि महावाक्याचा वाच्यार्थ – २

आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटका करून घेणे या उद्देशाने करीत आहोत. मागील चिंतनापासून 'त्वम्'चा लक्ष्यार्थ पाहायला सुरूवात केली होती. 'त्वम्'चा वाच्यार्थ 'कर्ता, भोक्ता' असा आहे. या वाच्यार्थाला उलट केले तर 'अकर्ता, अभोक्ता' असे होते. आता जर 'अकर्ता, अभोक्ता' हा 'त्वम्'चा लक्ष्यार्थ मानला तर तो 'तत्'पदाचा वाच्यार्थ आहे. त्यामुळे 'त्वम्'चा विचार असा करू की तसा करू? असा प्रश्न निर्माण होतो. 'त्वम्'चा विचार वाच्यार्थाने 'कर्ता, भोक्ता' असा करावा, की लक्ष्यार्थाने 'अकर्ता, अभोक्ता' असा करावा, असा प्रश्न तयार होतो.

आपला स्वाभाविक गुणधर्म कसा आहे हे आपल्याला माहीत आहे. व्यवहारात काही वाईट फल मिळाले तर आपण म्हणतो, 'तसे झाले, मी केले नाही'. चांगले फल मिळाले तर 'मीच केले' असे आपण म्हणतो. 'त्वम्' कसा आहे? चांगला की वाईट? चांगला–वाईट विचार माहीत नाही – तोच 'त्वम्'. 'त्वम्'ला विवेक आहे का? विवेक नाही. त्याला जे गोड वाटेल तेच तो करतो. 'त्वम्'पद ओळखणे अवघड आहे. कर्ता, भोक्ता यांचा विचार होत नाही तोच 'त्वम्'. काहीही न कळणे म्हणजे 'त्वम्'. त्याला देव कळत नाही. त्याला कार्य कळत नाही. त्याला कारण कळत नाही. ज्याला कार्य–कारण दोन्ही कळत नाही – तो 'त्वम्'. ज्याला कार्य कळते, पण, कारण कळत नाही – तो 'तत्'. ईश्वराला कारण कळले असते तर तो 'तत्' राहिला असता का? कार्य–कारण दोन्हीची अनोळख म्हणजे 'त्वम्'. कार्याची ओळख आणि कारणाची अनोळख म्हणजे 'तत्'.

प्रमाण –

**तयाशीही पूर्ण नकळेची कांहीं । अद्यापी संदेहीं पडियेले ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

प्रत्येकाला वाटते की कार्य केले पाहिजे. कार्य कळले तर तो 'तत्' होईल. पण कारण कळून घेईलच असे नाही. कार्याची ओळख करणे योग्य की कारणाची ओळख करणे योग्य? सर्वजण कार्याचीच ओळख करण्याच्या मागे आहेत. पण 'तत्'पदही कळणे सोपे नाही. ते महाकठीण आहे. कार्याची ओळख ठेऊन जो कोणी कर्ते–भोक्तेपणा घेत नाही तो 'तत्'पदाचा अधिकारी होतो. 'तत्' अकर्ता म्हणून कार्य करतो. त्याला कार्याची ओळख असते. जो कार्य कारण दोन्ही जाणत नाही तो 'त्वम्'. पण दोघेही वाच्यार्थात अडकलेले आहेत.

अकर्ता, अभोक्ता हे तर 'तत्'पदाचे वाच्यार्थ आहेत. 'त्वम्'पदाचा लक्ष्यार्थ

शोधणार कसा? ज्यांनी 'त्वम्'चा वाच्यार्थ यथार्थपणे जाणला आहे, अशा लोकांची संख्या

कमी असते. कोण करतो? असे जर विचारले, तर देहाला मी समजून 'मी करतो' असे उत्तर मिळते किंवा हुशार झाला तर 'हात करतो, पाय करतो' असे उत्तर मिळते. कोणी पाहिले ?असे जर विचारले तर उत्तर मिळते, 'माझ्या डोळ्यांनी मी पाहिले'. कर्तेपणा कोणाला देतात? नाम, रूपात्मक स्थूलदेहाला. सगळेजण स्थूलदेह आणि त्यांचे धर्म घेऊनच मरणार. 'त्वम्'ला केव्हा कर्तेपणा, भोक्तेपणा देणार? महाराजांनी सांगितले म्हणून पटले. कोणत्याही कारणाने महाराजांवरची श्रद्धा ढासळली, तर, पटणार नाही. यासाठी आपला स्वतःचाच तात्पर्य निश्चय झाला पाहिजे. कोण बोलते? तोंड बोलते का? याचे उत्तर कळले असते तर केवढी प्रगती झाली असती! फूलांचा सुगंध कोणी घेतला? सांगा. याचे उत्तर शोधणे हे गुह्य आहे.

सद्गुरू गुह्य सर्वांनाच सांगत नाहीत. हुशार बाप धन कोणाला देतो? योग्य पुत्राला. केव्हा? तो पुत्र योग्य ठरला तर. ब्रह्मधन कोणाला दिले जाते? जो साधक श्रीगुरू पुत्र ठरतो त्याला.

येथे प्रमुख मुद्दा 'त्वम्' पदाची ओळख हा आहे. कर्ता-भोक्ता आहे असे जाणणे म्हणजे 'त्वम्' कळणे. 'त्वम्' कळला असेल तर तो स्वतःला कर्ता-भोक्ता समजतो. पण असे होत नाही. कानच ऐकतात, डोळेच पाहतात असे वाटते. डोळ्याला दिसत असते तर प्रेतालापण दिसले असते! देहच कर्ता असे जगाला वाटते. जगाच्या विरुद्ध कसे जाणार?

जर महाराजांची सेवा हातानेच केली तर तेवढेच फल मिळेल. महाराजांचे पाय हाताने चेपले, जीवाने नाही चेपले, फल काय मिळेल? श्रवणाला बसले तर कोण ऐकेल? कान? महावाक्याचे श्रवण कानाने आणि मनाने करायचे नाही, असे मागे एका चिंतनामध्ये आपण ठरवले होते. श्रवण 'त्वम्'ने करायला हवे. देहाचा कर्ता-भोक्तेपणा घालवाल तर 'त्वम्' व्हाल. 'त्वम्' कर्ता-भोक्ता कसा हे कळले पाहिजे. त्यासाठी श्रवण करायला हवे. परंतु, लोकांना क्रियेच्या परमार्थात अधिक रस वाटतो. बरं! करून करून किती करेल? भोगून भोगून किती भोगेल? समजा एखाद्याने जिलेबी केली व खाल्ली. मग भूक लागल्यावर परत जिलेबी केली व खाल्ली. सारखं असंच केल्यावर पुढे अशी वेळ येईल की जिलेबी पाहिल्याबरोबर वीट येईल. नावही नको वाटेल. अनंत जन्मांनंतर करण्याचा, भोगण्याचा कंटाळा येतो. मग आता तरी वेदांत ऐकायला हरकत नाही. सर्वजण वेदांत ऐकू शकतात. पण संसाराचा कंटाळा आल्यावर वेदांत ऐकणे फलकारक आहे. तुम्हांला संसाराचा कंटाळा आला आहे काय?

मनुष्य संसारात कधी शीणतो? त्याला राब राब राबण्याचा किंवा कष्टांचा विवेक झाला, तर त्या राबण्यातला दोष कळला, तर आपोआप शीण येतो. 'त्वम्'ला कर्तेपणाचा शीण आला तर अकर्तेपणाकडे धावतो. मग तो उन्नत होईल. पुढे उच्च उच्च पदांवर जातो. करतो तोच, पण कर्ता नसतो.

एक मनुष्य एखाद्या संस्थेत शिपाई आहे. झाडलोट करणे, फाईली आणून देणे अशी कामे तो करतो. त्या शिपायाने बढतीसाठी परीक्षा दिली आणि पास झाला तर कारकून बनतो.

तो पूर्वीचे काम करत नाही, तर नवीन शिपायाकडून ती कामे करून घेतो. करतो कोण? कारकूनच. पण करतो का? समजा, पुढे हा कारकून संस्थेचा मालक झाला. आता संस्थेची सर्व कामे तो करून घेतो. तो संस्था चालवितो. चालवितो का? नाही का? त्याचे कर्तेपण जाते व अकर्तेपणा येते. करतो तोच पण करत नाही.



एखाद्याने स्थूल पातळीवर अकर्तेपणाचा अभ्यास केला तर तो पृथ्वीपर्यंत अकर्ता होऊ शकतो. पुढे अनेक जन्म त्याने याप्रमाणे अभ्यास सुरू ठेवला, तर प्रगती करीत करीत ब्रह्मदेव होतो. तेव्हा, 'मी अकर्ता म्हणून सृष्टीची रचना करतो' असा त्याचा निर्णय असतो. पण याचा उपयोग काय? शेवटचे अकर्तेपण म्हणजेच 'तत्'. तेथे फसगत होते, वाच्यार्थाने वाटचाल केल्याने.

म्हणून 'तत्' आणि 'त्वम्' या दोन पदांचा लक्ष्यार्थ शोधला पाहिजे. त्या वाटेने वाटचाल करायला पाहिजे. 'असि' म्हणजे 'आहेस'. काय आहेस? 'तू ते आहेस' की 'ते तू आहेस?' 'तत्त्वमसि' एक शब्द आहे की तीन शब्द आहेत? 'तत् त्वम् असि' हे एक महावाक्य असून त्यात 'तत्' 'त्वम्' आणि 'असि' असे तीन शब्द आहेत. 'असि' हे क्रियापद आहे. क्रियापद म्हणजे काय? काय होत आहे हे सांगणारे पद म्हणजे क्रियापद. चालणे, धावणे, खाणे इत्यादी पदे एक विशिष्ट क्रिया दाखवतात. आहे म्हणजे असणे. असण्याची क्रिया आहे. 'तत्' 'त्वम्' आहे. 'तत्' 'त्वम्' नाही असे नाही. म्हणजे येथे नसण्याची क्रिया नाही. असण्याची क्रिया आहे. येथे काहीतरी दाखविले आहे. या ठिकाणी वाक्यातील क्रिया लक्षात येते. 'असि'ने काय क्रिया दिसते? असणे म्हणजे अस्तित्व दिसते, नसणे नाही. काय आहे? हा मोठा प्रश्न आहे.

'तत् त्वम् असि', 'त्वम् तत् असि', 'तत् असि' की 'त्वम् असि'? अशा चार प्रकारे विचार केला पाहिजे. हे विचार मंथन आहे.

उदाहरणार्थ – 'तू जा', 'मी जातो', 'तू मी जाऊ'. क्रियापदाच्या आधी दोन कर्ते असू शकतात. पहिले कर्ता नंतर क्रियापद. परंतु, दोन कर्त्यांसह जेव्हा एक क्रियापद असते तेव्हा दोन कर्त्यांमध्ये 'व' किंवा 'आणि' लावतात. 'तू व मी जाऊ' किंवा 'तू आणि मी जाऊ'. तसेच 'तू जा', 'मी जातो' अशी दोन वाक्येही होऊ शकतात. त्याप्रमाणे 'तत् असि', 'त्वम् असि' अशी दोन वाक्ये होऊ शकतात. 'असि' ने काय दाखविले? अस्तित्व दाखविले. 'तत्' आणि 'त्वम्'चे अस्तित्व मानता येते. दोघांचे अस्तित्व मानले आहे. दोघांच्या अस्तित्वाचे एकत्व हे 'असि'पद दाखवते. 'असि'ने एकत्व दाखविण्याचे ठरविले आहे. 'असि' शब्द काहीतरी क्रिया दाखवितो – 'असणे'. 'तत्'पण आहे. 'त्वम्'पण आहे.

पूर्वीच्या चिंतनात असे पाहिले होते की, वाच्यार्थात 'तत् त्वम् असि' किंवा 'त्वम् तत् असि' हे जुळत नाही. 'अकर्ता कर्ता आहे' किंवा 'कर्ता अकर्ता आहे' हे जुळत नाही. वाच्यार्थात एकी होत नाही. 'तत् असि', 'त्वम् असि' एवढे ठीक आहे. म्हणजे 'अकर्ता आहे', 'कर्ता आहे' अशी दोन वाक्ये केली तर अडचण नाही. पण, वाच्यार्थामधून 'तत् त्वम् असि'चा विचार जेव्हा करतो तेव्हा द्वैत करावे लागते. तेव्हा अकर्ता–कर्ता, शिव–जीव हे वेगवेगळे आहेत असा सर्वांचा निर्णय होतो. 'मी कर्ता आहे, तो अकर्ता आहे', 'मी सुखी–

दुःखी आहे, तो सुखी–दुःखी नाही' असे द्वैत राहिले की वाच्यार्थ, वाच्यार्थ राहिला तर द्वैत राहणारच. द्वैत हा फार मोठा धोका आहे. त्याचे खंडन करूनच भगवंताची प्राप्ती होते.



प्रमाण –

दुजें खंडे तरी। उरला तो अवघा हरि।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

जो द्वैत खंडित करतो तो एकत्वाकडे जातो. जीव आणि शिव म्हणजे द्वैत. घरदारपण हेसुद्धा द्वैतच आहे. पण, खरी द्वैताची सुरूवात जीव–शिव इथून आहे. एक कर्ता आहे, एक अकर्ता आहे. एक प्रपंची आहे, एक अप्रपंची आहे. एक सुखी–दुःखी आहे, एक सुखी–दुःखी नाही. हे द्वैत कोणी जगवले? वाक्यातील वाच्यार्थाने.

आपण जोपर्यंत व्यवहारात इतर लोकांसोबत असतो तोपर्यंतच द्वैत आहे असे वाटते. आपण एकटेच राहिलो तर द्वैत नाही का? आपण एकटेच राहिलो तर आपल्याला करमणार का? समजा, गुहेमध्ये आपण एकटेच जाऊन राहिलो, तेव्हा आपण एकटेच असतो की सोबत मन पण असते? गुहेत जाताना आपण कसा विचार करून गुहेत गेलो होतो? मन वेगळे आणि मी वेगळा असा विचार करून गेलो होतो का? 'एकांतात राहू', असा विचार करून आपण तेथे गेलो. परंतु, तेथे गेल्यावर आपण आणि मन असे द्वैत दिसायला लागते. या द्वैताने आपले हाल होतात.

एकदम सुरूवातीला मी आणि मन असे द्वैत निर्माण का झाले? कशासाठी? पुढे नाम, रूपात्मक देह कशासाठी? हे सर्व द्वैत कळणार कसे? तसेच अद्वैत कळणार कसे? द्वैतावरून अद्वैत कळणार की अद्वैतावरून द्वैत कळणार?

प्रमाण –

कळों येतें खरें दुजें एकाकरूनी।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

नीट विचार केला तर असे लक्षात येते की अद्वैताकडून द्वैत कळत असते. त्याच्या उलटे तर सर्वच करतात. द्वैताकडून अद्वैताकडे वाटचाल करतात. म्हणजे देहबाह्य पदार्थ, देह या द्वैताच्यामार्फत परमार्थ करतात. तसेच देहबाह्य पदार्थ, देह यांना कळून घेण्यासाठी याच द्वैताचा आश्रय करतात. खरेतर देहबाह्य पदार्थ व देह या प्रपंचाला जाणण्यासाठी अद्वैताचा आश्रय करायला पाहिजे. अद्वैत जाणून द्वैत जाणणाऱ्या महापुरुषांना आपण शरण जायला हवे. जे 'एका'वरूनी 'दुजे'चे खरे स्वरूप कळून देतात त्यांच्या आश्रयाला जाणे गरजेचे आहे. ज्ञानोबा, तुकोबा हे असे श्रेष्ठ वेदांती महापुरुष आहेत.

आपल्याला खरा आधार कोणाचा आहे? अद्वैतवस्तूचा. हे नाहीच कळले, तर अद्वैतवस्तूचे प्रतिपादन करणाऱ्यांचा तरी आधार मानता यावा. जो ज्याच्या आश्रयाला राहतो

तो त्याचे प्रमाण शिकतो. म्हणून त्याच्याप्रमाणे त्याचे आचार, विचार होतात. आपण कोणाचे प्रमाण शिकतो? हे महत्त्वाचे आहे. आपणाला द्वैताकडून अद्वैत कळून घ्यायचे नाही. आपण प्रथम व्यतिरेकाने अद्वैतापर्यंत गेलो पाहिजे. पण, सर्वजण द्वैतावरच अडकतात. आपण 'तत् त्वम् असि'च्या वाच्यार्थात सापडलो. त्यामुळे द्वैत दृढ झाले. 'धर्म भिन्न असल्यामुळे शिव आणि जीव एक नाहीतच' – अशा निर्णयावर आपण ठाम झालो. एखाद्याने कितीही वेदांताचा अभ्यास केला तरी 'तो' व 'मी' वेगळा आहे असे वाटतेच.



काहीजण तर असे म्हणतात, 'श्रीज्ञानेश्वरांनी ज्ञानोत्तर भक्ती करायला सांगितली'. त्यांना असे म्हणायचे असते की ज्ञानानंतर 'उपासना' करायला सांगितली. हे योग्य नाही. श्रीज्ञानेश्वरांनी सांगितलेली ज्ञानोत्तर भक्ती मान्य आहे. पण, तुम्ही जर भगवंतापासून विभक्त राहात नसाल तरच. अद्वैत पटणे फारच कठीण आहे. 'तो' व 'मी' वेगळा वाटणारच. एखाद्या मोठ्या महाराजांना जाऊन विचारायचे, 'जीव–शिव एक की वेगळे'. महाराजाने 'वेगळेच' ठामपणे म्हटले की लगेच तेथून निघायचे. त्यांचा आपल्याला उपयोग नाही. 'ते वेगळे नाहीत' असाच निर्णय असावा. याचे कारण आपल्याला आपल्या महात्म्यांनी हेच शिकविले आहे व त्याचाच आपल्याला शोध करायचा आहे.

प्रमाण –

**एक हरि आत्मा जीव शिव सम। वायां तूं दुर्गमा न घालीं मन।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज हरिपाठ

भगवंताला द्वैताचा लेश नाही. स्वस्वरूपात द्वैत राहात नाही. त्याच्या ठिकाणी जीव, शिव, घरदार राहातच नाही. 'ते' अद्वैत कळून 'हे' द्वैत संपवावे की 'हे' द्वैत संपवून 'ते' अद्वैत कळावे? 'हे' संपवून 'ते' कळावे असेच बहुतेक साधक करतात. स्थूल, सूक्ष्मदेहांकडून, मूर्तिकडून त्याला प्राप्त करण्याचा प्रयत्न सर्वजण करत आहेत. या परमार्थाचे वर्म कळले नाही, तर, ज्ञानदान करणाऱ्या शास्त्र, सद्गुरुंची सेवा करावी लागेल आणि वर्म कळून घ्यावे लागेल.

प्रमाण –

**जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंठा।।**
**तो स्वाधीन करी सुभटा। वोळगोनी।।१६६।। अध्याय ४**

– श्रीज्ञानेश्वरी

पण, सर्वजण सद्गुरुंची सेवा कुठपर्यंत करतात? जोपर्यंत ते आपल्याला वाईट बोलणार नाहीत, अपमान करणार नाहीत तोपर्यंत. एखादा पुरुष किंवा एखादी स्त्री स्वतःच्या नालायक नवरा, बायको, पोरं, नातेवाईक इत्यादींनी लाथा जरी मारल्या तरी त्यांचेच पाय चाटतात. परंतु, सद्गुरुंनी भल्यासाठी सांगितलेला एखादा शब्दही अशा साधकाच्या

जिव्हारी टोचत राहतो. बाबांनो! अनेक जन्मांच्या तपस्येनंतर शास्त्र, सद्गुरूंचा संग प्राप्त

होत असतो. आता या जन्मी तरी वेड्यासारखे वागू नका. शास्त्र, सद्गुरूंना शरण राहा. तरच 'तत्त्वमसि' महावाक्याचा यथार्थ बोध प्राप्त होईल.

तर 'तत्त्वमसि' महावाक्याचा विचार कसा करावा? वाच्यार्थाकडून तर द्वैत दिसते. म्हणून वेगळ्या पद्धतीने विचार करावा लागेल. लक्ष्यार्थाने विचार करावा लागेल. भेद बाजूला करावा लागेल. वाच्यार्थाने भेदच पाहत होतो. भेद नाहीसा करावा लागेल. तो भेद कसा नाहीसा करावा? विचार करून.

इतके दिवस आपण महावाक्याचा वाच्यार्थाने विचार केला, तर आपल्या हाती द्वैत लागले. पुढे आपल्याला लक्षणावृत्तीने विचार करायचा आहे. आपण एखाद्या व्यक्तीची ओळख होण्यासाठी त्याची वृत्ती पाहतो. म्हणजे तो चांगला, वाईट, क्रोधी, प्रेमळ इत्यादी कशा प्रकारचा आहे हे पाहतो. मनुष्याची खरी ओळख त्याच्या वृत्तीवरून केली जाते. पुढील चिंतनापासून 'तत्त्वमसि' महावाक्याचा विचार लक्षणावृत्तीने करणार आहोत. म्हणून चिंतनाला यायच्या आधी लक्षणांचा अभ्यास करून या. लक्षणा किती आहेत? त्या कोण-कोणत्या आहेत हे अभ्यास करून या. मग आपण लक्ष्यार्थाकडे म्हणजे एकत्वाकडे पोहचण्यासाठी प्रयत्न करू. यासाठी जे काही गरजेचे आहे ते करा.

*****

।। ॐ तत् सत् ।।



## चिंतन क्रमांक ३५
## जहती लक्षणा

आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होण्याच्या हेतूने करीत आहोत. हा फेरा कसा प्राप्त झाला याचा शोध लावणे फारच अवघड आहे. जेव्हा दुःख कोसळते तेव्हा काही काळापुरता हा विचार घडू शकतो. सर्वसाधारणपणे, मायेच्या प्रभावामुळे केव्हा जन्मलो केव्हा मेलो हे कळतच नाही. सर्वजण एखाद्याचा जन्म झाला की आनंद व्यक्त करतात. कोणी मेले की दुःख व्यक्त करतात. परंतु, या विचित्र चक्रात आपणही अडकलेलो आहोत हे कळत नाही. परमार्थ करताना नेमका तो कशासाठी करावा हे शोधण्यात बराच काळ जातो. सामान्यपणे सभोवतालचे लोक परमार्थ करतात म्हणून आपण परमार्थ करतो. म्हणून जास्तीत जास्त वेळा अनुकरणाचा परमार्थ होतो.

परमार्थ का करायचा हे यथार्थपणे जाणून परमार्थ करत नाही, तोपर्यंत जन्ममरणाचा कार्यक्रम बंद पडणार नाही. साधकाने स्वतःच्या अवस्थेचा शोध घेतला पाहिजे. 'त्वम्' हा खऱ्या अर्थाने साधक आहे. साध्य साधता येईल तो साधक. स्थूल देहाला तो अधिकार नाही. फक्त कपडे, टिळा, माळांना महत्त्व देणाऱ्याला खरा साधक म्हणता येत नाही. 'त्वम्'ने साधक व्हावे. कर्ता, भोक्ता हा 'त्वम्'चा वाच्यार्थ आहे. मागील जन्मी काय काय केले हे कोणालाही आठवत नाही. या जन्मी देखील विपरीत करण्याने हानी सुरू आहे. जेव्हा सर्व इंद्रिये शाबूत असतात तेव्हाच परमार्थ केला पाहिजे. मरण येण्याच्या आधीच तयारी केली पाहिजे.

प्रमाण –

**याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

परंतु, आपला अट्टाहास वेगळ्या गोष्टींसाठी आहे. आपण कधी मरणार? सांगता येत नाही. म्हणून वेळ दवडू नका. जो खऱ्या अर्थाने साधक असतो तो असे ठरवितो की 'याच जन्मी हा विषय संपवायला हवा'. जेथे आहोत तेथे, जसे आहोत तसाच परमार्थ सुरू करावा. देशभ्रांतीमध्ये परमार्थ करायचा नाही. जनात राहा अथवा वनात. परमार्थ करा, चालेल. तरच परमार्थाचे कोडे सुटेल. 'फेरा चुकवायचाच' असे ठरविले तर परमार्थ पूर्णत्वास जातो.

संसाररूपी भ्रम ओळखला पाहिजे. आपला कृतीचा परमार्थ नाही. ज्याला भ्रम आहे हे कळले त्यालाच तो भ्रम घालविण्याचा प्रश्न येईल. 'तत्'चा व 'त्वम्'चा भ्रम कळला पाहिजे. अकर्ता–कर्ता, अभोक्ता–भोक्ता असा भ्रम आहे की नाही? विरुद्ध धर्म कधीही एकत्र येत

नाहीत. म्हणून वाच्यार्थाने 'तत् त्वम् असि' जुळत नाही. शास्त्राचे सर्व सांगणे हे उघड करूनही गुप्त आहे.


प्रमाण –

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ।।२०।। अध्याय १५

– श्रीमद्भगवद्गीता

सर्वांनाच परमार्थ यथार्थपणे सहज कळतो काय? जर जन्ममरण फेरा कळलाच नाही तर मग तो संपविण्याचा, न संपविण्याचा प्रश्नच नाही. खरंतर या जन्ममरणाकडे पाहून साधकाला संसाराबद्दल उदासीनता यायला हवी. या चक्रामुळे आपण भगवंतापासून वेगळे झालो याची तळमळ लागावी. ज्याप्रमाणे पाण्यापासून मासा वेगळा केला तर तडफडतो, त्याप्रमाणे देवापासून वेगळे झाल्याचं दुःख व्हावं. मग खरी गती आहे.

प्रमाण –

जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

उदासीनता असेल तर साधकाला काहीतरी प्राप्त होण्याची शक्यता आहे. संसाराविषयी उदास झालेल्या व्यक्तीलाच परमार्थ सांगावा. असे का? समजा, मी तुमच्या नात्यातला आहे. तरीही तुम्ही मला तुमच्या जवळ किती पैसा आणि संपत्ती आहे हे सांगणार नाही. ज्या व्यक्ती जवळच्या, अत्यंत प्रिय वाटतात त्यांनाच आपण आपल्याकडे असलेल्या धनाबद्दल सांगतो. पत्नीला सांगतो, मुले वयात आली की त्यांना सांगतो, इतरांना सांगत नाही, रस्त्यावरच्या कोणत्याही माणसाला आपण हे सांगत नाही. खरा विचार केला तर सांगूच नये. कारण तसे केले तर पुढे अनेक अडचणी येतील. महावाक्य हे वेदातील गुह्यतम ज्ञानधन आहे. व्यवहारात व्यावहारिक धनाचा उपयोग आहे. तुम्हांला व्यवहारातच मजा वाटते. म्हणून, गुह्यतम ज्ञानाचा तुम्हांला काही उपयोग नाही. मग ते महाराजांनी तुम्हांला का सांगावे?

वडील धनसंपत्तीबद्दल लहान मुलाला सांगत नाहीत. मात्र मुलाचा अधिकार आल्यावर सांगतात. त्याचप्रमाणे, परमार्थात गुह्यतम ज्ञानधन मिळवण्याचा अधिकार प्राप्त करा. आपल्यावर ईश्वरकृपा, शास्त्रकृपा आणि श्रीगुरूकृपा असली तरच परमार्थ सिद्ध होईल. त्यातही सद्गुरू हे ईश्वराच्या अधीन नाहीत. ईश्वराचा सद्गुरूंवर अंकुश नाही. त्याचप्रमाणे, सद्गुरू शास्त्राच्याही अधीन नाहीत. सरते शेवटी श्रीगुरूंनाच शरणागत व्हा. सर्वत्र तेच सर्वश्रेष्ठ मानलेले आहेत. हे शोधांती कळते.

तर 'तत् त्वम् असि' या महावाक्यातील 'असि' म्हणजे 'आहे'. 'तत्' आणि 'त्वम्'

यांचे वाच्यार्थ विरुद्ध आहेत. अकर्ता कर्ता असि. 'तत्' आणि 'त्वम्' यांचे वाच्यार्थ 'असि'ने जुळले नाहीत. उदाहरणार्थ – 'अंधार उजेड आहे' असे म्हटलं तर हे पटत नाही. महावाक्यातील 'असि'ने दाखविले आहे ते 'अस्तित्व'. हे 'अस्तित्व' दोघांनाही लावावे. 'तत् असि' व 'त्वम् असि'. पण कसा आहे? जेव्हा बंध वाटतो तेव्हा 'कर्ता असि'. कर्तेपण सोडल्यानंतर 'अकर्ता असि'. यामध्ये एकरूपता कुठे आहे? परंतु, जोपर्यंत 'तत्' आणि 'त्वम्' यांच्यातील एकरूपतेचा निश्चय होत नाही, तोपर्यंत परमार्थ सुटत नाही. आपल्याला 'तत्' आणि 'त्वम्' यांना एकच ठरवायचे आहे. वाच्यार्थाने दोघांच्या एकत्वाचा विचार जुळत नाही. म्हणून अशा वाच्यार्थ विचाराने परमार्थ संपणार नाही. वाच्यार्थाने 'तत्'कडे जाऊन उपयोग नाही. तसे केले तर 'त्वम्'रूपी छोट्या घरातून 'तत्'रूपी मोठ्या घरात जाण्यासारखे आहे. म्हणून दोघांचा नीट विचार करावा लागेल. त्यांना जोडणाऱ्या 'असि'चा विचार करावा लागेल. 'असि' म्हणजे 'अधिष्ठान'. अधिष्ठानावर काहीही आरोप करता येतो. अधिष्ठानावर 'तत्'चा आरोप करता येतो व 'त्वम्'चाही आरोप करता येतो. अधिष्ठानावर 'त्वम्' होता येते किंवा 'तत्'सुद्धा होता येते.

आता 'तत् त्वम् असि' महावाक्याचा अभ्यास लक्षणेने करू. 'लक्षणा' ही शब्दाची एक वृत्ती आहे. आपण मनुष्याची वृत्ती जाणून तो चांगला की वाईट हे ठरवितो. त्याप्रमाणेच, लक्षणेने शब्दांच्या खऱ्या अर्थाचा निर्णय होतो. लक्षणा तीन प्रकारची आहे – 'जहती', 'अजहती' आणि 'जहताजहती'.

'जहती' लक्षणा म्हणजे काय? ज्या ठिकाणी वाच्यार्थाचा अन्वय होत नाही, त्या ठिकाणी जहती लक्षणा करावी लागते. वाच्यार्थाचा संपूर्ण त्याग ज्या लक्षणेत होतो, त्या लक्षणेला 'जहती' लक्षणा असे म्हणतात.

प्रमाण –

**वाच्यार्थमखिलं त्यक्त्वा वृत्तिः स्याद या तदन्विते।**
**गङ्गायां घोष इतिवज्जहती लक्षणा हि सा ।।**

– संस्कृत वचन

हे समजून घेण्यासाठी एक दृष्टांत पाहू. 'गंगेवर गवळ्याचा गोठा आहे'. गंगेवर गवळ्याचा गोठा असेल का? म्हणजे नदीवर गोठा कसा असेल?

**(येथे चिंतन क्रमांक –२५ मधील संदर्भ वाचावा.)**

आता तसाच दुसरा एक दृष्टांत पाहू. 'गंगेवर राजाचा राजवाडा आहे'. गंगेवर राजाचा राजवाडा असेल का? म्हणजे नदीवर राजवाडा कसा असेल?

प्रथम गंगा म्हणजे काय याची माहिती असायला पाहिजे. या दोन्ही ठिकाणी गंगा हे अधिष्ठान आहे. गंगा या अधिष्ठानावर गोठा अथवा राजवाडा आहे. ज्याला गंगा माहीत आहे

तो म्हणेल, 'असे कसे असू शकते? असे असूच शकत नाही. पाण्यावर कधी गोठा अथवा राजवाडा राहिल काय?' दोन्ही दृष्टांतात 'गंगा' समान आहे. 'गंगा' अधिष्ठान आहे. राजा आणि गवळी वेगळे आहेत.

या दोन्ही वाक्यातील वाच्यार्थ कळायला पाहिजे. जहती लक्षणेत वाच्यार्थाचा संपूर्ण त्याग करण्यास सांगितले आहे. अख्खा वाच्यार्थ सोडून द्या. मग घ्यायचे तरी काय? शक्य असलेला अर्थ घ्यावा लागतो. पण तसा योग्य अर्थ घेण्यात चूक होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

वाच्यार्थ सोडल्यानंतर शक्य अर्थ काय असू शकतो याचा आपण विचार करू. गोठा कोठे असू शकेल? पाण्याच्या वर की आत? पाण्यावर किंवा पाण्याच्या आत गोठा असू शकत नाही. 'गंगेच्या काठावर गोठा आहे' असे ठरविणे जास्त योग्य होय. हे योग्य कधी वाटेल. गंगा नावाची नदी असून तिचा 'प्रवाह' आहे असे माहीत असेल तरच हे योग्य वाटेल. अधिष्ठानाचे पक्के ज्ञान असेल तर अचूक अर्थ लागतो. फसगत होत नाही.

समजा, कोणी 'गंगा' या शब्दाचा अर्थ 'गंगा' नावाचे गाव असा लावला, तर मग गावात गोठा आहे असा त्याचा निर्णय लागेल. हा निर्णय चुकीचा आहे. अधिष्ठानाचे अज्ञान असल्यास वर्म चुकते. म्हणून गंगा म्हणजे नदी-पाण्याचा प्रवाह. असे अधिष्ठानाचे ज्ञान हवे.

'गंगेवर गोठा आहे' या वाक्याचा वाच्यार्थ संपूर्ण सोडणे म्हणजे 'जहती' लक्षणा. पण 'गंगेवर गोठा नाही' असा निर्णय कोणी लावेल तर अडचण येईल.

'जहती' लक्षणा 'तत् त्वम् असि' महावाक्याला वापरली तर काय अर्थ लागेल? या महावाक्याचा 'अकर्ता कर्ता आहे' असा वाच्यार्थ आहे. याचे कारण 'तत्'चा वाच्यार्थ 'अकर्ता' व 'त्वम्'चा वाच्यार्थ 'कर्ता' असा आहे. म्हणून, 'अकर्ता कर्ता आहे' असा 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा वाच्यार्थ आपण केला. आता 'जहती' लक्षणेच्या व्याख्येप्रमाणे वाच्यार्थाचा संपूर्ण त्याग केला पाहिजे. समजा, ज्याप्रमाणे 'गंगेवर गोठा नाही' असा एखादा मनुष्य अर्थ करतो, त्याप्रमाणे 'अकर्ता कर्ता नाही' असा अर्थ लागेल. म्हणजेच 'तत् त्वम् नाही' असा अर्थ करावा लागेल. परंतु, असे म्हटल्यास अडचण येईल.

'गोठा नाहीच' असा निर्णय कोणी लावला तर वर्म चुकेल. म्हणजेच तत् त्वम् नाहीच असा निर्णय लागेल. 'जहती' लक्षणेप्रमाणे वाच्यार्थाचा संपूर्ण त्याग केल्यावर 'गोठाच नाही' असा निर्णय बरोबर का चुकलेला आहे? तर निर्णय चुकलेला आहे. कारण गोठा तर आहेच. पण याला हेच माहीत नाही की गंगा म्हणजे काय? आणि मग कदाचित् गोठ्याचा असण्याचा नसण्याचा प्रश्नच त्याला नसेल. तसेच, जन्ममरण फेरा ज्या अधिष्ठानावर सुरू आहे त्या अधिष्ठानाचा एखाद्याला तपास नसतो. म्हणून, जन्ममरण संसारचक्र आहे की नाही हेच त्याला माहीत नसते व त्याला त्याच्याशी घेणेदेणेही नसते.

विचार मंथन करण्यासाठी प्रथम 'तत् त्वम् असि' यांपैकी कोणाला तरी अधिष्ठान ठरवावे लागेल. समजा, 'तत्'ला आपण अधिष्ठान मानले. 'तत् त्वम् असि' हे महावाक्य 'गंगेवर गोठा आहे' या दृष्टांताशी जुळवून पाहू. 'गंगा' या अधिष्ठानाचा वाच्यार्थ 'प्रवाह'

असा आहे. ज्याला हा वाच्यार्थ यथार्थपणे कळला तो म्हणेल 'गंगेवर गोठा नाही'. त्याप्रमाणे 'तत्'चा वाच्यार्थ 'अकर्ता' आहे. 'तत्'चा हा वाच्यार्थ ज्याला यथार्थपणे कळला तो म्हणेल 'तत् त्वम् नाही'.



समजा, 'त्वम्'ला अधिष्ठान मानले. तर 'त्वम् तत् असि' हे वाक्य 'गोठा गंगेवर आहे' या दृष्टांताशी जुळवून पाहू. आता 'गोठा' या अधिष्ठानाचा वाच्यार्थ स्थिर पदार्थ असा आहे. ज्याला हा वाच्यार्थ यथार्थपणे कळला तो म्हणेल 'गोठा गंगेवर नाही'. त्याप्रमाणे 'त्वम्'चा वाच्यार्थ 'कर्ता' आहे. 'त्वम्'चा हा वाच्यार्थ ज्याला यथार्थपणे माहीत आहे तो म्हणेल 'त्वम् तत् नाही'.

पहिल्या अभ्यासात तत् त्वम् नाही असे कळते. पण तत् कोण आहे? हे कळत नाही. दुसऱ्या अभ्यासात त्वम् तत् नाही असे कळते. पण त्वम् कोण आहे? हे कळत नाही. म्हणजेच त्यांचा योग्य निर्णय लागत नाही.

बरं! 'त्वम् नाही' किंवा 'तत् नाही' असे म्हटले तर चालेल का? तर तसेही चालणार नाही. कारण, ज्याप्रमाणे दृष्टांतात 'गंगा नाही' किंवा 'गोठा नाही' असे चालणार नाही. म्हणजे गंगा किंवा गोठ्याचा त्याग करून चालणार नाही. त्याप्रमाणे 'त्वम् नाही' किंवा 'तत् नाही' असा निर्णय कोणी लावला तर तो शून्यवादाकडे जाऊ शकतो.

यावरून असे लक्षात येते की 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा अर्थ नीट समजण्यासाठी 'जहती' लक्षणा उपयोगाची नाही. उलट ती घातक ठरण्याची शक्यता नाकारता येत नाही. कारण या लक्षणेत प्रामुख्याने वाच्यार्थाचा त्याग आहे. त्याच्या पुढचा अभ्यास स्पष्ट होत नाही. वाच्यार्थावरच एखादा थांबेल. वाच्यार्थातच तो कदाचित् रममाण होईल. दृष्टांतात त्याला गोठा कोठे आहे या प्रश्नाशी घेणेदेणे नसेल व सिद्धांतात त्याला तत् अथवा त्वम् म्हणजे काय याच्याशी घेणेदेणे नसेल.

चार देह वाच्यार्थ आहेत की लक्ष्यार्थ? आपण देहरूपी वाच्यार्थातच रमल्यामुळे लक्ष्यार्थाशी आपल्याला घेणेदेणे राहिलेले नाही. आत्मा या लक्ष्यार्थापासून आपण वंचित राहिलेलो आहोत.

तर अशाप्रकारे, 'गंगेवर गोठा आहे' या वाक्याच्या संपूर्ण वाच्यार्थाचा त्याग केला तर एखादा 'गोठा नाही' या निर्णयावर येऊ शकतो. 'गोठा नाही' या निर्णयावर येऊन थांबलो तर आपली हानी आहे. केवळ 'जहती' लक्षणेचा अवलंब केला तर 'गंगेच्या पाण्यावर गोठा नाही' एवढाच निर्णय पक्का होतो. गोठा नेमका कुठे आहे याचा विचार मात्र येत नाही. याप्रमाणेच 'जहती' लक्षणा 'तत् त्वम् असि' महावाक्याला वापरली, तर 'तत् त्वम् नाही' अथवा 'त्वम् तत् नाही' एवढाच निर्णय लागतो. पण पुढचा निर्णय लागत नाही.

आपण 'अकर्ता कर्ता आहे' असा विचार करीत आलो आहोत. बरं! 'कर्ता अकर्ता आहे' हे पटते का? दृष्टांतात 'गंगेवर गोठा आहे' हे पटेल काय? गंगेवर गोठा का पटत नाही? कारण वाच्यार्थावर लक्ष आहे म्हणून. दृष्टी पाण्यावर जाते म्हणून अडचण येते. दृष्टी काठावर जात नाही तोपर्यंत अडचण येते.

'जीव शिव आहे' हे पटेल का? एखाद्याला पटलेच तर कुठपर्यंत पटेल? महाराजांनी चिंतनात पटवून दिले तर चिंतन जोपर्यंत सुरू आहे तोपर्यंतच ते पटेल. नंतर संसारातील कामे करत असतांना हे पटेल काय? पटले तरी टिकेल काय?

शास्त्र, सद्‌गुरू सांगतात – 'तत् त्वम् असि'. एखादा या महावाक्याला 'जहती' लक्षणा लावून 'त्वम् नाही' किंवा 'तत् नाही' या निर्णयावर येऊ शकतो. पुढे, 'सांगणारा फसवतोय' असेही तो म्हणेल. 'जहती' लक्षणेने 'अकर्ता कर्ता नाही' असा निर्णय लागतो. वास्तविक पाहता 'कर्ता नाही' किंवा 'अकर्ता नाही' असा निर्णय लावणेही योग्य नाही. म्हणजेच 'त्वम् नाही' किंवा 'तत् नाही' असा निर्णय लावणे बरोबर नाही. म्हणून, 'जहती' लक्षणेचा येथे वापर करू नये. कारण भलताच अर्थ पदरात पडण्याची शक्यता दाट आहे. पुढे 'अजहती' लक्षणेने महावाक्य सुटते का ते बघू.

विचार मंथनासाठी 'तत् त्वम् असि' महावाक्याचा विचार करा. 'लक्षणा' हे महावाक्य सोडविण्याचे यंत्र आहे. या यंत्राच्या वापराने ब्रह्मरूपी नवनीत आपल्याला काढायचे आहे. पुढील दिवसांमध्ये यावर विचार करत राहा. 'तत्त्वमसि'रूपी दही 'जहती' लक्षणारूपी रवीने घुसळा आणि त्याने महावाक्याचा योग्य निर्णय लागतो की नाही ते बघा. ज्याप्रमाणे दही किंवा केवळ रवी घेऊन जमणार नाही, पुढे घुसळण्याची प्रक्रिया करायला हवी. त्याप्रमाणे, फक्त महावाक्य व लक्षणा घेऊन उपयोग नाही तर मंथन करणे गरजेचे आहे.

प्रथम 'जहती' नंतर 'अजहती' आणि त्यानंतर 'जहताजहती' लक्षणेने महावाक्याचा निर्णय लागतो का ते बघा. आपला निर्णय शास्त्र व सद्‌गुरू यांच्याशी जुळवून पाहा आणि निश्चिंत व्हा.

*****

।। ॐ तत सत ।।



## चिंतन क्रमांक ३६
## अजहती लक्षणा

जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास सुरू आहे. महावाक्ये ही वेदातील सर्वश्रेष्ठ वाक्ये आहेत. त्यांपैकी एक महावाक्य म्हणजे 'तत्त्वमसि'. या शब्दांमध्ये जन्ममरण चक्र संपविण्याचे सामर्थ्य आहे. महावाक्याच्या यथार्थ अनुभवाने मनुष्य मुक्त होतो. शब्दांच्या दोन वृत्ती असतात – शक्ति वृत्ती व लक्षणा वृत्ती. शब्दाने पदार्थांची ओळख होते. जन्ममरण फेरा कळण्यासाठी शब्द हाच उपाय आहे. अन्य कोणताही मार्ग नाही. आपण संसाररूपी प्रवाहात वाहत आहोत. हा प्रवाह योग्य की अयोग्य हे कळण्यासाठी उपाय म्हणजे – शास्त्र व श्रीगुरू. कोणते शास्त्र सर्वश्रेष्ठ आहे? वेद सर्वश्रेष्ठ आहे. त्यातील महावाक्ये प्रमुख आहेत. कमीत कमी एकतरी महावाक्य कळले पाहिजे. मनुष्यामध्ये शक्ति लपलेली असते. मनुष्याकडे केवळ पाहिल्याने त्याच्यात नेमकी किती शक्ति लपली आहे हे कळत नाही. एखादा मनुष्य ५० किलो वजन उचलेल की १०० किलो हे त्याच्याकडे पाहून सांगता येत नाही. प्रत्यक्षात तो किती वजन उचलतो, हे उचलताना पाहिल्यानेच कळेल. शक्ति अशी दिसून येते. शब्दांमध्ये आणि पदार्थांमध्ये शक्ति असते. पदार्थाचे कार्य कसे व किती होणार हे शक्ति दाखविते. चोर, साप या शब्दांमध्ये शक्ति आहे. मराठी भाषा जाणणाऱ्याने 'साप' शब्द ऐकला तर त्याची शक्ति कळते. इंग्रजी माणसाला ती कळणार नाही. त्याला 'स्नेक' शब्दातील शक्ति कळते.

मागील चिंतनात आपला कोणता विषय होता? मागील चिंतनात एक श्लोक सांगितला होता. आठवतो का? मागचे आठवत असेल तर पुढचे सांगता येईल. एखाद्या मुलाचे बारसे केव्हा झाले हे चटकन सांगता येते. नातेवाईकांची नावे सहज सांगता येतात. काही लोक तर कोणाचे लग्न किती वर्षांपूर्वी झाले, कोणत्या तिथीला झाले इत्यादी अनेक बारकावे सांगू शकतात. इतका संसाराचा गोडवा सहज आहे. तसा गोडवा परमार्थात निर्माण व्हायला हवा.

असो! या ठिकाणी शब्दाची शक्ती वृत्ती आपल्या कामाची नाही. आपण लक्षणा वृत्तीने महावाक्याचा अभ्यास करत आहोत. मागील चिंतनात आपण जहती लक्षणेचा अभ्यास केला होता. तेव्हा एक श्लोक पाहिला होता.

प्रमाण –

**वाच्यार्थमखिलं त्यक्त्वा वृत्तिः स्याद या तदन्विते ।**
**गङ्गायां घोष इतिवज्जहती लक्षणा हि सा ।।**

– संस्कृत वचन

ज्या लक्षणेत वाच्यार्थाचा पूर्ण त्याग करणे गरजेचे असते ती जहती लक्षणा होय. 'गंगेवर गवळ्याचा गोठा आहे'. गंगेवर गोठा असणे शक्य आहे काय? या वाक्यातील 'गंगा' माहीत पाहिजे, नाहीतर योग्य अर्थ कळणार नाही. 'गंगा' हा प्रवाह आहे. 'गंगा' नावाची मुलगी किंवा 'गंगा' हे गाव असे समजून चालणार नाही. गंगेच्या काठावर गवळ्याचा गोठा असू शकतो. येथे कशाचा त्याग करावा? येथे गंगेच्या 'प्रवाहाचा' पूर्ण त्याग केला. म्हणजेच 'वाच्यार्थम् अखिलम् त्यक्त्वा'. गंगेचा 'प्रवाह' हा वाच्यार्थ काढून टाकला, तर, पुढे 'काठावर गोठा' असा योग्य विचार होऊ शकतो.

'तत्'चे धर्म सर्वज्ञ, निष्प्रपंच इत्यादी आहेत. समजा, जहती लक्षणा लावून 'तत्'ला काढून टाकला; गंगेचा 'प्रवाह' काढल्याप्रमाणे, तर मग खाली काय? त्याचे धर्म. त्याचे धर्म काढून टाकले तर चालेल काय? मग त्याला 'तत्' म्हणता येईल का? 'गंगेचा प्रवाह' या शब्दांमध्ये शक्ति आहे. त्या शब्दांना काढून टाकले तर चालणार नाही. का चालेल? काढावे तर कसे? न काढावे तर का? असा विचार करावा. 'तत्त्वमसि' मधून 'तत्' काढूनच टाकला तर अडचण येईल. 'त्वम् असि' म्हणजे 'तू आहेस' एवढेच राहिल.

तुम्ही म्हणाल, 'त्यात काय विशेष? केवळ वाच्यार्थच काढला ना?' म्हणजे 'तत्'ला वाच्यार्थ ठरवता का? पण तुम्हांला लक्ष्यार्थ तरी कुठे माहीत आहे? 'तू आहेस' एवढेच राहिल. 'तू' म्हणजे नेमका कोण? याचा नक्की बोध होत नाही. 'तत्' आणि 'त्वम्' यांचा त्याग करू नये. त्यांच्या वाच्यार्थाचा त्याग करावा. लक्ष्यार्थ माहीत नसेल आणि लक्ष्यार्थाचा स्वीकार होत नसेल तर वाच्यार्थाचा त्याग करूनही काही उपयोग नाही. म्हणून जहती लक्षणेचा आपल्याला उपयोग नाही.

अजहती लक्षणेची व्याख्या जहती लक्षणेच्या विरुद्ध आहे.

**(येथे चिंतन क्रमांक – २५ मधील संदर्भ वाचावा.)**

प्रमाण –

**वाच्यार्थमपरित्यज वृत्तिरन्यार्थके तु या ।**
**कथितेयमजहती शोणोऽयं धावतीतिवत् ।।**

– संस्कृत वचन

वाच्यार्थाचा त्याग न करणे. 'तांबडा धावतो' या उदाहरणात काय कळते? 'तांबडा' या शब्दाचा 'बैल' हा अर्थ होऊ शकतो. बरं! 'तांबडा रंग धावतो' असा अर्थ घेतला तर? रंग कधी धावतो का? म्हणून वाक्य चुकीचे होईल. का? कारण रंग कधी धावू शकत नाही. धावणे ही क्रिया तांबडा या रंगाकडून होऊ शकत नाही. तांबडा हा धावणारा पदार्थ असेल. बैल किंवा घोडा काहीही असू शकेल. घोड्याच्या समुदायाला काय म्हणतात? कळप. या कळपातील एक घोडा धावतो का सगळेच? तांबडा धावतो. यामधून स्पष्ट बोध होत नाही. थोडा विचार केला तर तांबडा रंग असणारा एक घोडा धावतो असे लक्षात येते. अजहती

लक्षणेत वाच्यार्थाचा त्याग करायचा नसतो. बैल प्रमुख की रंग प्रमुख?



आपल्यापासून काही अंतरावर बैलांचा समूह आहे. आपण बैलांकडे पाहत आहोत. आपल्याला बैल माहीत आहे. समजा, त्यांपैकी लाल रंगाचा बैल धावू लागला, तर आपण म्हणतो, 'तांबडा धावतो'. आता अडचण येत नाही. कारण 'तांबडा बैल धावतो' हे स्पष्टपणे माहीत आहे. 'तांबडा' वाच्यार्थ आहे, 'बैल' लक्ष्यार्थ आहे. लक्ष्यार्थ प्रमुख असतो. 'बैल' हा लक्ष्यार्थ पक्का माहीत असेल तर 'तांबडा धावतो' या वाच्यार्थाचा स्वीकार केला तरी चालेल. अडचण येत नाही. परंतु, जर लक्ष्यार्थ माहीत नसेल तर 'तांबडा धावतो' या वाच्यार्थाचा स्वीकार केल्याने काहीच नीट बोध होत नाही. म्हणून अजहती लक्षणेचा आपल्याला उपयोग नाही. तांबडा म्हणजे माणूस, घोडा, बैल, साप काहीही असू शकेल. वाच्यार्थाचा स्वीकार केल्याने लक्ष्यार्थाचा बोध होत नाही. अजहती लक्षणेने वाक्याचा लक्ष्यार्थ कळत नाही.

आता, अजहती लक्षणा 'तत्त्वमसि' महावाक्याला वापरू. 'तत्'च्या वाच्यार्थाचा पूर्ण स्वीकार केला तर काय अर्थ निघेल? 'सर्वज्ञ आहे'. काय सर्वज्ञ आहे? अडचण आली. कोण सर्वज्ञ आहे? स्थितप्रज्ञ आहे. कोण स्थितप्रज्ञ आहे? गाढव की दगड? केवळ वाच्यार्थाने लक्ष्यार्थ कळत नाही. 'त्वम्'च्या वाच्यार्थाचा पूर्ण स्वीकार केला तर काय अर्थ निघेल? 'अल्पज्ञ आहे'. कोण? मी? मी म्हणजे कोण? 'विकारी आहे'. विकारी नक्की कोण? लक्षात येत नाही. वाच्यार्थाचा स्वीकार केल्याने लक्ष्यार्थ कळत नाही.

'तत्त्वमसि'च्या वाच्यार्थाचा पूर्ण स्वीकार केला तर काय अर्थ निघेल? सर्वज्ञ अल्पज्ञ आहे. तांबडा काळा धावतो. पांढरा काळा धावतो. काय कळले? उजेड अंधार आहे. वाच्यार्थाचा पूर्ण स्वीकार केल्याने देखील लक्ष्यार्थ कळत नाही.

हा विचार पुन्हा करू.

जहती लक्षणेचा वापर म्हणजे – 'वाच्यार्थाचा त्याग करणे'.

तत्चा वाच्यार्थ म्हणजे 'अकर्ता'. त्याचा त्याग करणे म्हणजे अकर्ता 'नाही'. म्हणजेच तत् 'नाही'. मग, कोण आहे? 'त्वम्' आहे का? असा प्रश्न राहतो. त्वम्चा वाच्यार्थ म्हणजे 'कर्ता'. त्याचा त्याग करणे म्हणजे कर्ता 'नाही'. म्हणजेच त्वम् 'नाही'. मग, कोण आहे? 'तत्' आहे का? असा प्रश्न राहतो. संपूर्ण महावाक्य घेतले तर? 'तत्त्वमसि'चा वाच्यार्थ म्हणजे 'अकर्ता कर्ता आहे'. त्याचा त्याग करणे म्हणजे अकर्ता कर्ता 'नाही'. म्हणजेच तत् त्वम् 'नाही'. मग, कोण आहे? जर, दोघेही नाहीत तर मग शून्य आहे का? पण, 'शून्य' मानणे वेदांतशास्त्राच्या विरुद्ध आहे. म्हणजेच हा प्रश्न राहतोच.

अजहती लक्षणेचा वापर म्हणजे– 'वाच्यार्थाचा त्याग न करणे'. तत्चा वाच्यार्थ म्हणजे 'अकर्ता'. त्याचा त्याग न करणे म्हणजे अकर्ता 'आहे'. म्हणजेच तत् 'आहे'. मग कोण नाही? 'त्वम्' नाही का? असा प्रश्न राहतो. त्वम्चा वाच्यार्थ म्हणजे 'कर्ता'. त्याचा त्याग न करणे म्हणजे कर्ता 'आहे'. म्हणजेच त्वम् 'आहे'. मग, कोण नाही? 'तत्' नाही का? असा प्रश्न राहतो. संपूर्ण महावाक्य घेतले तर? 'तत्त्वमसि'चा वाच्यार्थ म्हणजे 'अकर्ता कर्ता आहे'. त्याचा त्याग न करणे म्हणजे अकर्ता कर्ता 'आहे'. मग, कोण नाही? असा प्रश्न

राहतोच. दोघेही आहेत, तर ते भिन्नत्वाने आहेत असाच येथे बोध होतो. कारण दोघांचे धर्म अत्यंत भिन्न आहेत आणि असे भिन्नत्व, द्वैत हे शास्त्राच्या व महात्म्यांच्या अनुभवाविरुद्ध आहे. अशाप्रकारे, 'तत्त्वमसि' महावाक्याला जहती व अजहती लक्षणा वापरली तर वाच्यार्थाचा त्याग अथवा स्वीकार केल्याने अडचण आली. दोन्ही लक्षणांनी चुकीचा बोध होतो किंवा नीट बोध होत नाही.



'गंगेवर गवळ्याचा गोठा आहे' अथवा 'तत्त्वमसि' या वाक्यासाठी किंवा कोणत्याही वाक्यासाठी एकच लक्षणा वापरावी. 'गंगा' शब्दासाठी एक लक्षणा आणि 'गोठा' शब्दासाठी दुसरी लक्षणा, असे चालत नाही. त्याचप्रमाणे, 'तत्' शब्दासाठी एक लक्षणा आणि 'त्वम्' शब्दासाठी दुसरी लक्षणा, असे चालत नाही. एकच लक्षणा दोन्ही शब्दांसाठी वापरायला हवी. पूर्ण वाक्यासाठी एकच लक्षणा एका वेळेस वापरायची. 'गंगेवर गवळ्याचा गोठा आहे' या वाक्याला जहती लक्षणा लावली तर वाच्यार्थाचा त्याग करून 'गंगेवर गवळ्याचा गोठा नाही' असा अर्थ लागतो. म्हणजे गवळ्याचा गोठाच नाही, असा अर्थ निघतो. मग गोठा आहे का? आहे तर कुठे? हा विचार पुढे करावा लागेल. म्हणजे फक्त जहती लक्षणा उपयोगाला येत नाही, हे नीट लक्षात ठेवावे. मग कुठे आहे? गंगेचा तीर हा शक्य संबंध असू शकतो. गंगेचा तीर हे लक्ष्य आहे. प्रवाहाच्या त्यागानंतर म्हणजे वाच्यार्थाच्या त्यागानंतर तीर हे लक्ष्य माहीत पाहिजे, तरच योग्य अर्थ निघतो.

अशारितीने जहती, अजहती लक्षणेने 'तत्त्वमसि' महावाक्याचा योग्य अर्थ कळत नाही.

आता तिसरी लक्षणा – 'जहताजहती लक्षणा' हिचा वापर महावाक्याला करून पाहू. जहती आणि अजहती योग्य प्रकारे एकत्रित करणे म्हणजेच जहताजहती लक्षणा. जहताजहती लक्षणा म्हणजेच भाग–त्याग लक्षणा. भाग म्हणजे स्वीकार. त्याग म्हणजेच अस्वीकार. कशाचा स्वीकार आणि कशाचा त्याग? जहती लक्षणेत वाच्यार्थाचा त्याग आणि अजहती लक्षणेत वाच्यार्थाचा स्वीकार आहे. जहताजहती लक्षणेत त्याग आणि स्वीकार दोन्ही आहेत. स्वीकार व त्याग एकत्र? समजा, पाणी घ्या–पाणी घेऊ नका. पाणी प्या–पाणी पिऊ नका. असे म्हटले तर करणार काय? अडचण येते. स्वीकार पण आणि त्याग पण करायचा? हे वरवर पाहता फार अवघड वाटते. परंतु, योग्य सद्गुरू व शास्त्राच्या आधाराने जहताजहती लक्षणा महावाक्याला वापरता येणे शक्य होते. पुढे कशाचा त्याग आणि कशाचा स्वीकार हे नीट कळते. त्याग आणि स्वीकार यामध्ये चूक व्हायला नको. नाहीतर मोठा फेरा पडतो.

प्रमाण –

चुकलिया त्यागाचें वेंझें । केला सर्वत्यागुही होय वोझें ।
न देखती सर्वत्र दुजें । वीतराग ते ।।१३४।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

भगवान श्रीतुकाराम महाराजांचा एक अभंग आहे – 'भाग गेला क्षीण गेला । अवघा झाला आनंद ।।' भाग आणि क्षीण गेला पाहिजे. नंतरच अवघा आनंद. या ठिकाणी भाग म्हणजे स्वीकार व क्षीण म्हणजे त्याग. स्वीकार आणि त्याग याचे वर्म ज्याला कळते त्याला अवघा आनंद कळतो. प्रपंच करावा का सोडावा ? परमार्थ करावा का सोडावा ? हे ज्याला यथार्थपणे कळते त्याला अवघा आनंद होतो.

येथून पुढे 'तत्त्वमसि' महावाक्याचा खरा अभ्यास आहे. 'तत्त्वमसि' महावाक्याचा विचार लक्षणांनी पूर्णत्वास गेला तर तुम्हांला जगामध्ये कोणीही बांधू शकणार नाही. तुम्हांला अमरत्व प्राप्त होते. हे अमरत्व उत्पत्ती सापेक्ष नाही. हे निरपेक्ष अमरत्व आहे. योग्य सद्गुरू, योग्य शास्त्र प्राप्त झाल्याने साधक अमर होतो. पण कोणता साधक अमर होतो ? हा सिद्धांत भलत्याच साधकाला सांगू नये. त्याचा काही उपयोग होत नाही. तप, गुरूभक्ती, श्रवणेच्छा आणि अनिंदा ही चार लक्षणे ज्या साधकामध्ये आहेत, त्याला हा गुप्तबोध सांगावा असे भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात. तप तीन प्रकारचे असते. शारीरिक, मानसिक, वाचिक. या तिन्ही तपांची साधकाला गरज आहे.

श्रीगुरूंवर आपली श्रद्धा हवी. एखादा साधक श्रीगुरूंची कधी निंदा करतो, तर कधी त्याला त्यांच्याविषयी श्रद्धा वाटते. एखादा साधक कधी या महाराजांचे ऐकतो, तर कधी कंटाळा आला तर त्या महाराजांचे ऐकतो. एखादा साधक पुढे नको त्या संसारकार्यात रमतो. असे लोक नरकात जातात. नंतर मृत्यूलोकात कुत्रा, डुक्कर होतात. म्हणूनच जगात किड्यामकोड्यांची संख्या वाढतच आहे. या कारणांसाठी योग्य शास्त्र, श्रीगुरूंवर श्रद्धा पाहिजे. कधी काहीही होवो, श्रीगुरूंवरची श्रद्धा कायम असावी.

श्रवणाची इच्छा सर्वांचीच आहे काय ? समजा, संध्याकाळी सात वाजता महाराजांचे चिंतन आहे. या चिंतनात अत्यंत महत्त्वाचा विषय सुरू आहे आणि नेमके त्याच वेळेस तुमचा मुलगा वारला तर मग चिंतन ऐकायला याल काय ? महाराजांचे चिंतन शेजारी असेल तरी येणार नाही. मात्र एखाद्याचे लग्न असले आणि घरातले कोणी मेले तर प्रेत लपवून ठेवून लग्न लावले जाते. एवढेच काय एका ठिकाणी सत्यनारायणाचे आमंत्रण आहे, तर मग महाराजांच्या चिंतनाच्या ऐवजी सत्यनारायणाच्या पुजेला जातात. वाढदिवस, बारसे साजरा करायला जातात. वेळ मिळाला, तरच महाराजांचे चिंतन ऐकतात. अशाप्रकारची श्रवणेच्छा काही उपयोगाची नाही. अनिंदा म्हणजेच निंदा न करणे. श्रीगुरू, शास्त्र आणि त्यांचे शब्द यांची निंदा न करणे. पण शास्त्राचे, श्रीगुरूंचे सर्वच पटते का ? विचार करा.

अशी ही चार लक्षणे ज्यांच्यामध्ये आहेत, त्यांनाच हा बोध सांगावा असे भगवान श्रीव्यासांचे वचन आहे.

प्रमाण –

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ।।६७।। अध्याय १८

– श्रीमद्‌भगवद्‌गीता

बरं! महाराजांच्या समोर श्रवणाला बसलेल्यांपैकी कोणाकडे ही चार लक्षणे आहेत हे महाराजांना काय माहिती असणार? माहीत नसते. म्हणून यावर एक मार्ग आहे. महाराजांनी चिंतन सांगत राहावे. श्रोत्यांपैकी ज्यांच्याकडे चार लक्षणे आहेत ते आनंदरूप होतील. बाकीचे अन्यत्र निघून जातील. म्हणून या चार गोष्टी साधकाने कष्टाने प्राप्त करायला पाहिजेत.

पुढील चिंतनाला येण्याच्या आधी जहताजहती लक्षणेचा वापर 'तत्त्वमसि' महावाक्याला करण्याचा प्रयत्न करा. सांगितलेली चार लक्षणे अंगी बाणून अधिकार घेऊन या. ठरवलेच तर एका क्षणात चारही अधिकार लक्षणे प्राप्त होऊ शकतात. तुमच्याकडे तर आठवडाभर वेळ आहे. त्यातील संसारिक कामाची वेळ वजा केली, तरी अंदाजे ६००० क्षण मिळतील. किंवा १००० क्षण धरा. कमीत कमी पुढच्या वेळेस जहताजहती लक्षणेचा दृष्टांत पाहून येथे या. म्हणजे आपला विषय आणखी सहज आणि सोपा होईल.

★★★★★

## चिंतन क्रमांक ३७
## जहताजहती लक्षणा – १

जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास सुरू आहे. मागील काही चिंतनांमध्ये तीन प्रकारच्या लक्षणांचा आपण अभ्यास केला. जहती, अजहती आणि जहताजहती अशा त्या तीन लक्षणा आहेत. आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास लक्षणावृत्तीने करीत आहोत. जहती लक्षणा – वाच्यार्थाचा संपूर्ण त्याग करणे. अजहती लक्षणा – वाच्यार्थाचा त्याग न करणे. जहताजहती (भागत्याग) लक्षणा – भाग म्हणजे स्वीकार. त्याग म्हणजे सोडून देणे. काय त्यागावे आणि काय स्वीकारावे हे यथार्थपणे कळले तर 'आनंद'रूप होता येते.

या लक्षणेचा दृष्टांत म्हणजे 'सोऽयं देवदत्तः' म्हणजे – 'तो हा देवदत्त'. या वाक्यात काय दिसते? 'तो' ने भूतकाळ व 'हा' ने वर्तमानकाळ दाखविला आहे. 'तो', 'हा', 'देवदत्त' यापैकी प्रमुख कोण? देवदत्त प्रमुख आहे. 'तो' आणि 'हा' यांचाही उपयोग आहे. हा देवदत्त कोण? 'तो', 'हा', 'देवदत्त' असे किती मनुष्य आहेत? तीन? दोन? का एकच? विचार करा.

एक दृष्टांत पाहा. एक राजा होता. पुढे त्याला वैराग्य येऊन तो वैरागी – फकीर झाला. आता आपण असे म्हणणार – 'राजा फकीर आहे'. या वाक्यावरून काय कळते? राजा आहे का फकीर आहे? का दोघेही आहेत? का तिसरा कोणीतरी आहे?

राजा नीटनेटका, तर वैरागी दाढी, केस वाढलेला. राजाच्या अंगावर कपडे, दागिने, तर वैराग्याच्या अंगावर फाटके कपडे, गंध, टिळा, माळा. अत्यंत भिन्न लक्षणे पाहून त्या दोन व्यक्ती आहेत असेच वाटते. ज्यांनी राजा व फकीराची वरवर लक्षणे पाहिली त्यांना त्या दोन व्यक्ती वाटतात. ज्यांनी फक्त राजा पाहिला त्यांचा येथे उपयोग नाही. ज्यांनी फक्त फकीर पाहिला त्यांचाही येथे उपयोग नाही. राजा किंवा फकीर यांची सखोल लक्षणे, स्वरूप लक्षणे पाहणाऱ्यांचा येथे उपयोग आहे. त्यालाच कशाचा त्याग करावा आणि कशाचा स्वीकार करावा हे कळेल व ते दोन आहेत की एकच आहे याचा निर्णय लावता येईल.

ज्याने दोन्ही वेळेस राजाला पाहिले, म्हणजे राजा असताना आणि वैरागी असताना, त्याने त्याग व स्वीकार कशाचा केला? त्याने श्रीमंती–गरीबीचा त्याग केला व पुरुषाचा स्वीकार केला. पूर्वी त्या पुरुषाचे ऐश्वर्य होते. आता जटा वाढलेल्या, हातात कमंडलू. हाच 'तो' हे कसे ठरवले? त्याच्याशी बोलून? त्याने पाठ केलेले तुम्हांला सांगितले तर? तुम्ही फकीराला राजाबद्दल विचारले आणि त्याने राजाची सविस्तर माहिती सांगितली. तर तो राजा ठरतो का? त्याचे सांगणे ऐकून ठरवणार का की हाच 'तो' राजा? कदाचित् तो फकीर तुम्हांला फसवत असेल. तो राजा नसूनही मीच 'तो' राजा आहे असं खोटंच म्हणत असेल तर?

राजाच्या शरीराची ठेवण महत्त्वाची. डोळे, कान, हात, पाय यांची ठेवण, त्याचप्रमाणे शरीरावरच्या खुणा, चिन्हे महत्त्वाची. अधिष्ठान शरीराची नीट ओळख पाहिजे. तरच 'तो राजा हाच वैरागी' असा बरोबर निश्चय होईल. शरीर तपासणे हे प्रमुख आहे. 'राजा' त्याच शरीरावर आरोपिला होता आणि फकीरही त्याच शरीरावर आरोपित आहे. राजापणाच्या खाणाखुणा फकीरपणाच्या खाणाखुणांशी अजीबात जुळत नाहीत. परंतु, शरीर पाहिले तर आपण फसणार नाही. म्हणजेच अधिष्ठानाच्या खाणाखुणा पाहिल्या पाहिजेत. काय समान पाहिजेत? उंची, बोटे इत्यादी समान आहेत काय हे पाहिले पाहिजे. सहसा एका ठराविक वयानंतर उंची बदलू शकत नाही. डोळ्यांचा रंग बदलत नाही. एखाद्या माणसाचे डोळे नीट पाहिलेले असतील तर अनेक वर्षांनंतर भेट झाली, तर डोळ्यांवरून त्याची ओळख पटते. अंगठ्यांच्या ठशांवरूनही त्याला ओळखता येते. एकाच अंगठ्याचे कालांतराने काढलेले ठसे जुळतात. राजा आणि फकीर हे दोन आरोपित पदार्थ आहेत. पण, त्या दोघांचे अधिष्ठान एकच. म्हणजे शरीर.

फकीराला पाहून 'तोच हा राजा' अथवा 'तोच हा फकीर' असा विचार करता येईल किंवा 'तो राजा' व 'हा फकीर' असे द्वैत सुद्धा होईल. 'हा तो राजा' होऊ शकते. हा 'तो' किंवा तो 'हा' असे चालेल. वर्तमानकाळ महत्त्वाचा.

राजाशी, फकीराशी, की शरीराशी आपले घेणेदेणे आहे? स्वीकार कोणाचा करावा? समजा राजाचा. मग, फकीराचा राजा कसा करायचा? राजाचा स्वीकार केला, तर फकीराला राजा बनविणे क्रमप्राप्त आहे. आपल्याला कोणाची ओळख असावी? राजाची, फकीराची की अधिष्ठान शरीराची? राजा म्हणावे तर राजा राहिला नाही. मग, राजावरच दृष्टी असेल तर फकीराला राजा करण्यासाठी प्रयत्न करावे लागतील. फकीरावर दृष्टी असेल तर काहीही करायची गरज नाही.

समजा, पन्नास टक्के लोकांनी राजाचा स्वीकार केला आणि फकीराचा उरलेल्या पन्नास टक्के लोकांनी स्वीकार करायचे ठरवले. एकाला पाहिजे फकीर. दुसऱ्याला पाहिजे राजा.

ज्याने फकीराचा विचार करायचा ठरवला, त्याला फकीराचा स्वीकार करणे सहज सोपे काम आहे. आता समजा त्या फकीराने दाढी काढली, जटा काढल्या, कपडे बदलले आणि राजाचा वेष घेतला. तर फकीर गायब झाला. आता ज्याला फकीर हवा होता तो फकीरालाच शोधणार. पुढे त्यांची भेट वेषांतर केलेल्या फकीराशी झाली आणि दोघेजण जर फकीराला शोधायला निघाले तर फकीर सापडेल का?

दुसऱ्याने राजाचा स्वीकार केला. समोर उभ्या असलेल्या फकीरावर राजाचे कपडे दागिने चढवले, दाढी जटा काढून टाकल्या. त्याने प्रयत्नाने फकीराला राजा बनविले. सिंहासनावर बसविले. त्यामुळे राजाचा स्वीकार करणारा खुश झाला. आता समजा त्या 'राजाने' पलायन केले आणि दुसराच भलताच वेष धारण केला तर? ज्याला 'राजा' हवा होता त्याची भेट वेषांतर केलेल्याशी झाली आणि जर दोघेही राजाला शोधायला निघाले तर

राजा सापडणार का ?

याप्रमाणे, ज्याला 'फकीर' हवा होता त्याच्या हाती काही लागत नाही आणि ज्याला 'राजा' हवा होता, त्याच्याही हाती काही लागत नाही.

आता वरील दृष्टांतावरून सिद्धांत बघू. 'जीव' म्हणजे फकीर म्हणजेच गोसावी. 'शिव' म्हणजे राजा. काही लोकांना कोण पाहिजे ? 'जीव'. असे लोक मस्तपैकी देह, देहधर्म आणि पदार्थ घेऊन जगतात. फकीर म्हणजे 'जीव' सहज उपलब्ध असतात. 'जीव' असंख्य आहेत. जिकडे-तिकडे जीवच दिसतात. आरोपित धर्मांना मी म्हणणारा हा जीव असतो. फकीर पुन्हा राजा बनेल का हे सांगता येत नाही. 'जीव' 'शिव' होईलच का हे सांगता येत नाही. प्रयत्नाने 'जीव' शिवपदावर जाऊ शकतो. शिवपदावर राहण्याचा भोग संपला की परत जीव होऊ शकतो. जीव शिवपदावर जास्त वेळ राहत नाही. तो जीवपदावर बहुकाल असतो. जसे राजकारणात असलेली 'व्यक्ती' बहुकालापासून राजकारणात असते आणि पुढे जाऊन 'पंतप्रधान' झाली, तर त्या पदावर अल्पकाळच असते. तसेच आपण 'जीव' पदावर अनंत काळापासून आहोत.

तुम्हांला कधीतरी असे वाटले असेल की एखादे वर्ष तरी मी पंतप्रधान व्हावे किंवा एखादा मोठा अधिकारी व्हावे. तुम्हांला दिवसाच्या २४ तासांत काय व्हावेसे वाटते ? नको नको ते व्हावे असे वाटते. 'जीव' का 'शिव' ? जीवांची संख्या खूप जास्त आहे. 'शिव' होण्यासाठी लाखो 'जीव' रांगेत उभे आहेत. तुम्हांला 'जीव' राहायचे का ? 'शिव' व्हायचे का ? मग काय असावे ? प्रत्येकालाच वाटते माझीच सत्ता असावी. पण जी कुठली सत्ता तो प्राप्त करू इच्छितो, साधारणपणे ती 'जीव' याच कक्षेत येते. अनादीकाळापासून आपल्याला वाटत आहे की मी काहीतरी असावे. असे जोपर्यंत वाटत राहिल तोपर्यंत काही खरे नाही.

आपण 'काही न होनी' केवळ 'अवघा' व्हायचे आहे. बाकी काहीही व्हायचे नाही. स्थूलदेह ते महाकारणदेह होणे नको. त्यांच्या धर्मांना घेऊन काहीतरी व्हावे असे मनुष्याला वाटत असते. तेही आपल्याला नको. पंतप्रधान 'जीव' असतो का 'शिव' ? 'जीव' असतो. जगाचा राजासुद्धा 'जीवच' आहे. म्हणून ही कुठलीही पदे नकोत. अगदी 'शिव' हे सुद्धा पद नको.

कमीत कमी आपल्या घरात तरी आपल्याला किंमत असावी, असे प्रत्येकालाच वाटते. ज्या घरामध्ये पतीचे वर्चस्व असते, त्याच्या पत्नीला असे वाटते की पतीने कधीतरी आपले ऐकावे. ज्या घरामध्ये पत्नीचे वर्चस्व असते, तेथे पतीला असे वाटते की पत्नीने कधीतरी आपले ऐकावे. मुलाबाळांना असे वाटते की आई-बापाने आपले ऐकावे. आई-बापाला असे वाटते की मुलांनी आपले ऐकावे. सूनेला वाटते सासूने ऐकावे आणि सासूला वाटते सूनेने ऐकावे. कळत-नकळत प्रत्येकालाच आपली सत्ता असावी असे वाटते. तिन्ही लोकांत हाच गोंधळ सुरू आहे. अशा भावनेपोटीच आपला 'जीवपणा' टिकून आहे.

आपण 'जीव' का राहिलो, याचा शोध घेणे गरजेचे आहे. खरेतर, आपण 'जीव' या सापेक्षित उच्च पातळीवर आहोत की चांगला, वाईट, स्थूल, कृश, स्त्री, पुरुष इत्यादी

खालच्या पातळीवर आहोत? कमीत कमी 'जीव' व्हा. जीवावर या. आपण जीवावर आलो

तर स्थूल, सूक्ष्म प्रपंचाशी संबंध राहणार नाही. असला तरी असूनही तो नसेल. जीवावर आल्यावर स्थूल, सूक्ष्म प्रपंच असो अथवा नसो. दोन देहांचे व्यापार आपोआप सुरू राहतील.

जीव गुंतविण्यासाठी आपल्याकडे पुष्कळ पदार्थ आहेत. धनदौलत, बायको, पोरं, आई, बाप इत्यादी. म्हणून आपण जीवावर येणार नाही. स्थूल, सूक्ष्म प्रपंचातून बाहेर पडावे असे लोकांना वाटत नाही. असे विचित्र लोक असतात. अशाच लोकांची संख्या जास्त आहे. 'शिव' होण्याची इच्छा असणाऱ्यांची संख्याही कमी आहे.

जीव फकीर आहे. का? कारण जीवाकडे काहीच नाही. त्याच्याकडे खरंतर काहीही नसताना, 'आपल्याकडे खूप काही आहे' या भ्रमात तो मस्त मजेत असतो. फकीरही मस्त मजेत असतो. पण फकीराचे मजेत असणे मूर्खपणामुळे नसते.

राजाला देशाची चिंता असते. अमुक मंत्री काय करत असेल? प्रजा कशी आहे. असा विचार तो सतत करतो. राज्यपद जाण्याची त्याला नेहमीच भीती असते. 'कोणी बॉम्बने उडविले तर?' अशी पंतप्रधानाला भीती असते. देवांना दैत्यांची भीती. दैत्यांनी देवांना ठोका दिला की देव विष्णूकडे किंवा शंकराकडे धाव घेतात.

फकीराला भीती नाही. फकीराजवळचे गाठोडे कोणी घेणार नाही. परंतु, तरीही फकीराला गाठोड्याची काळजी असतेच. लोकांना वाटत असते की काहीतरी व्हावे. राजा किंवा फकीर.

आपल्या दृष्टांतात आपण 'तो' हा 'राजा' किंवा 'तो' हा 'वैरागी' असे पाहिले तर दृष्टी राजावर किंवा वैराग्यावर जाते. व्यक्तीकडे लक्षच जात नाही. व्यक्ती दिसतच नाही. व्यक्तीचा शोध घेतला पाहिजे. राजाचा किंवा फकीराचा नाही. तुम्हांला व्यक्ती पाहिजे की आरोपित धर्म?

एखादा गरीब मनुष्य आपल्या परिचयाचा असेल, तर त्या गोष्टीची वाच्यता आपण समाजासमोर करत नाही. पण जर शहराचा महापौर आपल्या ओळखीचा असेल तर ती गोष्ट आपण ज्याला-त्याला सांगत फिरतो. 'महापौर माझ्या दूरच्या नात्यातला आहे' असे अभिमानाने आवर्जून सांगतो. नसला तरीही. म्हणजे आपला रस कशात आहे? आपले लक्ष श्रीमंती-गरीबी या धर्मांवर आहे, व्यक्तीवर नाही. शहाणी माणसं व्यक्तीचा स्वीकार करतात. गरीबी-श्रीमंतीचा स्वीकार योग्य नव्हे. जो व्यक्तीचा स्वीकार करतो, तो राजा-फकीर यांच्या बाबतीत एकच व्यक्ती बघतो. परंतु, आरोपित धर्मांकडे ज्याचे लक्ष असते त्याला एका काळात एकाचीच प्राप्ती होते.

तुमची दृष्टी जीवावर असेल तर तुम्हांला जीवाची प्राप्ती होईल. तुमची दृष्टी शिवावर असेल तर शिवपदाची प्राप्ती होऊ शकेल. पण अधिष्ठान ब्रह्मप्राप्ती कदापी होणार नाही. आपली दृष्टी व्यक्तीवर पाहिजे, मग ती व्यक्ती राजा असो अथवा फकीर असो. मुलाचा मुलगा म्हणून स्वीकार करते, म्हणून आईला सुख-दुःख होतात. तिने मुलाचा व्यक्ती म्हणून स्वीकार केला, तर ती तटस्थ होईल. त्याप्रमाणेच जीवाच्या व शिवाच्या

आरोपित धर्मांचा स्वीकार करू नये. त्यांच्या अधिष्ठानाचा स्वीकार करावा. जीव आणि शिव यांच्या वाच्यार्थाचा त्याग करावा आणि लक्ष्यार्थाचा स्वीकार करावा.


प्रथम 'तत्त्वमसि' महावाक्याचा वाच्यार्थ नीट कळून घ्या. त्यासाठी एक प्रक्रिया म्हणजे 'त्वम्' संबंधात 'प्राज्ञ', 'तैजस', 'विश्व' आणि 'तत्' संबंधात 'ईश्वर', 'वैश्वानर', 'विराट' यांच्यातील भेदाचा अभ्यास करणे. त्यानंतर त्यांच्यातील अभेद शोधणे. अभेदानेच 'तत्त्वमसि' महावाक्याचा लक्ष्यार्थ यथार्थपणे अनुभवावा. ही शास्त्रीय पद्धत आहे. परंतु, स्वतःच्या इच्छेप्रमाणेच आपण जगत राहिलो, शास्त्र व सद्गुरुंचे अनुशीलन केले नाही, तर आपण जीव किंवा शिव राहू. पण ब्रह्म होणार नाही. हे बघा! जीव राहू नका, शिव होऊ नका. ज्याला हे दोन्ही नकोत तो ब्रह्माकडे वाटचाल करणार आहे.

*****

## चिंतन क्रमांक ३८
## जहताजहती लक्षणा – २

आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने करीत आहोत. आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास लक्षणावृत्तीने करीत आहोत. आपण मागील चिंतनात 'राजा आणि गोसावी' हा दृष्टांत पाहिला. तसेच तीन प्रकारच्या लक्षणांचा आपण अभ्यास केला. जहती, अजहती आणि जहताजहती अशा त्या तीन लक्षणा आहेत.

राजा कसा असायला पाहिजे – मुकुटधारी, स्वर्णालंकाराने विभूषित, ऐश्वर्यवान असा. पण, आता हा दाढी वाढलेला, जटा असलेला, फाटके कपडे घातलेला, हातात कमंडलू असलेला वैरागी जो दिसतोय, तो हा राजा असू शकत नाही. परंतु, त्याच्या शरीरावरच्या लक्षणांचा – उदाहरणार्थ – डोळ्यांचा अभ्यास केल्यानंतर 'हाच तो राजा' असा निर्णय होतो. राजा घ्यावा की वैरागी घ्यावा. दोन्ही घेणे चुकीचे. 'राजा गोसावी आहे' असे म्हटले होते. 'गोसावी राजा आहे' असे म्हटले तरी अडचण येते. तो राजा हा गोसावी किंवा तो गोसावी हा राजा. राजा आणि गोसावी ज्या व्यक्तीवर आरोपित आहे ती व्यक्ती महत्त्वाची आहे. राजा किंवा गोसावी यांच्याकडे लक्ष देणे म्हणजे स्वतःची फसवणूक करून घेणे आहे. व्यक्तीकडे पाहावे. राजा, गोसावी यांच्याकडे पाहू नये.

सिद्धांतात राजा कोण आणि गोसावी कोण? गोसावी म्हणजे 'जीव'. राजा म्हणजे 'शिव'. जीव घ्यावा की शिव घ्यावा? आपण जीवावर आहोत की जीवदशेवर? जीवावर की जीवपणावर? जीवावर की जीवत्वावर? जीवदशा, जीवपणा किंवा जीवत्व हे एकार्थवाचक शब्द आहेत. कारणदेह म्हणजे 'जीव'. सूक्ष्मदेह, स्थूलदेह आणि बाह्यपदार्थांच्या संबंधाने जीवाला जीवत्व प्राप्त होते.

'मी राम देशपांडे आहे' असा आपला किती ठाम निश्चय आहे? की कमी झाला चिंतने ऐकल्याने? नाम हा धर्म आहे. कोणाचा? जीवाचा? नाही. तो तर स्थूलदेहावर आरोपित धर्म आहे. साधारण माणसाला जीवाचा धर्म कुठे माहीत आहे? जीव आणि जीवपणाच आपल्याला माहीत नाही. गावाचाच तपास नाही तर गावातील घराचा तपास कसा लागणार? तर एकूण काय की स्वीकार कोणाचा करायचा हेच आपल्याला माहीत नाही.

साधकाने प्रथम जीवावर यावे. त्यानंतर शिवाकडे जाण्याचा अथवा ब्रह्म होण्याचा प्रश्न येतो. राम देशपांडे यांना ब्रह्म करून उपयोग काय? जन्मोंजन्मे स्थूल आणि सूक्ष्मदेहांना ब्रह्म करण्याचा प्रयत्न केला तरी ते जमणार नाही. स्थूल, सूक्ष्म प्रपंच ब्रह्म होणार? होतील. आपोआप होतील. पण कसे? जीवाला प्रथम ब्रह्म करण्याचा उपक्रम करावा. पुढे स्थूलप्रपंचापर्यंत सर्वच ब्रह्मरूप होण्याचा उपसंहार होईल. परंतु, जीव वेगळाच उपक्रम हाती

घेतो. दिवसरात्र धावपळ करीत राहतो. का करतो? हे नीट सांगता येत नाही. 'जग धावते' हे पाहून स्वतःपण धावतो. रात्रंदिवस काबाडकष्ट करून खरेतर काहीही उपयोग नाही. का बरे नुसतेच राबराब राबत राहावे?



स्थूल आणि सूक्ष्मदेहासह त्यांच्या धर्मांशी तादात्म्य ही 'जीवदशा' होय. आपण प्रथम जीवदशेवर असतो. तेथून पुढे जीवावर यावे. मग तेथे जीवत्व राहत नाही. स्थूल आणि सूक्ष्मदेहांच्या धर्मांकडे लक्ष असूनही राहत नाही. म्हणून जीवाचा तपास करायचा. पुढे ब्रह्मरूप झाल्यावर जीव 'जीव' राहत नाही. मग जीवावर आरोपित केलेले धर्म कसे राहतील?

हे लक्षात ठेवा की केवळ देहाचे धर्म बदलल्याने सिद्धता येत नाही. त्यातही अविवेकाने धर्म बदलल्याने खूपच कठीणता निर्माण होते. पहिले होता गृहस्थ, नंतर झाला संन्यासी. केवळ धर्म बदलल्याने जीवदशा जात नाही. पहिले होता राजा, नंतर झाला गोसावी. गोसावी–राजा, जीव–शिव यांचा स्वीकार करायचा नाही. पण तरीही सध्या आपण कुठे आहोत हे बघा. तेथून पुढे जीव व्हा. जोपर्यंत मनुष्य लबाडी करतो तोपर्यंत त्याची जीवदशा असते. लबाडी संपली की जीवावर येतो. जीव म्हणजे व्यष्टी अज्ञानावर आले पाहिजे. जागे झाल्यापासून झोपेपर्यंत व्यष्टी अज्ञानाचा विचार करावा.

पंचवीस वर्षांपूर्वी 'मी राम देशपांडे' असा तुमचा भाव दृढ होता. शास्त्र, सद्गुरू यांना शरण राहिल्यामुळे आता तो भाव तेवढा पक्का राहिला नाही. जीवत्व न घेणे म्हणजे 'स्थूल, सूक्ष्मदेह आणि त्यांचे धर्म धारण करणारा न राहणे'. स्थूल आणि सूक्ष्मदेहांचे धर्म असंख्य आहेत. एक धर्म आहे – अहंकार. काही जणांचा भाव असा असतो की 'मोडेन पण वाकणार नाही'. असे चालत नाही. अहंकार जावा. ब्राह्मण वाकला म्हणून 'ब्रह्म' झाला. म्हणून लहान व्हा. धाकटे व्हा.

प्रमाण –

**म्हणोनि थोरपण पऱ्हां सांडिजे । व्युत्पत्ती आघवी विसरिजे ।**
**जैं जगा धाकुटें होईजे । तैं जवळीक माझी ।।३७८।। अध्याय ९**

– श्रीज्ञानेश्वरी

पुढे ज्याला व्यष्टी अज्ञान कळले तो 'जीव'. व्यष्टी अज्ञानाचा निर्णय लागला पाहिजे. आपल्याला सदैव कोणाचा त्रास वाटावा? अन्न, धन, मान यांचा? शेतात काय पेरायचे, काय कापायाचे, नवऱ्याचा त्रास, पोराबाळांचा त्रास हेच सर्व घेऊन बसावे का? हा त्रास कमीअधिक प्रमाणात सर्वांनाच असतो. त्याचा एवढा विचार करीत बसू नका. व्यष्टी अज्ञानाचा त्रास वाटायला हवा.

स्थूल पदार्थांचे धर्मच आवरता येत नाहीत, तर सूक्ष्मदेहाच्या धर्मांतून आपण बाहेर पडणार केव्हा? सध्या आपल्याला रात्रंदिवस नको त्या गोष्टींची काळजी वाटते. स्थूल, सूक्ष्मदेहांसह त्यांच्या धर्मांचा विषय म्हणजे तूळ अज्ञान होय. आता परमार्थ श्रवण केला, तर

पुढे कशाची काळजी करावी? व्यष्टी अज्ञानाची काळजी करायची. इतर कोणत्याही अज्ञानाची काळजी करू नये. म्हणजे तूळ अज्ञानाची काळजी करायची नाही.


व्यष्टी अज्ञानाने 'जीव' सिद्ध होतो. आत्म्याविषयी असलेल्या अज्ञानालाच व्यष्टी अज्ञान असे म्हणतात. आपलीच आपल्याला यथार्थ ओळख नसणे म्हणजे व्यष्टी अज्ञान होय. 'स्व'चे अज्ञान म्हणजेच 'जीव'. 'मला माझेच अज्ञान आहे' याची कोणाला काळजी आहे काय? प्रत्येकाला वाटते, 'मी मला चांगल्याच प्रकारे ओळखतो' पण खरेतर तसे नाही. म्हणून प्रथम स्वतःची नीट ओळख करावी. स्वतःचे स्वतःला अज्ञान आहे, असे वाटणारा 'जीव' असतो. पण साधारणपणे कोणलाही तसे वाटत नाही. आपल्याला हे सर्व साधूसंतांनी सांगितले म्हणून कळले. त्यांनी सांगेपर्यंत तपास नव्हता. अरे! शोधलेच कुठे होते? म्हणून ज्याला अज्ञान कळले तो वारकरी श्रेष्ठ होय.

अंधारात राहिले पाहिजे असे कोणाला वाटते काय? कोणत्या स्त्रीला स्वयंपाकाचे अज्ञान आवडेल? अज्ञान कळल्यावर ते आवडत नाही. अंधळ्या माणसाला अंधारात बसवले आणि डोळस माणसाला अंधारात बसवले तर उजेडाकडे कोण पळेल? अंधळ्याला अंधार–उजेड अशी दृष्टी नाही. जगातील बहुतेक लोक अंधारात बसलेले अंधळे आहेत. त्यांच्याकडे अंधार–उजेड, ज्ञान–अज्ञान अशी दृष्टी नाही. स्थूलदेह, सूक्ष्मदेह, बाह्य पदार्थ आणि त्यांच्या धर्मांचे अज्ञान म्हणजेच तूळ अज्ञान. आत्म्याच्या अज्ञानाव्यतिरिक्त कशाचेही अज्ञान म्हणजे तूळ अज्ञान. अभियांत्रिकी, वैद्यकिय, वाणिज्य, कला, विज्ञान, गायन, वादन, व्यवस्थापन, शेतकी, कायदा इत्यादी अनेक क्षेत्रांतील पदव्या प्राप्त करण्यामागे जे लागले आहेत, ते तूळ अज्ञान घालविण्याचा प्रयत्न करीत आहेत. तूळ अज्ञान घालविण्याचा प्रयत्न करणाऱ्यांची जीवदशा कायम असते. तूळ ज्ञान कमविण्याच्या मागे लागलेला मनुष्य काय होईल सांगता येत नाही. इंजिनियर, डॉक्टर, चित्रकार, गीतकार, संगीतकार, संशोधक, व्यवस्थापक, शेतकरी, वकील, न्यायाधिश या व्यतिरिक्त नवरा, बायको, राजा, फकीर काय होईल सांगता येत नाही.

स्वरूपाचे अज्ञान म्हणजेच मूळ अज्ञान. मूळ अज्ञान कळून घेतले पाहिजे. मूळ अज्ञानासारखे कुठलेही दुःख नाही. केवळ मूळ अज्ञानच जावे असे तीव्रतेने ज्याला वाटते तो – 'जीव'. तूळ अज्ञानच जावे असे ज्याला वाटते त्याची 'जीवदशा' असते. तूळ अज्ञानाच्या चिंतेत राहू नका. स्त्रीला एखादी भाजी करता आली नाही तरी तिने चिंता करू नये. भरपूर पैसा कमवता आला नाही तरी पुरुषाने चिंता करू नये. म्हणजेच तूळ अज्ञान गेले नाही तरी चिंता करत बसू नका. शांत राहा. या विचित्र 'जीवदशे'वरून 'जीवा'वर या. 'जीव' व्हा.

'जीव' झालो याचा स्वीकार करावा की नाही? जो 'जीव' होतो त्याला कशाची ओढ असते? व्यावहारिक मनुष्य मुख्यमंत्री, पंतप्रधान होण्याची वाट पाहत असतो. त्याप्रमाणे, जीवाने काय होण्याचा प्रयत्न करावा? 'मी राम देशपांडे' यापेक्षा 'मी जीव' हे बरे. जेथे जीवाचाही स्वीकार करायचा नसतो, तेथे जीवत्वाचा स्वीकार करावा काय? जीव नाही तर मग शिव तरी स्वीकारावा का? जो जीवदशेवर आहे तो लबाड, अपवित्र आहे. लबाडी न

करणे, पवित्र असणे म्हणजे 'जीव'. जीवपदावर जो येतो त्याला दोन गोष्टींचा अधिकार येतो

– शिव होणे अथवा ब्रह्म होणे.

राजा आणि गोसावी यांचा स्वीकार करणे योग्य नाही. राजा आणि गोसावी ज्याच्यावर आरोपित आहे ती व्यक्ती मुख्य आहे. व्यक्तीचा स्वीकार केला पाहिजे. तर जीवत्व सोडून जीव व्हा. नंतर जीवाचा स्वीकार करायचा नाही. पुढे शिवही व्हायचे नाही. तेथे काही खरे नाही. गावाचा सरपंच कदाचित् पुढे महापौर होईल. पुढे मुख्यमंत्री, नंतर पंतप्रधान बनेल. पण पंतप्रधान पदावर पाच वर्षच राहता येते. राजा अथवा इंद्र झाला तर ऐश्वर्य उपभोगता येते. तुम्हाला इंद्र होणे आवडेल की नाही? विष्णू किंवा शंकर होणे आवडेल? खरं सांगा. तुम्ही असे म्हणाल – महाराज समोर बसले आहेत म्हणून 'नाही' म्हटले पाहिजे. महाराज नसतील तर? शिवपद जर नको असेल तर मग स्वर्ग पाहिजे काय? अरे! त्याच्या पाठीमागे लागू नका. कारण हे सर्व भोगल्यानंतर पुन्हा अधोगतीला जावे लागणार आहे.

प्रमाण –

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ।।२१।। अध्याय ९**
**– श्रीमद्भगवद्गीता**

हेच अंगी बाणवावे. याला वैराग्य असे म्हणतात. स्वर्गाच्या सुखाचाही नाश आहे म्हणून स्वर्गसुखही नको. कारण त्यामुळे 'स्व' विषयी असलेले अज्ञान जात नाही. आपण मर्त्यलोकांच्या सुखाला भूललो आहोत तर स्वर्गसुखाला भुलणार नाही का? आपल्याला महागडे, भरजरी कपडे घालायची हौस, घरात चांगले फर्निचर हवेच. अशा अनेक जड वस्तूनींच जर आपल्याला अडकविले आहे, तर मग मूर्ख माणसांनी आपल्याला भुलवले यात नवल ते काय? जड वस्तूत जीव एवढा गुंततो की समजा एखाद्या स्त्रीने दुसऱ्या स्त्रीला साडी दिली, तर 'मी तिला साडी दिली' हे तिच्या मनातून निघतच नाही. काही स्त्रियांना सोन्याच्या दागिन्यांची भारी हौस असते. लग्न समारंभासारख्या कार्यक्रमांना जाताना कोणाकडूनतरी दागिने उसने घेऊन त्या कार्यक्रमांना जातात. कोणी दागिन्यांचे कौतुक केले, तर म्हणतात 'माझ्याच बांगड्या आहेत'. वारकरी स्त्रियांचीसुद्धा हीच अवस्था पाहून फार वाईट वाटते. अरे! आपल्यासाठी आपल्यासमोर भगवान श्रीतुकाराम महाराजांचे चरित्र आहे. नीट पहा ते कसे राहिले. संसारातील पदार्थांत ते रमले नाहीत. म्हणून संसारात ते मेले नाहीत. आपण संसारात रमतो, म्हणून संसारात मरतो. मग परत जन्म. जन्मा, मग परत मरा. आपण काय घेऊन मरणार? मान, संपत्ती? अरे! ते तर खालीच राहतील. अनात्म पदार्थांचे संस्कार घेऊन आपण मरणार आहोत. ते संस्कार आपल्याला संसारचक्रात पुनः पुनः फिरविण्यास कारणीभूत होतील. आता तरी सावध व्हा. भगवंताला शरण जा. मरण येण्याच्या आतच हे करा. खरेतर आपल्याकडे अजीबात वेळ नाही. परंतु, 'पुढील वीस–चाळीस वर्षांत मला

काहीच होणार नाही' असे सर्वांना वाटते. पण तसे नाही. कधीही काहीही होऊ शकते हे लक्षात घ्या. काळ हा आपला ग्रास घेण्यासाठी फणा काढून उभाच आहे.



प्रमाण –

घडिघडी काळ वाट याची पाहे । अजुनि किती आहे अवकाश ।।

– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

असो! तर आपण अज्ञानी आहोत की नाही, हा विचार कोणालाही नाही. जीव आणि शिव यांच्यात काय त्यागायचे आणि काय स्वीकारायचे याचा विचार नाही. त्यागाचे वर्म चुकले तर फेरा पडतो. स्वर्गाचा त्याग केला, पण स्वर्गाच्या संस्काराचे ओझे तर शिल्लक आहे. मग पुनरावृत्ती निश्चित होईलच.

प्रमाण –

चुकलिया त्यागाचें वेंझे । केला सर्वत्यागुही होय वोझें।
न देखती सर्वत्र दुजें । वीतराग ते ।।१३४।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

साधूसंतांच्या बोलण्याप्रमाणे ऐकले, कळले, आचरणात आले, तरच आपण तरणार आहोत. 'स्व' अज्ञान जाणा. पुढे आपल्याला ब्रह्म व्हायचे आहे. बाकी काहीही व्हायचे नाही. काहीही झालो नाही, तरच आपण अवघाच असलेले ब्रह्म होऊ.

प्रमाण –

यालागीं मौनेंचि बोलिजे । कांहीं नहोनि सर्व होईजे ।
नव्हतां लाहिजे । कांहींच नाही ।।३३।।

– श्रीचांगदेव पासष्टी

अवघा म्हणजेच ब्रह्म. तुम्हांला अवघा व्हायचे की आणखी काही व्हायचे आहे? नवरा, बायको इत्यादी बाकी काहीही झाले तर वाटोळे होत राहते. जीव राहायचे नाही, शिव व्हायचे नाही. या दोघांचे धर्म विरुद्ध आहेत. दोघांच्याही धर्मांचा त्याग करायचा. कर्ता राहायचे नाही, अकर्ता व्हायचे नाही. सध्या आपण स्वतःला कर्ता समजतो. आपण कर्ता आहोत काय? आपण दुसऱ्याचे करणे स्वतःवर घेऊन कर्ते झालो आणि पुढे त्याचाही आपल्याला विसर पडला. स्वतःला देह समजून, देहच कर्ता हे दृढ झाले. कोण करते हेही आपल्याला धड माहीत नाही.

प्रमाण –



तैसी शुभाशुभें कर्में । जियें निपजती प्रकृतिधर्में ।
तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ।।१७८।। अध्याय ३
– श्रीज्ञानेश्वरी

आपल्याला प्रकृती माहीत नाही व तिचे धर्मही माहीत नाहीत. दुसऱ्याचे ओझे डोक्यावर घेऊन आपण फक्त काहीतरी करीत आहोत. लोक वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये काही ना काही करीत राहतात. कर्तेपणा बरा वाटतो. तुम्हीही कर्तेपण मिरवा आणि महाराजही मिरवतील. मग आता सगळे मिळून 'अवघे धरू बुडणे', असा आपला परमार्थ चालेल. अरे! हा बुडण्याचा की तरण्याचा विषय आहे? तरण्यासाठी महावाक्याची यथार्थ ओळख पाहिजे.

जीव आणि जीवपणा यांचा त्याग केल्यानंतर काय स्वीकारायचे हे ठरविले पाहिजे. समजा एक भिकारी भीक मागत आहे. त्याची झोळी पूर्णपणे नको त्या पदार्थांनी भरली आहे. मग आपण भीक कुठे वाढावी? त्याला सांगावे प्रथम झोळी खाली कर, तरच काहीतरी वाढता येईल. असलेल्या नको त्या गोष्टींचा त्याग केला, तरच योग्य त्या पदार्थांचा स्वीकार करता येईल. ज्याचा स्वीकार करायला पाहिजे होता तो केला नाही. भलतेच स्वीकारून बसलात. हा विचार पूर्वी का केला नाही? आता तरी झोळी रिकामी करा. भलतंच झोळीत भरून ठेवलंय. नव्हे झोळी ओसंडून वाहत आहे. त्याग कधी करणार? त्याग केल्याशिवाय स्वीकार करता येणार नाही. आपली झोळी स्वच्छ आणि तयार ठेवा.

त्यागामध्ये मूळ अज्ञानाचा त्याग हा सर्वश्रेष्ठ आहे. प्रथम त्याग करा. जो त्याग करेल त्यालाच पुढील वर्म कळेल. आपली झोळी नको त्या पदार्थांनी काठोकाठ भरली आहे. म्हणून, योग्य ते प्राप्त होत नाही. प्रथम झोळी रिकामी करा. जे काही तुम्ही कवटाळलेले आहे ते कुठे टाकावे हा तुमचा प्रश्न आहे. परमार्थ करताना संसारिक विषय बोलत बसू नये. गप्प बसून राहावे. पुढील काम आपोमत होते.

प्रमाण –

हरि बोला हरि बोला नाहीं तरी अबोला । व्यर्थ गलबला करूं नका ।।
– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

आपण विरक्त व्हावे. पुढील विषय आपोआप सुटतो. त्यागाशिवाय गत्यंतर नाही. पण त्याग कशाचा करावा? कसा करावा? 'संसारात न रमणे' हाच त्याग परमार्थात फार उपयोगाला येतो. समजा, महाराजांच्या चिंतनात रमले नाही, तर चिंतनाचा त्याग सहजच होतो. त्याप्रमाणे, संसारात रमायचे नाही. म्हणून त्यागणे म्हणजे न रमणे.

आपल्या जवळचे भौतिक पदार्थ जातील अशी मनुष्याला सदैव भीती असते. भिकाऱ्याला भीती नसते. वैराग्यवान व्यक्ती म्हणजेच परमार्थातील भिकारी. म्हणून असे

भिकारी व्हा. हा सर्वांसाठी साधूसंतांचा आशीर्वाद आहे.



तर, भाग-त्याग लक्षणा अवगत करून काय त्यागावे आणि काय स्वीकारावे हे जाणावे लागेल. अन्यथा शाब्दिक ज्ञान राहिल. परमार्थ अनुभवात येणार नाही. 'असि' म्हणजे 'ब्रह्म'. ज्याला असि पर्यंत जायचे आहे त्याने जहताजहती लक्षणा महावाक्याला यथार्थपणे लावावी. जो जीव 'जीव' न राहता 'ब्रह्म' होण्याचा विचार करतो, त्याला यम नेणार नाही. यमदूत आला तर त्याला दृढपणे सांगा, 'माझी भाग-त्याग लक्षणा पूर्ण झाल्याशिवाय येऊ नकोस'. लक्षात ठेवा हे सांगणे ऐन वेळेस विसरायचे नाही. याच विषयाचा विसर पडू नये, म्हणून हा अभ्यास न करणाऱ्या कोणालाही घरात घ्यायचे नाही. आपण त्यांच्या जवळ जायचे नाही. गरजच पडली, तर आपल्या विरुद्ध असलेल्या पोराबाळांना हाकला. पण परमार्थ करा. जमेल का ? वेळ घालवू नका. 'ब्रह्म' आहे हे कळून घ्यायचे आहे.

*****

## चिंतन क्रमांक ३९
## जहताजहती लक्षणा – ३

जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास करीत आहोत. आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा लक्ष्यार्थ शोधत आहोत. त्यासाठी जहती, अजहती या लक्षणांचा अभ्यास पूर्वी केला. आता महावाक्याचा अभ्यास जहताजहती लक्षणेने करीत आहोत. आपल्याला त्याग कशाचा आणि स्वीकार कशाचा करायचा हे कळले पाहिजे.

एक उदाहरण पाहू. साळी भातासाठी उपयोगात येतात. साळींमध्ये तांदूळ असतात. साळी भरडण्याच्या यंत्रात साळी घालून भुसा आणि तांदूळ वेगळे केले जातात. पूर्वी साळी आणि तांदूळ एकत्र होते. भरडल्यानंतर किंवा भरडतानाच उफणण्याची प्रक्रिया केली जाते. वाऱ्यासोबत भुसा उडून बाजूला पडतो. भुसा आणि तांदूळ यांपैकी मनुष्य भुश्याचा त्याग करतो आणि तांदूळाचा स्वीकार करून भात शिजवतो. त्याचप्रमाणे, जहताजहती लक्षणेत काही त्यागायचे असते व काही स्वीकारायचे असते.

प्रमाण –

**कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट ।**
**तेथ उडे तें फलकट । जाणों आलें ।।१३०।। अध्याय २**

– श्रीज्ञानेश्वरी

साळी–तांदूळाचा दृष्टांत हा राजा–गोसाव्याच्या दृष्टांतापेक्षा समजण्यास सोपा आहे. 'तो हा राजा'. भूतकाळातील राजा आणि वर्तमानकाळातील गोसावी–फकीर. या दृष्टांतात त्याग कोणाचा करायचा हे सांगणे कठीण आहे. परंतु, साळी–तांदूळ दृष्टांतात वेगळे करून काय स्वीकारायचे आणि काय त्यागायचे हे सांगणे सोपे आहे. तांदूळ आणि त्यावरचे आवरण एवढेच या दृष्टांतात आहे.

'तत्त्वमसि' महावाक्याला जहताजहती लक्षणा कशी वापरायची? एका शब्दाला, दोन शब्दांना की तीन्ही शब्दांना ही लक्षणा वापरायची? राजा–गोसाव्याच्या दृष्टांतात राजा हा 'तत्' आणि गोसावी हा 'त्वम्'. 'तत्' घ्यावा की 'त्वम्' घ्यावा. राजा आणि गोसावी या दोघांचाही स्वीकार करता येत नाही. व्यक्तीकडे दृष्टी जाणे महत्त्वाचे आहे. राजा आणि गोसावी यांमधील काही गोष्टी बदलत नाहीत. जसे डोळे, हात, पाय इत्यादी लक्षणे न बदलल्याने व्यक्ती ओळखता येईल. केवळ राजाचा विचार केला किंवा केवळ गोसाव्याचा विचार केला तर बरोबर ओळख होणार नाही. त्याप्रमाणेच 'तत्'चा आणि 'त्वम्'चा सोबतच

विचार करावा लागेल. राजा आणि गोसावी यांची जी लक्षणे जुळत नाहीत त्यांचा त्याग करावा.

राजाचे भरजरी कपडे, मुकुट, ऐश्वर्य इत्यादींचा त्याग करावा. त्याचप्रमाणे, गोसाव्याचे फाटके कपडे, दाढी, जटा, गरीबी इत्यादींचा त्याग करावाच लागेल. राजा आणि गोसावी यांच्या काही गोष्टी समान आहेत. ते त्यांचे स्वरूप आहे. या ठिकाणी आरोपित गोष्टींकडे लक्ष न देता, शरीराकडे लक्ष असेल तर 'तो राजा हाच गोसावी' किंवा 'हा गोसावी तोच राजा' हे बरोबर जुळते. या ठिकाणी आरोपित गोष्टींचा त्याग आणि मूळ स्वरूपाचा स्वीकार आहे.

प्रमाण –

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।।६६।। अध्याय १८

– श्रीमद्भगवद्गीता

या ठिकाणी 'सर्व धर्मान् परित्यज्य' हा 'त्याग' आणि 'मामेकं शरणं व्रज' हा 'स्वीकार' आहे. 'तत्' आणि 'त्वम्'मध्ये कशाचा त्याग आणि कशाचा स्वीकार केला पाहिजे? आरोपित धर्मांचा त्याग आणि मूळ स्वरूपाचा स्वीकार करायला हवा. तर मग 'तत् त्वम् असि' किंवा 'त्वम् तत् असि' हे बरोबर जुळते. हे केवळ जहताजहती लक्षणेनेच जुळते, म्हणून या लक्षणेचा उपयोग करावा. 'तत्'चे मूळ स्वरूप काय आहे? 'त्वम्'चे मूळ स्वरूप सांगा? एक तर राजाचे मूळ स्वरूप शोधा किंवा गोसाव्याचे मूळ स्वरूप शोधा. ते एकच असले पाहिजे. तरच दोघांची एकी होईल. केवळ 'त्वम्'चे मूळ स्वरूप शोधा. 'तत्'च्या भानगडीत पडले नाही तरी चालेल. 'त्वम्' म्हणजे कोण? 'मी', 'अहम्', 'स्व', 'आपण'. स्वतःच्या लक्षणांचा स्वीकार आणि दुसऱ्यांच्या लक्षणांचा त्याग करायला पाहिजे. नाहीतर, भगवान श्रीज्ञानेश्वरांनी श्रीज्ञानेश्वरीत म्हटल्याप्रमाणे **'पुढिलांचे ओझे'** वाहण्याचा प्रकार होतो. सध्या आपण आपल्यालाच ओळखत नाही, म्हणून आनंदात आहोत. कारण अज्ञानातही आनंद असतो. नाही का? पण हे लक्षात घ्या की स्वतःला न ओळखणे म्हणजे चक्रात अडकणे आहे. पुन्हा पुन्हा चक्रात अडकणे हे चांगले नव्हे.

आपण सदैव खऱ्या स्वतःला लपवित राहतो. आपण स्वतःला स्वतःपासून लपवितो, अधिक दुसऱ्यापासूनही लपवितो. व्यवहारात पारदर्शकपणे आपण इतरांना 'मी असा आहे' असे सांगतो का? बरे! आपण सर्वांसमोर पारदर्शक न राहिलो तरी एकवेळ ठीक आहे, पण श्रीगुरू, शास्त्र, ईश्वर यांच्यापासून काहीही लपवू नये. जे काही चांगले–वाईट आहे ते त्यांच्यासमोर ओकावे. व्यवहारात आपण म्हणतच असतो, 'ही गोष्ट कोणाला सांगू नको. याला सांगू नको, त्यालाही सांगू नको'. म्हणजे आपले पितळ उघड करीत नाही. ही सवय अनेक जन्मांपासून जडलेली आहे. त्याच व्यावहारिक स्वार्थाचा आपण परमार्थातही वापर करतो. आपणच आपले स्वरूप लोपवल्यासारखे करतो. आपण आपले स्वरूप लपविले हाच मोठा भ्रम आहे. आपण बहुजन्मांपासून स्वतःला उत्तरोत्तर जन्मांत पुन्हा पुन्हा लपविले. जसे

की एखाद्या खोलीत स्वतःलाच बंद करावे व एकावर एक अनेक कुलूपे लावावी आणि चावी

समुद्रात फेकून द्यावी. स्वतःच्याच ओळखीची चावी या संसार समुद्रात आपण हरवून बसलो. आता चावी कधी शोधणार? कुलूपे कधी उघडणार? अशाप्रकारे सर्वांनीच एकावर एक अनेक आवरणे चढवली आहेत. ती काढली पाहिजेत. साधक श्रीगुरू, शास्त्र आणि ईश्वर यांच्या समोर दिगंबर झाला पाहिजे. तो पूर्णतः दिगंबर झाल्यावर त्याचेच खरे स्वरूप त्यालाच उघडे होईल.

बायको खरी कशी आहे हे नवऱ्याला माहीत नसते. नवरा खरा कसा आहे हे बायकोला माहीत नसते. ते दोघेही एकमेकांना एकमेकांपासून वेगवेगळ्या पातळीवर लपवित राहतात. अशा लपवालपविनेच जग जगले आहे. प्रत्येकानेच स्वतःची सगळी खरी लक्षणे लपविली आहेत. प्रत्येकाला स्वतःच्या काही गोष्टी केवळ स्वतःलाच माहीत असतात. त्यामुळे नकळतपणे आतमध्ये एक प्रकारचे दडपण तयार होते. म्हणजेच एक प्रकारचे आवरण तयार होते. त्याने आपण गाडले जातो. लपविलेली गोष्ट उघड होऊ नये म्हणून न उघडण्यासाठी धडपड सुरू होते. मग परमार्थ तर लांबच राहतो. खरंच सांगा मनातले, हृदयातले आपण दुसऱ्यांना सांगतो का? हे मान्य आहे की व्यवहारात सगळेच विषय सगळ्यांनाच सांगू नयेत. पण श्रीगुरूंपासून काहीही लपवू नये आणि जर लपविले गेलेच, तर ते आपल्या लबाडीमुळेच लपविले जाते. यामुळेच परमार्थाचा गुप्त विषय नीट कळत नाही. मग पटणे, वृत्तीवर बाणणे, आचरणात आणणे तर खूपच लांब राहिले.

'त्वम्'चे स्वरूप नीट लक्षात यावे असे वाटत असेल, तर अशाप्रकारे आवरणं चढविण्याचे नाटक बंद करा. नाटकात एखादा नट बहुरूपीची भूमिका करतो. पण तो नट घरी गेल्यावर बहुरूपी राहत नाही. तिथे तरी त्याने बहुरूप्याचे ढोंग करू नये. त्याचप्रमाणे, जोपर्यंत आपण परमार्थात पोहोचत नाही तोपर्यंत आपण बहुरूपी आहोत. श्रीगुरू आपले माय-बाप. त्यांच्याकडे गेल्यावर बहुरूप्याचा वेष सोडावा. मग ते आपल्याला बहुरूपाहून एकरूपावर आणतात. त्यांच्या आणि आपल्या निजधामाला ते आपल्याला घेऊन जातात. त्यांच्या स्वरूपाशी एकरूप होणे हेच आपले निजधाम आहे. कारण सद्गुरू साक्षात परब्रह्मस्वरूप असतात.

मी लहान असताना एकदा पाहिले की एका दुकानात एक पोलीस काठी घेऊन दुकानदाराला दम देत होता. दुकानदाराने त्याला पाच रूपये दिले. मी पोलीसाला घाबरून लपून बसलो. नंतर मला कळले की तो बहुरूपी होता. मग मी हसू लागलो. माझे मलाच हसू येऊ लागले, अधिक बहुरूप्याच्या बहुरूपावरही मला हसू येऊ लागले. त्याप्रमाणेच, भगवंताचे खरे रूप न कळल्याने भगवंताच्या बहुरूपावर दृष्टी गेली, तर फारच दुःख होते व त्याच भगवंताचे एकरूप लक्षात आले तर महासुख होते. एकदा का एकरूप लक्षात आले की मग बहुरूप पाहूनही सुखच होते. हाच परमार्थाचा शेवट आहे.

प्रमाण –



अनंतवेषें अनंतरूपें देखिलें म्यां त्यासी ।
बापरखुमादेविवर खूण बाणली कैसी ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

तर, एकत्वाचा बोध लक्षात न घेता, संसारात सुख ठेवले आहे, अशा चुकीच्या समजूतीने मनुष्याने बहुरूप्याचा वेषच दृढ केला आहे. प्रत्येकाला स्थूलप्रपंचासह स्थूलदेहामध्ये सुख वाटते. सूक्ष्मदेहामध्ये सुख वाटते. हुशार झाला तर कारणदेहामध्ये सुख वाटते. ते सुख स्वरूपाच्या सुखासारखे आहे. पण, स्वरूपसुख नाही. हे सुखाचे फसवे रूप आहे. देहात, घरादारात, बाह्य पदार्थांत सुख वाटते. हे सर्व बहुरूप आहे. असे बहुरूप का निर्माण केले? खऱ्या सुखाला लपविण्यासाठी. बहुरूपाचा वापर स्वरूप लपविण्यासाठी केला. बहुरूप काढले तर जीव सुखरूप होईल. घरादारात सुख नाही हे माहीत होते. जीव दुसऱ्याला फसवायला गेला, पण स्वतःच फसला. पुढे स्वरूपच कळेना, बहुरूपच खरे मानू लागला.

तुमच्या मनात काय चालले आहे हे कोणाला कळायला पाहिजे? स्वतःलाच कळावे. ज्याला स्वतःच्या मनातले नीट कळत नाही तो भ्रमिष्ट. ज्याला स्वतःचा कारणदेह म्हणजे जीव कोठे आहे हे कळत नाही तो महाभ्रमिष्ट. कशाचा त्याग करावा? ज्या ज्या गोष्टींमुळे आपण झाकले गेलो त्या त्या गोष्टींचा त्याग करावा. करणार कसा? हे बघा! स्थूलदेह कोणाचा? पंचीकृतपंचमहाभूतांचा. मग कशाला म्हणतो की 'माझा आहे'? श्रीमंत मित्राची गाडी घेऊन गरीब मित्र फिरतो. गरीब मित्राला गाडीबद्दल कोणी विचारले, तर तो म्हणतो, 'माझीच आहे'. कशाला खोटेपणा करायचा? रोजच दुसऱ्याची वस्तू वापरली तर 'माझीच आहे' असा भ्रम होतो. भाड्याच्या घरात राहणारे कालांतराने ते घर 'माझेच आहे' म्हणून जगू लागतात. प्रसंगी कोर्टकचेरी पर्यंत मजल जाते. लग्नात स्त्री दुसऱ्याचे दागिने घालून जाते हेही तसेच आहे. आता पहा, हा शर्ट कोणाचा? माझा म्हणून घातला आणि झाकला गेलो. 'हा देह माझा' असे म्हणू नका. तोंडाने नाही, मनाने नाही, जीवाने म्हणा की 'हा देह माझा नाही'. कोणी म्हणणे योग्य आहे? जीवात्म्याने म्हणावे. जीवात्म्याने असे म्हटले तर तो उघडाच होतो. मग आवरणच राहत नाही.

तुम्ही सुखी आहात की दुःखी आहात? कोणी तुम्हांला शिकविले का, 'सुख–दुःख तुमचे आहेत'? सुख–दुःख कोणाचे धर्म आहेत? ते अंतःकरणाचे धर्म आहेत. आपण त्याच्याशी तादात्म्य पावतो आणि म्हणतो 'मी सुखी आहे, दुःखी आहे'. मग सुख–दुःख होणारच. धक्के बसणारच. देह असेपर्यंत अंतःकरण असते, तरीपण 'त्यांचे धर्म माझे नाहीत' असा ठाम निश्चय करायला शिकले पाहिजे.

परमार्थ श्रवण करण्यासाठी, कळण्यासाठी आणि पटण्यासाठी स्वतःचा अधिकार लागतो. वृत्तीवर बाणण्यासाठी व अनुभवात येण्यासाठी श्रीगुरूंची कृपा लागते. सुख–दुःख

अंतःकरणाचे धर्म आहेत, पण सुख-दुःख आपणाला होतात असे वाटते. समजा, गाडीमध्ये

बसलो आहोत आणि गाडीचे एक चाक एका दगडावरून गेले, तर 'गाडी दगडावरून गेली' असे म्हणतो. 'मी दगडावरून गेलो' असे म्हणत नाही. त्याचा झटका आपल्याला जाणवतो. पण चाकाला त्याचा खरा भोग होतो. आपणाला नाममात्र भोग होतो. शरीर गाडीसारखे. त्याच्याशी आपला संसर्ग असतो, तादात्म्य नसते. पण तादात्म्यच वाटते ही फारच वाईट बाब आहे.

दही घुसळल्याने पुढे त्याचे ताक आणि लोणी होते. दही असताना दोघांचे तादात्म्य असते. नंतर घुसळल्याने दोघांचे तादात्म्य तुटते आणि संसर्ग राहतो. त्याचप्रमाणे, विचारमंथनाने तादात्म्य घालवा. संसर्ग राहू दिला तरी चालतो.

सुख-दुःख इत्यादी धर्म कशामुळे तयार झाले? पूर्वकर्मांनुसार. ती कर्मे कुठून आलीत? क्रियेतून कर्म. क्रिया कशी घडली? त्याची पाच कारणे आहेत. देह, इंद्रिये, इंद्रियांच्या देवता, दहा प्राण आणि जीव.

प्रमाण -

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ।।१४।। अध्याय १८
– श्रीमद्भगवद्गीता

तुम्ही या कारणांत आहात का? याचा नीट शोध घ्या. या कारणात जीव हे एक कारण आहे. जीव का तयार झाला? अज्ञानामुळे. अज्ञान का तयार झाले? स्वतःवरच पांघरूण घातल्यामुळे. 'स्व'चे न जाणणे 'स्व'नेच स्वीकारल्यामुळे. आपणच आपले अज्ञान मानले. प्रत्यक्षात आपण आत्मा असताना देखील 'मी अज्ञानी आहे, मीच मला ओळखत नाही' असे म्हणत होतो. हेच अजब आहे. पुढे मी नवरा, बायको, चांगला, वाईट इत्यादी रूपाने स्वतःला ओळखण्याचा विपरीतपणा आपण स्वीकारला आणि अनंत जन्म अनेक शरीरात फिरत राहिलो.

'मीच मला ओळखत नाही' हे 'माझा बाप ब्रह्मचारी आहे' असे म्हणण्यासारखे आहे, याला वदतोव्याघात दोष असे म्हणतात. म्हणजे स्वतःच स्वतःच्या बोलण्याचे खंडन (घात) करणे. 'आपणच आपल्याला ओळखत नाही' असे होणे शक्य आहे काय? नाही. पण, लोकांना विचारले 'तुम्ही कोण आहात?', तर ते म्हणतात – 'मी स्त्री आहे', 'मी पुरुष आहे'. म्हणजेच आपण ज्ञानरूप 'स्व'चे अज्ञान मानले व भलत्याच 'मी'चा स्वीकार केला. 'स्व' म्हणजे 'मी'. 'स्त्री', 'पुरुष' इत्यादी आरोपित धर्मांसह आपल्याकडे हा 'मी' आहे. नुसता 'मी' आहे की कशाच्या 'सहित' आहे? 'सहित' असेल तर सहित पदार्थांचा त्याग करणे गरजेचे आहे.

प्रमाण –



**अर्जुनपण न घेता । मीं ऐसें जें पांडुसुता ।**
**उठतसे तें तत्त्वता । तयाचें रूप ।।१३१५।। अध्याय १८**

– श्रीज्ञानेश्वरी

आपापल्या धर्मांसह चार देह म्हणजे अर्जुन होय. ते अर्जुनपण न घेता 'मी'चा स्वीकार करायला हवा. जहताजहती लक्षणेच्या दृष्टांतात आपण राजा व गोसावी या दोघांचाही स्वीकार केला नाही. तर, त्या दोघांचेही अधिष्ठान शरीर शोधले. त्याचप्रमाणे, सिद्धांतात, 'मी'च्या सोबत काहीतरी असावे असे वाटते, तोपर्यंत हा शोध होणार नाही. सर्वांनाच शरीराशी एकरूप, बायको–पोरांच्या सोबत, धनसंपत्तीच्या सहित राहणेच फार आवडते. परत म्हणतात, 'इतक्या वर्षांपासून आम्ही श्रवण करत आलो आहे, काहीही प्राप्त होत नाही'. गोतावळ्यासोबतच असावे असे वाटते. मग कसे काय काही प्राप्त होईल ? तर मग सांगा बरे! अरे! तू स्वतःहून दूर झाला नाहीस, तर यम गोतावळ्यापासून दूर करील. स्थूलदेह आणि गोतावळा येथपर्यंत यम सर्वांचा गुरू आहे. सर्व जगत् त्याचेच शिष्य होणार आहेत. इच्छा असोत वा नसोत. पण, खऱ्या सद्गुरूचे शिष्य होणार नाहीत. श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ श्रीगुरू चार देहांसकट सर्व गोतावळा अत्यंताभावरूप ठरवतात.

बंधू, मित्र, आई, बाप, पोरं हेच साधकांचे मोठे आवरण झाले आहे. अशा साधकांचा त्यांच्या दृष्टीने त्यांचा गोतावळा कुठपर्यंत ? स्थूलदेहापर्यंतच. पण खऱ्या साधकासाठी गोतावळा कुठपर्यंत ? बाह्यपदार्थ, नातलग तर आहेतच, पुढे यांच्यापासून ते अज्ञान आणि त्याच्या सापेक्ष ज्ञानापर्यंत सर्व गोतावळाच आहे. पण एवढा विचार कोण करतो ? कोण एवढा शहाणा आहे ? आपणच आपले वाटोळे करून घेतले. आपल्याला स्थूल प्रपंच हा स्थूलदेहापुरताच मर्यादित असावा. परंतु, तसे होत नाही. सांगा पाहू! निघेल का संपत्तीतला, पोरातला जीव ? आपला जीव आपणच अडकवून घेतला आहे. या सर्वच गोतावळ्याला जीवात्म्यापर्यंत आणू नका. स्थूलापर्यंतच ठेवा. तसे तुम्ही केलेच, तर मग, बायको, पोरे म्हणतील, 'तुमचा आमच्यात जीवच नाही, तुम्ही आमच्याकडे लक्षच देत नाहीत'. ते वाटोळे करण्याचा प्रयत्न करतात. आपला जीव स्थूल, सूक्ष्म प्रपंचात गुंतवून चक्रात फिरवू पाहतात. आपण फसायचे नाही. आपण कोणाचा पोरगा, नवरा, बायको नाही. असलाच तर देह नवरा आहे. 'जीव' नवरा नाही. 'मी' नवरा नाही. गोतावळ्याला 'मी' सोबत चिकटवणे संपवावे आणि 'मी'ला गोतावळ्यासोबत चिकटवणे संपवावे. सुरुवात कशी करावी ? प्रथम बाह्य पदार्थ आणि नातलगरूपी आवरण काढावे. नंतर स्थूलदेहाचे आवरण काढावे. म्हणजे सूक्ष्माचा विचार करता येईल.

पुढच्या चिंतनाला येण्याच्या आधी स्थूल प्रपंचाचा त्याग करून या. तेव्हा तुम्ही नवरा, बायको, श्रीमंत, गरीब इत्यादी नसणार. खरे तर ऐकण्याचा, ग्रहण करण्याचा अधिकार अशाच श्रोत्यांचा आहे. जहताजहती लक्षणेत काही गोष्टींचा त्याग आणि काही गोष्टींचा

स्वीकार करायचा असतो. स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन प्रकारचा त्याग असतो.

स्थूलरूपाने त्याग म्हणजे जंगलात, गुहेत जाणे. त्यानंतर, मनाने त्याग. नंतर, जीवाने त्याग. तुम्हांला कोणता त्याग जमेल ? जीवाने त्याग करणे श्रेष्ठ आहे. पण, तो अवघड आहे. त्या खालोखाल मनाने त्याग करणे सोपे आहे.

खरेतर स्थूलाने त्याग सर्वात सोपा. पण, तोच अवघड वाटतो. तर, मग जीवाने त्याग कधी व्हायचा ? मनाने त्याग हा मधला त्याग. जीवात्म्याने मनाला शिकवावे, 'गोतावळा तुझा नाही'. पुढे जीवात्म्याने स्वतःला विचारावे, 'गोतावळा तुझा तरी आहे काय ?' 'स्थूल, सूक्ष्म प्रपंच हा गोतावळा माझा नाही', असे म्हटले की आपण जीव ठरतो. देहधर्मांशी असलेल्या तादात्म्याला 'अर्जुनपण' म्हणतात. 'अर्जुनपण' घेऊ नका आणि 'मी'चा स्वीकार करा. अशी जहताजहती लक्षणा वापरायची आहे, हे लक्षात ठेवा.

*****

## चिंतन क्रमांक ४०
## जहताजहती लक्षणा – ४

'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने सुरू आहे. काही दिवसांपासून आपण 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा अभ्यास लक्षणा वापरून करीत आहोत. पूर्वी जहती लक्षणा आणि अजहती लक्षणांचा वापर महावाक्यासाठी केला. सध्या जहताजहती लक्षणेने विचार सुरू आहे. या लक्षणेला भाग-त्याग लक्षणा असेही म्हणतात. या लक्षणेशी संबंधीत दोन दृष्टांत, राजा-गोसावी आणि साळी-तांदूळ आपण पाहत आहोत.

साळी-तांदूळ या दृष्टांतात काय करावे? संपूर्ण साळी टाकून द्यावी? साळी म्हणजे तांदूळ आहे. पण, तांदूळ म्हणजे साळी नाही. त्याचप्रमाणे, जगत् म्हणजे ब्रह्मच आहे. पण, ब्रह्म म्हणजे जगत् नाही. साळी भरडण्यासाठी गिरणी असते. त्यात साळी टाकली की भुसा आणि तांदूळ वेगळे होतात. भुसा उपयोगात येतो. उदाहरणार्थ – जनावरांना खाद्य म्हणून. जनावरे मनुष्याच्या कामाला येतात. जनावरे भुसा खातात आणि मनुष्याची कामे करतात. मनुष्य तांदूळ खातो. पशू आपले का ऐकतात? ते पशूपक्षी का ठरले? मनुष्य जनावरांना त्यांच्यासाठी जे योग्य अन्न आहे ते देतो. उदाहरणार्थ – भुसा. म्हणून, ते मनुष्याची कामे करतात. शिजवलेला तांदूळ, नीट भात करून, जर जनावरांना खायला दिला, तर जनावरे मनुष्याची कामे करणार नाहीत. चटणी, पापड, भाजी, पोळी जनावरांना रोजच खायला दिली, तर ती जनावरे मनुष्यांची कामे करणार नाहीत. आपले पोट भरल्यावर जे अन्न शिल्लक राहते, ते किंवा शिळे अन्न मनुष्याने जर कुत्र्याला खायला दिले, तर तो घरात पलंगावर झोपणार नाही. दारातच राहिल. रक्षण करेल. उंबरठा ओलांडणार नाही. काही लोक कुत्र्याचे नको तेवढे लाड करतात. स्वतः जे ताजे अन्न खातात तेच कुत्र्याला देतात. एकवेळ माणसाला देणार नाहीत, भिक्षेला आलेल्या साधूला देणार नाहीत, भिकाऱ्याला देणार नाहीत, पण कुत्र्याला देतील. असा कुत्रा त्याच्या मालकासोबत त्याच्या गाडीतून फिरतो. मालकाच्या पलंगावर लोळतो. रक्षण करण्याऐवजी नुसता भुंकतो. इतका विचित्रपणा जगात दिसतो.

आता समजा, भुसा माणसाने खाल्ला, तर माणूस मरणार नाही. पण काय होईल? असा मनुष्य नांगर ओढेल, असे आपोआपच होईल. हा असा आहाराचा परिणाम फार मोठा आहे. जसे अन्न खाऊ तसेच स्थूल, सूक्ष्मशरीर बनते. शरीर तसेच कार्य करते. भुसा सार आहे की असार? तांदूळ सार आहे की असार? स्वतः सार खाता. जनावरांना असार भुसा देता. जनावरांच्या दृष्टीने भुसा सार आहे. आपल्या दृष्टीने जनावरे असार खातात. जनावरांच्या दृष्टीने आपण असार खातो. कोण बरोबर आहे? दोघेही आपापल्या जागेवर बरोबर आहेत. भुसा जनावरांनी खावा. आपण तांदूळ खावे. ज्याला व्हायचंय पशू त्याने खावा भुसा. ज्याला व्हायचंय मनुष्य त्याने खावा तांदूळ.

दुसऱ्या दृष्टांतात, 'राजा आणि गोसावी' असे घ्यावे, अथवा 'राजा की गोसावी' असे घ्यावे? ज्याने केवळ राजाच पाहिला, असा एक मनुष्य आणि ज्याने केवळ फकीरच पाहिला, असा दुसरा मनुष्य यांचे आपापसात भांडण होईल. दोघांची एकवाक्यता होत नाही. आपापल्या जागेवर ते बरोबर आहेत. माणसांसाठी तांदूळ सार, जनावरांसाठी भुसा सार. भुसा की तांदूळ सार? राजा की गोसावी खरा?



तिसऱ्या मनुष्याने भूतकाळात राजाला पाहिले होते आणि वर्तमानकाळात गोसावीला पाहात आहे. असा मनुष्य राजा आणि गोसावी यांचा त्याग करतो व व्यक्तीचा स्वीकार करतो. जहताजहती लक्षणा राजा आणि गोसावी दोघांना वापरली तर? पहिल्या मनुष्याने केवळ राजाच पाहिला, त्याने राजाचा त्याग केला आणि व्यक्तीचा स्वीकार केला. जहताजहती लक्षणा केवळ गोसाव्यालाच लावली तर? दुसऱ्या मनुष्याने केवळ गोसाव्यालाच पाहिले. त्याने गोसाव्याचा त्याग आणि व्यक्तीचा स्वीकार केला. अशाप्रकारे, वरीलप्रमाणे दोन्ही प्रसंगांमध्ये व्यक्तीचाच स्वीकार होतो आणि असाच व्हायला हवा.

भुसा आणि तांदूळ यामध्ये कशाचा त्याग आणि कशाचा स्वीकार आहे? मूळ भूक आहे. मनुष्याने भूकेचा स्वीकार केला आणि भुसा त्यागला आणि भूक शमवली. जनावरानेही भूकेचा स्वीकार केला आणि तांदूळाचा त्याग केला आणि भूक शमवली. जनावर आणि मनुष्य यांच्या बाबतीत, 'भूक शमविणे' हे समान आहे. या ठिकाणी भूकेचा स्वीकार आहे. काय स्वीकारले हे महत्त्वाचे आहे. काय स्वीकारायचे ते महत्त्वाचे आहे. त्याग कशाचा आणि स्वीकार कशाचा करायचा हे कळले पाहिजे.

जहताजहती लक्षणेत त्यागाचाही अभ्यास आहे व स्वीकाराचाही अभ्यास आहे. मागील चिंतनात कुठपर्यंत त्यागायला सांगितले होते? काय त्यागायला सांगितले होते? त्याग म्हणजे परमार्थ. परमार्थ म्हणजे त्याग. पंढरपूरच्या वारीस जेव्हा पालखी निघते, तेव्हा पालखी सोबतच अखंड राहावे. पण, असा आपला निश्चय असतो का? पालखी पुणे शहरात आणि हा पिंपरीत. पालखी सासवडमध्ये, हा पुणे शहरात. असे नको. ज्याचा त्याग करायचा त्याचा त्याग करावा, ज्याचा स्वीकार करायचा तो करावाच. नको त्याचा त्याग, नको त्याचा स्वीकार करू नये. हे वर्म कळणाऱ्यांना शरण जावे. जे शास्त्रातले सांगत नाहीत, पण शास्त्रबाह्य बोलत नाहीत, त्यांना महाराज म्हणावे. अशा महाराजांना शरण जावे.

एकदा आळंदीहून पंढरपूरला पालखी चालली होती. रस्त्याच्या बाजूला, मोठ्या गर्दीत एक स्त्री तिच्या ७ ते ८ वर्षाच्या छोट्या मुलीसोबत उभी होती. पालखी सोबत बहुसंख्य लोक होते. गोंधळ, दाटी, गर्दी होती. पालखीत ठेवलेल्या भगवान श्रीज्ञानदेव महाराजांच्या पादुकांपर्यंत पोहचणे अत्यंत अवघड होते. खरेतर, पादुका ठेवलेल्या बैलगाडीलाही स्पर्श करणे शक्य नव्हते. आईचा निश्चय मुलीसह पादुकांवर डोके ठेवण्याचा होता. स्वतःही आणि मुलीला घेऊन ती पालखीच्या दिशेने जाऊ लागली. पण, तिची मुलगी लहान असल्यामुळे, लोकांच्या प्रचंड गर्दीला घाबरून माघारी फिरली. तेव्हा ते पाहून तिची आई भयंकर संतापली. अत्यंत क्रोधाने तिने मुलीला धमकावले – 'पालखी जवळ जा, दर्शन घे, नाहीतर मुस्काट

फोडीन'. आता मात्र मुलगी परत पालखीच्या दिशेने विजेप्रमाणे गेली. थेट पादुकांवर जाऊन आदळली. क्षणातच लोकांनी पुन्हा तिला बाहेर फेकले. पण, तिचा हेतू साध्य झाला होता. पादुकांसह त्यावरील मऊ, सुगंधीत फुलांच्या स्पर्शाने ती मोहरून गेली. दोघींना फक्त श्रीज्ञानदेवांच्या पादुका दिसत होत्या. हजारो लोक दिसत नव्हते. त्यांचा अडथळा त्यांना मान्यच नव्हता. मग 'प्राण गेले तरी बेहत्तर' अशा आवेशात त्या स्त्रीने पादुकांचे दर्शन घेतले आणि मुलीकडूनही करवून घेतले. श्रीज्ञानदेवांच्या नावाने पालखीत ठेवण्यात आलेल्या पादुकांवर नतमस्तक झाल्याने निर्माण झालेले दोघींच्या चेहऱ्यावरचे कृतार्थतेचे भाव मी आजही विसरू शकत नाही.

एखादी गोष्ट प्राप्त करायची, स्वीकारायची ठरली की करायचीच आणि त्यागायची ठरली की त्यागायचीच, असा निश्चय निर्माण करायला हवा. आपल्याला धनदौलत, आई, बाप, नातेवाईक, बायको, पोरांचा मोह आहे. आपल्याला शास्त्र, साधूसंतांचा मोह नाही. कशाचा मोह करावा अन् कशाचा मोह त्यागावा हे कळले पाहिजे. थोडासा परमार्थ केला की 'आता मला कसलाही मोह नाही' असे काहीजणांना वाटू लागते. पण, माणसे घर, बायको, पोरात राहून नकळतच त्यांच्या मोहात अडकतात. घरदाराचा त्याग केलेले काम, क्रोध, लोभ इत्यादी मोहात अडकतात. एकूणच, त्याग करणे हे फारच कठीण आहे.

या अभ्यासात आपले त्यागायचे ठरले आहे. स्थूलाने त्याग, सूक्ष्माने त्याग आणि कारणाने त्याग असे त्यागाचे तीन प्रकार आहेत. स्थूलाने त्यागणे सोपे की अवघड? अत्यंत अवघड. ज्याने स्थूलाने त्यागले तो श्रेष्ठ आहे. अशा पुरुषांना नमस्कार करावा.

सूक्ष्माने त्याग म्हणजे मन, बुद्धी, अंतःकरणाने त्याग. हा त्याग सोपा की अवघड? स्थूलाच्या त्यागापेक्षा किती अवघड हे सांगता येणार नाही. एखादी गोष्ट मनातून काढणे फारच कठीण असते. एखादा मनुष्य जंगलात, एकांतवासात जरी राहिला, तरी त्याचे मन प्रपंचाकडे धावते. जर एखाद्याने प्रयत्नपूर्वक अंतःकरणातून मी व माझे घालविले, तर अशी व्यक्ती त्याग करणाऱ्यांमध्ये स्थूल त्याग करणाऱ्यांपेक्षा श्रेष्ठ ठरते.

प्रमाण –

**आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।**
**पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ।।२०।। अध्याय ५**

– श्रीज्ञानेश्वरी

अंतःकरणाने त्याग करणे हे फारच कष्टसाध्य आहे. अशाप्रकारे, त्याग करणारा उत्कृष्ट संन्यासी होय.

तिसरा त्याग म्हणजे 'कारण' त्याग. म्हणजेच जीवाने त्याग. जीवाला कारण का म्हणता येईल? आपले आणि इतरांचे वाटोळे करण्याचे व भले करण्याचेही ते कारण आहे म्हणून. जीव स्वतःच्या जागेपासून खाली गेला, तर बंध. वर गेला, तर मोक्ष. जीव कुठेही

घुसतो. बंध–मोक्षास कारण जीवच आहे. ब्रह्मरूप होण्यासाठी अधिकारीही जीवच. ब्रह्म सदैव मोक्षरूप आहे. जो सदैव बंधनात आहे, त्याला मोक्ष देता येत नाही. जो कधी बंधाकडे, तर कधी मोक्षाकडे धाव घेतो, त्याला मोक्ष देता येतो. त्याला बंधातही टाकता येते. जीवाने त्याग हा सर्व श्रेष्ठ त्याग आहे. अंतःकरणाने त्याग करण्यापेक्षा जीवाने त्याग करणे अवघड आहे. कोणी म्हणेल याला प्रमाण काय? आपल्यावर संसाराचा प्रभाव पुष्कळ प्रमाणात आहे. म्हणूनच, अवतारी महापुरुषांची प्रमाणे द्यावी लागतात.



प्रमाण असंभावना, प्रमेय असंभावना आणि विपरीत भावना या केव्हा जातात? श्रवणाने प्रमाण असंभावना जाते. मननाने प्रमेय असंभावना जाते आणि निदिध्यासनाने विपरीत भावना जाते. भगवंतावर अनन्य आणि अखंड श्रद्धा असली तर हे तिन्ही दोष जातात. अवतारी महापुरुष जे सांगतील तेच खरे अशी श्रद्धा पाहिजे. त्यांची आठवण सतत पाहिजे. श्रद्धा जर डळमळली, तर त्या तीन भावना परत त्रास द्यायला येतात. जसे परीक्षा नापास झालेल्या मुलाला परत पहिल्यापासून परीक्षेचा अभ्यास करावा लागतो. त्याप्रमाणे, श्रद्धा ढासळली तर परत मागे यावे लागते. जीवाचा त्याग हाच मूळ त्याग आहे.

प्रथम स्थूलप्रपंचाचा त्याग. नंतर सूक्ष्मप्रपंचाचा त्याग आणि पुढे कारणप्रपंचाचा त्याग. हे सर्व आपोआप अथवा हळुहळू होईलच असे नाही. त्यासाठी तुम्हांला निश्चय करावा लागेल. भगवंतप्राप्तीच्या आड येणाऱ्या सर्व गोष्टी तुम्ही त्यागणार का? आज ठरवाच की 'त्यागायचेच'. तीन प्रकारच्या त्यागांपैकी एकाने त्यागा अथवा तिघांनेही त्यागा. क्रमाने करा अथवा कसेही. पण कराच. अन्यथा या मार्गात येऊ नका. 'आम्ही कोणताच त्याग करणार नाही, पण आम्हाला परमार्थ पाहिजे' अशी तुमची वृत्ती असेल तर काय करावे? मी जर कोणाला सांगितले, 'तुम्ही तुमच्या नातवंडांमध्ये गुंतले आहात', तर तो म्हणतो, 'असे आम्हांला तर वाटत नाही, तुम्हीच तसे म्हणता'.

कुठल्यातरी एका प्रकाराने त्याग करण्याचा प्रयत्न करीन असे सांगा. त्याग कसा करावा हे ज्याला कळत नाही, त्याने काय करावे? ज्याप्रमाणे मुलाने आई, बापाला शरण राहावे, तसे तुम्ही साधूसंतांना शरण रहा. ते सर्व योग्य ते करतील.

'मी राम देशपांडे आहे' हे कोणी त्यागावे? आपणच त्यागायला हवे. उदाहरणार्थ – एक खट्याळ, विचित्र बायको नवऱ्याशी नाटक करते, त्याला फसवत राहते. ही गोष्ट नवऱ्यालाही माहीत असते. अनेक प्रकारचे हट्ट न पुरविल्याने बायको म्हणते, 'तुमचा माझ्यावर जीवच नाही, मी निघून जाते'. तिला वैतागलेला नवरा म्हणतो, 'जा'. ती म्हणते, 'जाते'. काही वेळाने नवराच परत म्हणतो, 'थांब. जाऊ नकोस. मला तरी तुझ्याशिवाय कोण आहे?' काय करावे? त्याचाच निर्णय पक्का नाही. मग, दुसऱ्याला दोष देण्यात काय अर्थ आहे. तर, त्यागण्यासाठी स्वतःचा निर्णय पक्का हवा.

स्थूल आणि सूक्ष्म प्रपंचाकडे पाहू नका. जीव कुठे अडकलाय ते पहा. काहीही करायचे असेल, तर मुक्त होण्याच्या दृढ इच्छेनेच करा. नाहीतर करायचेच नाही. अथवा संसारातच रमायचे असेल, तर कमीत कमी नरकाला जाणार नाही असे बघा. आपण

साधूसंतांचे ऐकले नाही, तर आपल्याला नरकाला जावे लागेल. त्यांचे ऐका किंवा यमाचा टोला खा.


जगामध्ये मनुष्यरूपी बैलाला अन्न-धन-मानरूपी भुसा द्यावा लागतो. असे हे देवतांचे मनुष्यरूपी पशू अन्न, धन आणि मान खातात. मनुष्य देवतांना भजतो. ते याची अन्न, धन आणि मान यांची इच्छा पुरवितात. यातून बाहेर पडण्याची कोणाचीही इच्छा नाही. योग्य मार्गाने तुमच्या वाट्याला आलेली संपत्ती तुमच्याच नावावर राहू द्या. पण जीवाने म्हणा, 'ही संपत्ती महाराजांना अर्पण केली'. तुमचे भले होईल. महाराजांना त्याची गरज नाही. ते परत तुम्हांलाच ती संपत्ती देतील. अन्न-धन-मानाचा त्याग प्रयत्नाने करा. पहिल्यांदा धन आणि मानाचा त्याग करा. धन कितीही असले तरी पुरतच नाही. हाव संपतच नाही. हाव थांबवा. धन कमी असले, तर माणसाला 'माज' चढत नाही. त्याचप्रमाणे, खरेतर मानहानी जेवढी, तेवढी बरी. मानहानीमुळे अहंकार नाहिसा होतो. मानाची साडी, टॉवेल, टोपी इत्यादी सोयऱ्याने दिलेच पाहिजे का ? नाही दिले तर चालणार नाही का ? कोणी जर आपल्याला शिवी दिली, तर म्हणा, 'छान झाले. पूर्व कर्माचा भोग संपला'. पण, हे खरेच असे वाटावे. नुसते नाटक करू नका. कोणी निंदा अथवा कोणी वंदा, आमचा 'स्व' हिताचा धंदा. असे कोणाला वाटले पाहिजे ? जीवाला वाटले पाहिजे. ठामपणे तसे वाटण्यासाठी प्रयत्न करा.

आंघोळ झाल्यानंतर वेगवेगळी सौंदर्य प्रसाधने लावत बसणे, भारी कपडे घालणे इत्यादी शक्य ते गरजेचे नसलेले शरीराचे लाड बंद करण्याचा प्रयत्न करा. फाटके कपडे असोत अथवा भरजरी कपडे असोत, काही वाटू नये. स्थूलप्रपंचाचा त्याग करणे स्थूलरूपाने शक्यच न झाल्यास, सुरुवातीला स्थूलप्रपंचाला मनातून काढण्याचा प्रयत्न करा. हे शक्य होत नसले तर ईश्वर, शास्त्र व सद्गुरू यांना शरण राहण्याचा प्रयत्न करा. शरण राहिल्याने त्यागाचे वर्म कळण्यास मदत होते आणि पुढे त्याग होण्यासही मदत होते. काही लोक म्हणतात की सर्व गोष्टी मी मनाने त्यागल्या आहेत. त्यामुळे वस्तू वापरल्या तर काय हरकत ? काहीच हरकत नाही. पण खरेच तसे असावे. नाहीतर योग्य वेळप्रसंग आला की आपलं आपल्यालाच कळेल की आपला त्याग मनापासून आहे की नाही. खरेच असेल तर तो साधक श्रेष्ठ. नसेल तर तो गाळात जाईल.

स्थूलप्रपंचाचा त्याग सूक्ष्मदेहाच्या साहाय्याने केल्यानंतर सूक्ष्मप्रपंचाचा त्याग जीवाने करावा. सुख, दुःख, काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादी सर्व सूक्ष्मप्रपंच होय. हा त्याग जीवापासून आहे की नाही हे जीवाला कळते. काम आला, नाही आला. क्रोध आला, नाही आला. दोन्ही प्रसंगात स्थिर राहणे यालाच त्याग असे म्हणतात.

प्रमाण –

**सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा न भजावें ।**
**आणि लाभालाभ न धरावें । मनामाजीं ।।२२६।। अध्याय २**

– श्रीज्ञानेश्वरी

सुखाने तयार होणारा संतोष, दुःखाने निर्माण होणारा विषाद, तसेच लाभ, अलाभ हे मनात धरू नये. संपत्ती असली काय किंवा नसली काय, काही वाटू नये. असा त्याग प्रथम मनाने आणि मग जीवापासून व्हावा. म्हणजेच साक्षीरूपाने, तटस्थरूपाने सूक्ष्म प्रपंचाकडे पाहायला शिकावे. या ठिकाणी त्यागणे म्हणजे त्यागणेच आहे. पण ते कसे आहे? न त्यागून त्यागावे की त्यागून त्यागावे? राजा आणि गोसावी यांचा त्याग, म्हणजेच व्यक्तीवर आरोपित धर्मांचा त्याग हा स्थूलरूपाने त्याग आहे की 'न त्यागून त्याग' आहे? 'आरोपित धर्मांचा न त्यागता त्याग आणि व्यक्तीचा स्वीकार' हाच या ठिकाणी विवेक आहे.

त्याग जरी करायचाच आहे, तरी साधकदशेमध्ये ज्यामुळे परमार्थ साधतो, अशा गोष्टींचा त्याग करू नये. 'घरामध्ये ग्रंथ असले तर राहू द्या. नसले तरी बरे', असे म्हणू नका. त्याचप्रमाणे, 'साधूसंत घरामध्ये आले काय आणि गेले काय, आपल्याला काय फरक पडतो?', अशी वृत्ती नसावी. उलट त्यांच्या येण्याने आनंद व्हावा. कारण त्यागाचे वर्म हे साधूसंताच्या कृपेनेच कळते.

प्रमाण –

साधूसंत येती घरा। तोचि दिवाळी दसरा ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

व्यवहारात जसे दिवाळी–दसरा म्हणजे मोठा आनंद असतो, त्याप्रमाणे, साधूसंताच्या येण्याने आपल्याला हर्ष व्हावा.

त्यानंतर पुढे त्याहीपेक्षा श्रेष्ठ त्याग म्हणजे स्वतःचा जीवभावच त्यागावा. हे जमेल का? होय. जमवायचेच आहे आणि तेही मरण येण्याच्या आत.

जीवाने स्थूल, सूक्ष्मप्रपंचात न गुंतणे म्हणजे त्याग. प्रपंचात राहून प्रपंचाचे मर्म ओळखून त्यात रममाण न होणे म्हणजे प्रपंचाचा त्याग होय. परंतु, जीव कळत–नकळत जर प्रपंचात रमला, तर मग सोबत गोतावळा, आंतर्बाह्य पदार्थ इत्यादी असो अथवा नसो, खरा त्याग होत नाही. देह व प्रपंच यांना 'मी' व 'माझे' म्हटले की नरकाला जावेच लागते. म्हणून, मरण्याच्या आत त्याग साधावा लागेल. साधक ऐकत नाही म्हणून त्याला वारंवार हे सांगावे लागते. आपल्या मरणाची तारीख कोणती हे आपल्याला माहीत नाही. पण, मरण येणार हे मात्र नक्की आहे. आपल्या मरण्याने जगातील कोणालाही काहीही फरक पडणार नाही. मला सांगा, पोरगा मेला तर त्याला कवटाळून हंबरडा फोडणारी आई 'आता मी जगून काय करू' असे म्हणून मरते का? मग नाटक कशाला करायचे? मला माहीत आहे की माझे बोल तुमच्या मनाला टोचतील. पण बुद्धीने विवेक करा. एकमेकांचा मोह सोडा. आई, बाप, बायको, पोरं, नातेवाईक इत्यादी मोहात गुंतवून ठेवत असतील, भगवंताच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करू देत नसतील तर त्यांचा स्वीकार करू नका. जे मोहातून बाहेर काढतील त्यांचा स्वीकार करा. मग ते कसेही असोत.

जीव प्रपंचात ठेवून प्रपंचात गुंतवायचा नाही, असे वचन साधूंना द्या. ते वचन पाळण्याचा सदैव प्रयत्न करा. साधूला दिलेले वचन पाळले नाही, तर काय होईल हे सांगता येत नाही. एक वेळ साधूचे पाय धरू नका, पण जीव संसारात गुंतवू नका. जो असे करील, त्याची तीच साधूसंतांची सेवा आहे असे समजा. हे शक्य होत नाही, म्हणून हार घालणे, पाया पडणे इत्यादी प्रकारची सेवा करावी लागते. हार घालणे, पाया पडणे इत्यादी करणे म्हणजे खालच्या पातळीची सेवा आहे. उत्तरोत्तर सेवेतूनच पुढे त्यागाचे वर्म कळते.

त्याग करणे हे सोपे की अवघड आहे? सोपे आहे. विचार करा की तुम्ही आपणहून संसारातून जीव नाही काढला, तरी यम आपल्या दूतांकडून तुमचा जीव संसारातून काढेलच. मग, यमाचा शिष्य व्हायचे की महाराजांचा? महाराजांकडे लाड चालतात. यमाकडे लाड चालत नाहीत. यम एक ठोका देतो आणि जीव घेऊन जातो. आपली कसल्याही प्रकारची विचारपूस तो करत नाही. सरळ हल्लाच करतो. आपण ठरवल्याप्रमाणे आणि आपल्या वेळेप्रमाणे आपल्याला तो घेऊन जात नाही. मला सांगा तुम्ही अकस्मात मरणार की ठरवून? आपण केव्हा मरणार हे कदाचित् एखादा श्रेष्ठ योगी सांगू शकतो. पण, आपण तसे सांगू शकत नाही. आपण आत्ताच मेलो आहोत असे ठरवा. हे शरीर आत्ताच प्रेत आहे हे लक्षात घ्या आणि संसारात येणाऱ्या द्वंद्वधर्माची चिंता न करता निश्चळ राहण्याचा प्रयत्न करा. आत्ताच येथे वचन द्या. मला नव्हे, स्वतःचे स्वतःलाच की निश्चळ राहीन. कारण स्थिर राहिल्यानेच पुढे भगवंताचा बोध टिकू शकतो.

जहताजहती लक्षणेमध्ये प्रथम जीवाने स्थूल–सूक्ष्मप्रपंचाचा त्याग करण्याचा विषय आहे. नंतर जीव पदाचा त्याग आहे. पुढे शिव पदाचा त्याग आहे. त्यापुढे 'ब्रह्म' स्वीकार आहे. हा झाला खालून वर जाण्याचा प्रकार. एकदा 'ब्रह्म' स्वीकार झाला की मग पुन्हा खाली येताना, प्रथम शिव, मग जीव व नंतर स्थूल–सूक्ष्मप्रपंचाचा 'एकमेव ब्रह्म' म्हणून स्वीकार आहे.

तुम्ही त्याग करण्याचा प्रयत्न केलात की बदल होईल. साधूसंतांना बरे वाटेल. अनेक वर्षांपासून तुमच्यात बदल होत चाललाय काय? तुम्ही साधूसंतांचे ऐकता. त्यांच्या सांगण्याचा उपयोग करता. म्हणून बदल होत आहे. आता हा बदल असा होऊ द्या की एक ब्रह्मच राहिले पाहिजे. बाकी काहीच उरायला नको. चिंतनात एक तास देह तुमचे ऐकतो. त्यानंतर, देह तुम्हांला ऐकवतो. कायमच त्याला आपले ऐकायला लावा. तो आपल्याशी एकरूप होऊ द्या, म्हणजेच ब्रह्मरूप होऊ द्या. हाच शेवट.

*****

॥ ॐ तत् सत् ॥



## चिंतन क्रमांक ४१
## जहताजहती लक्षणा – ५

जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने 'तत्त्वमसि' या महावाक्याचा आपण अभ्यास करीत आहोत. आपण फेऱ्यात अडकलो आहोत हे कळण्यासाठी भाग्य पाहिजे. आपण आज सुखात आहोत, पण उद्या दुःख येऊ शकते. आपण पुनः पुनः जन्मतो आणि मरतो. छोट्या, मोठ्या अनेक देहांना प्राप्त होतो. यासारखी वाईट स्थिती नाही. व्यवहारात अचानकपणे दुःख आले, तर वैराग्य येते. ते जास्त काळ टिकत नाही. त्यानंतर मनुष्य पूर्ववत संसार करतो. यातून निघण्यासाठी कोणता उपाय करायचा याचा विचार करावा लागेल. सत्शास्त्राचा अभ्यास केल्याने एकवेळ अन्न–पाणी मिळणार नाही, पण मुक्तीचा मार्ग सापडेल. चार महावाक्यांपैकी, 'तत्त्वमसि' या महावाक्याचा विचार जास्त करण्यात आलेला आढळतो. या महावाक्याचा विचार पूर्णत्वास गेला, तर इतर तीन महावाक्यांचाही विचार आपोआप होतोच.

'तत्त्वमसि' महावाक्याचा वाच्यार्थाने विचार केल्याने एकवाक्यता होत नाही. म्हणून पुढचा अभ्यास करणे गरजेचे आहे. आपण पुढचा विचार लक्षणेने करीत आहोत. त्यामध्ये जहती लक्षणा, अजहती लक्षणा आपण महावाक्याला वापरल्या. परंतु, त्यांच्याद्वारे महावाक्याचा योग्य निर्णय लागत नाही. म्हणून जहताजहती लक्षणेने आपण महावाक्याचा विचार करीत आहोत. या लक्षणेत काही त्यागायचे असते आणि काही स्वीकारायचे असते. 'तत्त्वमसि' महावाक्याच्या तीन पदांना आपण जहताजहती लक्षणा वापरत आहोत.

प्रथम स्थूल सर्व त्यागावे असे ठरले होते. स्थूल प्रपंचाच्या त्यागातील शेवटचा त्याग म्हणजे अंगावरील कपड्यांचा त्याग. अनेक महात्मे इथपर्यंत गेले. काही त्याच्याही पुढे गेले. कपड्यांच्या त्यागापर्यंत त्याग केलेले कुठे चुकले किंवा नाही हा एक वेगळा अभ्यास आहे. परंतु, ते सर्वच श्रेष्ठ आहेत. चुकलेच असतील, तर पुढे पुढे त्यांची तपस्या घडत राहिली, तर प्रगती होऊन ते परमार्थाचा शेवट गाठतील.

मागील चिंतनात आपण त्याग करायचे ठरवले होते. मधे सहा दिवस निघून गेले. या सहा दिवसात कदाचित् तुम्ही जागे झाल्यापासून झोपेपर्यंत एकच विचार करत असणार. कोणता? 'जीवाने त्याग कसा करीन?' खरंच असं झालं का? असं झालंच असेल, तर तुम्ही फारच श्रेष्ठ आहात. अशा साधकांची गरज आहे. आपल्या अभ्यासात आपण पदार्थांमध्ये न रमणे याला त्याग म्हटले होते. हे सोपे आहे की अवघड आहे? ज्या पदार्थांत आपण रमलो त्यांच्यात रमायचे नाही. ज्या पदार्थांमध्ये आपण रमलोच नाही त्यांचा प्रश्न नाही. आपण कुठे कुठे अडकलो आणि अडकत आहोत हे विचार करून जाणावे. कोणत्या नातलगांवरून, पदार्थांवरून लक्ष काढावे हे तुमचे तुम्हांलाच माहीत आहे. जे आपल्याला या मार्गात पुढे पुढे

जाण्यास अडथळा ठरत असतील, त्यांच्यात रममाण होऊ नका. त्यांचा योग्य निर्णय लावता येत नसेल, तर शास्त्र, श्रीगुरूना विचारा. हे कायम लक्षात ठेवा की अशाप्रकारचे नातेवाईक आपल्याला मातीत घालणार आहेत. त्यांचा आपल्याला काही उपयोग असेल, तर तो फक्त व्यवहारापुरताच आहे. मात्र, त्यामुळेच आपण आपल्यामध्ये असलेला विवेक जागृत करू शकत नाही. त्यांच्या नादी लागू नका. आपल्या मृत्यूनंतर स्थूलशरीराला जाळून राख आणि हाडे नदीत घालायची हे त्यांचे खरे काम आहे. हे कामही ते लोक तुमचे आणि त्यांचे व्यवहारात नीट जमत असेल तरच करतील. खरेतर, मरणानंतरही आपल्या देहाला अशा लोकांनी हातही लावू नये. परंतु, असे केव्हा होईल? जर आपण त्यांच्यात रमलो नाही तर. तरच ते आपल्या जवळही येणार नाहीत. जर आपण गोतावळ्यात रमलो नाही, तर आपल्याला साधूसंत, सद्गुरू जवळ करतील व भवबंधनातून वाचवतील. अशा या गोतावळ्यात आपल्या अत्यंत जवळचे कोणीही असो, ते आपला पुढील त्रास वाचवू शकत नाहीत. म्हणून साधूसंत, सद्गुरूंना शरण जा. पुढे तेच आपल्याला यमाच्या जाचणीतून वाचवू शकतात.

प्रमाण –

**माता पिता बंधु बहिणी कोणी न पवती निर्वाणीं।**
**इष्ट मित्र सज्जन सखे हे तो सुखाची मांडणी ।।**
**एकला मी दुःख भोगीं कुंभपाक जाचणी।**
**तेथें कोणी सोडविना एका सद्गुरु वांचोनी ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

नको असलेल्या प्रपंचात गुंतणे अथवा न गुंतणे हे आपल्यावरच अवलंबून आहे. काहीजण म्हणतात, 'इच्छा नाही, तरीपण गुंततो'. होय, हे सुद्धा खरेच आहे. पण मग उपाय शोधावा. ज्याला तहान लागली आहे तो पाण्याचा शोध घेतोच. अडकवणाऱ्या संसारात रमण्याची ज्याला आंतरिक इच्छा नाही, तो रमणारच नाही. पण दुर्दैवाने रममाण व्हावंच लागत असेल, तर न रमण्यासाठी तो काहीतरी योग्य उपाय शोधेलच.

गणगोत वाच्यार्थ की लक्ष्यार्थ? माता, पिता, बंधु, बहिणी, बायको, मुले इत्यादी वाच्यार्थात आहेत. ते वाच्यार्थात आहेत असे कळले, तर मग त्यांचा आपण त्याग का करत नाही? जहताजहती लक्षणेत आपण वाच्यार्थाचा त्याग करावा. आपण लक्षणा वापरली पाहिजे. अन्न, धन, मानानंतर गणगोत त्यागायचे. वेळ पडली तर राहिलो बंगल्यात, झोपलो तर झोपडीत. खरा वारकरी कोणत्याही परिस्थितीत राहतो. स्थूलप्रपंचात न रमणारा वारकरी श्रेष्ठ आहे. असा वारकरी व्हा.

आता पुढे सूक्ष्मप्रपंच. त्याच्या अंतर्गत काय काय येते? अपंचीकृत पंचमहाभूतांपासून जे जे बनले आहे ते ते सूक्ष्म प्रपंचांतर्गत येते. सूक्ष्मप्रपंच हा वाच्यार्थ आहे की लक्ष्यार्थ आहे? सूक्ष्मप्रपंच हा सुद्धा वाच्यार्थच आहे. सूक्ष्मप्रपंच हा वाच्यार्थ का? सदैव

जे बदलत असते ते वाच्यार्थात येते. स्थूलप्रपंचात क्षणाक्षणाला बदल होत असतो हे सर्वांनाच

माहीत आहे. त्याप्रमाणेच, सूक्ष्मप्रपंचातही क्षणाक्षणाला बदल होत असतो. पण साधारणपणे दोन्हीही प्रपंचातला बदल सहजपणे जाणवत नाही. त्यासाठी थोडा विचार करावा लागतो. मनुष्याच्या जीवनात स्थूलशरीरामध्ये बालपण, तरुणपण, वार्धक्य असा बदल जाणवतो. मनुष्याचे आयुष्य कमी म्हणजे अंदाजे १०० वर्षे इतके आहे. त्या मानाने चंद्र, सूर्य इत्यादी अनेक स्थूल पदार्थांचे आयुष्य खूप जास्त आहे. त्यांच्यामध्ये होणारे बदल एकदम लक्षात येत नाहीत. एकोणिस तत्त्वांपासून बनलेला सूक्ष्मदेह अपंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेला आहे. नीट विचार केला, तर त्यातील बदल जाणवतो. उदाहरणार्थ – मन अनेक संकल्प–विकल्प करते. बुद्धीत अनेक तरंग निर्माण होतात.

प्रमाण –

**अनेक बुद्धीचे तरंग । क्षणाक्षणां पालटती रंग ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

बाप ब्राह्मण तर मुलगा कोण असेल? ब्राह्मण. सूक्ष्मप्रपंचातून स्थूलप्रपंच निर्माण झाला आहे. सूक्ष्मप्रपंच वाच्यार्थात आहे. त्यामुळे स्थूलप्रपंचही वाच्यार्थातच आहे. अशाप्रकारे विचार केला तरी दोन्ही प्रपंचाचा त्याग करणे शक्य होईल. वाच्यार्थाचा त्याग होण्यासाठी 'वाच्यार्थात रममाण न होणे' ही प्रक्रिया अवलंबण्याचा आपण प्रयत्न करणार आहोत. सूक्ष्मप्रपंचाच्या मानाने स्थूलप्रपंचाचा अभ्यास करणे सोपे आहे. परंतु, साधारणपणे स्थूलप्रपंचाचाच अभ्यास करणे अवघड जाते.

सूक्ष्मदेह हे अपंचीकृत पंचमहाभूतांचे कार्य आहे. सूक्ष्मदेहाचे कार्य म्हणजे काम, क्रोधादि असंख्य धर्म. म्हणजेच बुद्धीत असे पुष्कळ तरंग उठतात. त्यामध्ये एकसारखा बदल होतो. मनुष्याला क्रोध आला, तर त्यात रममाण होतो. दया आली, त्यात रममाण होतो. दुःख आले, रममाण होतो. मोह आला, रममाण होतो. या अशा तरंगांचा कालावधी किती? 'क्षणभर'. ते क्षणाक्षणाला त्यांचा रंग पालटत राहतात. मला सांगा क्रोध आला, तर किती वेळ राहतो? फक्त काही काळ. पण त्याची आठवण करून परत क्रोधाची पुनरावृत्ती होते. आपण त्यामध्ये रममाण होतो. शास्त्रात लिहिले आहे की या सर्वांचा त्याग करा. साधूला काम, क्रोधादिक असतात की नाही? साधू भोगतो, पण त्यागतो. त्यांचे त्यागणे हे एक वर्म आहे. ही गूढ गोष्ट आहे.

प्रमाण –

**काम क्रोध लोभ मोह दंभ मद । केला यांचा छेद ज्ञानशस्त्रे ।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

सिद्ध पुरुष त्यांचा त्याग ज्ञानशस्त्राने करतात. तुम्ही अभ्यास केला, तर तुम्हांला हे

साधूच्या कृपेने लक्षात येईल. साधूच्या स्थितीप्रमाणे तुमची स्थिती झाली, तर ते लक्षात येईल. सूक्ष्मदेहाच्या धर्मांमध्ये जगत् अडकलेले आहे. एवढेच काय अनेक महाराज आणि योगी देखील त्यांना भीतात, त्यांच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करतात. त्यांना सूक्ष्मदेहाच्या धर्मांचा भयंकर त्रास जाणवतो. सूक्ष्मदेहाच्या धर्मांचा त्रास कोणाला जाणवत नाही ? मूर्खाला आणि सिद्ध महापुरुषांना.



ज्या मनुष्याला शिव्या ऐकण्याची सवय होऊन कोडगा झाला आहे, त्याला शिव्या ऐकून काही वाटत नाही. जो नवरा आपल्या बायकोला, 'काय मूर्ख बाई आहे' असे सतत म्हणत राहतो, तो मग दुसऱ्या बाईसमोर जरी तसे बायकोला म्हणाला, तरी तिला काहीही वाटत नाही. त्याप्रमाणे, आपल्याला काम, क्रोधादि रोजचेच आहेत. पण या काम, क्रोधाची मर्यादा किती ? एखाद्या दिवशी खूप जास्त क्रोध केला, तर आपले आपल्यालाच कळते की 'आज क्रोधाची पातळी ओलांडली'. दुसऱ्याला आपण शिवी दिली तर लक्षात राहत नाही. पण कोणी आपल्याला शिवी दिली असेल, तर ती मरेपर्यंत लक्षात राहते. आपण सूक्ष्मदेहाच्या धर्मांमध्ये किती गुंतलो, किती बुडालो हे सुद्धा आपल्याला कळलेले नाही. तुम्हांला काम, क्रोधादिक त्रास देतात का ? मूर्ख आणि सिद्ध महापुरुष यांना ते त्रास देत नाहीत. मधल्या माणसांना त्रास देतात. मधला म्हणजे मुमुक्षु. ज्या अर्थी लोकांचा व्यवहार आरामात सुरू आहे, त्या अर्थी धर्मांचा त्यांना त्रास होतो का ? शेजारचा मनुष्य दररोज त्रास देत असेल, तर हा त्याचा निकाल लावतो. क्रोध जर वाईट, तर मग लोकं त्याला संपवायचा प्रयत्न का करत नाहीत ? जो परमार्थात आहे त्याला हे धर्म त्रास देतात. तुम्ही कुठे आहात. इकडे, तिकडे का मधात ? मधली अवस्था वाईट आहे. मुमुक्षुची अवस्था फार वाईट. मुमुक्षुला रात्री नीट झोप लागू नये. का ? या धर्मांचा निकाल लावला पाहिजे– असा विचार त्याने करीत राहावे. यांचा त्याग कसा करायचा ? काम म्हणजेच इच्छा नाहीशी झाली तर क्रोध येत नाही.

प्रमाण –

मुळाचें तोडणें जैसें । होय कां शाखोद्देशें ।
कामु नाशलेनि नाशे । तैसा क्रोधु ।। १०६० ।।अध्याय १८।।

– श्रीज्ञानेश्वरी

या धर्मांचा उगम कुठून होतो ? चित्तातून. चित्तामध्ये अनंत जन्मांचे संस्कार साठलेले आहेत. केव्हा कोणते संस्कार उद्‌भूत होतील हे सांगता येत नाही.

अपंचीकृत महाभूते वाच्यार्थात असल्यामुळे त्यांच्यापासून उत्पन्न झालेले सर्व धर्महीी वाच्यार्थातच आहेत. मग त्यांचे कौतुक का ? त्यांचे कौतुक केले तर ते त्यांचे गुण दाखवितात. ते अधिकच फुलतात. आला का क्रोध ? 'ये'. गेला तर 'जा'. साधकाने असा विचार आतल्या आत करावा. परंतु, कोणाला मारण्यासाठी हातात काही घेऊ नये. असा अभ्यास करीत राहिलात, तर सूक्ष्मदेहाचे धर्म त्रास देणार नाहीत. एखादा मनुष्य उंच आणि

धिप्पाड असेल, तर त्याला सर्व घाबरतात. पण त्याची मुले त्याला घाबरत नाहीत. कारण तो आपल्याला काही करणार नाही हे मुलांना माहीत असते. एक हडकुळा मनुष्य खिशात नेहमी कोयता घेऊन फिरायचा. त्याच्या समोरून जाताना आम्हांला कधीच भीती वाटायची नाही. का? त्याचे खरे स्वरूप माहीत नव्हते, म्हणून भीती वाटत नव्हती. जेव्हा आम्हांला कळले की तो दिसतो तसा नाही, तेव्हापासून आम्ही त्याच्यापासून दहा हात दूरच राहू लागलो.



एखादा अनोळखी माणूस अचानक दारात उभा राहिला, तर तो चांगला असूनही आपण त्याला घाबरतो किंवा एखादा वाईट माणूस दारात उभा राहिला, तर त्याला कदाचित् आपण चांगले समजू शकतो. पुढे तो घरातले सामान चोरी करून घेऊन जातो. माणसाची योग्य पारख न झाल्याने असे घडते. त्याप्रमाणेच, सूक्ष्मदेहाच्या धर्मांची नीट ओळख न झाल्यामुळे, ते धर्म लक्ष्यार्थात आहेत की वाच्यार्थात आहेत हे न कळल्यामुळे, आपली फार मोठी हानी होते. काम, क्रोधादिक जेथून तयार झालेत ते वाच्यार्थात आहे. म्हणून त्यांचे कार्य देखील वाच्यार्थातच आहे. हे लक्षात घ्या.

समजा, तुम्ही रस्त्याने चाललेले आहात. चालत असतांना रस्त्याच्या कडेला एक मुंग्यांचे वारूळ दिसले. आता, वारूळात किती मुंग्या आहेत? त्या रोज काय करतात? कशा राहतात? कधी झोपतात? कधी उठतात? इत्यादी विचार तुम्ही करत बसता का? जगात दररोज कितीतरी माणसे जन्माला येतात, कित्येक मरतात. जे जन्मले त्या सर्वांबद्दल तुम्ही आनंद व्यक्त करीत बसता का? जे मेले त्या सर्वांसाठी तुम्ही सुतक ठेवता का? हा जगताचा प्रवाह अव्याहतपणे सुरू आहे. नदीच्या काठावर बसून पाण्याचा प्रवाह पाहत, पाणी आले व गेले याबद्दल तुम्ही सुख-दुःख करत बसता का? आपण पाण्याच्या प्रवाहात रमत नाही. जगत् प्रपंचाच्या भानगडीतच पडले नाही, तर आपण रममाण होत नाही. जगतामध्ये सतत उत्पत्ती, स्थिती, प्रलय सुरू आहेत. तेही अगदी सहज आहे. मग त्याचे काय कौतुक करावे. महाराज कायम रागावणार किंवा कायमच गोड बोलणार काय? रस्त्यावर गाड्या कायमच धावत राहतील काय? ज्याला रस्त्याशी घेणे-देणे आहे तो रस्त्यावर येणाऱ्या, जाणाऱ्या गाड्यांमध्ये रमेल का? आले गेले, अडकायचे नाही.

सिद्ध महापुरुषांना काम, क्रोध इत्यादी आहेत का? नाहीत का? ते जसे दिसतात, तसेच खरे आहेत का? ते फक्त 'आहेत' की 'गुंतलेले' आहेत? 'असणे' आणि 'गुंतलेले' यामध्ये काही फरक नाही का? फरक आहे. तो फरक लक्षात येणे गरजेचे आहे.

प्रपंच कसा त्यागणार? त्यागून त्यागा अथवा भोगून त्यागा. काही साधू प्रपंच त्यागून त्यागतात, तर काही भोगून. त्यागून त्यागणाऱ्यांमध्ये भगवान श्रीज्ञानदेव महाराज हे सर्वश्रेष्ठ आहेत. भोगून त्यागणाऱ्यांमध्ये भगवान श्रीतुकाराम महाराज हे श्रेष्ठ आहेत.

प्रमाण –

**प्रपंच रचना सर्वहि भोगूनि त्यागिली।**

– श्री संत निळोबाराय महाराज गाथा

प्रपंचाच्या धर्मांमध्ये रममाण होऊ नये. सूनेचा राग आला, रममाण व्हायचे नाही.

राग आला आणि राग गेला असे असेल, तर आपण स्थिर होऊ. या ठिकाणी आपण त्यागाचे वर्म पाहत आहोत. जो स्थूल प्रपंचाचा त्याग करतो, तो सूक्ष्म प्रपंचाचा त्याग करण्याचा अधिकारी होतो. आले व गेले हा काळ 'क्षणभंगुर' असतो. पण, साधारणपणे तोच मोठा वाटतो. काही माणसे पूर्वी घडलेल्या गोष्टी आठवतात. कधीतरी सुख झाले होते, ते आठवून बळेच सुखावण्याचा प्रयत्न करतात. कधी दुःखाची आठवण काढून दुःखी होतात. आठवण काढून सुख–दुःखात रमतात. एखादा मनुष्य, 'वीस वर्षांपूर्वी बाप मेला' असे म्हणतो आणि रडतो. सर्व धर्मांना परत परत उगाळत राहतो. आपलीच कथा सांगत बसतो. साधकाने कमीत कमी उगाळणे बंद करावे. मागचे काही काढत बसू नये. समोर चुकून मागचा विषय आलाच, तर प्रयत्नाने त्यापासून अलिप्त होण्याचे कष्ट करावेत. बरेच जण पुढचे जे माहीत नाही, त्यावर चिंता करत बसतात. भविष्यातले उगाळत बसतात. 'पुढे मुलगा कमवेल आणि मी बसून खाईन' अशी पुढची कल्पना करतात. अशाप्रकारे भूत, भविष्यातच सर्वजण मेले आहेत.

जो तिन्ही काळात गुंततो त्याला यम खातो. पण, साधारणपणे कोणालाही यमाची भीती वाटत नाही. काळ आपल्याला कसा खातो ते कोणालाही कळत नाही. ज्याचा विचार करू नये, त्याचाच विचार आपण जास्तीत जास्त वेळ करत राहतो. भविष्याला उगाळू नये. तर भूतकाळाला उगाळावे काय ? सुरुवातीला हा नियम व्यवहाराला लावा, परमार्थाला नाही. पुढे जाऊन हा नियम परमार्थालाही लागू होतो. पण हे केव्हा ? जेव्हा साधक सिद्ध होतो तेव्हा.

सध्या आपला व्यवहार चालू असल्यामुळे काम, क्रोधादिकांचा त्रास आहे. आले तर आले. गेले तर गेले. मागचे काम, क्रोध, लोभ, सुख, दुःख, मान, अपमान उगाळायचे नाहीत. अनेकांना अपमान उगाळत बसण्याची सवय असते. दुसऱ्यांनी आपल्यावर केलेला क्रोध आठवतो. मात्र आपण दुसऱ्यावर केलेला क्रोध आठवत नाही. अशाप्रकारे, आपला व्यवहारही धड नाही. दुसऱ्यांनी आपल्यावर केलेला क्रोध आठवतो, तर मग आपण दुसऱ्यावर केलेला क्रोधही आठवावा.

देहधर्म असंख्य आहेत. त्या सर्वांना एकदमच तिलांजली द्या. कशी ? त्यांचा विचार करू नका. ते अचिंत्य आहेत. त्यांचे चिंतन सोडून द्या. त्यांच्या वाटेला जाऊ नका. जर एखाद्याने घर रस्त्यावर बांधले तर महानगरपालिका ते घर बाजूला काढेल. सोपा उपाय म्हणजे महानगरपालिकेच्या वाटेलाच जाऊ नये. नाही तर ते आपल्याला वाटेला लावतात. त्याग म्हणजे वाटेला जायचे नाही. ते म्हणतील तेथे व ते म्हणतील तेवढ्या जागेवरच घर बांधावे. म्हणजे अडचण येत नाही.

काम, क्रोधादिकांच्या वाटेलाच गेले नाही, तर काय फल तयार होणार ? फल तयार झाले, तरी फलाच्या त्यागाला किंमत आहे. कार्यापासून फल तयार होणारच. त्या फलाच्या त्यागाला किंमत आहे. कार्यत्यागाला एवढी किंमत देऊ नये. कार्य सुरू असताना काम, क्रोधादिकांमध्ये रमले नाही, तर ते फल देत नाहीत. हा त्याग कोणी करावा ? त्याग जीवालाच करणे शक्य आहे. जीव धर्मांमध्ये गुंतवायचा नाही. धर्मांना 'आले तर या आणि गेले तर जा',

असे म्हणत राहण्याचा प्रयत्न करा.



भिकारी झालो तर सुख का दुःख? आपल्याकडे बंगला नसेल तर सुख का दुःख? हेच उमगत नाही. म्हणून त्याच गोष्टींसाठी धडपडतो. त्यासाठी जीव तीळ तीळ तुटतो. अन्न, धन, मान, गोतावळा, सूक्ष्मप्रपंचात जीव गुंतू नये. पण गुंततो. हे सर्व असते काळीच त्यातून बाहेर पडायचे आहे. हे बघा! सगळे नातेवाईक संपणार की आपण? काम, क्रोधादिक संपतील की आपण संपणार? गोतावळा, बायको, पोरे असली तर असू दे. त्यांच्यात रममाण व्हायचे नाही. यासाठी तुमचे 'प्रयत्न' अधिक 'श्रीगुरुंची कृपा' पाहिजे. शेतकऱ्याने शेत नांगरले. फळझाडे लावली. ती वाढून पाने आली. पण, जोपर्यंत वसंत ऋतूचे आगमन होत नाही, तोपर्यंत झाडाला फळे येत नाहीत. शेत नांगरणे, झाडे लावणे म्हणजे 'प्रयत्न' आणि वसंत ऋतूचे आगमन म्हणजे 'श्रीगुरुंची कृपा'. श्रीगुरुंना कळते केव्हा कृपा करावी.

जो स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचात रममाण होत नाही, तोच कारणाकडे जातो. जो रममाण होईल, त्याच्या कानावर हे शब्द पडले, तरी ते फलीभूत होणार नाहीत. दोन प्रपंचातून जीव काढा. मग तो जीव पुढे ब्रह्मरूप होण्यासाठी अधिकारी आहे.

पुढील चिंतनापर्यंत तुमच्याकडे सहा दिवस आहेत. सहा दिवस म्हणजे १४४ तास. दररोज ७ तास झोप. इतर व्यवहार १० तास. असे मिळून १७ तास जरी गेले, तरी ७ तास शिल्लक मिळतात. सहा दिवसांचे ७ × ६ = ४२ तास तुमच्याकडे आहेत. तुमच्याकडे ४२ × ६० = २५२० मिनिटे आहेत. म्हणजे तुमच्याकडे ४२ × ६० × ६० = १,५१,२०० सेकंद म्हणजेच क्षण आहेत.

प्रमाण –

क्षणाक्षणा हाचि विचार। तरावया पार भवसिंधु ॥

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

वरीलपैकी निम्मे क्षण जरी घेतले, तरी आपल्याकडे हजारो क्षण उपलब्ध आहेत. दैनंदिन सर्व व्यवहार करीत असतानाच हा विचार जीवापासून करा. आपला जीव काय करतो, हे इतरांना कळत नाही. या गोष्टीचा फायदा घ्या आणि परमार्थ साधा. उठता, बसता, चालता, बोलता, भाजी बनवताना, खाताना, नव्हे काहीही करताना हाच विचार करा.

प्रपंचात जीवाने रममाण व्हायचे नाही. जो स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचात जीवाने रममाण होणार नाही, त्याच्यासाठी कारणाचा म्हणजे 'त्वम्'चा अभ्यास आहे. त्यानंतर, 'त्वम्'पदाच्या वाच्यार्थाचा त्याग आणि पुढे 'त्वम्'पदाच्या लक्ष्यार्थाचा स्वीकार कसा करायचा हे पुढील चिंतनांमध्ये आपण पाहणार आहोत.

*****

## चिंतन क्रमांक ४२
## जहताजहती लक्षणा – ६

आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होण्याच्या प्रयोजनाने करीत आहोत. या ठिकाणी 'तत्त्वमसि' महावाक्याचे निरूपण सुरू आहे. वेदांताच्या अंतरंग साधनांपैकी हे चौथे आणि शेवटचे साधन आहे. याला 'तत्–त्वम् पदार्थ शोधन' असे म्हणतात. या आधी श्रवण, मनन, निदिध्यासन ही तीन साधने आहेत. ही तीन साधने पूर्ण झाल्यावरच, चौथे म्हणजे 'तत् त्वम् पदार्थ शोधन' हे साधन करता येईल. पूर्वीची तीन साधने अंगीभूत नसतील, तर महावाक्य निरूपण नीट समजणार नाही. ज्याअर्थी तुम्ही येथे बसले आहात, त्याअर्थी त्या तीन साधना अंगीभूत झाल्या आहेत, असे समजून बोलावे लागते.

खरे पाहिले तर त्या तीन साधना पूर्ण होणे दूरच, कार्यामध्येच अनेक जण अडकलेले आहेत. विक्षेप आणि आवरण या अविद्येच्या प्रमुख दोन शक्ति आहेत. विक्षेप म्हणजे कार्य. मुंगी ते ब्रह्मदेव हे कार्य आहे. जीवाला कार्यातून काढण्यातच श्रीगुरूंची वेळ जाते, तर मग आवरण काढायचे केव्हा? वेळ कमी आहे. नको ते उद्योग सोडून द्या. तुम्ही दिवसभर केवळ व्यवहार करता, त्यागाचा विचार कधी करता का? असे हत्यार तुम्ही शोधले आहे का ज्याचा वार करून जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होता येईल? असे तंत्र तुम्ही शोधले का? परमार्थ हे वस्तूतंत्र आहे, पुरुषतंत्र आहे, स्वतंत्र आहे. हे तंत्र प्रत्येकाने स्वतःच वापरायचे असते. परमार्थ कोण करणार? फक्त महाराजांनीच करायचा? खरी गरज तर साधकाला आहे. सिद्ध पुरुषाला परमार्थ करण्याची गरजच काय?

लोकांचे चेहरे पाहूनच हे लक्षात येते की त्यांच्याकडून त्याग होत नाही. अंतसमयी तरी हा विषय कळून घ्या. तेव्हा तरी हे लक्षात घ्या. तुम्ही मेल्यावर नातलग तुम्हांला जाळतील आणि तुमच्याच घरात तुमचा फोटो टांगतील. पुढची पिढी तो फोटोही ठेवणार नाही. काढून टाकतील. हेच सत्य आहे. मला सांगा तुमच्या आजोबांचा फोटो तुमच्या घरात आहे का? पणजोबांचा आहे का? नाही. पण जोपर्यंत मनुष्य जिवंत असतो तोपर्यंत असे एकमेकांना दाखवित राहतो की, 'तुम्हीच माझ्यासाठी सर्वकाही आहात'. अशाप्रकारे एकमेकांना मोहात गुंतवणे यालाच जग असे म्हणतात. 'हे असेच असते. असेच करावे लागते', असे एकमेकांना सांगत राहणे सुरू आहे.

माता, पिता, बंधू, भगिनी इत्यादी सर्व पदार्थ का भुलवतात? लहानपणी खेळण्यात रमतो. तरुणपणात तरुणीत अडकतो. म्हातारपणी नातवंडात गुंततो. गुंतू नका. ते वाटोळे करतील. नातू = न + आतू = जो आतमध्ये (आत्म्याकडे)जाऊ देत नाही तो. नातं = न + आत = जे आत (आत्म्याकडे) येऊ देत नाही ते. नातवंडांच्या अतिशय मोहात दुर्दशा होते.

म्हातारपण हीच तर मनुष्यदेहातील शेवटची अवस्था आहे. कमीत कमी या अवस्थेत तरी सावध व्हा. स्वतःचे परीक्षण नीट सूक्ष्मपणे करा. जन्म वाया चालला आहे, याचे भान राहत नाही. पण ते ठेवण्याचा प्रयत्न करा. तसेच अन्न–धन–मानात अडकू नका. जो यांच्यामध्ये जीवाने अडकत नाही, त्याचा हा विषय आहे. स्थूलदेहाने देखील त्यांच्यामध्ये अडकायचे नाही.

अशाप्रकारे, मायाकार्यानेच प्रत्येकाचे हाल झाले आहेत. तर मग माया–मूळकारणापर्यंत आपण केव्हा पोहोचणार? याचा अभ्यास राहिला दूर. मृगजळामध्ये पोहण्यातच प्रत्येकजण मग्न आहे. सूर्याचा विचारच करीत नाहीत. मृगजळाचे तळे किती खोल आहे? तळ्याच्या पाण्यावर साळी लावू की केळी लावू? या विचारातच सर्वजण अडकलेले दिसतात.

त्याप्रमाणेच, घरदार प्रपंच कसा चालवायचा? असाच विचार आणि व्यवहार सर्वत्र दिसतो. तर मग हे सर्व करायचे नाही का? करायचे. पण जीवाने त्याग करून करायचे. या सर्वातून जीव काढला, तरच त्याग न करता त्याग घडतो. याप्रमाणे त्याग घडला, तर घरदार प्रपंचात राहूनही ते बंधनकारक होत नाहीत. हे त्यागाचे श्रेष्ठ वर्म आहे.

तिसरा प्रपंच म्हणजे कारणप्रपंच. ज्यामुळे जीव झाला आणि जीवत्व आले, त्याला कारण असे म्हणतात. हा प्रपंच मोठा आहे, व्यापक आहे, पण गुप्त आहे. पंचमहाभूतांपैकी वायू आणि आकाश दिसत नाहीत. कारण ते व्यापक आहेत. पंचीकृत पंचमहाभूतात्मक प्रपंच इंद्रियांना गोचर आहे. अपंचीकृत पंचमहाभूतात्मक प्रपंच अगोचर आहे. त्याहीपेक्षा कारणप्रपंच अत्यंत गुप्त असून दुर्गम आहे.

प्रमाण –

**शरीरद्वय कारणम् आत्मा अज्ञानम ।**

– श्री आद्य शंकराचार्यकृत पंचीकरण

ज्यामुळे आत्म्याचे अज्ञान असून सूक्ष्म आणि स्थूल या दोन शरीरांची उत्पत्ती होते त्याला कारणदेह असे म्हणतात.

कारण प्रपंच कसा सोडावा? जर तुम्हांला कोणी म्हटले, 'पंतप्रधानपदाचा राजीनामा द्या'. तर तुम्ही राजीनामा द्याल की नाही? अहो! तुम्ही पंतप्रधान नाहीत. त्यामुळे राजीनाम्याचा प्रश्न नाही. पण, तुम्ही स्वतःला पंतप्रधान भ्रमाने मानत असाल, तर तुमचा राजीनामा कोणीही घेऊ शकत नाही. समजा, तुमच्या घराखाली शंभर फूटांवर खजिना लपविलेला आहे. पण, तुम्हांला त्याबद्दल माहिती नाही. कोणी तुम्हांला म्हणाले, 'मला तो खजिना द्या, अर्धा खजिना तरी द्या'. तुम्ही काय बोलणार? तुम्हांला तर खजिन्याचा तपासच नाही. तुम्हांला खजिन्याची अनोळख आहे. मग देण्याचा प्रश्न येतो कुठे?

त्याप्रमाणे, जगाला कारणदेहाची म्हणजेच अज्ञानाची अनोळख आहे. म्हणून

अज्ञान त्यागा, अज्ञान सोडा असे सांगण्याचा प्रश्नच येत नाही. साधूला अज्ञानाची ओळख

असते आणि आपल्याला अज्ञानाची अनोळख आहे. दोघांमध्ये असा फरक आहे.

साधू अद्वैत वेदांताच्या सिद्धांतात प्रतिष्ठित असल्यामुळे त्यांच्या ठिकाणी अज्ञानच नाही. अशाप्रकारे विचार केला, तर साधूच्या ठिकाणी अज्ञानाचा थांगपत्ता नाही. अज्ञान त्यांच्या ठिकाणी निर्णयांती सिद्ध झालेले नाही. आपल्याला तर याचाच तपास नाही की अज्ञान कशाला म्हणतात. साधूला 'अज्ञान नाही' असे अज्ञानाच्या ओळखीने आहे व आपल्याला 'अज्ञान नाही' असे अज्ञानाच्या अनोळखीने आहे. म्हणजे आपल्याला अज्ञानाचेही अज्ञान आहे. कोणाला जर विचारले, 'अज्ञान म्हणजे काय?' तर भलतेच प्रश्न तयार होतात. तोच उलट आपल्याला प्रश्न विचारतो, 'कशाचे अज्ञान?' मग काय सांगावे त्याला?

तुम्हांला अज्ञान आहे की नाही? जर तुम्हांला अज्ञान नसेल, तर मग एक तर तुम्ही साधू आहात अथवा मूर्ख आहात. तुम्हांला अज्ञान कळले का? कळले असेल तर त्यागाचा प्रश्न. मूळ अज्ञान आणि तूळ अज्ञान असे अज्ञानाचे दोन भाग आहेत. मूळ अज्ञान म्हणजे स्वरूपाचे अज्ञान. मूळ अज्ञानापासून सूक्ष्म आणि स्थूलप्रपंच झाले आहेत. स्थूलप्रपंच आणि सूक्ष्मप्रपंच अज्ञानाचे कार्य आहे. स्थूल, सूक्ष्मप्रपंचांचे आणि त्यातील पदार्थांचे अज्ञान म्हणजे तूळ अज्ञान.

तुम्ही इथे का बसले आहात? तुम्ही इथे आलात की मी बोलावले? इथे येण्याला कारण काय? अशा विचाराला कार्य–कारणमीमांसा असे म्हणतात. सुरुवातीला स्थूल, सूक्ष्मप्रपंचांची मीमांसा करणे गरजेचे आहे. उदाहरणार्थ – डोळ्याची पापणी का हालते? कशामुळे? याचे उत्तर दिले, तर ते उत्तर वाचून बोलत आहात की अनुभवात आणून बोलत आहात? स्थूलशरीर हालण्यासाठी प्राण निमित्त आहे. त्याहीपुढे शरीरामध्ये स्थूल, सूक्ष्म पातळींवर हालचालींसाठी खरे कारण म्हणजे 'संस्कार'. साधू ओळखून घेतो की हे सर्व का सुरू आहे. त्यातला किती भाग स्वतःवर अवलंबून आहे, हे तो जाणून असतो. इच्छा प्रारब्ध, अनिच्छा प्रारब्ध, परेच्छा प्रारब्ध असे प्रारब्धाचे तीन प्रकार साधूला व्यवस्थित माहीत असतात. म्हणून तो स्थिर असतो. एखाद्याला रात्री उठवून विचारले, 'तू कोण आहेस?' तर उत्तर मिळते, 'राम देशपांडे'. हे चुकीचे दृढ आहे. तुमचा हाच अनुभव आहे. तुमचे हेच पक्के आहे. पहाटे तीन वाजता उठवून जर एखाद्याने विचारले, 'तू कोण आहेस?' तर त्याला उत्तर द्यावे, 'हा देह मी नाही'. जरी तसे वाटत नसले तरीही.

या दोन्हीही देहांना कोण चालवतो? आत्म्याच्या सत्तेवर 'संस्कार' या देहांना चालवतात. पूर्व संस्कारानुरूप देह हालल्याने होणाऱ्या क्रियेतून पुढचे संस्कार तयार होतात. पुढे या संस्कारानुरूप देह प्राप्त होतात. या संस्कारानुरूप होणाऱ्या वासनेचा देह म्हणजेच सूक्ष्मदेह. जर सूक्ष्मदेह डुकराचा असेल तर स्थूलदेहही त्याचाच तयार होतो. मग त्या देहानुरूप क्रिया होतात. अशाप्रकारे, पूर्व पूर्व संस्कारामुळे उत्तर उत्तर देहांची प्राप्ती होते व जन्ममरणाचे संसार चक्र सुरू राहते. या चक्रात मनुष्यदेहात आल्यानंतर हुशार मानले गेलेले

लोकही चांगले की वाईट, पाप की पुण्य यांचा विचार करण्यातच मरून जातांना आढळतात. फक्त जगण्यातच मग्न असणाऱ्यांचा तर येथे विषयच नाही. या सर्वांचेच मूळ कारण आपण शोधणार केव्हा ?



संस्कार निर्माण होण्याला मूळ कारण म्हणजे अविद्या. अविद्येची एक शक्ति म्हणजे 'आवरण'. ती कशावर आवरण टाकते? त्याचा आपल्याला विचार करणे आहे. ती ज्याच्यावर आवरण टाकते तेथे विक्षेपही तयार करते. 'विक्षेप' ही अविद्येची दुसरी शक्ति. अविद्या ब्रह्मावर आवरण टाकते का ? टाकते तर कशी टाकते ?

सूर्याला ढग झाकतात. हे खरे आहे का ? बरं! आपण काय पाहतो ? सूर्य झाकला गेला आहे. पृथ्वीशी आपला संबंध असल्यामुळे आपल्याला हे खरेच वाटते. पृथ्वीशी संबंध सोडला, ढगांच्या पलीकडे आपण विचार करू लागलो तर सत्य लक्षात येते.

ज्या क्षणाला अविद्या आपल्या आवरणशक्तीने आत्म्याला झाकते, त्या क्षणापासून आत्म्यालाच 'जीव' असे म्हणतात. हे असे नेमके कधी घडले याचा विचार सध्या बाजूला राहू द्या. या ठिकाणी हे घडलेले आहे, हेच प्रथम लक्षात घ्या. मग, आता काय करावे ? याचा विचार करणे गरजेचे आहे. या अविद्येने आवरण टाकले की लगेचच विक्षेप तयार होतो. पण, असे कसे ? समजा, बीज मातीने झाकले, पाणी दिले आणि पोषक वातावरण मिळाले तर बीज फुटते. बीज फक्त मातीवर टाकले, तर ते फुटणार नाही. जेव्हा झाकले तेव्हा ते फुटते. अविद्येच्या आवरणरूपी मातीने आत्मारूपी बीजाला झाकले की ते बीज जीवरूपाने फुटते. बीजाला जसे अंकुर फुटून पाने, फुले, फळे इत्यादी तयार होतात. तसेच आत्मारूपी बीजापासून सूक्ष्म, स्थूलदेह तयार होतात. हीच अविद्येची विक्षेपशक्ती होय.

ज्या अविद्येच्या संपर्काने विक्षेप तयार होतो, ती अविद्या नेमकी कशी आहे ? याचा थांगपत्ता लागत नाही. त्या अविद्येने आत्म्याला खरेच झाकले आहे की नाही ? हेच कळत नाही. आपण मनुष्य, आई, आजोबा असले नाते लगेच सांगतो. मात्र, अविद्येची ऐपत काय हेच आपल्याला कळत नाही. 'अंतःकरणविशिष्ट चैतन्य', 'अविद्योपहित चैतन्य', 'अविद्या प्रतिबिंबित चैतन्य' याप्रकारे जीवाच्या अनेक व्याख्या आहेत. सर्वसाधारण माणसांना अविद्या ही विशेषण, उपाधी किंवा उपलक्षण यांपैकी कोणत्या संबंधाने आहे हेच माहीत नाही. ही अविद्या कशी आहे ? ऐकून, वाचून ज्यांना माहिती आहे, त्यांना तरी ती संपूर्णपणे कळते का ? त्याग करण्यासाठी अविद्येची खरी अवस्था कळावी लागते. आपण संसारात गुरफटलेले आहोत, म्हणून अज्ञान अर्थात अविद्या मानावीच लागते. प्रपंच खरा वाटणे हेच अज्ञान होय.

प्रमाण –

अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हें विज्ञान ।
तेथ सत्यबुद्धी तें अज्ञान । हेंही जाण ।। ६ ।।अध्याय ७।।

– श्रीज्ञानेश्वरी

प्रत्येकाची विक्षेपावर सत्यत्व बुद्धी आहे. 'सूर्याला ढगाने झाकले' या उदाहरणात 'झाकले'वर सत्यत्व बुद्धी आहे का? 'ढगाने सूर्याला झाकले' या गोष्टीला सत्यत्व दिले तर ढग बाजूला हटविण्याचा प्रयत्न होईल. नव्हे तो करावाच लागेल. अविद्येने आत्म्याला झाकले असे समजले तर विक्षेप होऊन सुख-दुःखापायी धावपळ करावी लागेल. 'अविद्येने सुखरूप आत्म्याला झाकलेले आहे' या गोष्टीला पूर्वी कधीतरी सत्यत्व दिल्यामुळेच आज प्रत्येकजण स्थूल, सूक्ष्म पदार्थांमधून सुख मिळवू पाहत आहेत. 'अविद्येने सुखरूप आत्म्याला झाकलेले आहे' हे सत्य वाटत नसेल तर अशी स्थिती ठीक आहे. तीच साधूची स्थिती असते.

या ठिकाणी आपला जहताजहती लक्षणेचा विचार सुरू आहे. यात काही त्यागायचे असते व काही स्वीकारायचे असते. सध्या काय काय त्यागावे? याचा आपण विचार करत आहोत.

ज्या अविद्येमुळे आत्मा झाकला, त्याच अविद्येने पुढे जीव कसा लोपविला हे कळले पाहिजे. तुमचा अविद्येशी संबंध कसा आहे? विशेषण रूपाने आहे, उपाधी रूपाने आहे का उपलक्षण रूपाने आहे? विशेषण म्हणजे तादात्म्य पावणे, एकरूप होणे. पाण्यामध्ये लाल रंग टाकला तर तो वेगळा करता येत नाही. तो पाण्याशी एकरूप होतो. पाण्याचे गुणधर्म रंगाला व रंगाचे गुणधर्म पाण्याला येतात. क्षीर की नीर म्हणजे दूध की पाणी? असे दूध व पाणी एकत्र झाल्यावर पाणी कोणते आणि दूध कोणते? असे ओळखता येत नाही, यालाच तादात्म्य असे म्हणतात.

जीव आत्मा आहे की अन्य काही आहे हेच साधारणपणे कळत नाही. इतर लोकांनी आपल्याला जे शिकवले ते आपण ऐकून घेतले. लोकांनी आपले नाव 'राम' ठेवले. तेच आपण सत्य समजून दृढ करून बसलो. आपल्याला कोणी विचारले-कोण आहे? तर आपण देह व त्यांच्या धर्मांशी एकरूप होऊन 'मी राम आहे', 'मी पुरुष आहे', 'मी क्रोधिष्ट आहे' असे उत्तर देतो. अविद्या विशेषण ठरल्यामुळे आपली अशी अवस्था झाली. अविद्येशी तादात्म्य असल्यामुळे, पुढचा अविद्याकार्य स्थूल, सूक्ष्म प्रपंचही तादात्म्यातच चालला आहे. 'मूळ प्रपंच'च तादात्म्यात चालला आहे, म्हणून बाकीचे तादात्म्यातच चालले आहे. एवढेच नव्हे तर परमार्थ करणेही तादात्म्यात राहूनच आहे. मूळ अविद्येशी तादात्म्य, म्हणून बायको, मुले, संपत्ती इत्यादींशी तादात्म्य. अविद्येशी तादात्म्य तोडले, तर स्थूल, सूक्ष्म प्रपंचाला कोणी विचारत नाही. पण अविद्येशी जीवाभावाचा संबंध असल्यामुळे तिला सोडायची इच्छा होत नाही. पुढे तिच्या कार्यातूनही बाहेर पडण्याची इच्छा होत नाही. तुम्हांला आपले नाम-रूपात्मक अस्तित्व विवेकाने त्यागावे असे वाटते काय? मग, त्यासाठी अविद्येशी असलेले तादात्म्य घालविण्याचा पहिल्यांदा प्रयत्न करा. येथे वेदांत सुरू होतो.

उदाहरणातील सूर्य आणि ढग यांमध्ये ढग केवढा व सूर्य केवढा? या ढगाने खरेच सूर्याला झाकले, असे जो समजतो त्याच्यासाठी ढग सूर्याचे विशेषण ठरते. 'सूर्यच नाही, ढगच आहे' अशा निर्णयावरही तो येऊ शकतो. त्याप्रमाणेच, अविद्या व आत्मा यांच्यात कोण लहान व कोण मोठा? ज्याच्यासाठी अविद्या विशेषण असते, त्याचा असा निर्णय असतो की 'आत्मा

नाहीच. केवळ राम देशपांडे, घरदार इत्यादीच आहेत. हेच खरे आहे. हे असेच चालू द्या'. जे

दिसते ते खरे म्हणजेच विशेषण.

या 'कारण' प्रपंचामध्ये विशेषणाचा त्याग कसा करावा हे शिकायला हवे. अविद्या विशेषण आहे हे कोणी ठरविले ? अनंत जन्मांपूर्वी आपणच ते ठरविले आहे. आता आपणच आपल्यात बदल करून घेऊ. आतापर्यंत अविद्येला विशेषण मानले. आता उपाधी ठरवू.

आपण वेगळे राहून जे दुसऱ्याचे ज्ञान करून देते, तिला उपाधी म्हणतात. उपधेय + उपाधी = उपहित. उदाहरणार्थ – 'दंडी पुरुष' म्हणजेच हाती दंड घेतलेला पुरुष. येथे दंड ही उपाधी आहे. पुरुष उपधेय आहे. 'दंडासह पुरुष' हे उपहित आहे. उपाधीने युक्त त्याला उपहित म्हणतात. पुरुष हे उपधेय दंड या उपाधीने युक्त असल्यामुळे 'दंडी पुरुष' हे उपहित आहे. 'दंड' ही उपाधी पुरुषाशी एकरूप न होता, म्हणजे वेगळी राहून दंडहीन पुरुषांपासून दंडी पुरुषाला वेगळा दाखवते. उपाधी वर्तमानकाळी असते. उपाधी व्यावर्तक असते. म्हणजे वेगळे करून दाखवणारी असते. उपाधी अनन्वयी असते. म्हणजे उपाधी उपधेयाशी एकरूप होत नाही. उपाधी आपले धर्म उपधेयावर चालवत नाही. दंड आपले धर्म पुरुषावर चालवत नाही.

उपाधीची व्याख्या आत्मा आणि अविद्या यांना लावू. आता अविद्या आत्म्याला अर्थात मला उपाधी आहे, असा विचार करा. उपधेय + उपाधी = उपहित. आत्मा + अविद्या = साक्षी. 'अविद्या' ही उपाधी आत्म्यापासून वेगळी राहून आत्म्याचे ज्ञान करून देते. अविद्या आपले धर्म आत्म्यावर चालवत नाही. काही साधू या स्थितीवर असतात, याला साक्षीभाव असे म्हणतात. अविद्या उपाधी ठरली तर आत्मा आणि अविद्या यांमध्ये संसर्ग अध्यास असतो, तादात्म्य अध्यास नसतो. आता घर, बायको, पोरे इत्यादींशी संसर्ग राहिल, तादात्म्य नाही.

उपाधीच्या पुढची गोष्ट म्हणजे 'उपलक्षण'. जे ज्याच्या एक देशाचे ठिकाणी असून काही काळ असते आणि व्यावर्तक असते, त्याला 'उपलक्षण' म्हणतात. उपलक्ष्य + उपलक्षण = उपलक्षित. उदाहणार्थ – 'कावळा बसलेले ते देवदत्ताचे घर आहे'. येथे कावळा हे उपलक्षण आहे. घर हे उपलक्ष्य आहे आणि 'कावळा बसलेले देवदत्ताचे घर' हे उपलक्षित आहे. म्हणजे घर + कावळा = कावळा बसलेले देवदत्ताचे घर.

उपलक्षण व्यावर्तक असते. इतर घरांपासून वेगळे असे 'कावळा बसलेले देवदत्ताचे घर' आहे. उपलक्षण आपले धर्म उपलक्ष्यावर चालवत नाही. उपलक्षण काही काळ असते. म्हणजे वर्तमान काळात ते असते. भूतकाळात, भविष्यकाळात ते नसले तरी चालते. 'कावळा बसलेले ते देवदत्ताचे घर आहे' असे दाखविल्यानंतर कावळा जरी उडून गेला तरी देवदत्ताचे घर कोणते हे पूर्वीच माहीत झालेले असल्यामुळे त्याचे घर सापडण्यास अडचण येत नाही.

आता अविद्या मला उपलक्षण आहे असा विचार करा. उपलक्षणाची व्याख्या आत्मा आणि अविद्या यांना लावू. उपलक्ष्य + उपलक्षण = उपलक्षित. त्याचप्रमाणे, आत्मा + अविद्या = कूटस्थ. अविद्या ही वेगळी राहून आत्म्याची ओळख करून देते. अविद्या आपले धर्म आत्म्यावर चालवित नाही. अविद्या जर उडाली तर आत्मा = कूटस्थ असे होते.

म्हणजेच, कूटस्थाशी कावळ्याप्रमाणे संबंध असलेली अविद्या गेली तर कूटस्थच आत्मा

ठरतो. नव्हे ती गेली नाही तरी आत्मा व कूटस्थ एकरूपच आहेत. तात्पर्य – अविद्या ही उपलक्षण व्हावी. मग ती उडून जावो अथवा न जावो.

विशेषणाचा त्याग करावा लागतो. उपाधीचा त्याग वाटला तर करावा लागतो. परंतु, उपलक्षणचा त्याग करावाच लागत नाही. अविद्या ही उपलक्षण आहे, हे कळले तर तिचा त्याग करावाच लागत नाही. ती स्वतःच उडून जाते. ती स्वःतच्याच गुणाने उडून जाते. ती विद्यमान राहत नाही. ज्याप्रमाणे, कावळा त्याच्या स्वभावानुसार उडून जातो, त्याप्रमाणेच हे घडते.

अविद्येला घालविण्याचा प्रयत्न करावा काय? तिला प्रयत्नाने घालवल्यानंतर ती माया रूपाने प्रगट होते. येथून पुढे खरी सद्गुरूंच्या कृपेची आवश्यकता असते. पण, त्याआधी येथून खालचे कोण करणार? विशेषण ठरलेल्या अविद्येला व तिच्या कार्याला उपाधी कोण करणार? प्रथम स्थूल प्रपंचाचा व नंतर सूक्ष्म प्रपंचाचा त्याग करावा. पुढे कारण प्रपंचाचा त्याग करावा. जर अविद्याकार्यांतच गुंतलेले राहाल व कारणत्यागाचा अभ्यास कराल, तर 'अविद्या विशेषण आहे' असे नुसते पाठ होईल. पुढचा बदल घडणार नाही. म्हणून, प्रथम स्थूल, सूक्ष्म प्रपंचातून बाहेर पडा. स्थूल, सूक्ष्म प्रपंचाच्या पुढे कारणप्रपंच आहे.

जहताजहती लक्षणेत त्याग आणि स्वीकार करायचा असतो. अविद्येचा त्याग केव्हा होतो? याचा विचार करा.

अविद्येशी असलेला आपला संबंध आपण आपलाच बदलायचा आहे. आपण देहांना 'मी' समजत होतो. सुरूवातीला, 'मी' देह नाही' व पुढे जाऊन 'ते देह माझे नाहीत' असे कळावे. जेव्हा आपण देह वापरतो तेव्हा संसर्ग आहे, तादात्म्य नाही हे लक्षात ठेवावे. जेव्हा देहालाच 'मी' म्हणतो तेव्हा तादात्म्य असते आणि जेव्हा देहाला 'माझे' म्हणतो तेव्हा संसर्ग असतो. पुढे अविद्या म्हणजे काय हे कळावे. अविद्येशी आपला संबंध कसा हा त्याहीपुढचा प्रश्न आहे. अविद्या विशेषण ठरली असेल तर पुढे उपाधी ठरावी आणि त्याहीपुढे उपलक्षणच ठरावी. तेव्हा अविद्या राहत नाही. रात्र सरली की सूर्य उगवतो. त्याप्रमाणे, अविद्या उपलक्षण ठरली की आत्मसूर्याचा उदय होतो.

विशेषणाला खूप किंमत दिली जाते. 'लाल घोडा धावतो' या उदाहरणात लाल रंगाला किंमत आहे. तसेच, उपाधीलाही किंमत असते. 'दंडी पुरुष' या उदाहरणात दंडाला किंमत आहे. मात्र, उपलक्षणाला एवढी किंमत देता येत नाही. 'कावळा बसलेले ते देवदत्ताचे घर आहे' या उदाहरणात कावळ्याला किंमत देता येत नाही. तो उडून जाणार आहे. त्याप्रमाणेच, उपलक्षण ठरलेल्या अविद्येला किंमत देता येत नाही. अविद्या उडणारच आहे. किंमत न देणे म्हणजेच उपलक्षण. जर अविद्या उपलक्षण ठरली तर अविद्येलाच किंमत नसते. मग, अविद्याकार्याला का किंमत द्यावी? उदाहरणार्थ – बायकोशी कडाक्याचे भांडण झाले. तिच्याशी बोलायचे नाही असे ठरविले. तर मग तिच्याशी संबंधीत कोणाशीही बोलू नये. पण, हा तिच्यापासून झालेल्या पोरांचा लाड करतो. तिच्या प्रपंचातच गुरफटतो. त्याचप्रमाणे,

एकदा अविद्येशी भांडण झाले की मग तिच्या प्रपंचाच्या नादी लागत बसू नये. तिच्या प्रपंचात अडकून राहू नये.


अशारीतीने, या ठिकाणी कारणप्रपंचाचा त्याग गुप्तपणे उघड केला आहे. तुम्ही या वाटेने जाल तर कुठलाही धक्का न लागता भ्रम निरास होऊन तुम्हांला स्वस्वरूपाची प्राप्ती होईल. हा त्याग होण्यासाठी ईश्वर, शास्त्र व सद्गुरू तुमच्यावर कृपा करोत अशी त्यांच्या चरणी प्रार्थना करतो.

★★★★★

## चिंतन क्रमांक ४३
## विशेषण–विशेष्यभाव संबंध

जन्ममरण फेरा चुकविण्याच्या उद्देशाने 'तत्त्वमसि' या महावाक्याचा आपला अभ्यास सुरू आहे. 'तत्त्वमसि' हे वेदातील महावाक्य आहे. या वाक्याचा वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ यांचा विचार करणे अवघड आहे. 'तत्', 'त्वम्' आणि 'असि' हे तीन शब्द मिळून हे महावाक्य तयार झाले आहे. ही तिन्ही पदे अवस्था दाखवितात. या तीन पदांचा पृथकपणे आणि एकत्रित अभ्यास केला पाहिजे. महावाक्याच्या वाच्यार्थाचा अभ्यास आपण केलेला आहे. आता लक्ष्यार्थाचा विचार सुरू आहे. जहती लक्षणा आणि अजहती लक्षणा वापरून महावाक्याचा लक्ष्यार्थ लागत नाही, हे आपण जाणले. म्हणून जहताजहती लक्षणा वापरून महावाक्याचा लक्ष्यार्थ यथार्थपणे कळतो का, हे आपण पाहत आहोत. या लक्षणेचा वापर महावाक्याला करून काही त्यागायचे असते आणि काही स्वीकारायचे असते. सध्या काय त्यागायचे ? याचा विचार सुरू आहे.

साधारणपणे, स्थूलप्रपंचाचा त्याग केल्याशिवाय सूक्ष्मप्रपंचाचा त्याग होत नसतो. ज्याचा सूक्ष्मप्रपंचाचा त्याग झालेला आहे, त्याचा स्थूलप्रपंचाचा त्याग झालेलाच आहे. पण हे एवढे सोपे नाही. ऐकणे, कळणे, पटणे, वृत्तीवर बाणणे, बोलणे आणि आचरणात आणणे यामध्ये पृथ्वी–आकाश असा फरक आहे. मरण येण्याच्या आत आपल्याला या पायऱ्या साधायच्या आहेत. आपल्याकडे वेळ शिल्लक आहे फक्त एक क्षण. मिळणारा प्रत्येक क्षण आपल्यासाठी विशेष भत्ता असल्यासारखा आहे. काळ प्रत्येक क्षण मोजत बसलेला आहे.

प्रमाण –

**घडिघडी काळ वाट याची पाहे । अजुनि किती आहे अवकाश ।।**

– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

पुढच्या क्षणालाच आपला मृत्यू आहे. म्हणून, भवसिंधू पार करण्याचाच विचार सदैव करावा. त्यासाठी शास्त्र, साधू यांच्या संगतीत राहा. आपल्याला शास्त्र, साधू संगत न घडण्याचे कारण म्हणजे आपले पूर्वकर्म. शास्त्रांमध्ये गती नसण्याचे कारणही पूर्वकर्मच. कळत नकळतपणे पूर्वजन्मी साधू आणि शास्त्र यांची अवहेलना आपल्याकडून झालेली आहे. म्हणूनच असे घडते. शास्त्र आणि साधू हे आपल्यासाठी जीवलग असतील, तरच आपल्याला परमार्थात योग्य वाट सापडेल. त्यानंतर कोणता विचार करायचा ? तो आचरणात आणि अनुभवात कसा आणायचा ? हे सर्वच त्यांच्या संगतीने कळेल.

या ठिकाणी काय त्यागावे हा विषय महत्त्वाचा आहे. आपण जे जे आपले समजतो ते

ते त्यागावे. 'मी पलीकडल्या माणसाचे घर दान करतो' किंवा 'मी पलीकडल्या माणसाचे घर त्यागतो', असे म्हटले तर? अशी लबाडी चालणार नाही. दुसऱ्याच्या वस्तू त्यागण्याचा प्रश्नच येत नाही. ज्या वस्तू आपण स्वतःच्या मानतो त्यांचा त्याग करावा. उदाहरणार्थ – एखादा स्वतःच्या घराला 'माझे घर' असे दृढपणे समजत असेल, तर त्याने त्याचा त्याग करावा.

सूक्ष्मप्रपंचाचा त्याग झाला असेल, तर स्थूलप्रपंचाचा त्याग झालेलाच असतो. त्याचप्रमाणे, कारणप्रपंचाचा त्याग झाला असेल, तर सूक्ष्म आणि स्थूलप्रपंचाचा त्याग झालेलाच असतो. 'कारण'प्रपंचाचा त्याग करण्याआधी कारणप्रपंच म्हणजे नक्की काय हे कळले पाहिजे. कारण म्हणजे अविद्या. अविद्या म्हणजे ब्रह्माचे अज्ञान. खऱ्या 'विषयी'चे अज्ञान. 'मूळ अविद्या' ही अविद्येची सर्वश्रेष्ठ स्थिती आहे.

मूळ अविद्येचा त्याग करणार कसा? त्यासाठी आपला अविद्येशी संबध कसा आहे, हे प्रथम जाणून घेतले पाहिजे. त्यानंतर अविद्येचा त्याग करता येईल. अविद्येचा संबंध ही एक गोष्ट आणि अविद्येचा त्याग ही वेगळी गोष्ट. समजा, कोणाला सर्दी झाली. प्रथम शरीराशी सर्दीचा संबंध कसा आहे हे नीट जाणून घ्यावे. त्यानंतर औषधांची उपाय योजना आणि विशिष्ट पथ्य पाळले, तर सर्दीचा त्याग होतो. एखाद्याच्या अंगात ताप भरला असेल, तर प्रथम तापाचा शरीराशी संबंध जाणून घेऊन, त्याप्रमाणे उपाय योजना केल्याने तापाचा त्याग होतो. जसा संबंध, तसा त्याग. संबंधानुसार प्रक्रिया भिन्न भिन्न असतात. अविद्येशी आपला संबंध कसा? विशेषण रूपाने, उपाधी संबंधाने की उपलक्षण रूपाने. त्याचा शोध घेऊन, मग योग्य त्याप्रकारे त्याग करावा.

**(येथे चिंतन क्रमांक –२५ मधील संदर्भ वाचावा.)**

जीवाची एक व्याख्या – 'अंतःकरणविशिष्टं चैतन्यम्' अशी आहे. उदाहरणार्थ – लाल + घोडा = लाल घोडा. 'घोडा' हे विशेष्य आहे. 'लाल' हे विशेषण आहे. 'लाल घोडा' हे विशिष्ट आहे. विशेषणाने युक्त त्याला विशिष्ट म्हणावे. 'घोडा' हे विशेष्य 'लाल' या विशेषणाने युक्त असल्यामुळे 'लाल घोडा' हे विशिष्ट आहे. विशेषण हे कार्यान्वयी असते. म्हणजेच, 'लाल' हे विशेषण 'घोडा' या विशेष्याशी एकरूप असते. लाल या रंगाचा घोड्यात अन्वय आहे. विशेषण वर्तमानकाळी असते. विशेषण व्यावर्तक असते. म्हणजे वेगळे करून दाखवणारे असते. 'लाल' हे विशेषण 'घोडा' या विशेष्याशी एकरूप राहून इतर रंगांच्या घोड्यांपासून 'लाल घोड्याला' वेगळे दाखविते. विशेषण आपले धर्म विशेष्यावर चालविते. 'लाल' हे विशेषण 'घोडा' या विशेष्यावर 'लालपणा' किंवा 'लाल रंग' हा धर्म चालविते.

आता, विशेषणाची ही व्याख्या आत्मा आणि अविद्या यांना लावू. विशेष्य + विशेषण = विशिष्ट. आत्मा + अविद्या = जीव. 'अविद्या' हे विशेषण 'आत्मा' या विशेष्याशी एकरूप राहून आपल्या धर्मांसह म्हणजे अविद्येप्रमाणे आत्म्याचे ज्ञान करून देते. 'अविद्या' हे आत्म्याचे विशेषण ठरले, तर त्या मनुष्याचा आत्म्याच्या ठिकाणी 'जीव' असा व्यवहार होतो. तात्पर्य – अविद्या आत्म्याचे विशेषण ठरले, तर आत्म्याची बद्ध अवस्था दिसते.

विशेषण हे कार्यान्वयी असते. परंतु, उपाधी ही कार्यान्वयी नसते. उपधेय + उपाधी = उपहित. आपण वेगळे राहून जे दुसऱ्याचे ज्ञान करून देते, त्यास उपाधी म्हणतात. उपाधी आपले धर्म उपधेयावर चालवत नाही. आत्मा + अविद्या = साक्षी. 'अविद्या' ही उपाधी 'आत्मा' या उपधेयापासून वेगळी राहून आत्म्याचे 'साक्षी' म्हणून ज्ञान करून देते. तात्पर्य – अविद्या आत्म्याची उपाधी ठरली, तर आत्म्याची मुक्त अवस्था दिसते.



उपलक्षण देखील व्यावर्तक असते आणि भूत, वर्तमान, भविष्य तिन्ही काळात असू शकते. उपलक्ष्य + उपलक्षण = उपलक्षित. उपलक्षण आपले धर्म उपलक्ष्यावर चालवत नाही. आत्मा + अविद्या = आत्मा (कूटस्थरूप). 'अविद्या' आपले धर्म आत्म्यावर चालवत नाही. त्यामुळे, 'अविद्या' गेली व न गेली तरी समीकरण आत्मा = आत्मा असेच होते.

तुम्हांला अविद्या आहे का? असेल तर त्यागण्याचा प्रश्न. तुम्हांला अविद्येची जाणीव जरी असली तरी कोणत्या अविद्येची जाणीव आहे? मूळ अविद्येची की तूळ अविद्येची?

स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचाचे अज्ञान म्हणजे तूळ अविद्या. मनुष्य याच प्रपंचाचा विचार करण्यामध्ये गुंतलेला असतो. जिलेबी कशी बनवायची? तूळ अविद्या. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या चरित्रातील घटनांचे क्रम न कळणे आणि मग विश्लेषण करत बसणे – तूळ अविद्या. भगवान श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या ग्रंथांचा कवित्व, समाजशास्त्र, साहित्यशास्त्रानुसार अर्थ लावणे – तूळ अविद्या. हे जे व्यासंगी, समाज सुधारक, इतिहास संशोधक, साहित्यिक, कवी, संगीततज्ञ इत्यादी लोक असतात ते जास्तीत जास्त सूक्ष्मदेहाच्या मूळापर्यंत जाऊ शकतात. त्याच्या पलीकडे हे लोक जाऊ शकत नाहीत.

तसेच, गणपतीची मूर्ती अशीच का? इंद्र पाऊस पाडतो का? इत्यादी अनेक प्रकारची ही तूळ अविद्या आहे. कोणी महाराजांना विचारतो, 'तुम्ही वैकुंठ पाहिला आहे का?'. महाराज जर 'नाही' म्हणाले तर तो विचार करतो की, 'काय उपयोग या महाराजांचा?'. अहो! ब्रह्मदेवाच्या अज्ञानापर्यंत सगळी तूळ अविद्याच आहे. म्हणून, मातीपासून ते ब्रह्मदेवापर्यंतच्या पदार्थांचे ज्ञान करून घेऊनही पारमार्थिक उपयोग नाही, हे लक्षात घ्या. कोणाकोणाला अविद्या आहे? जी आहे ती कशी आहे? अविद्या विशेषण असेल, तर विचार आणि व्यवहार कसा होईल? विशेषण हे वर्तमानकाळी, कार्यान्वयी आणि व्यावर्तक म्हणजे वेगळे करून दाखवणारे असते.

एकदा एका मंदिराच्या प्रांगणात स्वतःला पारमार्थिक समजणाऱ्या काही स्त्रियांशी माझा संवाद झाला. त्यामधील स्वतःला श्रेष्ठ समजणारी स्त्री म्हणाली, 'मी या बायांना घेऊन तीर्थस्नानाला गेले. नदीत गेल्यावर मी एका बाईचे मुंडके पाण्याखाली दाबले. मी सुद्धा पाण्याखाली गेले. मुंडके सोडल्यावर तिने पाण्यातून डोके वर काढले. पाण्याच्या आत माझ्या ठिकाणी तिला पार्वती दिसली. खोटे वाटत असेल तर विचारा या बायांना'. तिला असे म्हणायचे होते की, 'तिने पार्वतीरूपाने त्या स्त्रीला दर्शन दिले'. परमार्थात कोण काय घेऊन बसेल हे सांगता येत नाही. त्या स्त्रियांना अविद्या व तिचा संबंध यांचा कसलाही गंध नाही. या

स्त्रियांना अविद्या ही विशेषण आहे. भलत्याच प्रपंचात त्या गुंतून पडल्या आहेत. परमार्थाच्या नावाखाली जगामध्ये अनेक प्रकारे फसवणूकच जास्त प्रमाणात चालत आहे.



एखादा परमार्थाबद्दल पूर्वदुराग्रह घेऊन चिंतन ऐकत असेल आणि महाराजांचे बोल त्याच्या दुराग्रहांविरुद्ध असेल, तर त्याचा महाराजांवरचा विश्वास जातो. हे पूर्वदुराग्रह काढणे फार अवघड आहे. साधारणपणे कोणाचे पूर्वदुराग्रह जातात? २५–३० श्रोते रोज महाराजांसमोर बसून श्रवण करतात. समजा, ही संख्या १००० पर्यंत वाढली, तर त्यांपैकी अंदाजे एकाचा पूर्वदुराग्रह जाईल. आणखी १००० श्रोते वाढले, तर त्यांपैकी एकाचा पूर्वदुराग्रह जाईल. हजारांपैकी पूर्वदुराग्रह गेलेला तो एक मनुष्य म्हणजे तुम्हीच – असा सकारात्मक विचार करा.

तुमच्यापैकी कोणाला असे वाटते की 'मी ईश्वर आहे'. आहे का ? नाही का ? तुम्ही ईश्वर नाही. हे तुम्हांला ठामपणे माहीत आहे. म्हणजे तुम्ही ईश्वराला व्यावर्तक करणारे ठरले. 'मी ईश्वरापासून वेगळा' असा तुमचा निश्चय आहे. म्हणून, तुम्ही व्यावर्तक ठरले. जे पुरुष आहेत त्यांना असे वाटते का 'मी स्त्री आहे' ?. नाही वाटत. पुरुष हे स्त्री व्यावर्तक ठरले. स्त्री ही पुरुष व्यावर्तक ठरली. दोघांनी एकमेकांना एकमेकांपासून व्यावृत्त केले. आपण अन्यापासून अन्य आहोत असे प्रत्येकाला वाटते. आपली ओळख वेगळी. आपण वेगळे काहीतरी रसायन आहोत. आपण 'हे'ही नाही आणि 'ते'ही नाही, वेगळे आहोत. 'आपण वेगळे', 'महाराज वेगळे' आणि 'देव वेगळा' अशाप्रकारे आपण आपली सगळ्यांपासून व्यावृत्ती करतो.

'दंडी पुरुष' या उदाहरणात ज्याच्या हाती काठी नाही, त्यांच्यापासून हाती काठी असलेला पुरुष वेगळा दिसून येतो. 'लाल घोडा' या उदाहरणात ज्यांचा रंग लाल नाही, त्यांच्यापासून लाल रंग असलेला घोडा वेगळा दिसून येतो. विशेषण आणि उपाधी दोन्ही वर्तमानकाली आणि अन्यव्यावर्तक असतात. विशेषण आणि उपाधी यांमध्ये फरक असा की विशेषण हे कार्यान्वयी असते व उपाधी ही कार्यान्वयी नसते. अविद्या विशेषण ठरली तर तादात्म्याचा निश्चय होतो. अविद्या उपाधी ठरली तर 'संसर्गाचा' निश्चय होतो.

स्थूलप्रपंच आणि सूक्ष्मप्रपंच हे मूळ अविद्याकार्य आहे. अविद्या एखाद्याला विशेषण ठरली हे त्याच्या स्थूलप्रपंचातील व्यवहार पाहून कसे ठरवायचे ? मुलाबाळांत जीव आहे की नाही हे केव्हा कळते ? योग्य वेळ आली की कळते. स्थूलप्रपंचाशी तादात्म्य असेल, तर अविद्या ही विशेषण ठरते.

एखाद्या मनुष्याचे सूक्ष्मप्रपंचाशी तादात्म्य आहे की नाही हे कळणे अवघड आहे. जेव्हा तुम्हांला क्रोध येतो तेव्हा तुम्ही क्रोधाशी एकरूप असता की नसता ? जेव्हा आपण स्थिर असतो, जेव्हा वृत्तीचा अतिरेक नसतो तेव्हा आपल्याला सूक्ष्मप्रपंचाशी असलेले आपले तादात्म्य कळते.

एखाद्या माणसाबद्दल समाजात अशी समज असते की तो शांत स्वभावाचा आहे. जेव्हा तो शांत बसलेला असतो, रागवत नाही, तेव्हा त्याला डिवचून बघा. त्याचा क्रोध

उफाळून आला की कळेल त्याचे सूक्ष्मप्रपंचाशी तादात्म्य आहे किंवा नाही.



एखाद्याला काळा, गोरा, ठेंगणा, राम देशपांडे इत्यादी म्हणणे हे सर्व स्थूलप्रपंचातले डिवचणे आहे. चांगला, वाईट, प्रेमळ, क्रोधिष्ट, सुखी, दुःखी, पापी, पुण्यवान इत्यादी म्हणणे हे सर्व सूक्ष्मप्रपंचातील डिवचणे आहे.

तुम्ही मूळ अविद्येने कधी डिवचले गेले आहात का, म्हणजेच तुम्ही कारणप्रपंचामध्ये कधी डिवचले गेले आहात का? कसे डिवचले जाणार? तुम्ही स्थूलप्रपंच, सूक्ष्मप्रपंचांमध्येच तादात्म्य होऊन गुंतलेले आहात. कारणप्रपंचाचा तुम्हांला तपास नाही. जो अविद्याकार्याशी तादात्म्य पावलेला असतो, त्याला अविद्येशी घेणेदेणे नसते.

'मी कोण हे मला माहीत नाही' म्हणजेच 'मूळ अविद्या'. 'मला माझेच ज्ञान नाही' म्हणजेच मूळ अविद्या. 'मी देव नाही' म्हणजेच मूळ अविद्या. 'मी ब्रह्म नाही' म्हणजेच मूळ अविद्या. या मूळ अविद्येशी तुम्ही कधी तादात्म्य पावले आहात काय? तुम्ही 'माझेच मला ज्ञान नाही' या जाणीवेने कासावीस झाले आहात काय? तुम्हांला 'स्व'स्वरूपाविषयी प्रचंड तळमळ वाटते का? 'माझेच मला अज्ञान आहे' असे जेव्हा प्रकर्षाने तुम्हांला जाणवेल, त्या जाणीवेशी जेव्हा तुमची एकरूपता असेल, तेव्हा तुमचे मूळ अविद्येशी तादात्म्य आहे असे समजावे. मूळ अविद्येशी तादात्म्य असलेल्या मनुष्याला स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचांशी काही घेणेदेणे नसते. त्याच्याजवळ एक वा अनेक पदार्थ असो अथवा नसो त्याला त्याबद्दल काही वाटत नाही.

आपण मूळ अविद्येमुळे डिवचले गेलो पाहिजे. 'मी ब्रह्म नाही' असे ठामपणे वाटणे म्हणजेच मूळ अविद्या. 'मी देव नाही' या जाणीवेने आपल्याला त्रास होतो का? उलट 'मी अनेक देव–देवतांची पूजा करीन' असा संकल्प साधक करतो. असे केले म्हणजे तुम्ही देवांचे पशू ठरले. खाली घसरले.

'चराचराला व्यापून राहणारा मी' असे आपल्याला वाटते का? 'सर्व जगाला अधिष्ठान मी' असे आपल्याला वाटते का? उलट 'मला गावात मान कसा मिळेल' इकडेच आपले लक्ष असते. 'मी त्रैलोक्य–सत्तावान आहे असे वाटते का?' हो. पूर्वी आपण तसे होतो. पण, आता तसे राहिलो नाही. एवढे तरी कळते का? 'मी त्रिलोकाला अधिष्ठान होतो. आता देहापूरता मर्यादित झालो'. याची खंत वाटते का?

एखाद्या माणसामध्ये क्रोध प्रकट झाला म्हणजे त्याचे स्थूल, सूक्ष्मदेह क्रोधाने व्यापले की हात, पाय थरथर कापतात, डोळे लाल होतात. त्याप्रमाणेच, जो मनुष्य मूळ अविद्येशी तादात्म्य पावतो, त्याच्यामध्ये अविद्येचा संचार होतो. उठता–बसता, जागे झाल्यापासून झोपेपर्यंत, 'मी स्वतःला जाणत नाही' हाच विचार त्याच्याजवळ असतो. 'आपल्याला आपलीच ओळख नाही' या विचाराने तो सतत काळजीत असतो. तळमळत असतो. असे घडण्याला कारण म्हणजे जेव्हा एखादा मनुष्य सद्गुरुंना शरण जातो, तेव्हा ते त्याला प्रश्न करतात. तू कोण? तू कुठून आलास? तुझे आई, बाप कोण?

प्रमाण –



**का ते कांता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः ।**
**कस्य त्वं कः कुत आयातस्तत्त्वं चिन्तय तदिह भ्रातः ।। ८**

– श्री आद्य शंकराचार्य रचित मोहमुद्गर स्तोत्र

हे ऐकून – मी खरा कोण? कुठून आलो? कसा आलो? माझे खरे आई–बाप कोण? याची त्याला चिंता लागते. मग, त्याला जो भेटेल त्याच्याशी तो 'स्व'स्वरूपाचे अज्ञानाबद्दल दुःख व्यक्त करतो.

मूळ अविद्येशी असलेले तादात्म्य घालवणार कसे? 'लाल घोडा' या उदाहरणात लाल रंग घोड्यापासून वेगळा करता येतो का? विशेषण हे विशेष्यापासून वेगळे करता येत नाही. विशेषणाचा त्याग घडणे शक्य नाही. त्याचप्रमाणे, अविद्या विशेषण मानली तर तिला आपल्यापासून वेगळे करणे शक्य नाही. येथे अविद्येचा संबंध चुकीचा मानला. मूळ अविद्येशी तादात्म्य असलेल्या साधकाला योग्य शास्त्र आणि श्रीगुरू भेटले, तरच त्याचे कल्याण होते. परंतु, 'मी अज्ञानी आहे' अशी वृत्ती ज्या शिष्यामध्ये प्रबळ आहे, त्यालाच पुढचा अधिकार प्राप्त होतो. येथेच खरी वेदांताची सुरुवात होते. अशा शिष्याला श्रीगुरू बोध करतात, 'तुझे अविद्येशी तादात्म्य नसून संसर्ग आहे. अविद्या तुझ्यासाठी विशेषण नसून उपाधी आहे'.

तुम्ही गायक, वादकांना त्यांच्या गायन–वादनाशी तादात्म्य पावलेले पाहिले आहे का? ते रात्रंदिवस गायन–वादनात दंग असतात. एखादा गायक आपल्याशी बोलताना अचानकपणे थांबतो व आलाप सुरू करतो. वादक असेल तर मध्येच हातावर, पायावर, जे मिळेल त्यावर ठेका धरतो. महत्त्वाचा विषय असला, तरी ते तो विषय मध्येच सोडतात. ते त्यांच्याच तंद्रीत असतात. त्यांना आपण हटकले की मग त्यांचा ठेका बंद करतात. कित्येक वेळा ते इतर सर्व कामे सोडून गायन, वादन पुष्कळ वेळ करत बसतात. त्यासाठी रात्र–दिवस यांचा विचार ते करत नाहीत. त्यांच्याप्रमाणेच, अविद्यावान पुरुषाची अवस्था असावी.

जर आपण अविद्यावान आहोत तर मग आपले अविद्येशी तादात्म्य का होत नाही. शास्त्र–सद्गुरू कोणाला प्राप्त होतात? जो भाग्यवान आहे त्याच्या हातात 'श्रीज्ञानेश्वरी' आपोआप येते. पण, अविद्या म्हणजे काय हेच माहीत नाही, मग 'श्रीज्ञानेश्वरी' उलटी पाठ असली तरी त्याचा काय उपयोग? अविद्यावान हो आणि 'श्रीज्ञानेश्वरी' वाच. मग काय होते ते बघ.

क्रोध कसा घालवावा हे शांत स्वभावाच्या माणसाला सांगून काय उपयोग? भूक नसलेल्या माणसाला 'अमुक पदार्थ असा खा' असे सांगून उपयोग काय? ज्याला गाणे शिकण्याची किंवा ऐकण्याची इच्छा नाही, त्याच्यासमोर सूर लावून गायले तर काय फायदा? बहिऱ्यासमोर गाणे सुरू केले, तर उपयोग नाही. आंधळ्यासमोर दिवा ठेऊन उपयोग काय? त्याचप्रमाणे, ज्याला अविद्या माहीत नाही, अविद्या ज्याचा विषय नाही, अविद्येशी ज्याचा संबंध नाही, त्याला सद्गुरू, शास्त्र, महावाक्य यांचा उपयोग नाही.

आपण परमार्थ का करतो? काही जणांचा परमार्थ अनुकरणाचा असतो. आपण परमार्थ करतो हे पाहून तरी पोरगा परमार्थ करील, म्हणून बाप परमार्थ करतो. काही लाजेस्तव 'श्रीज्ञानेश्वरी' वाचतात. काहीजण तूळ अविद्या घालविण्यासाठी 'श्रीज्ञानेश्वरी' वाचतात. काहीजण प्रमाणे पाठ करून दुसऱ्यांना सांगता येईल, म्हणून 'श्रीज्ञानेश्वरी' वाचतात. खरेतर, मूळ अविद्या घालविण्यासाठी 'श्रीज्ञानेश्वरी'च्या अभ्यासाचा उपयोग व्हावा. पण, हे कमी लोक करतात. शक्यतो नाहीच.



आपले तादात्म्य मूळ अविद्येशी असावे. अशा साधकानेच शास्त्र, सद्गुरू यांच्याकडे जावे. उगीच कोणीही त्यांच्याकडे गर्दी करू नये. तूळ अविद्येशी तादात्म्य करण्यापेक्षा मूळ अविद्येशी तादात्म्य असलेले बरे. 'मन स्थिर नाही, प्रापंचिक त्रास आहे' – हे तूळ अविद्यान्तर्गत येते. 'मीच मला ओळखत नाही. मी मूळ अविद्यावान आहे', असे ज्याला प्रकर्षाने जाणवते तो वेदांतशास्त्र हाती घेतो. 'मी राम देशपांडे' असे समजत असशील तर मग जन्ममरणाच्या चक्रातच फिरत राहा. जेव्हा थकशील तेव्हा मी कोण? असा प्रश्न विचारशील. जो जन्ममरणाच्या चक्रात गटांगळ्या खाऊन थकतो, तोच अविद्यावान होऊन महापुरुषांचा आश्रय घेतो. अविद्या नाश होण्यासाठी तळमळ असणे, यालाच मुमुक्षुत्व म्हणतात. जो अविद्यावान आहे तो शास्त्रांचा आश्रय घेतो. मुक्त आणि मूर्ख शास्त्रांचा आश्रय घेत नाहीत. प्रथम मुमुक्षु व्हावे. अविद्या जिव्हाग्री टोचावी. अशा मुमुक्षुला सद्गुरू सांगतात की 'तादात्म्य काढ'. विशेषण त्यागता येत नाही, कारण विशेषणाचे विशेष्याशी तादात्म्य असते. विशेषण वेगळे करता येत नाही. म्हणून, बाबा रे! अविद्या तुझ्यासाठी विशेषण नाही, हेच तू शास्त्र आणि सद्गुरू यांच्या बोधाने लक्षात घे.

कसा त्याग करावा? हे सद्गुरू शिकवितात. 'अविद्या विशेषण नाही' हे ते शिकवितात. मग पुढे, 'अविद्या उपाधी आहे की उपलक्षण आहे', हेही ते शिकवितात. या ठिकाणी अविद्येशी आपला संबंध कसा आहे हे सांगितले. संबंध कसा काढावा हे मात्र सांगितले नाही. तर प्रथम आपण अविद्येशी तादात्म्य पावावे. 'मी मला ओळखत नाही' हे दृढ करावे. असा मनुष्य स्थूल, सूक्ष्म प्रपंचाच्या धर्मांकडे लक्ष देत नाही. मी कोण? हाच विचार करण्याकडे त्याचे लक्ष असते. तो प्रपंचात असतो. पण, असून नसतो. त्यामुळे स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचा आपोआप त्याग घडतो. घर, संपत्ती, मुले, बायको इत्यादी आली तर आली, गेली तर गेली. जेवण मिळाले तर मिळाले, नाहीतर राहिले. एकच काळजी – 'मी कोण आहे'. तो स्थूल, सूक्ष्म प्रपंचात वावरताना दिसतो. पण त्यात असतो का? जो कारणावर गेला आहे त्याचा बाकीचा त्याग आपोआप होतो. अशी अवस्था दृढ पाहिजे. कारणावर गेले पाहिजे. अशा अविद्यावानाची अविद्या घालविण्याची काळजी शास्त्र आणि सद्गुरूंना लागते. जो अविद्यावान होईल, तो शास्त्र आणि सद्गुरूंना शरण जाईल.

अविद्येचा विशेषण रूपाने संबंध कसा असतो हे आपण पाहिले. पुढील चिंतनात अविद्येचा संबंध उपाधी आणि उपलक्षण रूपाने कसा असतो ते बघू.

*****

## चिंतन क्रमांक ४४
## उपाधी–उपधेयभाव संबंध

आपण 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होण्यासाठी करीत आहोत. जीवाला संसार करण्याची खोड अनंत जन्मांपासून आहे. ती खोड केव्हा मोडेल हे सांगता येत नाही. जन्ममरणरूपी संसार हा जणू काही एक भोवरा आहे. ज्याप्रमाणे, वेगाने फिरणारा भोवरा स्थिर वाटतो, त्याप्रमाणेच संसार वाटतो. संसाराची गती सहजपणे लक्षात येत नाही.

प्रमाण –

संसृति भोंवरा भोंवरा। फिरतसे गरगरा ।।

– श्री संत नरहरी सोनार महाराज

उत्पत्ती, स्थिती, प्रलय या संसाराचा वेग अतिशय आहे. अतिशय वेगामुळे जीवाला संसार स्थिर असल्याची भूल पडली आहे. 'संसार स्थिर व सत्य वाटणे' हीच भोवळ त्याला आली आहे. म्हणूनच, तो दुःखात अडकला आहे.

प्रमाण –

भोंवरी सांडुनि पाव ठेवी रे गोपाळा ।
नाच चिदानंदा सुख होईल सकळां ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

म्हणून, जर कोणी भोवळ घालवून स्थिर होईल, तर तोच सुखरूप होईल.

मनुष्याला अनेक जन्म स्थूलप्रपंच, सूक्ष्मप्रपंचाचीच गोडी असते. म्हणून, परमार्थ करायला लागल्यावर त्याला धर्मशास्त्रात राहावे असे वाटते. तो वेदांताकडे वळला, तर कारणप्रपंच आणि महाकारणप्रपंचाची माहिती होऊन चारही प्रपंच कसे आहेत, हे त्याला कळेल.

धर्मशास्त्रात रममाण होणाऱ्या साधकासाठी वेदांतशास्त्र ही एक झटका चिकित्सा आहे. समजा, एखाद्या माणसाचा हात मुरगळला किंवा पाय मुरगळला. त्यावर उपचार करणारा वैद्य रुग्णाचा हात/पाय धरतो आणि जोरात झटका देतो. रुग्ण जोराने, अतीव दुःखाने अक्षरशः किंचाळतो. परंतु, काही क्षणानंतरच त्याला बरे वाटू लागते. त्याचप्रमाणे, अनंत जन्मांपासून असलेला भवरोग काढण्यासाठी किती मोठा धक्का द्यावा लागेल? किती

मोठा झटका द्यावा लागेल? साधकाने प्रथमच वेदांत ऐकला, तर त्याला आश्चर्य वाटते, भीती वाटते, राग येतो, कल्पना वाटते – अशा विविध प्रतिक्रिया होतात. ते सहन न झाल्यामुळे काही साधक इतर मार्ग पकडतात. प्रत्येकाची त्याच्या अदृष्टानुसार गती होते. शास्त्र आणि सद्गुरू यांना शरणागत राहणे हा उद्धाराचा उपाय सर्वश्रेष्ठ आहे.



आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा लक्ष्यार्थ कळण्यासाठी जहताजहती लक्षणेचा वापर करत आहोत. या लक्षणेनुसार काही त्यागायचे असते आणि काही स्वीकारायचे असते. 'त्वम्'चा त्याग आणि 'त्वम्'चा स्वीकार, 'तत्'चा त्याग आणि 'तत्'चा स्वीकार अशी प्रकिया आहे. सध्या 'त्वम्'चा त्याग कसा करावा हा विषय सुरू आहे. व्यष्टी पातळीवर स्थूलप्रपंच , सूक्ष्मप्रपंच आणि कारणप्रपंचाचा त्याग हे सर्व 'त्वम्'च्या त्यागांतर्गत येते.

ज्याचा स्थूलप्रपंचाचा आणि सूक्ष्मप्रपंचाचा त्याग झालेला आहे, तो कारणप्रपंचाचा त्याग करण्याचा अधिकारी आहे. ज्याचा कारणप्रपंचाचा त्याग झाला आहे, त्याचा स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचाचा त्याग झालेलाच आहे. हा सर्वश्रेष्ठ त्याग आहे.

कारणप्रपंच म्हणजे काय? कारण म्हणजे अविद्या, अविद्या म्हणजे कारण. जे दोन देहांचे उत्पत्ती स्थान असून ज्याने 'स्व'वर पांघरूण टाकले आहे, त्याला कारण म्हणतात. 'स्व'वर पांघरूण म्हणजे आवरण. स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचांची उत्पत्ती म्हणजे विक्षेप. स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचात वाटेल तसे वागणे, राहणे म्हणजे मल.

त्यागण्यासाठी अविद्या असावी लागते, नसेल तर प्रश्नच नाही. वस्तू असेल तर त्यागण्याचा प्रश्न. तुम्हां सर्वांकडे अविद्या आहे काय? जागे झाल्यापासून ते झोपेपर्यंत अविद्येने तुम्हांला पछाडले पाहिजे. जे लोक आपल्यासाठी प्रतिकूल असतात, त्यांचे नाव जरी आपल्यासमोर कोणी काढले, तर आपल्याला त्रास होतो. तसा अविद्येचा त्रास होतो का? अविद्येचे अस्तित्व कळते का?

एखाद्याने खाण्या-पिण्याच्या संबंधात अनियमितपणा केला आणि त्याला अस्वस्थ वाटू लागले. म्हणून, तो डॉक्टरकडे गेला. डॉक्टरांनी त्याला तपासून डायबेटिस रोगाचे निदान केले. आता, डॉक्टर सांगेल ती औषधे तो घेतो आणि पथ्य पाळतो. डॉक्टरच्या बोलण्यावर ठाम विश्वास ठेवतो. परंतु, साधूसंत, शास्त्र, सद्गुरू यांवर मनुष्याचा ठाम विश्वास नसतो.

आपण अविद्येच्या जबड्यात अडकले आहात. याची तुम्हांला जाणीव आहे का? घरदार खरे आहे की नाही यावर विचार केला होता का? घर, बायको, पोरे इत्यादी चालविणे हा टाईमपास आहे. मनुष्याला वाटते की तो संसार चालवितो. हा भ्रम आहे. कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीला त्याचे प्रारब्ध फिरवते. पण, आपल्याला वाटते 'मी चालवितो'.

मागील सहा दिवसांत जागे झाल्यापासून ते झोपेपर्यंत तुम्ही अविद्येचा विचार केला होता का? व्यवहार आणि झोप यामध्ये अंदाजे १६ तास रोजचे गेले असे धरले, तर सहा दिवसांत ४८ तास तुम्हांला उपलब्ध होते. ४८ तास तुमच्यापैकी कोणी अविद्येचा विचार केला का? बरं! ४० तास? चाळीस तासही जाऊ द्या, केवळ ४ तास धरा. चार तास तरी

तुमच्यापैकी कोणी अविद्येचा विचार केला आहे? नाही ना केला? मग या चिंतनाचा तुम्हांला

काय उपयोग? 'मी अविद्येने पछाडलेला आहे' असं केवळ चार तास तरी कोणाला वाटले? अविद्येमुळे तुमची झोप उडाली नाही. का नाही? जे दिसते तेवढेच आपण खरे मानतो. अविद्येशी आपल्याला घेणंदेणं नाही. काहीजण स्वर्ग–नरक यांना खरे समजतात. अविद्येने ग्रासले आहे, हे केव्हा लक्षात येईल? अविद्या एक क्षणही आपल्याला सोडत नाही. एक वेळ बायको, पोरे आपल्याला सोडतील, पण अविद्या सतत चिकटलेली असते, हे लक्षात घ्या.

अविद्येचा त्याग कसा करावा? अविद्या विशेषण झाली आहे. अविद्येने पछाडलेले आहे. भूत–पिशाच काढण्यासाठी मांत्रिक असतो. अविद्यारूपी भूत मानगुटीवर बसले आहे. हे ज्याला कळत नाही, त्याचा प्रश्न नाही. कारणप्रपंच आणि कार्यप्रपंच यांना वैतागलेला साधक महाराजांकडे येतो आणि म्हणतो, 'मला अविद्यारूपी भूताने पकडलेले आहे. घर, दारा इत्यादींपासून मला खूप त्रास होत आहे. अविद्येने मला जखडले आहे'. महाराज विचारतात, 'खरेच अविद्येने तुला जखडले आहे?' साधक म्हणतो, 'हो! तिच्या विक्षेपशक्तीने देहाची त्रेधा–तिरपीट उडाली आहे. ती अविद्याच याला मूळ आहे. माझ्यावर कृपा करा. अंतःकरण निर्माण करायला ती मूळ आहे. अगणित उत्पात ती करीत आहे. त्यामुळे मी होलपटत चाललो. काम, क्रोध, मोह, मद, मत्सर इत्यादी तिनेच निर्माण केले. स्थूलशरीर निर्माण केले. विविध भोग भोगविले. नको नको ते करविले. माझे फार हाल झालेत. दोन प्रपंचाचा त्रास तिच्यामुळे. तिचा ठाव– ठिकाणा लागत नाही. धर्म, अधर्म, पाप, पुण्य, सुख, दुःख हे जे काही आहे ते सर्वच तिच्यामुळे. या सर्वाला अविद्याच निमित्तकारण आणि अविद्याच उपादानकारण आहे. मला वाचवा. ती मला पुनः पुनः चक्रात टाकीत आहे. ती जावी म्हणून ईश्वराची पूजा–सेवा केली. पण ईश्वराने सांगितले की अविद्या निवारण करण्यास तो असमर्थ आहे. म्हणून हे सद्गुरू! मी त्याच्या सांगण्यानेच आपल्याकडे धाव घेतली. मला पदरात घ्या. मला वाचवा. मी आपले उपकार विसरणार नाही. कृतघ्न होणार नाही'.

तेव्हा सद्गुरूंच्या लक्षात येते की, हा साधक मूळ अविद्येशी तादात्म्य पावलेला आहे. येथून खऱ्या अर्थाने सद्गुरू–शिष्य संबंध सुरू होतो. खरा परमार्थ सुरू होतो. अन्यथा, केवळ सात्त्विक व्यवहार सुरू असतो. जो खरा शिष्य ठरतो, त्याला श्रीगुरू कळकळीने बोध करतात, 'बाबा रे! अविद्या तुझ्यासाठी विशेषण ठरली आहे. खरेतर अविद्या तुला विशेषण नाही, उपाधी आहे'.

अविद्या विशेषण ठरली अशा साधकाने काय करावे? सद्गुरूंच्या सान्निध्यात राहून त्याने बदल करावा. अविद्येला उपाधी ठरवावी. पण हे लक्षात ठेवावे की झाडाचे बी पेरल्याबरोबर लगेच फळं लागत नाहीत. झाड वाढल्यावर काही काळाने फळं लागतात. अविद्येशी तादात्म्य पावलेला साधक सद्गुरू भेटताच लगेच मुक्त होत नाही. प्रयत्नाने त्याने अविद्येला उपाधी ठरवावी. पुढे उपाधीप्रमाणे त्याचे वर्तन होणे, आचरण होणे अपेक्षित आहे.

आपण स्वतः वेगळी राहून जी दुसऱ्याचे ज्ञान करून देते तिला उपाधी म्हणावे. व्यावर्तक आणि वर्तमानकाळ या दोन्ही गोष्टी उपाधी आणि विशेषणाला समान आहेत. परंतु,

विशेषणाचा कार्यात अन्वय असतो. उपाधीचा कार्यात अन्वय नसतो. सदऱ्याचा माझ्यात अन्वय नाही. वर्तमानकाळात मी सदरा घातला आहे. हा सदरा मला बाकीच्या लोकांपासून वेगळा दाखवतो. म्हणून सदरा मला उपाधी आहे. तसेच, उपरणं मला उपाधी आहे. बाह्य पदार्थ उपाधी आहेत हे कळते. पण, 'स्थूलदेहाचा माझ्यात अन्वय नाही' असे किती लोकांना कळते? देह आपल्यासाठी विशेषण ठरला आहे. त्यावर उपाय श्रीमद्भगवद्गीतेत सांगितला आहे – 'असंग शस्त्रेण दृढेन छित्वा'. परंतु, प्रारब्ध इतके बलवान असते की ते काही महाराजांच्या ठिकाणीही देह विशेषण ठरवून त्या महाराजांना उलटा-पुलटा करते. स्थूल, सूक्ष्मप्रपंचाशी तादात्म्य म्हणजे विशेषण आणि संसर्ग म्हणजे उपाधी असा फरक विशेषण आणि उपाधी यांच्यामध्ये आहे.

पुढे एखादा म्हणेल की 'महाराजांचे हाल झालेत, ते मुक्त नाहीत, तर मग आमचे काय?' हे बघा! पंगतीमध्ये जेवण वाढणारा स्वतः उपाशी जरी असला तरी ज्यांना तो जेवण वाढतो त्या लोकांची भूक शमून ते तृप्त होतात. अगदी त्याचप्रमाणे, सद्गुरू जरी परोक्ष ज्ञानी असले तरी त्यांच्या उपदेशाने त्यांच्यावर नितांत श्रद्धा ठेवणारा सत्शिष्य अपरोक्षज्ञानी होऊन जीवन्मुक्त होतो.

अविद्येचा अन्वय नाही हे विवेक आणि युक्ती यांनी साध्य होते. त्यामुळे विरक्ति आपोआप येते. भोग न भोगणे याला विरक्ति म्हणत नाहीत. भोक्ता-भोग-भोग्य यांचे यथार्थ स्वरूप ओळखणे, याला विरक्ति म्हणतात. अशी विवेक आणि युक्ती आपल्याकडे नसेल तर काय करावे? अविद्या विशेषण की उपाधी हे कळत नसेल तर काय करावे?

प्रमाण –

तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली। म्हणोनी ठेविली पायीं डोई॥

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

परमार्थासाठी गरजेची असणारी युक्ती ज्यांच्याकडे नसते, त्यांनी डोळे झाकून श्रीगुरुंना शरण जाणे हाच एक उपाय आहे. त्यांच्या कृपेने विवेक जागृत होतो. युक्ती सुचते. अन्वय-अनन्वय कळतो आणि उद्धार होतो. मुलगा गरज असेपर्यंत त्याच्या आई-वडीलांना शरणागत राहतो. आई-वडीलांना गरज नसतांनाही ते मुलाला जवळ करतात. त्याचप्रमाणे, शास्त्र आणि सद्गुरू त्यांना गरज नसतानाही ते साधकाला जवळ करतात. त्यांना शरणागत राहिल्याने साधकाचा विवेक जागृत होतो. युक्ती सुचते. मुलांप्रमाणेच साधक पुढे शास्त्र, सद्गुरूंजवळ राहिलच असे नाही.

अविद्येचा अन्वय की अनन्वय? मानले तर उपाधी माना, विशेषण नाही. सदरा घातला तर सदरावान, फेटा बांधला तर फेटेवाला, टोपी घातली तर टोपीवाला. सदरा, फेटा आणि टोपी विशेषण मानू नका, उपाधी माना. समजा, एखाद्या माणसाने चष्मा लावला आहे. चष्मा त्याच्यासाठी विशेषण की उपाधी? तो चष्म्याला डोळ्यांमध्ये घुसवून एकरूप करत

नाही. म्हणजे चष्म्याचा अन्वय डोळ्यात नाही. म्हणजे त्याला चष्मा विशेषण नाही, उपाधी आहे. उपधेय + उपाधी = उपहित. मनुष्य + चष्मा = चष्मेवान मनुष्य. उपधेय आणि उपाधी वेगवेगळे असतात. या दोघांच्या संपर्काने जे उपहित असते ते स्वतःच्या महिमेत असते. चष्म्याच्या सहाय्याने रूप पाहतो. लाल काचेचा चष्मा असेल तर समोरचे दृश्य लाल दिसते, निळी काच असेल तर समोरचे दृश्य निळे दिसते. परंतु, चष्मेवान मनुष्य स्वमहिमेत असतो. मनुष्यामध्ये बदल नाही. 'मला लाल दिसले' असे तो वेगळा राहून म्हणत असतो. चष्मेवान मनुष्य उपहित होतो.



त्याचप्रमाणे, अविद्या उपाधी होते तेव्हा चैतन्य उपहित होते. अविद्योपहितं चैतन्यम् – अशी जीवाची एक व्याख्या आहे. अविद्या उपाधी ठरली तर जीव स्वमहिमेत राहतो. अविद्येला उपाधीप्रमाणे समजा. सदरा, उपरणे याप्रमाणे. अविद्या उपाधीरूपाने स्वीकारली, तर पुढचा व्यवहारही उपाधीरूपानेच होतो. तेथे तादात्म्य नसते, संसर्ग असतो. मनुष्याने निळा चष्मा लावला तर पुढचे सर्व पदार्थ निळे दिसतात, डोळा निळा होत नाही, पदार्थ निळे होत नाहीत किंवा मनुष्यही निळा होत नाही. धर्मशास्त्र ज्या गोष्टींना चांगले किंवा वाईट ठरवते, त्या गोष्टी मनुष्यासाठी उपाधी ठरल्या तर मनुष्य स्वमहिमेत राहतो. चांगल्या–वाईट अशा द्वंद्वधर्मांत तो अडकत नाही.

अपंचीकृत आणि पंचीकृत प्रपंचातील पदार्थ चांगले की वाईट? हे पदार्थ काहीजणांना धर्मरूप वाटतात, काहीजणांना अधर्मरूप वाटतात. जशी अविद्या मानाल तसे. लाल काचेच्या चष्म्याने समोरचा प्रपंच लाल नसतानाही लाल दिसणार. काच निळी असेल तर निळा दिसणार. अविद्या धर्मरूप तर प्रपंच धर्मरूप. अविद्या अधर्मरूप तर प्रपंच अधर्मरूप. वास्तविक पाहता, प्रपंच चांगला किंवा वाईट असे काही नसते. अविद्येशी असलेल्या संबंधाप्रमाणे निर्माण झालेल्या स्वतःमधील संस्कारांचा आरोप मनुष्य पदार्थांवर करतो आणि त्याप्रमाणे पदार्थ मानतो.

समजा, एखाद्याने निळ्या काचेचा चष्मा लावला, तर समोरचा प्रपंच निळा दिसतो. त्याला ते आवडले नाही, कारण त्याला प्रपंच लाल पहायचा होता. त्याने लाल रंगाचा चष्मा लावला आणि आनंद मानू लागला. 'हं! आता महाराज लाल झाले'. तो मनुष्य खूष होतो. जगाकडून काही ना काही मिळत राहावे अशी मनुष्याची अपेक्षा असते. बायको म्हणते, 'असे करा', तर हा निळा काचेचा चष्मा लावतो. पोरं म्हणतात, 'तसे करा'. तर हा लाल काचेचा चष्मा लावतो. अन्य कोणी मनुष्य याला म्हणतो, 'अमुक करा', तर हा चष्म्याची काच परत बदलतो. पदार्थ जसा आहे तसा आहे. पदार्थात सुख–दुःख नाही. लाल काय, निळे काय, दोन्ही फसवे आहे.

प्रपंचाला मूळ कारण अविद्या आहे. अविद्या जणू काही पडदा आहे. आडवस्त्र आहे. इकडे चैतन्य, तिकडे अविद्या. मनुष्य अविद्येचा स्वीकार करतो आणि चिकटतो. अविद्येला स्पर्श केल्याबरोबर ती आवरण आणि विक्षेप रूपाने फुटते. पहिले स्व–स्वरूपावर आवरण टाकते आणि नंतर विक्षेप तयार करते. वास्तविक पाहता आवरण काढणे ही मुख्य गोष्ट आहे.

परंतु, अनंत जन्मांपासून जीवाला विक्षेपाचाच दात परिचय असल्याकारणाने 'विक्षेप घालवा' असे सर्वजण म्हणतात. त्याहीपुढे घसरून 'मल घालवा' असे म्हणतात.

विक्षेप आणि मल अत्यल्प काळात होतो. सर्वप्रथम कार्यामध्ये 'अमुक गोष्ट चांगली की वाईट? काही केले तर पाप का पुण्य?' अशी वृत्ती मनुष्याची होते. त्यानंतर 'धर्माचा स्वीकार करू की अधर्माचा स्वीकार करू' अशी वृत्ती तयार होते आणि मग लगेचच सत्त्व, रज, तम हे तीन गुण तयार होतात, प्रवाह सुरू होतो. प्रवाहात असंख्य गोष्टी होतात. हे सर्व अतिशय कमी वेळात होते.

एका तासात कोटीवेळा जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होतात. विद्युत दिव्यातील विद्युत प्रवाह अधिक (पॉझिटीव्ह) आणि वजा (निगेटीव्ह) या विरुद्ध दोन टोकांमध्ये आवर्तन करत असतो. अधिकपासून वजापर्यंत व वजापासून पुन्हा अधिकपर्यंतचा प्रवाहाचा प्रवास म्हणजे एक आवर्तन. भारतात एका क्षणाला विद्युत प्रवाहाची पन्नास आवर्तने होतात. ते आपल्याला तसे कळत नाही. हात लावला तर कळते. झटका बसल्यानंतर.

याप्रमाणे, एका क्षणाला सत्त्व, रज, तम यांची आवर्तने कोटी वेळा होतात. कळतच नाही की धर्म काय अधर्म काय? सत्त्व, रज, तम काय? वेग किती आहे? क्रिया झाल्यानंतर त्याचा झटका बसतो.

ईश्वर स्वतःमधून स्वतःची माया काढतो आणि तीच त्याच्यावर आवरण टाकते. पण, हे कसे काय शक्य आहे? मला सांगा, बायको कोण करतो? पुरुष करतो. मिरवते कोण? ती मिरवते. जगामध्ये बायकोने पुरुषाला ताब्यात ठेवण्याची टक्केवारी नव्याण्णव टक्के आहे. तिने एक शब्द टाकला की घराचा विस्कोट होतो किंवा भलेही होते. तिने एक शब्द टाकला की आई–बापापासून ती मुलाला वेगळे करते. काय नको नको ते घडविते. पुरुषाचा जीव मुख्यतः बायकोतच असतो. तिच्यातून पोराबाळांत जातो. 'लग्नामध्ये मिरविण्यासाठी पाच हजार रुपयांची साडी आणा', असे तिने सांगितले की लगेच हा त्यासाठी ओव्हरटाईम करतो. त्याप्रमाणेच, ईश्वराचीच बायको त्यालाच लोळविते.

अविद्या म्हणजे बायको. चैतन्य म्हणजे पुरुष. पहिले ती पांघरूण टाकते. कसे पांघरूण टाकले? हे ती कळूच देत नाही. याने स्वतःची माया बाहेर काढली. तिच माया याला गप्प करते आणि जगत्‌रूपी महान कार्य निर्माण करते. त्याला लोपविते. स्वतःचा कारभार मिरविते. अविद्या आपली की कोणाची? हे माहीत नाही. दिवसगणिक सुख, दुःखांचे भोग देणारी ती आहे. बायकोच्या निमित्ताने पुरुष कार्यांतील असंख्य पदार्थांचा स्वीकार करतो आणि ते पदार्थ पुरुषाला विशेषण ठरतात. त्याप्रमाणेच, मायेच्या निमित्ताने चैतन्य कार्यांतील असंख्य पदार्थांचा स्वीकार करते आणि ते पदार्थ चैतन्याला विशेषण ठरतात.

उपाधी स्वतः वेगळी राहते. व्यवहारात बायकोला विशेषण न करता, उपाधी करावी. त्यामुळे ती सरळ नीट राहते. परमार्थात सद्गुरू हेच काम करतात. 'अविद्या विशेषण नाही, उपाधी आहे. तिला उपाधी करून सरळ कर' असे सद्गुरू पक्के ठसवतात. मग, संसार काहीही असू दे.

चष्म्याची काच काळी, निळी असली, तरी पुरुष, डोळा, पदार्थ हे काही काळे, निळे होत नाहीत. उपाधी अनन्वयी आहे हेच यातून लक्षात येते. सुख–दुःख उपाधी ठरले, तर पुरुष स्वमहिमेत असतो. जहताजहती लक्षणेत काही त्यागायचे असते आणि काही स्वीकारायचे असते. आपण अविद्येचा विशेषण म्हणून स्वीकार केला होता, तेव्हा आपल्याला उपाधी म्हणजे काय हे माहीत नव्हते. नंतर, आपण उपाधीवर आलो. आता, आपण विशेषणाचा त्याग आणि उपाधीचा स्वीकार करीत आहोत.



सद्गुरूंचे बोलणे कारंज्याप्रमाणे असते. कारंजे वर उठतात आणि लगेच पाठोपाठ गायब होतात. हवेत उडालेले कारंजाचे पाणी शुद्ध असते. त्याच्या एका थेंबाने असंख्य आजार बरे होतात. त्याप्रमाणे, सद्गुरूंचे एकूण एक शब्दरूपी कारंजे, अनंत जन्मांचे दुःख घालविण्यास कारणीभूत होतील. ते अनुभवण्यासाठी स्वतःची तशी तयारी करा.

*****

## चिंतन क्रमांक ४५
## उपलक्षण–उपलक्ष्यभाव संबंध – १

जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या हेतूने 'तत्त्वमसि' महावाक्याचा आपण अभ्यास करीत आहोत. 'तत्त्वमसि' हे महावाक्य छांदोग्य उपनिषदातील आहे. जहताजहती लक्षणेचा वापर करून आपण तत्त्व शोधत आहोत. या लक्षणेचा वापर करून 'त्वम्'पदाचा विचार सुरू आहे. स्थूल, सूक्ष्म आणि कारणप्रपंचाचा त्याग कसा करावा यावर चिंतन सुरू आहे. पुनः जन्म पुनः मरण या चक्रास कारण मूळअविद्या आहे. अविद्या नाशाने या चक्रातून जीव मुक्त होतो. स्थूल, सूक्ष्म आणि कारणप्रपंचाशी तादात्म्य ठेवणे हानीकारक आहे. परंतु, या प्रपंचापासून वेगळे होणे सोपे नाही. पदार्थांना सत्यत्व देऊन बसल्यामुळे वेगळे होणे कठीण झाले आहे. परत परत अभ्यास केला, तरी अविद्या नाश करण्याकडे साधकाचे लक्ष जात नाही. असंख्य व्यवहारात गुंतल्यामुळे आपले अज्ञान दृढ झाले आहे.

मागील चिंतनात अविद्या उपाधी होते म्हणजे नक्की काय? हे पाहिले. उपाधी ही व्यावर्तक आणि वर्तमानकाली असते. त्याचप्रमाणे, विशेषणही व्यावर्तक आणि वर्तमानकाली असते. परंतु, विशेषण अन्वयी असते आणि उपाधी अनन्वयी असते.

जो पदार्थ आपला असतो त्याचा त्याग करता येतो. जो पदार्थ आपला नाही तो त्यागण्याचा प्रश्न येत नाही. अविद्या शोधली पाहिजे. ज्याला असे प्रकर्षाने वाटते की, 'मी अविद्यावान आहे. मूळ अविद्येने मी जन्ममरणाच्या चक्रात अडकलो आहे' तो खरा वेदांताचा अधिकारी आहे, बाकीचे नाहीत. त्यालाच अविद्या त्यागण्याचा अधिकार आहे. इतर लोकांना चित्त शुद्ध करणे, अंतःकरणातील उत्पातात बदल करणे हाच परमार्थ वाटतो. पाप–पुण्याचे संस्कार चित्तातून अंतःकरणात येतात. जीव या संस्कारानुरूप बाह्य पदार्थांकडे आकर्षित होतो. परंतु, संस्कार आणि पदार्थ हे कार्यांतर्गत येतात. त्यांचे कारण मुख्य आहे. म्हणजेच, अविद्या मुख्य आहे. फक्त, अविद्येच्या नाशानेच जन्ममरण फेरा चुकणार आहे.

आपल्याला 'आपण देव नाही' असे वाटते. आपल्याला 'मी जगताला अधिष्ठान आहे' असे वाटत नाही. एखाद्याने साधूसंतांकडून हे ऐकलेच, तरी त्याच्या ते गळी उतरत नाही, अनुभवात येत नाही. मग, त्यासाठी काय करायला पाहिजे? पुनः पुनः 'तत्त्वमसि' महावाक्याचा विचार करीत राहणे, हाच त्यावर उपाय आहे.

उपधेय + उपाधी = उपहित. आत्मा + अविद्या = साक्षी. उपाधी अनन्वयी असते. उपाधी कशामध्ये अन्वय करत नाही? दंडी पुरुषाच्या उदाहरणामध्ये दंडाचा अन्वय पुरुषात नसतो. त्याप्रमाणेच, अविद्येचा स्व–स्वरूपात अन्वय नाही. अविद्या ज्याला उपाधी ठरते, त्याला आत्म्याची ओळख 'साक्षी'रूपाने होते. आत्म्याच्या ठिकाणी तीळमात्रही अविद्या नाही. त्यामुळे, आत्म्याकडून अविद्येचा विचार करण्याचा प्रश्नच येत नाही. मात्र,

जीवाकडून अविद्येचा विचार व्हावा. अविद्या कशी त्यागावी? असा विचार जीवाने केला पाहिजे.



हातातले पैसे टाकून देणे सोपे की अंगावरचे कपडे त्यागणे सोपे? अंगावरच्या कपड्यांचा त्याग करणे सोपे की मनातले विचार काढणे सोपे? हे उत्तरोत्तर अवघड आहे. पदार्थ त्यागण्यासाठी ते फेकून देणे हे जरूरी आहे काय? ते सर्व पदार्थ उपाधी ठरले, तर ते राहूनही त्यांचा त्याग होतो. सोन्याची साखळी गळ्यातून काढावी की मनातून काढावी? श्रेष्ठ काय? सोन्याच्या साखळीचे आकर्षण कोणाच्या मनात आहे की नाही हे ज्याचे त्याला कळते. त्याहीपुढे पदार्थ जीवावरून निघाला असेल, तर तो सोबत राहिला काय अथवा न राहिला काय, फरक पडत नाही. त्या पदार्थाचा त्याग झालेला असतो. पदार्थ उपाधी ठरलेला असेल, तरच याप्रमाणे त्याग घडतो.

जीवावरून अविद्या कशी काढावी? एकवेळ जीवाने अविद्याकार्याचा त्याग करणे सोपे. पण, जीवाने अविद्येचा त्याग करणे अवघड आहे. ज्याने अविद्याकार्याचा त्याग केला त्याच्यासाठी 'अविद्या–त्याग' हा विषय असतो. अन्यथा फल प्राप्त होत नाही. स्थूलप्रपंच आणि सूक्ष्मप्रपंच यांना अविद्याकार्य म्हणतात. प्रथम त्यातून जीव काढला पाहिजे. काढाल काय? मरणाच्या आत काढा. मरण केव्हा येईल हे आपल्याला माहीत नाही. आपल्याकडे वेळ अजीबात नाही. तुम्ही इतर काहीही करत राहता, अविद्याकार्याचा त्याग करीत नाहीत. प्रथम शास्त्राला शरण जा. अविद्या आणि अविद्याकार्य म्हणजे काय हे कळेल. पुढे सद्गुरूंची प्राप्ती होते. सद्गुरूंसोबत केवळ स्थूल रूपाने राहिल्याने फायदा होत नाही. सद्गुरूंना शरण जावून म्हणावे, 'अविद्याकार्याचा त्याग केला. कृपा करून अविद्येचा त्याग कसा करावा हे सांगावे'.

घर, बायको, पोरं तुम्हांला विशेषण आहे की उपाधी आहे? विशेषण अन्वयी असल्यामुळे त्यागता येत नाही. अविद्या व तिचे कार्य विशेषण ठरले तर मनुष्य संसारातून निघूच शकत नाही. उपाधी वेगळे करून दाखविते. सद्गुरूंच्या सान्निध्यात राहून प्रयत्नपूर्वक संसारातून वेगळे निघा.

प्रमाण –

**सांगते तुम्हां वेगळे निघा। वेगळे निघून संसार बघा।।**

– श्री संत एकनाथ महाराज गाथा

विवेक जागा झाला, तर आपला देहाशीच संबंध नाही, तर त्याला चिकटलेल्या नातलगांशी संबंध असण्याचा प्रश्नच नाही, असे कळते. जीवाने अविद्येचा त्याग करण्यासाठी अविद्या विशेषणाहून उपाधी ठरवावी आणि पुढे उपाधीहून उपलक्षण ठरवावी. उपलक्षण उपलक्ष्याला असते. उपलक्ष्य + उपलक्षण = उपलक्षित. कावळा बसलेले देवदत्ताचे घर. घर + कावळा = कावळा बसलेले घर. येथे 'घर' हे उपलक्ष्य आहे. 'कावळा' हे उपलक्षण आहे.

**(येथे चिंतन क्रमांक – २५ मधील संदर्भ वाचावा.)**

'कावळा बसलेले ते देवदत्ताचे घर आहे' असे एका मनुष्याला दाखविले आणि सांगितले. आता कावळा जर उडून गेला, तर त्याला देवदत्ताचे घर सापडणार नाही का? कावळा बसून राहिला अथवा उडून गेला तरी देवदत्ताचे घर सापडते. एकदा कावळा-संबंधाने घर कळले की मग घराला किंमत की कावळ्याला किंमत? कावळ्याच्या निमित्ताने घर दाखविणे होते. कावळ्याच्या पाठीमागे कोणी लागत नाही. कावळा उडून गेला, तर घर सापडणार नाही असे नाही. उपलक्षण प्रमुख असते काय?

'राम देशपांडेंना पकडून आणा' असे ठरले. प्रथम त्यांची लक्षणे कळून घेणे गरजेचे असते. ते गोरे आहेत, हातात काठी आहे इत्यादी. महत्त्व कोणाला? काठीला की राम देशपांडेंना? लोकांच्या गर्दीत राम देशपांडे दिसले. लगेच त्यांनी जमावामध्ये काठी फेकून दिली तर? काठी प्रमुख की राम देशपांडे प्रमुख? उपलक्षणाचे महत्त्व दाखवून देण्यापुरते. नंतरच्या क्षणापासून उपलक्षणाला किंमत नसते. कावळा उडाला काय किंवा बसून राहिला काय, फरक पडत नाही. म्हणजेच, क्षणातच उपलक्ष्य उपलक्षणेने उपलक्षित होते.

डोळ्याच्या पापणीला उघड-झाप करण्यास जितका वेळ लागतो, त्यापेक्षाही अत्यल्प कालावधीत ब्रह्मज्ञान होते. ज्याला अविद्या उपाधी ठरली आहे, असा साधक सद्‌गुरूंच्या सानिध्यात येतो. सद्‌गुरू त्याला बोध करतात, 'अविद्या तुला उपाधी नसून उपलक्षण आहे. तू ब्रह्म आहेस' असे बोलता क्षणीच साधकाला स्व-स्वरूपाचा निश्चय होतो. मात्र, असा निश्चय फक्त उत्तम अधिकारी साधकाला होतो.

प्रमाण -

कानावचनाचिये भेटी -। सरिसाचि पैं किरीटी।
वस्तु होऊनि उठी। कवण एकु जो ।।९९१।।अध्याय १८।।

- श्रीज्ञानेश्वरी

आत्मा + अविद्या = कूटस्थ. कावळा बसलेले देवदत्ताचे घर. 'अविद्या आरोपलेला आत्मा' अविद्या कोणाला आहे? मला. अविद्येचा आरोप कोणावर? 'मी'वर अविद्येचा आरोप आहे. मला अविद्येचा स्पर्श झाल्याबरोबर जीव झालो. 'मी अज्ञानी' हा आरोप कोणावर? आरोप 'मी'वर आहे. एकदा 'मी' हे उपलक्ष्य कळले की उपलक्षण अविद्या गेली तरी चालेल. आपले लक्ष कुठे? कावळ्यावर की देवदत्ताच्या घरावर? सद्‌गुरू सांगतात, 'अविद्या आरोपलेला आत्मा'. परंतु, साधकाचे लक्ष अविद्येकडे जाते, आत्म्याकडे जात नाही.

सद्‌गुरूंनी सांगितले, 'कावळा बसलेले घर देवदत्ताचे आहे, त्याच्या घरी जा. देवदत्त दयाळू आहे. तो तुला जेवायला देईल'. साधकाचे लक्ष कावळ्यावरच. कावळा उडून जेथे जेथे बसला त्या त्या घराला तो देवदत्ताचे घर समजू लागला. देवदत्ताच्या घराच्या शेजारी एक घर होते. त्यावर कावळा बसला. हा शिष्य त्या घरात घुसला आणि जेवण करायला

बसला. घरमालक दुष्ट होता. त्याने या शिष्याला झोडपून काढले आणि भांडी घासायला

लावली. लक्ष केवळ 'कावळा' या शब्दाकडेच होते, म्हणून त्याची फसगत झाली. 'मी अज्ञानी' असे समजणाऱ्या साधकाचे लक्ष 'मी'वर जात नाही. अविद्येकडे जाते. कावळा जेथे जेथे बसेल त्या घरांना देवदत्ताचे घर समजत चाललो, तर, साधक कुठे कुठे फिरत राहिल हे सांगता येत नाही. असे सर्वत्र दिसते.

काहीजण कावळ्याला कावळा न समजता कावळ्याच्या पिसालाच कावळा समजतात. कावळ्याचे पीस उडून उडून जेथे जेथे जाईल तेथे तेथे हा जातो. कावळा राहतो एके ठिकाणी आणि त्याचे पीस अनेक ठिकाणी उडत जाते आणि हा पिसाच्याच मागे जातो. पीस ज्या ज्या घरांवर पडेल त्या त्या घरांना देवदत्ताची घरं समजतो. सिद्धांतात पीस म्हणजे अविद्याकार्य होय. संस्काररूपी वारा स्थूल आणि सूक्ष्मदेहरूपी पीस हालवितो.

आपले लक्ष कुठे आहे? आत्म्यावर, अविद्येवर की अविद्याकार्यावर? मोठे मोठे महाराज अविद्याकार्यातच मेले आणि म्हणून परत जन्मले. 'महाराजांचा स्थूलदेह तेजोमय आहे' असे कोणी म्हणेल, तर याचा अर्थ त्याचे लक्ष पीसावर आहे. सूक्ष्मदेहसुद्धा एक पीसच आहे. अंतःकरणवृत्ती एका पदार्थाला अल्प काळात पकडते. लगेच दुसऱ्या पदार्थाला धरते. पीसाचे उडणे वाऱ्यावर. ज्या दिशेला वारा वाहेल त्या दिशेला पीस जाते. पदार्थ सुंदर, चांगले, वाईट ठरतात. प्राचीन संस्कारामुळे अंतःकरणवृत्ती हालते. सर्वांनी अविद्या कार्यालाच पकडले, 'मी'ला पकडले नाही. खरेतर, अविद्या 'मी'वर उपलक्षण रूपाने आरोपीत आहे. एवढ्याच वाक्याने साधकाने शहाणे व्हावे, कारण उपलक्षणाला म्हणजे अविद्येला खरी किंमत नसते. अविद्या काढली तर 'मी'ला 'मी' म्हणण्याचीही गरज नाही. परंतु, जर कोणी पिसच धुवत बसला तर? जिकडे पीस तिकडे धावतो, तेथेच गुंततो. अंतःकरणवृत्ती कुठे ना कुठे जाणारच. त्याला किंमत द्यावी काय? समजा, पीस फार लांब गेले, तर देवदत्ताच्या घराचे नामोनिशाण राहणार नाही. तसेच झाले आहे जगताचे. सर्वजण जाती, वर्णाचा अभिमान धरून बसलेले आहेत. 'मी' कुठे याचा तपास नाही. 'अमुक ठिकाणी ब्राह्मणांनी बसावे, अमुक ठिकाणी शूद्रांनी बसावे' असे नियम करतो. काय काय करतील सांगताच येत नाही.

काही साधक ठरवितात, 'पिसाला उडू द्यायचेच नाही. पिसाला दाबून धरायचे'. ते पिसाला दाबून ठेवतात आणि म्हणतात, 'पाहतो कसा उडतो ते'. स्थूलदेहरूपी पिसाला ते एका ठिकाणी बहुकाळ ठेवण्याचा संकल्प करतात. काहीजण ठरवितात, 'सूक्ष्मदेहाला हलू द्यायचे नाही. त्याला स्थिर करीन'. बहुतेक साधक याच प्रयत्नात मरतात. स्थूल आणि सूक्ष्मदेह अविद्याकार्य असून ते देह एका ठिकाणी जास्त वेळ राहत नाहीत. कार्याचा प्रवाह आहे. परंतु, साधक शरीराला स्थिर ठेवण्याचा हट्ट धरून बसतो, तर काय करावे?

काही साधक, 'अविद्या कशी आहे' म्हणजे 'कावळा कसा आहे' याचा शोध घेतात. अविद्या छोटी आहे की मोठी आहे? कावळा काळा की पांढरा? – असा विचार करीत बसतात. या गोष्टींशी घेणे देणे नसावे. कोणाकोणाला अविद्येचा त्रास आहे? अविद्येकडे लक्ष दिले की त्रास होतो.

काही साधक ठरवतात की स्थूलदेह चांगला ठेवावा. घर–बायको–पोरांची सेवा करीत राहतात. ते म्हणतात, 'आम्ही सेवा केली'. म्हणजेच त्यांनी पीसे धुतली, कावळ्याला आंघोळ घातली. असांप्रदायिक महाराज अशा साधकांना सांगतात, 'सेवा करत राहा, कावळ्याला आणखी दहा दिवस आंघोळ घाल. मी तुला पुढे मुक्त करणार आहे'.

कावळा कसा आहे हे सांगता येत नाही. जेथे अविद्येकडे लक्ष ठेऊ नये, तेथे अविद्याकार्याकडे लक्ष द्यावे काय? सद्गुरू सांगतात, 'देवदत्ताचे घर'. साधक म्हणतो, 'कावळा'. सद्गुरू सांगतात, 'अविद्या बसलेला आत्मा'. साधक म्हणत राहतो, 'अविद्या अविद्या'. कावळा उडून जाणार आहे. अविद्या उडून जाणार आहे. आत्मा स्थिर आहे. पण ज्या ज्या घरांवर कावळा बसतो त्या त्या घरांमध्ये साधक जातो आणि मार खातो. साधक शरीर स्थिर करण्याचा प्रयत्न करतो, त्यामुळे त्याला 'मी परमार्थ करतो' असे वाटते. 'आत्मा सापडला' असे वाटते. कावळ्याला थांबविण्यासाठी जर त्याला आमिष दाखविले, तर तो थांबणार काय? कावळ्याचा स्वभावच आहे उडून जाण्याचा. देहाला काही ना काही आमिष दाखवून साधक देहाला स्थिर करण्याचा प्रयत्न करतो. असे करणाऱ्याच्या पाठीमागे लागू नये, कारण कार्याचा प्रवाह आहे. त्याला थांबवू नये. देवदत्ताच्या घराकडेच लक्ष पाहिजे, तरच 'कानावचनाचिये भेटी' होते. श्रीगुरुंनी एकदाच बोध केल्याने साधक मुक्त होतो. लक्ष उपलक्ष्यावर पाहिजे, उपलक्षणावर नाही. अविद्या आणि अविद्याकार्य जावो अथवा राहो.

प्रमाण –

देह जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ भावो।।

– श्री संत नामदेव महाराज गाथा

सध्या आपली अवस्था कशी आहे? देवदत्ताच्या घरामध्ये आणि माझ्यामध्ये काही अंतर आहे. मरण येण्याच्या आत तेवढे अंतर चालून जावे लागेल. जो केवळ 'मी'वर लक्ष देतो, त्याला स्व–स्वरूप प्राप्त होण्यास किती वेळ लागतो? डोळ्याची पापणी लवते न लवते तोच मुक्ती प्राप्त होते. देहाच्या असंख्य धर्मांतून बाहेर पडायचे असेल, तर ज्याप्रमाणे सांगितले ते आचरणात आणा. ते इतके सोपे नाही. मात्र, सांप्रदायिक रीतीने आलेत, तर पटकन काम होईल. या चिंतनात अविद्या उपलक्षण कशी होते, ते सांगितले. अविद्येचा त्याग कसा करावा हे अद्याप सांगितलेले नाही. त्यागाची व्याख्या – असले काय आणि नसले काय. तीळमात्र काही न वाटणे. 'अविद्या असली काय किंवा नसली काय' ही स्थिती स्व–संवेद्य आहे. त्यासाठी, दृष्टी केवळ 'मी'वर पाहिजे.

पुढे अविद्येचा त्याग कसा करायचा ते पाहू. पण, तुम्ही पहिले गृहपाठ करा. सांगितलेले सपाट करून येऊ नका.

*****

## चिंतन क्रमांक ४६
## उपलक्षण–उपलक्ष्यभाव संबंध – २

'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यासाचा हेतू जन्ममरणाच्या चक्रातून सोडवणूक करणे हा आहे. आपण मूळ अविद्येमुळे अडकलेले आहोत. मूळ अज्ञानाचा नाश करणे म्हणजे रज्जू–सर्प दृष्टांतील सर्प निर्माण करणाऱ्या कारणाचा नाश. 'तत्त्वमसि' महावाक्यातील 'तत्', 'त्वम्', 'असि' या तीन पदांच्या वाच्यार्थांचा पृथकपणे आणि नंतर त्या तीन पदांच्या वाच्यार्थाचा एकत्रितपणे अभ्यास केला. सध्या महावाक्याच्या लक्ष्यार्थाचा विचार सुरू आहे. त्वम्पदाचा लक्ष्यार्थ पाहात आहोत. त्यासाठी जहताजहती लक्षणेचा वापर करीत आहोत.

साधकाने स्थूलप्रपंच आणि सूक्ष्मप्रपंच यांचा त्याग कसा करावा हे पूर्वी पाहिले. स्थूलापेक्षा सूक्ष्मप्रपंचाचा त्याग करणे अवघड आहे. त्याहीपेक्षा कारणप्रपंचाचा त्याग अवघड आहे. कारण म्हणजे 'जीव'. 'जीव' म्हणजे 'त्वम्'. असा आपण अर्थ केला. अविद्येमुळे जीव होतो. अविद्येचा आपल्याशी संबंध विशेषण, उपाधी, उपलक्षण रूपाने कसा आहे, याचा अभ्यास आपण केलेला आहे.

उपलक्ष्य + उपलक्षण = उपलक्षित. अविद्या उपलक्षण आहे असे कोण सांगतात? सद्गुरू सांगतात. तुम्ही पूर्वी काय म्हणत होतात, 'अविद्या मला विशेषण आहे'. असे असेल तर पुढे 'अविद्या मला उपाधी आहे' असे सद्गुरूंच्या सहाय्याने ठरवावे. परंतु, अविद्या विशेषण ठरलेलीच नाही. तुम्हांला अविद्याकार्यच विशेषण ठरले आहे. अविद्या विशेषण आहे हे कळलेले नाही. मग काय उपयोग? अयोग्य साधकाला महावाक्याचा उपयोग नाही. अविद्याकार्याच्या फालतू विचारांमध्ये अडकू नका. जागे झाल्यापासून ते झोपेपर्यंत अविद्येचा विशेषण या रूपाने त्रास झाला पाहिजे. अशा साधकासाठी पुढच्या पायऱ्या आहेत. सिद्ध महापुरुष आणि मूर्ख यांना 'मी अविद्यावान' असे वाटत नाही. अविद्या विशेषण असलेला साधक श्रीगुरूंना शरण जातो. श्रीगुरू त्याला सांगतात, 'अविद्या विशेषण नाही, उपाधी आहे'. श्रीगुरू साक्षीची दृष्टी आणून देतात. आत्मा आणि अविद्या वेगळी, असे लक्षात आणून देतात. पुढे जाऊन श्रीगुरू सांगतात, 'अविद्या उपाधी नाही, उपलक्षण आहे'.

कावळा बसलेले देवदत्ताचे घर. अविद्या बसलेला आत्मा. कावळ्याने लोपविले की नाही? अरे! उलट कावळा संबंधाने देवदत्ताच्या घराची ओळख होते. परंतु, जो कावळ्यावरच लक्ष ठेवतो, त्याच्यासाठी घर लोपते. मग कावळ्याच्या पीसाकडेच लक्ष दिले, तर घर लोपणार नाही? त्याप्रमाणेच, अविद्या आणि तिच्या कार्यावर लक्ष लावून बसलो, तर ब्रह्म लोपणार नाही का? तुमचे लक्ष अविद्येवर, अविद्याकार्यावर की ब्रह्मावर? भगवान श्रीतुकाराम महाराज आपल्याला कशावर लक्ष लावण्यास सांगतात?

प्रमाण –



लक्ष लाऊनि राहा गोविंदी गा ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

जास्तीत जास्त लोकांचे लक्ष अविद्याकार्यावर आहे. केवळ श्रवण करण्याने सिद्ध होता येत नाही. पुढे जाऊन कळणे, पटणे, वृत्तीवर बाणणे याला देखील सिद्धता म्हणता येत नाही. अनुभवात असेल तर सिद्धता.

आई, बाप म्हणतात, 'माझे माझ्या पोरावर चांगले लक्ष आहे'. म्हणजेच त्यांचे कावळ्याच्या पीसावरच लक्ष आहे. पुत्र हा अविद्यारूपी कावळ्याचा पीस आहे. पुत्र जेथे जेथे जाईल त्यातच आई, बाप गुरफटतात. पुत्रालाच ते आत्मा मानतात.

प्रमाण –

आत्मा वै पुत्र नामासि ।। १०.७८.३६ ।।

– श्रीमद्भागवत् पुराण

कावळ्याचे पीस उडत जेथे जेथे जाईल, त्या त्या घराला देवदत्ताचे घर समजतो. त्याप्रमाणेच, संसारात जेथे जेथे जातो तेथे तेथे रममाण होतो, खरे समजतो. काही जणांचा असा भाव असतो की, 'सद्गुरूंनी माझा कितीही अपमान केला तरी चालेल, इतरांनी अपमान केला, तर ते मी खपवून घेणार नाही'. अपमान झाला की लक्ष अपमानावर जाते. येथे साधक फसतो. त्याने देहधर्मांकडे लक्ष न देता आत्म्याकडेच लक्ष द्यावे. साधकदशेत ही गोष्ट आचरणात असावी. भ्रम हा शास्त्र, सद्गुरूंच्या सहाय्याने जातो.

कावळा ज्या घरावर बसला ते देवदत्ताचे घर ही गोष्टसाधकाने लक्षात घेतली, तर त्याने देवदत्ताच्या घराकडे लक्ष द्यावे. इकडे तिकडे लक्ष देऊ नये. नंतर, कावळा असला काय किंवा नसला काय, फरक पडत नाही. उपलक्षण जाईल किंवा राहिल. कावळा बसून राहिल किंवा उडून जाईल, लक्ष उपलक्ष्यावर पाहिजे. जो साधक उत्तम अधिकारी असतो, त्याच्यासाठी अविद्या उपलक्षण असते. उपलक्ष्यावर म्हणजे आत्म्यावर दृष्टी असेल, तर उपलक्षण म्हणजे अविद्या असूनही ती राहत नाही. आत्मा आणि ब्रह्म हे शब्द फसवे आहेत. कारण त्यामुळे आत्मा व ब्रह्म वेगवेगळे आहेत असे काही जण समजू लागतात. पण तसे नाही, ते दोन्ही एकच आहेत. आत्मा ब्रह्मरूप आहे. निरुपाधिक 'मी' हा योग्य शब्द आहे. अविद्या 'मी'वर आरोपित आहे. दृष्टी 'मी' वर जावी, मग अविद्या गेली किंवा राहिली काय. 'मी' कोण ? – 'अहं ब्रह्मास्मि'. 'मी' 'आत्मा' आहे. 'मी' ब्रह्म आहे.

प्रमाण –



**मी वासुदेव तत्त्वतां । कळों येईल विचारितां ।**
**आहे ठाउका सभाग्य संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

बरं! मला सांगा, एवढा आपण अभ्यास केल्यानंतर तुम्ही काही त्याग केला का? आता तर आपण उपलक्षणाचा विचार करण्यापर्यंत पुढे गेलेलो आहोत. त्याग कसा केला? करून की न करून? का त्यागायचे? कशासाठी त्यागायचे? काम–क्रोधादिकांचा त्याग कशासाठी? यातच गुंतू नका, पुढे या. 'कळेल' असे वाटते. कसे कळेल? अविद्या गेली पाहिजे. आत्म्यावर लक्ष ठेवले, तर अविद्या जाते. राहिली तरी जाते. कावळ्याप्रमाणे.

समजा, घरातील एखाद्या व्यक्तीला वाळीत टाकायचे असेल, तर काय करतात? त्याच्याकडे लक्ष देत नाहीत. दुसरीकडे लक्ष देतात. त्याप्रमाणे, 'मी'वरच लक्ष केंद्रित केले, तर अविद्या उपलक्षण ठरते. उपलक्षण तीन्ही काळी असावे, अशी गरज नाही. उपलक्षण व्यावर्तक असते. अविद्या कुठेही बसत नाही, कोणालाही पकडत नाही. हडळ ज्याला पकडायचे ठरवते त्यालाच पकडते. अविद्येला आरूढ होण्यासाठी कोण पाहिजे? ज्ञानी पुरुषाचा अविद्येशी संबंध येतो. कर्मठ, उपासक, योगी यांना अविद्या म्हणजे काय हेच माहीत नसते. तिच्या कार्यातच ते रमतात.

वेगळे करणे, हा अविद्येचा स्वभाव आहे. कोणापासून वेगळे करते? ब्रह्माहून वेगळे करते. जीव, शिव, राम देशपांडे हे वेगळे आहेत असे अविद्या दाखविते. अविद्येची लेकरे तेच काम करतात–तुकडा पाडणे. अविद्येची लेकरे म्हणजे अविद्याकार्य. परिछिन्न करणे हे अविद्या आणि अविद्याकार्याचे काम. परंतु, अविद्या उपलक्षण ठरली, तर आपला फायदा आहे. तुकडे दिसत असले तरी परिछिन्नता नाही हे उपलक्षणात ठरते. अविद्या असली काय आणि नसली काय, असा निश्चय असणे म्हणजे अविद्या उपलक्षण ठरते. परिछिन्नता गेली काय, न गेली काय, चालते. 'परिछिन्नता' हा भ्रम होता हेच कळते.

लग्नानंतर बायको विशेषण होते. मुले झाल्यानंतर ती उपाधी ठरते आणि मुले विशेषण ठरतात. परंतु, बायको कधीही उपलक्षण ठरत नाही. बायको मेली की नवरा तिचा फोटो भिंतीवर टांगतो आणि तिच्या आठवणींवर जगतो. बायको मेल्यावरही पुरुषाला ती विशेषण होते. अशाप्रकारे, बायको विशेषण, नंतर उपाधी आणि मेल्यानंतर परत विशेषण होते.

अनंत कल्पांपूर्वी कधीतरी अविद्येचा विशेषण म्हणून स्वीकार केला, म्हणून स्थूल आणि सूक्ष्मदेह निर्माण झालेत. जीव अनंत काळापासून लाखो योनींमध्ये असंख्य जन्म घेत घेत प्रवास करत आला. भोगत भोगत थकला. जगत्रूपी खेळाला विटला, वैताग आला. मग परमार्थ करू लागला. त्याला अविद्या उपाधी झाली. तो महाराज बनला. महाराजाने ग्रंथ वाचले आणि दुसऱ्यांना परमार्थ सांगावा असे त्याला वाटले, चिंतने सांगावी असे वाटले. मग,

'महाराज' असे तादात्म्य होते म्हणजे अविद्या विशेषण ठरते. अशाप्रकारे पूर्वी विशेषण, मग उपाधी आणि महाराज झाल्यावर परत अविद्या त्याच्यासाठी विशेषण होते. महाराज जेव्हा मरतो तेव्हा कोण म्हणून मरतो? महाराज म्हणून की जीवन्मुक्त म्हणून? तुम्ही महाराज होणार की जीवन्मुक्त होणार? महाराज व्हा अथवा होऊ नका, पण जीवन्मुक्त व्हा.



उपाधीवर या, पण त्यावर राहू नका. कारण उपाधीहून परत विशेषणावर घसरण होऊ शकते. या कारणासाठी उपाधीला उपलक्षण करा. एकदा का अविद्या उपलक्षण ठरली की परत ती विशेषण होत नाही. अविद्या उपलक्षण ठरणे ही अंतरंग गोष्ट आहे.

तुमच्याकडे किती पैसा, सोनं, संपत्ती आहे हे कोणाला सांगता? जे तुमचे अंतरंग, जीवलग असतील त्यांना. जवळच्या माणसाला तरी सांगता का? येथे अनेक वर्षांपासून मी चिंतने सांगत आहे. परंतु, या घरातील कोणीही आतापर्यंत त्यांच्याकडे किती संपत्ती आहे हे मला सांगितलेले नाही. संपत्तीबद्दल मनुष्य त्याच्या पत्नीला सांगतो आणि मुले मोठी झाली की त्यांना योग्य काळी सांगतो. मनुष्य अंतरंग गोष्टी जीवलगांना सांगतो.

जे सत्‌शिष्य आहेत, अंतरंग आहेत त्यांनाच सद्‌गुरू अविद्येला उपलक्षण करून देतात. तो कृपेचा विषय आहे. म्हणून साधूसंतांशी जीवलग व्हायला हवे.

प्रमाण –

आतां तुम्ही कृपावंत। साधुसंत जीवलग ॥

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

भगवान श्रीज्ञानदेव महाराज, त्यांचे ग्रंथ आपल्याला जीवलग असावेत. तर अविद्या उपलक्षण होईल. मग, लक्ष आत्म्यावर राहिल. एकदा अविद्या उपलक्षण ठरली की मग ती विशेषण होत नाही. स्वतःच्या जीवावरूनच बायकोला मारून टाकले, तर ती विशेषण राहिल काय? ती उपलक्षण ठरेल. गेली काय किंवा राहिली काय? अविद्या उपलक्षण झाली, तर ती राहिली काय किंवा गेली काय? कावळा जर उडून गेला नाही, तर त्याच्यापासून काही सुख आहे का? कावळा उडून गेला, तर त्याचे दुःख नाही. अविद्या गेली तर सुख नाही, राहिली तर दुःख नाही. न करता अविद्येचा त्याग होतो. अविद्येला उपलक्षण संबंधाने ओळखली की तिचा त्रास होत नाही. मुख्यमंत्रीपदावर विद्यमान असलेल्या पुरुषाच्या मुलांना घाबरून राहावे लागते. मुख्यमंत्रीपद विद्यमान राहिले नाही, तर त्याच्या मुलांपासून भीती नाही. त्याचप्रमाणे, अविद्याच जर विद्यमान ठेवली नाही, तर तिच्या लेकरांपासून म्हणजे अविद्याकार्यांपासून भीती वाटत नाही. देहांचे असंख्य धर्म, घर, बायको, पोरं, संपत्ती ही अविद्येची लेकरे आहेत. स्थूलप्रपंच, सूक्ष्मप्रपंच राहिला काय, गेला काय. अविद्येला न हाकलता हाकलली. लेकरांची अडचण नाही. ज्ञानी अविद्याकार्याला घाबरत नाही. का घाबरत नाही? ते अविद्येची सत्ताच काढून घेतात. तर मग अविद्या आणि अविद्याकार्याचे काहीच चालत नाही. जगत् दिसते ना? जगत् असू द्या, देहांचे धर्म असू द्या. असंख्य पदार्थ असू द्या. त्याने काही बिघडत नाही. पण

केव्हा? जेव्हा अविद्या विशेषणाहून उपाधी आणि उपाधीहून उपलक्षण ठरेल तेव्हा.



'त्वम्' पदार्थाचा त्याग कुठपर्यंत करावा? भगवान श्रीतुकाराम महाराजांच्या जीवनात त्याग कुठपर्यंत दिसतो? एका शेतकऱ्याच्या शेतावर राखण केल्यानंतर, अमाप पिक आल्यामुळे, त्या दयाळू शेतकऱ्याने महाराजांना अनेक पोती धान्य दिले. महाराजांनी गोर–गरीबांना ते वाटून टाकले. शेवटची पायली शिल्लक असलेल्या धान्याचे पीठ करण्यासाठी त्यांची बायको जात्यावर बसली होती. तेवढ्यात एक भिकारी दारात आला. त्याने धान्य मागितले. महाराजांनी धान्य संपले हे पाहून जात्यातून निघालेले सर्व पीठ त्या भिकाऱ्याला देऊन टाकले. ज्याप्रमाणे, वृक्ष पापी–पुण्यवान असा भेद न करता सर्वांना सावली, फळे देतो तसा त्याग श्रीतुकाराम महाराजांच्या जीवनात दिसतो. दारात उभा असलेला भिकारी असो वा लबाड असो, त्याला दान करायचे. एकदा बायकोची साडीच एका भिकाऱ्याला त्यांनी देऊन टाकली. ते सरसकट त्याग करीत, हातचे राखून नाही. सरसकट त्यागणे म्हणजे त्याग. काहीतरी राखून ठेवले त्याला त्याग म्हणत नाहीत. काम, क्रोधादिक राखून ठेवले त्याला त्याग म्हणत नाहीत. त्यागायचे तर सरसकट त्यागायचे, स्वीकारायचे तर पूर्णच स्वीकारायचे.

साधकाने कावळ्याचा पूर्ण त्याग करावा. लक्ष सरळ देवदत्ताच्या घरावर हवे. कावळ्याकडे संपूर्ण दुर्लक्ष म्हणजेच कावळ्याचा संपूर्ण त्याग होतो. कावळ्याचा त्याग झाल्यामुळेच लक्ष त्याच्या पीसांवर जाण्याचा प्रश्नच येत नाही. एकदा का देवदत्ताच्या घरात गेला आणि बाहेर आला की मग कावळा घरावर राहो अथवा उडून जावो, हरकत नाही. मग, मनुष्य देवदत्ताच्या घरात राहिला, नाही राहिला तरी चालते. 'आत्मनिश्चय' केल्यावर संसार केला तरी फरक पडत नाही आणि नाही केला तरी फरक पडत नाही. अशा मुक्त महापुरुषाच्या हातून पाप–पुण्य घडो अथवा न घडो तो त्यात अडकत नाही.

प्रमाण –

तया कर्मामाजी मग। संहरो आघवें जग।
अथवा नवें चांग। अनुकरो ।।४३२।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

खरेतर, अविद्या उपलक्षण ठरलेल्या महापुरुषांना 'विदेहमुक्त' म्हणावे व अविद्या उपाधी ठरलेल्या महापुरुषांना 'जीवन्मुक्त' म्हणावे.

मग, कावळ्याला पाणी देणे, पूजा करणे, त्याला आंघोळ घातली तरी फरक पडत नाही. विद्वान महापुरुष संसारात रममाण होवोत अथवा संसाराचा त्याग करोत, त्यांच्या जीवन्मुक्तिला बाधा येत नाही. जेव्हा खरवडून त्याग करणार तेव्हा जीवन्मुक्तिकडे वाटचाल कराल. अविद्येच्या त्यागानेच खरवडून त्याग होतो.

परंतु, सध्या आपल्या आणि देवदत्ताच्या घरामध्ये काही अंतर आहे. मधे अनेक घरे आहेत, वाट काढत काढत देवदत्ताच्या घरापर्यंत पोहचायचे आहे. देवदत्ताच्या घरावरील कावळ्याकडे पाहत पाहत पुढे चालायचे आहे. मागे वळून पाहायचे नाही. एकदा क्षणभर मागे पाहिले आणि तेवढ्यात कावळा उडून गेला, तर मग परत देवदत्ताचे घर कोणते हे शोधायला वेळ लागतो.



अविद्येसह आत्म्यावरील दृष्टी एक क्षणभर जरी बाजूला गेली तरी आत्मानुसंधान साधणे पुढे कठीण होते. एवढा मोठा सूर्य, छोट्या ढगामुळे झाकला जातो. सूर्याला काही फरक पडत नाही. ढगं आपल्याला सूर्यापासून वंचित करतात. तसेच, आपण जणू आत्म्यापासून दूर आहोत. आपली वृत्ती बहिर्मुख आहे. दोन चाकी गाडी असेल तर चार चाकी कधी मिळेल? बंगला केव्हा बनेल? या गोष्टींकडे वृत्ती लागलेली असते. अंतर्मुख होऊन आत्मानुसंधान करावे. तुम्ही एका खोलीत स्थिरपणे चार तास बसू शकाल की नाही? मी असे ऐकले की पावसचे स्वामी स्वरूपानंद महाराज एकाच खोलीत ४० वर्षे राहिले होते. आपल्यापासून सूर्यामध्ये जे अंतर आहे ते कमी करत गेलो तर ढगाने सूर्य झाकला जाणार नाही. आपले एक बोट डोळ्यासमोर धरले तरी सूर्य दिसत नाही. खरे पाहता, आत्मा झाकला गेलेला नाही. तसे वाटते. त्यामुळेच तर फसतो. अंतर कमी करा. जीवाने स्थूल, सूक्ष्मप्रपंचात रममाण होऊ नये. जीवाने जीवाच्या ठिकाणी राहावे, हृदयात. जीव जपून ठेवा. नवरा, बायको परस्परांना म्हणतात, 'माझा तुझ्यात जीव आहे' तर आता नवरा मेल्यावर बायको सरणावर जात नाही किंवा बायको मेल्यावर नवरा सरणावर जात नाही. दोघांपैकी कोणीही सरणावर गेले तरी स्वखुषीने जाणार नाही आणि गेलेच, तर आपापल्या कर्मांनुसार दोघे भिन्न भिन्न योनीला प्राप्त होतील.

खालच्या (स्थूल आणि सूक्ष्म) प्रपंचांमध्ये जीव गुंतला नाही तर तो वरच्या (कारण) प्रपंचात येतो. (जीव आपल्या स्थानी येतो.) मग शास्त्र, सद्गुरू कमी वेळात जीवाला उपलक्षणावर आणून सोडतात. त्यागासाठी लक्षणेचा उपयोग आहे. कुठपासून ते कुठपर्यंत खरवडून काढावे? अविद्याकार्यापासून ते अविद्येपर्यंत सर्व खरवडून काढावे. घर, बायको, पोरे यांना खरवडून टाकावे. पण कदाचित् तेच तुम्हांला साफ करतील. कोणाची संख्या जास्त? अविद्येची लेकरेच चितपट करतात. अविद्येला पुढे येण्याची गरजच पडत नाही. काम, क्रोध, लोभ, मोह, घर, बायको, पोरे, अन्न, धन, मान ही लेकरे दररोज भेटतात. आपण उभे राहण्याचा प्रयत्न केला की ते आपल्याला पलटी करतात. समोर शंभर पैलवान हा एकटा. तरीपण छाती काढून रमतोस? चांगल्या मल्लाला शरण जा. त्यांचा शिष्य हो. मग अविद्या आणि तिची लेकरे काही करीत नाहीत. अविद्या आणि तिची लेकरे केव्हा गप्प बसतील? सद्गुरूंची कृपा पाहिजे. मागे–पुढे सांभाळणारे सद्गुरू हवेत.

प्रमाण –



१. मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

२. पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला ।
तेणें पांचजन्यु आस्फुरिला । अवलीळाचि ।।१४३।। अध्याय १

– श्रीज्ञानेश्वरी

सद्‌गुरू पुढे, शिष्य मागे असे आपल्या परंपरेत, संप्रदायात आहे. त्यामुळे, शिष्याच्या केसांलाही धक्का लागत नाही. म्हणजे परमार्थातील विघ्ने दूर होत जातात. परंतु, प्रारब्धाचे भोग भोगावेच लागतात. पण, त्याचा त्रास जास्त होत नाही. भगवान श्रीव्यास, भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज हे आपल्या मार्गाचे अध्वर्यु आहेत आणि सोबतच असंख्य जीवन्मुक्त महापुरुषांच्या शक्तीसमोर अविद्याकार्य काहीही करू शकत नाही. तुम्ही सनकादिकांना शरण गेले तर भीती नाही. परंतु, आपण देहांच्या धर्मांच्या पाया पडतो. क्रोध आला की क्रोधाच्या पाया पडतो. मद, मत्सर, मान, धन इत्यादी अविद्येच्या असंख्य लेकरांच्या पाया पडतो. सद्‌गुरुंच्या उपदेशाचे पालन करावे. सद्‌गुरुंच्या बाह्य आचरणाचे अनुकरण करू नये. त्वम्‌पदाला जहताजहती लक्षणा वापरून काय त्यागायचे हे पाहिले, म्हणजे 'जहती' पाहिले. पुढे उपलक्षणाचाही त्याग करून काय स्वीकारायचे ते पाहणार आहोत. म्हणजेच 'अजहती' विचार करणार आहोत.

*****

॥ ॐ तत् सत् ॥



## चिंतन क्रमांक ४७

## उपलक्षण-उपलक्ष्यभाव संबंध - ३

'तत्त्वमसि' महावाक्याच्या अभ्यासाचा हेतू जन्ममरणाचा फेरा चुकविणे हा आहे. तत्त्वमसि केवळ साधारण वाक्य नसून, वेदातील महावाक्य आहे. या महावाक्याचा विचार करणे गरजचे आहे. कारण त्यामुळे जन्ममरणाचा फेरा चुकतो. हे फल मिळाल्याशिवाय तत्त्वमसि हे 'महावाक्य' आहे असे कळणार नाही. ज्याला या फलाची गरज वाटते, त्याच्यासाठी हा विषय आहे. जो भुकेला आहे, त्याला जेवण द्यावे. ज्याला तहान लागलेली आहे, अशा माणसाला पाणी द्यावे. ज्याला भूक लागली नाही, अशा माणसाला जेवण दिले, तर ते त्याला पचणार नाही. त्याच्या शरीरात रोग तयार होईल. सभोवतालच्या माणसांच्या दबावाने जर कोणी परमार्थ करील, तर परमार्थ फलिभूत होणार नाही. परमार्थ आवडीवर आहे. कोणाला परमार्थ करण्याचा आग्रह करणे कामाला येत नाही. ज्याला भूक लागली असते तो जेवतो. संतांचा अनुभव आणि शास्त्रानुसार तत्त्वमसि हे 'महावाक्य' ठरते. फल प्राप्तीसाठी आत्ताच आपण सर्वांनी महावाक्याचा विचार करावा.

आपण जहताजहती लक्षणेचा वापर 'त्वम्' पदार्थ शोधण्यासाठी करत आहोत. महावाक्याला लक्षणांचा वापर कसा करावा? यासंबंधी विस्तृत वर्णन शास्त्रांमध्ये आढळत नाही. साधूंच्या मुखातून ते श्रवण करावे. जहताजहती = जहती + अजहती. जहतीने त्याग व अजहतीने स्वीकार करायचा असतो. जीवाने स्थूल, सूक्ष्म आणि कारणप्रपंचांचा त्याग करावा. याला त्वम्पदाच्या वाच्यार्थाचा त्याग म्हणतात. त्वम्पदाच्या लक्ष्यार्थाचा स्वीकार करणे म्हणजे काय आणि तो कसा करावा? आपण हे पुढे पाहणार आहोत.

मागील चिंतनात त्वम् पदार्थ वाच्यार्थ त्यागांतर्गत कारणप्रपंच म्हणजे अविद्येचा त्याग येथपर्यंत विचार केला होता. आपल्याशी अविद्येचा संबंध विशेषण, उपाधी आणि उपलक्षण संबंधाने कसा आहे? हे पाहिले. परमार्थ करायला लागल्यानंतर जेव्हा साधकाला अविद्या विशेषण होते, तेव्हा त्याने सद्गुरूंकडे धाव घ्यावी. त्यांच्या कृपेने अविद्या उपाधी होते. पुढे सेवा आणि शरणागतीने अविद्या उपलक्षण ठरते. मग, अविद्या राहिली काय किंवा गेली काय? हा प्रश्नच उरत नाही. न करताच अविद्येचा त्याग होतो. लक्ष उपलक्ष्यावर असावे.

तत्त्वनिश्चयासाठी महाकारणदेहाचा विचार करावा की नाही? असा एक प्रश्न साधकांसमोर असतो. कारणदेह म्हणजेच अविद्या देह. म्हणजेच अज्ञान देह. महाकारणदेह म्हणजे विद्या देह. अविद्येमुळे जीवाला 'स्व'चे अज्ञान असते. विद्या देहाच्या पातळीवर असलेल्या साधकाला 'स्व'चे ज्ञान असते. परंतु, तो स्वस्वरूप झालेला नसतो. जेव्हा जीव महाकारणात प्रवेश करतो, त्या क्षणापासून तो जीव राहत नाही. तो होतो शिव. जीवाने शिव व्हावे काय? जीवब्रह्मैक्याचा निश्चय होणे गरजेचे आहे. जीव राहायचे नाही. शिव व्हायचे

नाही. जीवाने सरळ ब्रह्मच व्हावे. जीव, शिव हे ब्रह्मावरील तरंग आहेत.



प्रमाण –

जीव शिव दोन्ही हरिरूप तरंग । सिंधु तो अभंग नेणें हरी ।।

– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

हरि म्हणजे ब्रह्म. परमार्थाचे फळ हरिरूप होणे आहे. शिवरूप होणे नाही. सद्गुरूंच्या कृपेने अविद्या उपलक्षण ठरली की साधक ब्रह्मरूप होतो. मग, शिवाशी काय घेणेदेणे? येथे परमार्थ संपतो. परंतु, येथपर्यंत तुम्हांला पोहचायचे आहे. या मार्गाने गेलात, तर निश्चितपणे ब्रह्मरूपच होणार. समुद्रावरची छोटी लाट अथवा मोठी लाट दोन्ही समुद्ररूपच असतात. छोटी लाट म्हणजे जीव व मोठी लाट म्हणजे शिव. छोट्या लाटेनेही हाती समुद्रच लागतो. त्याप्रमाणे, जीवाहून ब्रह्मरूप होता येते. जीव नंतर शिव, नंतर ब्रह्म असा क्रम असावाच असे नाही. जीवब्रह्मैक्य हा आपला विषय आहे. त्यासाठी, अविद्येला उपलक्षण करा.

प्रथम कुठे अडकलेले आहात हे शोधा. आपल्याला आपण ब्राह्मण, काळा, सुखी, दुःखी इत्यादी स्थूल, सूक्ष्मदेहधर्मांमध्ये नेमके कुठे अडकलो हे कळले पाहिजे. या प्रपंचांचा त्याग घडला, तर कारणावर येतो. तेव्हा, शिवपदाकडे जाण्याचा अधिकार येतो. अविद्येचा विद्येने नाश केला आणि महाकारणदेह राहिला, तर समजावे की अविद्या सापेक्ष ज्ञान संपले नाही. म्हणून, शिवपदाचा अधिकार येतो.

प्रथम साधकाला, 'मी ब्रह्म कसा असू शकेल?' असा प्रश्न पडतो. पुढे तो कारणावर जातो आणि 'मी अज्ञानी' म्हणजे 'मी ब्रह्म नाही' असे वाटते. त्याला ज्ञान झाले तर, 'मी ब्रह्म आहे' अशी समज त्याची असते. हा ज्ञानी पुरुष महाकारणदेहाच्या पातळीवर असतो. त्याला अविद्या उपलक्षण ठरलेली असते. असा ज्ञानी परत खाली घसरू शकतो. अज्ञान धरल्याशिवाय ज्ञान होईल काय? कावळा बसलेले देवदत्ताचे घर. कावळा हे उपलक्षण घ्यावेच लागते. अविद्या उपलक्षण ठरल्याने ब्रह्माची ओळख होते. स्वरूपाचे अज्ञान, म्हणून सापेक्ष स्वरूपाचे ज्ञान. जसा यक्ष तसे बलिदान. जशी अविद्या तशी विद्या.

ज्ञानी पुरुषांचे दोन प्रकार आहेत – अविद्येचा नाश करून महाकारणदेहावर असलेले ज्ञानी आणि ब्रह्मरूप झालेले ज्ञानी.

एक मनुष्य सकाळी नुकताच झोपेतून जागा झाला आहे. दुसरा मनुष्य येऊन त्याला विचारतो, 'तू जागा आहेस काय?' तेव्हा तो मनुष्य उत्तर देतो, 'हो, आत्ताच मी झोपेतून जागा झालो आहे'. ही निद्रासापेक्ष जागृती आहे. अशी अवस्था महाकारणदेहावर असलेल्या ज्ञानी पुरुषाची असते. तो ज्ञानाने जागा आहे, स्वरूपाने नाही. जो अविद्येला उपलक्षण ठरवून विद्या देहाच्या पातळीवर असतो, तो आत्ताच झोपेतून उठलेल्या पुरुषाप्रमाणे असतो. तो पुन्हा झोपू शकतो. तो ब्रह्मरूप नाही, ज्ञानी आहे. तेथून तो ढासळू शकतो.

एक मनुष्य सकाळपासूनच जागा आहे. दुपारच्या वेळेस दुसरा मनुष्य त्याला

विचारतो, 'तू जागा आहेस काय?' तेव्हा तो उत्तर देतो, 'मी जागाच आहे, झोपलो कधी

होतो?' ही जागृती चांगली आहे. ही निद्रासापेक्ष जागृती नाही. ब्रह्मरूप झालेल्या ज्ञानी पुरुषांची अशी स्थिती असते. त्यांच्या दृष्टीने अविद्या आणि विद्या नाहीत. ते स्वरूपाने जागे असतात.

साधकाने आपला भाव पवित्र ठेऊन शास्त्र, सद्गुरूंना शरण राहावे. अमुक साधक ज्ञानी की अज्ञानी असा विचार करत बसू नये. स्वतः ब्रह्मरूप होऊन कालातिक्रमण करावे.

जो अविद्येला उपलक्षण करून महाकारणावर येऊन बसला आहे, त्याला महावाक्याचा विचार जहताजहती लक्षणा वापरून करावा लागेल. जो जीव महाकारणावर आला आहे, त्याला शिव किंवा ब्रह्म म्हणू नये. तो जीव राहिलेला नाही, शिवपण नाही (पण, त्याला फक्त शिवपदाचा अधिकार आला आहे. शिवपद प्राप्त झालेलं नाही.) आणि ब्रह्महीं नाही, ही अत्यंत वाईट अवस्था आहे. त्याने जर जहताजहती लक्षणा वापरून विचार केला, तर सद्गुरूंच्या कृपेने ब्रह्म होईल. नाहीतर खाली येऊन जीव होईल किंवा वर जाऊन शिव होईल आणि जन्ममरणाचा फेरा कायम राहिल.

आई-बापांना त्यांच्या सर्वच मुलांबद्दल आपुलकी, कळवळा वाटत नाही. जो मुलगा आई-वडिलांच्या आज्ञेत राहतो, त्यांचे मनोगत जाणून आचरण करतो, व्यवस्थित राहतो, त्याच्याबद्दल त्यांना आस्था, कळवळा वाटते. जी मुले तशी वागत नाहीत त्यांच्याबद्दल आपुलकी नसते. असे का होते? याचे उत्तर मुलांनी शोधले पाहिजे.

शास्त्र, सद्गुरू हे आपले माय-बाप आहेत. निष्ठेने शास्त्रसेवा केली, तर फल मिळेल. शास्त्राभ्यास वारंवार करीत राहिल्याने शास्त्राला साधकाबद्दल कळवळा वाटेल. जे आंतरिकपणे हवे असते ते शास्त्रातून समोर येते. पुढे साधकाला सद्गुरू भेटावेत असे तीव्रतेने वाटले, तर असे काही घडेल की ते भेटतील. त्यांच्या कृपेने साधक पुढे ब्रह्मरूप होतो.

कोणी महाकारणदेहावर गेल्यावर जर शिवपदप्राप्तीचा अधिकारी झाला, तरी 'मला शिवपद नको' असे म्हणण्याची धमक पाहिजे. आपल्याला तर स्थूल, सूक्ष्मदेहांच्या धर्मांनीच पकडलेले आहे. 'मी बायको आणि मुलांचा प्रपंच व्यवस्थितपणे चालवितो', असे समजून फुगतो. शिव तर संपूर्ण जगताचा प्रपंच चालवूनही फुगत नाही. लोकांना परमार्थाचा बोध करून कोणी महाराज फुगला, तर त्याने हे लक्षात घ्यावे की तो भगवान श्रीव्यासांप्रमाणे बोध करू शकत नाही, त्यांच्यासारखे बोलू शकत नाही. म्हणून, महाराजानेही फुगू नये.

शिवपदाला नकार देण्याची तयारी या जन्मातच करा. नवरा, बाप होण्यासाठी नकार द्यावा. बायको मेली, तर दुसरी बायको करू नये. एक मूल असेल, तर दुसरे होण्याच्या पाठीमागे लागू नये. तुम्ही घरामध्ये एक प्रयोग करा. घरातील लोकांसमोर मोठ्याने म्हणा, 'मला बायको, पोरं नाहीत. मला आई, बाप नाहीत'. घरातील लोक तुम्हांला धपाटे मारतील, जोडे खाल. ते सहन करण्याची तुमच्यामध्ये ताकद नाही. (स्त्रियांनी तर असे प्रयोग करूच नयेत, अनंत अडचणी येतील) म्हणून, हे सर्व मनातल्या मनात म्हणा, तसा संकल्प करा.

आई, वडिल मुलाला अभ्यास करायला सांगतात. मुलगा हातात पुस्तक धरतो.

पण, विचार चित्रपटाचे करतो. म्हणजे, त्याच्या आई, वडिलांना फसवितो. हे फसविणे वाईट आहे. फसवावे तर कसं फसवावे? संसारात राहून त्यांच्याच नकळत ब्रह्मरूप व्हावे. त्या फसविण्याला किंमत आहे.



सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, प्रलय करणारी देवता म्हणजे शिव. पण, या शिवपदासंबंधी वैराग्य पाहिजे. हे शिवपणही 'ओविळे' आहे. म्हणून त्याचा स्वीकार करू नये.

प्रमाण –

**जयाचेनि कृपा सलिलें । जीव हा ठाववरी पाखाळें ।।**
**जें शिवपणहि ओविळें । अंगीं न लवी ।।११।। प्रकरण २**

– श्रीअमृतानुभव

जीव राहायचे नाही, शिव व्हायचे नाही. ब्रह्मरूप व्हायचे आहे. महाकारणदेहावर न जाता जहताजहती लक्षणांचा उपयोग करून ब्रह्मरूप कसे व्हावे, याचा अभ्यास करू. ज्या उपलक्षणांच्या सहाय्याने देवदत्ताच्या घरात गेलो, त्या उपलक्षणाचा नाश न करता नाश करावा. उपलक्षणाची गरज नाही. उपलक्षणाशिवाय देखील देवदत्ताच्या घरात जाता येते. उपलक्षणच नाही, असे ठरवायचे. कावळाच नाही. म्हणजे, कावळ्याची सत्ता नाही. देवदत्ताच्या घराची सत्ता आहे. त्या सत्तेवर लक्ष द्यावे. अशाप्रकारेच, अविद्या सिद्ध न करता जो ब्रह्मावर जातो, तो ब्रह्मरूप होतो. अविद्येची सत्ताच नाही, असे ती स्वतःच सांगते.

प्रमाण –

**अविद्या येणें नांवें । मी विद्यमानचि नव्हे ।।**
**हें अविद्याचि स्वभावें । सांगतसे ।।३८।। प्रकरण ६**

– श्रीअमृतानुभव

कावळा नाही, तर देवदत्ताचे घर नाही का? तसे नाही. अविद्या नाही म्हणजे ब्रह्म नाही का? असे नाही. अविद्या नाही, तर मग सोबत कोण राहत नाही? तिच्यासोबत विद्या राहत नाही, ज्ञान राहत नाही. अविद्या सापेक्षा विद्या राहत नाही. अज्ञान उडाले की ज्ञानही राहत नाही. अविद्या कशी उडवून लावावी. ज्ञानाने की स्वरूप ज्ञानाने? 'स्व'शी एकरूप नसलेल्या ज्ञानाने अविद्या उडवावी? की 'स्व'शी एकरूप असलेल्या ज्ञानाने अविद्या उडवावी? जसे, सूर्याच्या ठिकाणी सूर्याचा प्रकाश म्हणजे स्वरूप प्रकाश. पृथ्वीवरील सूर्याचा प्रकाश हा अंधार सापेक्ष प्रकाश आहे. सिद्धांतात हा प्रकाश म्हणजे अज्ञानसापेक्ष ज्ञान. महाकारणदेहावर काट मारण्यासाठी कारणदेहावर काट मारावी लागते. कारणच सिद्ध होत नाही, तर महाकारण सिद्ध होणार कसे? अंधारच नाही, तर त्याला संपवणाऱ्या उजेडाचा प्रश्नच नाही. सूर्याच्या ठिकाणी अंधार-उजेड असा प्रश्नच नाही. जहताजहती लक्षणेने,

शास्त्र-सद्गुरूंच्या सहाय्याने कारणदेह सिद्ध न करता ब्रह्मरूप होतो. कावळाच नाही, तरी देवदत्ताच्या घरात जातो.

तुम्हांला सांगितले, 'कावळा बसलेले ते देवदत्ताचे घर आहे'. दृष्टांतातील घर संकुचित आहे. कावळा ज्या इमारतीवर बसला आहे, तेथील देवदत्ताचे घर नेमके कुठे ? असा प्रश्न येतो. समजा, देवदत्ताच्या घराचे क्षेत्रफळच एक एकर म्हणजे चाळीस गुंठे आहे. घर खूप मोठं आहे. अनेक खोल्या आहेत, दरवाजे आहेत. घराला अनेक मजले आहेत. एक एकर एवढ्या क्षेत्रफळात पसरलेले देवदत्ताचे घर आहे. या घरावर कावळा बसला. ज्या भागावर कावळा बसला तेवढेच देवदत्ताचे घर मानणार की संपूर्ण एक एकर क्षेत्रफळ एवढे देवदत्ताचे घर मानणार ?

एक एकरभर पसरलेल्या घरावर कावळा बसलेला आहे. आता देवदत्ताचे घर नेमके कोणते ? कोणत्या मजल्यावर ? नेमके कुठे जायचे ? अडचण आली. घर व्यापक असल्यामुळे कावळ्याचा उपयोग नाही. ज्या भागावर कावळा बसला तेवढेच देवदत्ताचे घर. असा संकुचित विचार आणि निश्चय होऊ शकतो.

अज्ञान आरोपित ते ब्रह्म. ब्रह्म काय एकाच देहापुरते संकुचित आहे ? जीव एक आहे, दहा आहेत की अनेक आहेत ? अज्ञान किती आहे ? केवळ आत्मा कळणे हा परमार्थाचा शेवट नाही. 'आत्मा ब्रह्मरूप आहे' असा अनुभव म्हणजे सिद्ध स्थिती. देवदत्ताच्या विस्तृत घराच्या ज्या संकुचित भागावर कावळा बसला आहे, तेवढेच देवदत्ताचे घर नाही. एक एकर एवढ्या विस्तृत क्षेत्रफळावर पसरलेले हे संपूर्ण घर देवदत्ताचे आहे.

आत्म्याची प्राप्ती करणे एक वेळ सोपे. ब्रह्माची प्राप्ती होणे अवघड आहे. कावळ्याचे पाय घराच्या ज्या भागावर आहेत, तेवढेच देवदत्ताचे घर नाही. ब्रह्म एका देहापुरतेच मर्यादित नाही. ज्ञात, अज्ञात, श्रृत, अश्रृत, सर्व चराचरात्मक सृष्टी व्यापूनही ब्रह्म उरले आहे. उपलक्षणाला म्हणजे अविद्येला उडवावी लागेल. अविद्येचे सहाय्य तत्त्वनिश्चयासाठी घ्यायचेच नाही. देवदत्ताचे घर जाणण्यासाठी कावळ्याचे सहाय्य घ्यायचे नाही. पण, हे फारच अवघड आहे.

देवदत्ताच्या घराच्याच सहाय्याने त्याचे घर जाणले पाहिजे. सरळ देवदत्ताच्या घरावर दृष्टी पाहिजे. घराच्याच खुणा पाहिल्या पाहिजे. जसे की घर दोन मजली आहे, लाल रंगाचे आहे, क्षेत्रफळ एक एकर आहे, इत्यादीं हे सर्व देवदत्ताच्या घराची स्वरूप लक्षणे आहेत. सरळ स्वरूप लक्षणांकडेच दृष्टी हवी. कावळा बसलेला असो अथवा नसो.

उपलक्षण घ्यायचेच नाही. न घेता उपलक्षणाचा त्याग. कावळा असला काय किंवा नसला काय. अविद्या किंवा विद्या असण्याचा किंवा नसण्याचा प्रश्नच नाही.

दृष्टी सरळ सूर्यावरील सूर्यप्रकाशाकडे असावी. पृथ्वीवरील सूर्यप्रकाश आणि अंधाराकडे नसावी. दृष्टी समुद्रावर असावी. लाटांवर नसावी. सोन्याच्या अलंकारातील अलंकाराला काय महत्त्व द्यायचे ? लक्ष सोन्याकडे हवे.

दृष्टी ब्रह्मावर हवी. जगत् झाले काय किंवा नाही ? असा प्रश्नच नाही. जगताच्या

उत्पत्ती, स्थिती, प्रलयाकडे दृष्टी नसावी. ब्रह्माच्या स्वरूप लक्षणांवर लक्ष हवे. मग, कारण आणि महाकारणाचा प्रश्नच येत नाही.


जहताजहती लक्षणेत त्याग आणि स्वीकार करायचा असतो. ही लक्षणा त्वम्पदाला लावून स्थूल, सूक्ष्म आणि कारणप्रपंचाचा त्याग कसा करायचा, हे आतापर्यंत पाहिले. त्याचप्रमाणे, स्वीकार स्वरूपाचा करायचा असा निर्णय लावला.

चार प्रपंचाचा त्याग करत स्वरूपापर्यंत पोहोचलो, याला 'व्यतिरेक' असे म्हणतात. जहताजहती लक्षणेतील 'जहती' म्हणजे त्याग कशाचा करायचा? हा विचार पुर्णत्वास गेला. परंतु, अजहती राहिले आहे. 'अन्वय' राहिला आहे.

प्रमाण –

**तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे। सगुण निर्गुण एकु गोविंदु रे।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

सगुण–निर्गुण प्रपंचाचा त्याग करून लक्ष गोविंदाकडेच हवे. क्रमाने चार प्रपंचाचा त्याग. नंतर, स्वरूप लक्षणांचा विचार करून, स्वरूपाचा स्वीकार.

तोंड भाजल्यामुळे किंवा अन्य कुठल्याही कारणाने ज्याला सर्व पेय पदार्थ फुंकूनच पिण्याची सवय लागलेली असते, तो ताकसुद्धा फुंकूनच पितो. त्याप्रमाणेच, त्यागण्याच्या सवयीमुळे काही साधक 'जहती' लक्षणा वापरून त्याग करत जातात आणि चार प्रपंचाचा त्याग करून स्वरूपाचाही त्याग करतात आणि 'शून्य आहे' अशा भलत्याच निर्णयावर येतात.

जहताजहती लक्षणेतील 'अजहती' लक्षणा त्वम्पदाला वापरून स्वरूप स्वीकारायला शिकायचे. जो सरळ स्वरूप लक्षणांचाच विचार करतो, त्याला कारण आणि महाकरणाचा त्याग घडतो. 'अजहती' लक्षणा वापरून अन्वय कसा करावा हे शिकले पाहिजे.

पुढच्या चिंतनामध्ये स्वीकार कशाचा करायचा? अजहती लक्षणा कशी वापरायची? अन्वय म्हणजे काय? हे पाहणार आहोत. तुमच्यापैकी जे लोक चार प्रपंचाचा त्याग करून येतील, त्यांनाच येथे प्रवेश दिला जाईल. तुमच्यापैकी चार प्रपंचाचा त्याग करायला किती तयार आहेत? 'जहती' विषय संपला. अन्वयाचा विषय आला. पुढे 'अजहती' लक्षणेचा अभ्यास सुरू करणार, तेव्हा त्वम्पदाचा विचार पुर्णत्वास जाईल. त्यानंतर, तत्पदाला जहताजहती लक्षणा लावायची. पुढे त्वम् आणि तत्‌ची एकवाक्यता असिपदाने कशी होते, ते पाहणार आहोत.

चार प्रपंचांचा त्याग करून स्वरूपापर्यंत पोहचलो. व्यतिरेक केला. खाली येऊन अन्वयही करायला पाहिजे. संतांनी जगताचा फक्त तिरस्कार केलेला नाही, पुढे स्वीकारही केलेला आहे. तो कसा हे कळावे. 'जळी स्थळी काष्ठी पाषाणी भरला। रिता ठाव नाही उरला।' हे शोधायचे आहे.

पुढच्या वेळेस त्यागाचा अभ्यास करून या. दोन तास अगोदर म्हणजे पाच वाजताच

या. मी तुम्हांला ‘त्याग’ या विषयावर प्रश्न विचारीन. जे कोणी अचूक उत्तरे देतील, त्यांना चिंतनाला बसू देण्यात येईल, इतरांना परत जावे लागेल. चालेल का? ........... चिंता करू नका, गंमत केली. मी तसे कोणतेही प्रश्न विचारणार नाही.


पण, मरण येण्याच्या आत व्यतिरेक–अन्वय साधा. निर्णय लावल्यानंतर कसेही राहा. आपल्याकडे वेळ नाही. व्यतिरेक, अन्वय क्रमाने करा अथवा एकदम करा. पण विचार करा. पुढच्या क्षणाला मृत्यू होऊ शकतो.

प्रमाण –

घडिघडी काळ वाट याची पाहे । अजुनि किती आहे अवकाश ।।

– श्री संत एकनाथ महाराज हरिपाठ

घर, दारा, गणगोत आपल्याला वाचवणार नाही. हे ऐकले तरी ‘ये रे माझ्या मागल्या’ असे करू नका. जे वाचवतील त्यांचे ऐका. जे वाचवणार नाहीत, त्यांचे पाय चाटू नका. शास्त्र, सद्गुरू सेवेने जीवब्रह्मैक्य निश्चय होईल. त्यासाठीच, अट्टाहास करून ‘सर्वं खल्विदं ब्रह्म’ असा अनुभव घ्या. त्यासाठी अभ्यासाची गरज आहे.

★★★★★

## चिंतन क्रमांक ४८

## आत्म्याचा अन्वय

जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या उद्देशाने 'तत्त्वमसि' महावाक्याचा आपण अभ्यास करीत आहोत. तत्त्वमसि महावाक्यातील त्वम्‌पदाच्या वाच्यार्थाचा तीन प्रकारे त्याग कसा करायचा याचा अभ्यास केला. जहताजहती लक्षणेचा वापर करून महावाक्याच्या वाच्यार्थाचा त्याग आणि लक्ष्यार्थाचा स्वीकार करणे अशी रीत आहे. मागील चिंतनात उपलक्षण नाहीसे कसे करावे यावर विचार केला. उपलक्षण घ्यायचेच नाही. सरळ सत्, चित्, आनंद इत्यादी स्वरूप लक्षणांचाच विचार करायचा. परंतु, यासाठी सद्‌गुरूंची कृपा पाहिजे.

कावळा बसलेले हे देवदत्ताचे घर आहे. देवदत्ताच्या घरावर जेवढ्या अंशावर कावळा बसलेला आहे, तेवढेच देवदत्ताचे घर असा चुकीचा निर्णय लागू शकतो. घराचे क्षेत्रफळ एक एकर आहे. कावळा ज्या खोलीवर बसला आहे, तेवढेच देवदत्ताचे घर असा समज होऊ शकतो.

आपला अविद्येशी विशेषण म्हणून संबंध असेल तर विशेषण–विशिष्ट भाव काढावा, तर मग विशेष्य शिल्लक राहते. पुढे उपाधी–उपहित भाव काढला तर उपधेय उरते. नंतर उपलक्षण–उपलक्षित भाव मावळला तर उपलक्ष्य राहते.

'त्वम्' हा शब्द आपल्यासाठी केवळ शब्द नसावा. तो यथार्थ समजून घ्यावा आणि स्वतः त्वम्‌पदावर आरूढ व्हावे. जीव हा जीवरूपानेच कळला पाहिजे. ज्या अर्थी स्थूलदेह आणि सूक्ष्मदेह आहेत, त्या अर्थी अज्ञान आहे. अविद्येला विशेषण, उपाधी, उपलक्षण यापैकी काहीच धरले नाही, तर जीव जीवच राहत नाही. अशा तऱ्हेने अविद्या घालवली, तर महाकारणदेह तयार होणार नाही.

काही साधक अज्ञान देह सापेक्ष ज्ञान देहावर जातात. ज्ञान कशावर आरोपित असते ? ट्युबलाईटचा प्रकाश ट्युबलाईटवर आरोपित असतो. सूर्याचा प्रकाश स्थूलप्रपंचात सर्वत्र पसरलेला आहे. मूळ सूर्य आहे. सूर्याकडे पाहतो तेव्हा हा प्रकाश कळतो. सूर्यावरील सूर्याचा प्रकाश आणि पृथ्वीवरील सूर्याचा प्रकाश भिन्न नाही, एकच आहे. पृथ्वीवरील प्रकाश पृथ्वीवरील अंधाराचा नाश करतो. याप्रमाणे, अज्ञानाला घालविणारे ज्ञान असते. हे ज्ञान विकारी असून या पातळीवर असलेला ज्ञानी शिवपदाचा अधिकारी असतो. तेथून तो जीवपदावर किंवा सूक्ष्म, स्थूलप्रपंचावर घसरू शकतो.

सूर्याच्या ठिकाणी अंधाराचा प्रश्न नाही. सूर्य प्रकाशरूप आहे. याप्रमाणे स्वस्वरूप आहे. सूर्याकडे दृष्टी गेली पाहिजे. मग त्याचा स्वीकार आपोमत होतो. सूर्याचा स्वीकार करावा. सोन्याच्या अलंकाराकडे सोनार आणि ग्राहक यांची दृष्टी कशी असते ? सोनार सोने पाहतो. ग्राहक अलंकार पाहतो. अलंकारावरच दृष्टी असेल तर फसतो. सुवर्णावर दृष्टी हवी.

सुवर्णाचा स्वीकार केला, तर अलंकार आपोमत मिळतोच.

त्वम्पदाच्या वाच्यार्थाचा त्याग कोणी केला? जी वस्तू आपली असते, तिचा त्याग करता येतो. शेजारच्या घराचा त्याग मी करू शकत नाही. माझ्या मालकीचे जे घर आहे, त्याचा त्याग करता येतो. त्वम्‌च्या वाच्यार्थाचा त्याग आपण केला. का केला? कारण वाच्यार्थालाच आपण आपलं समजत होतो. अधिक जे आपले स्वरूप आहे, त्याचा स्वीकार करण्यासाठी.

सर्व प्रपंचांचा व्यतिरेक केल्यानंतर खाली चैतन्य उरते, त्याला 'मी' असे म्हणतात. 'मी'च्या पुढे सर्व प्रपंच आहे. 'मी'च्या पाठीमागे काही नाही. 'मी'च्या पुढे महाकारणदेहाच्या पातळीवर 'मी ज्ञानी' अशी समज आहे. हे विकारी ज्ञान आहे. त्याचा स्वीकार करू नये. पुढे कारणप्रपंचात 'मी अज्ञानी', सूक्ष्मप्रपंचात, 'मी क्रोधिष्ट, प्रेमळ, सुखी, दुःखी' आणि स्थूलप्रपंचात, 'मी ब्राह्मण, काळा, ठेंगणा' अशी समज असते. सर्व प्रपंच 'मी'वर आरोपित आहेत. सर्व प्रपंचांचा व्यतिरेक केल्यानंतर जे 'मी' उरते त्याचा स्वीकार करावा.

पूर्वी जहती लक्षणेचा वापर करून प्रपंच त्यागले. कोणी जर म्हटले की 'मी'च नाही, तर 'अजहती' लक्षणा वापरता येणार नाही. कारण, सर्व प्रपंच 'मी'वर आहे. 'मी' आहेच. 'मी'ला अजहती लक्षणा वापरून, 'मी'चाच स्वीकार करावा.

'मी'वर आरोपित धर्मांमध्ये गुंतले तर मुक्त होणार नाही. हे केवळ ऐकल्याने होणार नाही. देह धर्मांशी तादात्म्य आहे की नाही हे वेळ आल्यावर कळते. 'मी'चा स्वीकार करण्याचे ठरले आहे.

प्रमाण –

अर्जुनपण न घेतां। मी ऐसें जें पांडुसुता ।।
उठतसे तें तत्त्वता। तयाचें रूप ।।१३१५।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

अशा 'मी'ला घेतले पाहिजे. चार प्रपंचाचा त्याग. नंतर 'मी'चा स्वीकार. पुढे 'मी'चा सर्वत्र स्वीकार करता यावा, नाहीतर फसतो. ब्रह्म एकदेशी नाही. व्यापक आहे. भगवंताला केवळ आळंदीतच शोधले, इतर ठिकाणी नाही. असे चालेल काय? व्यापकता लक्षात आली पाहिजे. व्यष्टीने विचार करताना, सामान्य रूपाने नखशिखांत व्यापून, तर विशेष रूपाने हृदयात असलेल्या त्या 'मी'चा स्वीकार करायचा.

शेतात बीज पेरले, खत–पाणी घातले, कापणी–मळणी करून धान्य घरात आणणे हा शेवट. मधेच थांबून चालणार नाही. फल हातात आले तर शेवट. चार प्रपंचांचा व्यतिरेक करून चैतन्य गाठले. पुढे तेच चैतन्य सर्व जगतामध्ये आहे असा अन्वय केला, तरच परमार्थ संपतो. 'अहजती' लक्षणा वापरून अन्वय करून 'मी'चा स्वीकार सर्वांगावर करायचा असतो.

चैतन्यरूपाने 'मी' आहे. सत्, चित्, आनंद या तीन रूपाने अस्तित्व 'मी'चे आहे. त्याचीच सत्ता, त्याचेच ज्ञान, त्याचेच सुख आहे. सत्, चित्, सुख हे 'मी'चे अंगीभूत गुण आहेत. त्यांना वेगळे करता येत नाही. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असे श्रुतीमाता सांगते. तिघांचा एकपणा म्हणजे 'मी' आहे.



एखाद्याचा 'मी'चा अन्वय महाकारणदेहामध्ये झाला की 'मी ज्ञानी' अशी त्याची समज असते. ज्ञानामुळे 'मी' कळला की 'मी'मुळे ज्ञान कळले? ज्ञानाला 'मी'ने जाणले. 'मी' हा स्वतः जाणणेस्वरूप आहे. अन्वयामध्ये 'मी'ने हे ज्ञान महाकारणदेहाला दिले आहे. सूर्य उगवला की त्याचा प्रकाश पृथ्वीवर पसरतो. तेव्हा सूर्याकडे स्वतःकडे प्रकाश राहत नाही का? राहतोच. सूर्य स्वतःमध्ये कोणतीही उणीव न करता पृथ्वीवर आपला प्रकाश पाठवितो. 'मी' हा 'मी'मध्ये कुठलीही उणीव न आणता महाकारणदेहावर येतो आणि महाकारणाला सत्ता, ज्ञान आणि सुख प्रदान करतो. आता 'मी ज्ञानी' असे पूर्वीसारखे त्याचे तादात्म्य नसते. मानलेच तर संसर्ग असतो. 'मी' महाकारणापासून भिन्न असून महाकारणाला प्रकाशन करतो, असा त्याचा निश्चय असतो. त्याने स्वीकार 'मी'चाच केलेला असतो. म्हणून, द्वैत नसते आणि म्हणून, दुःख नसते. फक्त सुख असते.

पुढे 'मी'चा अन्वय कारणदेहात झाला की 'मी अज्ञानी' असे सत्यत्वाने नसते. 'मी' अज्ञानाला प्रकाशन करणारा असून, अज्ञानापासून भिन्न आहे, असा त्याचा निर्णय असतो. अज्ञान 'मी' पासून आले, ते 'मी'रूपच आहे असा निश्चय असतो. अज्ञानाला 'मी' प्रकाशन केले आहे. अज्ञान हे 'मी' फक्त मानले आहे. ते खरे नाही असा निश्चय असतो. स्वीकार 'मी'चाच होतो. म्हणून द्वैत कल्पित ठरते आणि दुःख न होता सुखच असते.

नंतर 'मी' अंतःकरणवान असा संसर्ग असतो, तादात्म्य नसते. सुख, दुःख, काम, क्रोध इत्यादी सूक्ष्मदेहाचे असंख्य धर्म आहेत. साधक अवस्थेत या धर्मांचा व्यतिरेक पूर्वीच झालेला आहे. आता अन्वय आहे. 'मी प्रेमळ', 'मी दुःखी' असे तोंडाने जरी तो म्हणत असला तरी तसे मानत नाही. मानलेच तर 'कल्पित अज्ञानापासून झालेले कल्पित धर्म' असाच त्याचा निश्चय असतो. त्याने स्वीकार केला असे वाटते. पण, प्रत्यक्षात स्वीकार केलेला नसतो. तो धर्मांपासून अलिप्त असतो. सूक्ष्मदेह आणि त्यांच्या धर्मांपासून 'मी' भिन्न आहे, असा त्याचा निश्चय असतो. 'मी' त्यात राहूनही 'मी' त्यात नाही अशा बोधाने तो स्वीकार 'मी'चाच करतो. या देहाला आणि त्यांच्या धर्मांना 'मी'ची सत्ता आहे, त्यांना 'मी'च प्रकाशन करतो आणि द्वैत कल्पित असल्यामुळे सुख, दुःखही कल्पितच असा त्याचा निश्चय राहतो.

पुढे स्थूलदेहामध्येही तो 'मी'चाच स्वीकार करतो. स्थूलदेहामध्ये नखशिखांत 'मी'च आहे, असा त्याचा निर्णय असतो. त्याने स्थूलदेह आणि त्याच्या धर्मांचा स्वीकार केला आहे असे वाटते, पण प्रत्यक्षात स्वीकार केलेला नसतो. या देहाला आणि त्यांच्या धर्मांना 'मी'ची सत्ता आहे, त्यांना 'मी'च प्रकाशन करतो आणि द्वैत कल्पित असल्यामुळे सुख, दुःखही कल्पितच असा त्याचा निश्चय राहतो.

पुढे स्थूलदेहातून वृत्ती बाह्य पदार्थांपर्यंत जाते. म्हणजे 'मी'च बाह्य पदार्थापर्यंत

जातो आणि पदार्थांच्या आकाराचा होतो. अंतःकरणात, इंद्रियांत आणि पदार्थात एकच चैतन्य आहे. कुटस्थचैतन्य म्हणजे 'मी' इंद्रियांच्या ठिकाणी असलेल्या चैतन्याशी एकरूप होऊन, पुढे पदार्थाच्या ठिकाणी असलेल्या चैतन्याशी एकरूप होतो. ज्यावेळेस अपरोक्ष ब्रह्मज्ञान होते, तेव्हा जगतामध्ये ब्रह्मअन्वय एका क्षणाच्या लाखाव्या हिश्यात युगपत् होते. तिन्ही ठिकाणी स्वीकार 'मी'चाच होतो. 'मी' सोबत आलेले सर्व धर्म सावलीप्रमाणेच आहेत, याचा त्यास ठाम निश्चय असतो. म्हणून, द्वैतरहित 'मी' कल्पित द्वैतप्रपंचात सत्तारूप, ज्ञानरूप आणि आनंदरूप म्हणून 'जीवन्मुक्त' स्थितीत राहतो.



अशाप्रकारे, महाकारणदेह ते स्थूलदेह, तसेच बाह्य पदार्थांमध्ये अन्वयाने 'मी'चाच त्याचा निश्चय असतो. त्याने चार देह स्वीकार केल्यासारखे वाटतात. पण, स्वीकार केलेले नसतात. असा अन्वय झाला, तर जीवन्मुक्ति सिद्ध होते. असे हे जीवन्मुक्त महापुरुष प्रपंचामध्ये राहूनही, 'मी'चाच स्वीकार करतात. ते 'मी'ला 'मी' म्हणतात. सावलीरूप देह आणि त्यांच्या धर्मांना नव्हे.

'अजहती' लक्षणा वापरून महाकारण ते स्थूलदेहापर्यंत आणि बाह्य पदार्थांपर्यंत एकत्व साधता येते.

मातीच्या चिखलापासून भांडी, मूर्ति, प्राण्यांच्या प्रतिकृती बनवता येतात. त्या सर्वांमध्ये एकच माती असते. खेळ मोडून परत माती तयार होते. त्याप्रमाणेच, एका 'मी'पासून चार देहांची उत्पत्ती झाली आहे. परंतु, 'मी'मध्ये कोणताही बिघाड झालेला नाही. प्रपंचांचा स्वीकार करूनही स्वीकार नाही.

घर, बायको, पोरे यांचा स्वीकार तुम्ही कसा केलेला आहे? स्वीकार करून स्वीकार केला की स्वीकार करूनही स्वीकार केला नाही? अलिप्त राहून व्यवहार करण्यासाठी स्वीकार केला असे दिसत नाही. बरं! तादात्म्याने स्वीकार केलेला असेल, तर तसे कायम ठेवून दाखवा. यम आला तर सर्व प्रपंच हिसकावून घेतो, कायम राहत नाही. मग, तुमचे तादात्म्य कुठे टिकतं? सांगा.

दोन व्यक्तींच्या चार देहांच्या पातळीवर एकी होऊ शकेल काय? समजा, दोन व्यक्तींच्या स्थूलशरीरांची एकी करायचे ठरले, तर तसे करता येईल काय? व्यवहार करताना दोघे कदाचित् म्हणतील, 'आम्ही मनाने एक आहोत'. पण ते नाटक असते, प्रत्यक्षात तसे नसते. पुढे दोघांचा जीव एक होऊ शकत नाही. केवळ दोघांचा 'मी' सदैव एकरूप असतो. दोघांनाही 'मी'च चालवितो.

मनुष्य आणि मनुष्येतर प्राणी हुशार आहेत. ते आपला जीव दुसऱ्याला देत नाहीत. जीव लबाड आहे. स्वतःचे अस्तित्व दुसऱ्याला देत नाही. ईश्वरालादेखील जीवांना एकरूप करता येत नाही. कल्प संपल्यावर जेव्हा महाप्रलय होतो, तेव्हा संपूर्ण सृष्टी सूक्ष्माहूनही सूक्ष्म म्हणजे कारण रूपात राहते. तेव्हा सर्व जीव बीजरूपाने वेगळे अस्तित्व ठेवून असतात. नवीन कल्पामध्ये ती बीजे फुटतात. सूक्ष्मदेह, स्थूलदेह प्राप्त होऊन जीव परत काही ना काही कर्म करीत राहतात.

हे सर्व कोणी केले ? 'मी'ने ठरविले हे सर्व करायचे. 'मी' जे ठरविल तेच होणार. 'मी'ला जे वाटेल ते 'मी'ला करता येते. पाय तुटला, जेवण केले इत्यादी सर्वच 'मी'ने केले. भोग 'मी'चा. परंतु, हे तुम्हांला कळलेले नाही. तुम्ही 'मी'ने 'मी'ला कळून घेतले नाही. कारल्याची भाजी कशी बनवायची ? घर कसे चालवायचे ? स्वर्ग कसा असेल ? अशा गोष्टी कळून घेण्यातच सर्वजण गुंतलेले दिसतात.

त्याग प्रपंचाचा करायचा. 'जहती' लक्षणा प्रपंचाला वापरायची. पण, तुम्ही 'जहती' लक्षणा 'मी'ला वापरली. स्वीकार 'मी'चा करायचा असतो. अजहती लक्षणा 'मी'ला वापराची असते. पण, तुम्ही अजहती लक्षणा प्रपंचाला वापरली. तुम्ही 'मी'चा स्वीकार केला नाही. मग, महावाक्याचा तुम्हांला काय उपयोग ? बाबांनो ! असे करू नका.

प्रपंचाच्या पाठीमागे धावू नये. व्यष्टीने प्रपंचांचा व्यतिरेक करीत आत आत जा आणि 'मी' व्हा. नंतर बाहेर येऊन सर्वत्र 'मी'च आहे, असा अनुभव घ्या. पण, हे फारच अवघड आहे. हे कसे साध्य करता येईल ? तुम्हांला तुमच्या पोराच्या जीवात जीव ओतणे जसे सहज आहे, तसा सद्गुरुंना जीव द्या. जीवावर या. आपण स्वतःला कोण समजतो ? चार प्रपंचांपैकी कोणत्या प्रपंचावर सध्या आहोत ? याचा प्रथम विचार करावा. तेथून पुढे जावे. स्थूलदेह आणि त्यांच्या धर्मात अडकले असाल, तर त्याग करीत करीत जीवावर या. जीवब्रह्मैक्य हा विषय आहे, यालाच 'कारणा'चा परमार्थ असे म्हणतात, कारण यामध्ये वाच्यार्थाने जीव या जगत्कारणाचा व लक्ष्यार्थाने ब्रह्म या जगत्कारणाचा विचार केला जातो.

स्थूल आणि सूक्ष्मदेह हे व्यवहारासाठी आहेत. परमार्थात त्यांचे काम नाही. मनुष्य देहातील जीव ब्रह्मरूप करणे सापेक्षित सोपे आहे. भगवान श्रीज्ञानदेव महाराजांनी रेड्याला ब्रह्मरूप केले नाही, रेड्याच्या जीवाला ब्रह्मरूप केले. हे अवतारी महापुरुषांनाच शक्य आहे. जो मनुष्य स्थूलदेहाला 'मी' समजतो, तो रेड्यापेक्षा कमी नाही. त्याला नक्कीच पुढे रेड्याचा किंवा म्हशीचा जन्म मिळणार आहे. आत्ताच जीवावर या. याल काय ? तुमचा जीव भलत्याच गोष्टींमागे धावतो. जीवाने कमीत कमी जीवावर राहावे. जीवाला धावावे असे वाटत असेल, तर त्याने शास्त्र, सद्गुरूंकडे धाव घ्यावी. सद्गुरूंच्या कृपेने 'मी' लक्षात येतो व 'मी'चा स्वीकार होतो. नंतर कारण, सूक्ष्म, स्थूलप्रपंचावर जरी आला, तरी त्याचा 'मी'चाच निश्चय असतो.

'जहती' म्हणजे त्याग, 'अजहती' म्हणजे स्वीकार. 'मी'वर गेल्यावर कळते की प्रपंच आरोपित होता. प्रत्यक्षात नव्हता. अन्वय साधल्यावर प्रपंचात राहिले तरी फरक पडत नाही. चार देह असूनही नाहीत, अशी 'जीवन्मुक्त' स्थिती असते.

*****

## चिंतन क्रमांक ४९
## तत् आणि त्वम् ह्यांची शरीरे आणि आभास

'तत्त्वमसि' महावाक्याच्या अभ्यासाचा हेतू जन्ममरणाचे चक्र खंडित करणे असा आहे. त्या चक्रात आपण अडकलेलो आहोत, हे वारंवार सांगूनही लक्षात येत नाही. लक्षात आले तरी वळत नाही. याची माहिती ज्यांना नाही, अशा लोकांच्या संगतीत आपण बहुकाळापासून राहात आलो आहोत. हा फेरा चुकविण्यासाठी संतांचा संग आणि शास्त्राभ्यास करणे गरजेचे आहे. वेदांतशास्त्र ऐकणारे आणि वेदांतशास्त्रावर बोलणारे मुक्त होतीलच असे नाही. वेदांतशास्त्रावर काही चिंतने ऐकली, आता मुक्त झालो, असा गैरसमज करून घेऊ नका. आठवडाभरात तुम्ही १ तास चिंतन ऐकता. परंतु, उर्वरित वेळ कसा घालवता? याचा पण विचार करा. येथे येऊन जे श्रवण करतात, त्यांचा अधिकार असेलच असे नाही. अधिकार ही वेगळीच गोष्ट आहे. प्रपंचात आपला जीव कुठे कुठे अडकलेला आहे, हे विचार करून जाणावे. तेथून जीव काढत काढत प्रगती साधावी. दाखविण्यासाठी परमार्थ करू नका. असे लोक नरकाला जातात. लहान मुलांपासून म्हाताऱ्यांपर्यंत सर्वांना परमार्थ करण्याची गरज आहे. परमार्थ हा स्वतःसाठी करायचा, दुसऱ्यासाठी नाही.

वेदांतशास्त्राची अंतरंग साधने म्हणजे श्रवण, मनन, निदिध्यासन आणि तत्–त्वम् पदार्थ शोधन ही होत. प्रथम जे श्रवण केले ते गळी उतरले पाहिजे. स्वतःचे लक्ष गोतावळ्यातून काढणे गरजेचे आहे. त्यांच्यापैकी कोणीही तुम्हांला सोडविणार नाही. मृत्यू सांगून येत नाही. पुढच्या क्षणाला मृत्यू येऊ शकतो. परमार्थामध्ये तत्परता हवी. यासंबंधी वेदांतसार या ग्रंथामध्ये एक उदाहरण आहे. ज्याच्या केसांना आग लागते, तो मनुष्य पाण्याच्या डोहाकडे जलद गतीने धाव घेतो. पोहता येते की नाही हा विचारच न करता डोहात उडी मारतो. तशी धाव परमार्थामध्ये हवी. अशी तत्परता जन्ममरणाच्या चक्रातून सुटण्यासाठी पाहिजे.

तत्, त्वम्, असि ही तीन पदे मिळून तत्त्वमसि महावाक्य बनले आहे. महावाक्याचे तात्पर्य कळणे सोपे नाही. त्यासाठी मोठे कष्ट आहेत. आपण सुरूवातीला 'तत्' आणि 'त्वम्'पदांचा पृथकपणे वाच्यार्थ पाहिला. नंतर एकत्रित तत्त्वमसिच्या वाच्यार्थाचा विचार केला. वाच्यार्थ जुळत नाही म्हणून आपण लक्ष्यार्थाचा विचार करीत आहोत. प्रथम जहती आणि नंतर अजहती लक्षणा वापरूनही महावाक्याचा लक्ष्यार्थ निश्चय झाला नाही. आता, जहताजहती लक्षणा वापरत आहोत. त्वम्पदाला जहताजहती लक्षणा लावून अविद्येचा त्याग आणि स्वरूपाचा स्वीकार कसा करायचा ते पाहिले.

मागील चिंतनात चैतन्याचा अन्वय चार देहांमध्ये कसा होतो ते पाहिले. अन्वय असतांना महाकारण, कारण, सूक्ष्म आणि स्थूलप्रपंचाशी संसर्ग असतो. तादात्म्य नसते.

आता, यापुढचा सूक्ष्म सिद्धांत सांगतो. मुक्त महापुरुषांना कारणदेह म्हणजे अविद्या

नसते. कारणदेह धरायचाच नाही. कावळा धरूच नये. अज्ञान धरूच नये. मुक्त पुरुषांचा

कारणदेह सिद्धच होत नाही. अज्ञानच नाही. ते स्वतःला जीव समजतच नाहीत. मानलाच तर एक वेळ मुक्त महापुरुषांचा महाकारणदेह मानता येईल. त्याचा संसर्ग असतो. मुक्त महापुरुष कधी महाकारणावर जरी आले तरी ते स्वतःला शिव समजत नाहीत. ते स्वरूपावर ठाम असतात. अशा मुक्त महापुरुषांना 'जीवन्मुक्त' म्हणायच्या ऐवजी 'विदेहमुक्त' म्हणावे. 'विदेहदशावान' म्हणावे. देह असतांनाच ते अशा स्थितीत असतात.

प्रमाण –

देहीच भोगू विदेही दशा ।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

ज्या झाडाचे सोटमूळ काढून घेतलेले असते, त्या झाडाप्रमाणे जीवन्मुक्तांच्या देहाची अवस्था असते. झाडाचे सोटमूळच काढले, तर झाड हळुहळू सुकायला लागते. आपोआप पाने, फांद्या, खोड, बुंधा हे सर्व सुकायला लागतात. त्याप्रमाणे, सूक्ष्म आणि स्थूलदेहांचे जे मूळ म्हणजे कारणदेह, तोच जीवन्मुक्तांचा नष्ट झालेला असतो. संसारचक्राचे मूळ म्हणजे अविद्याच शिल्लक राहत नाही. जीवन्मुक्तांचे केवळ प्रारब्ध कर्म उरलेले असते. वाळत चाललेल्या झाडाप्रमाणे त्यांचे देह असतात. ते स्थूल आणि सूक्ष्मशरीराने व्यवहार करतांना दिसतात, पण त्यांचा सदैव 'मी'चाच निश्चय असतो. जीवन्मुक्तांचा देह पडतो त्याच क्षणाला त्यांचा सूक्ष्मदेह अपंचीकृत पंचमहाभूतात नेहमीसाठी नष्ट होतो. स्थूलदेह पंचीकृत पंचमहाभूतांशी एकरूप होतो. त्यांचा परत कुठेही केव्हाही कोणत्याही लोकांत पुनर्जन्म होत नाही.

सुकत चाललेले झाड, दिसते म्हणून झाड आहे का ? जीवन्मुक्तांचा देह जरी दिसत असला तरी 'मी देह नाही' असा त्यांचा निश्चय असतो. छोटे झाड लवकर संपूर्णपणे वाळेल. त्याप्रमाणे, प्रारब्ध कर्मांना चालविणारे संस्कार कमी असतील, तर जीवन्मुक्तांचा देह लवकर पडतो. मोठे झाड उशिरा संपूर्णपणे वाळेल. त्याप्रमाणे, ज्या जीवन्मुक्त महापुरुषांच्या प्रारब्ध कर्मांना चालविणारे संस्कार जास्त असतील, तर त्यांचे आयुष्य मोठे असते.

सुकत चाललेल्या झाडाच्या आश्रयाला पशूपक्षी राहतात का? झाडापासून सावली, फळ इत्यादी मिळणार नाही हे जाणून पशूपक्षी झाडाचा त्याग करतात. त्याप्रमाणे, शक्यतो व्यवहारातील कोणताही मनुष्य जीवन्मुक्ताकडे लक्ष देत नाही. कारण जीवन्मुक्ताकडून याला व्यवहारात कोणताही फायदा होत नाही.

साधक जोपर्यंत प्रपंचांचा व्यतिरेक करीत नाही, तोपर्यंत अन्वय करता येत नाही. श्रेष्ठ अधिकारी पुरुषांचा व्यतिरेक न करता सरळ अन्वयच सिद्ध होतो. परंतु, असे उत्तम अधिकारी दुर्मिळ असतात. मध्यम आणि कनिष्ठ अधिकाऱ्यांना प्रपंचांचा व्यतिरेक आणि चैतन्याचा अन्वय सिद्ध करावा लागतो. त्यांना जहताजहती लक्षणेचा वापर करावा लागेल.

आतापर्यंत आपण त्वम्‌चा विचार केला. त्वम् म्हणजे काय? त्वम्‌पदामध्ये प्रपंचाचा त्याग आणि स्वरूपाचा स्वीकार कसा करायचा हे पाहिले.



त्वम् म्हणजे व्यष्टी आणि तत् म्हणजे समष्टी. त्वम् किंवा व्यष्टी म्हणजे एका जीवाचा विचार. यामध्ये स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर आणि कारणशरीर येतात. व्यष्टी स्थूलशरीरावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'विश्व' असे म्हणतात. व्यष्टी सूक्ष्मशरीरावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'तैजस' असे म्हणतात. व्यष्टी कारणशरीरावर जो चैतन्याभास अभिमान धरतो, त्या आभासाला 'प्राज्ञ' असे म्हणतात.

ज्याप्रमाणे, त्वम्‌चे तीन देह आणि तीन चैतन्याभास आहेत, त्याप्रमाणेच तत्‌चे तीन देह आणि तीन आभास आहेत.

ज्ञात, अज्ञात, श्रुत, अश्रुत संपूर्ण सृष्टीमधील सर्व जीवांची स्थूलशरीरे एकत्र केलीत, तर त्या शरीराला तत्‌चे स्थूलशरीर म्हणतात. समष्टी स्थूलशरीर म्हणजेच तत्‌चे स्थूलशरीर आहे. तत्‌च्या स्थूलशरीरावर अभिमान धरणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'विराट' किंवा 'वैश्वानर' असे म्हणतात.

सर्व जीवांचे सूक्ष्मदेह एकत्रित केले, तर त्याला समष्टी सूक्ष्मदेह म्हणतात. समष्टी सूक्ष्मदेह म्हणजेच तत्‌चा सूक्ष्मदेह आहे. तत्‌च्या सूक्ष्मदेहावर अभिमान धरणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'हिरण्यगर्भ', 'प्राण' किंवा 'सूत्रात्मा' असे म्हणतात.

सर्व जीवांच्या कारणदेहांना एकत्र केले, तर त्याला समष्टी कारणदेह किंवा माया असे म्हणतात. समष्टी कारणदेह किंवा माया म्हणजेच तत्‌चा कारणदेह आहे. मायेवर जो चैतन्याचा आभास अभिमान ठेवतो त्या आभासाला ईश्वर असे म्हणतात.

त्वम्‌बद्दल आपल्याला माहिती आहे. परंतु, तत्‌च्या शरीराबद्दल माहिती नाही. काही जणांची कल्पना अशी की तत्‌चे शरीर दिव्य असते. पितांबरधारी, मुकुट धारण करणारा इत्यादी प्रकारचा तो असतो. अशाप्रकारचा जो देव आहे, तो निराळा आहे. प्रत्यक्षात तत्‌चे शरीर तसे नाही.

तत्‌चे स्थूलशरीर म्हणजे काय? समजा, सृष्टीतील सर्व त्वम्‌चे स्थूलशरीरे एकत्र केली, तर एकत्रित शरीर हेच तत्‌चे स्थूलशरीर. पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेले अनंतकोट ब्रह्माण्ड एकत्र केले, तर ते तत्‌चे स्थूलशरीर. या शरीरावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याच्या आभासाला 'विराट किंवा वैश्वानर' असे म्हणतात.

स्थूल सृष्टी अफाट आहे. अचिंत्य आहे. सूर्यमालेत सूर्य आणि ग्रहांचा अंतर्भाव होतो. ही सूर्यमाला ज्या आकाशगंगेत आहे, ती आकाशगंगा गोलाकार आहे. एका क्षणाला प्रकाशकिरण अंदाजे तीन लाख किलोमीटर अंतर कापतो. याप्रमाणे प्रकाशकिरण एका वर्षात ३००००० × ६० × ६० × २४ × ३६५ = ९४६०.८ अब्ज किलोमीटर अंतर कापतो. ज्या आकाशगंगेत आपली सूर्यमाला आहे, त्या आकाशगंगेचा व्यास १,००,००० प्रकाश वर्षे इतका मोठा आहे. एका आकाशगंगेत करोडो तारे आणि ग्रह आहेत. याप्रमाणे असंख्य आकाशगंगा आहेत. इतकी अफाट स्थूल सृष्टी असतांना आपण आपल्या क्षुद्र देहाबद्दल

अभिमान धरावा का?


आता तुम्ही म्हणाल, 'सृष्टी एवढी अफाट कशी? सृष्टीत असंख्य जीव कसे?' हे समजण्यासाठी तुम्ही प्रथम स्वतःच्या शरीराचा विचार करा. एका मनुष्याचे स्थूलशरीर आपल्याला दिसते. हे स्थूलशरीर कशापासून बनले आहे याचा विचार केला का? मनुष्याच्या स्थूलशरीरावरच्या एक चौरस इंच क्षेत्रफळावर अंदाजे एक लाख सूक्ष्म जंतू राहतात. ते सूक्ष्म जंतू डोळ्यांनी दिसत नाहीत. तर सबंध शरीरावर किती सूक्ष्म जंतू असतील? हे सर्व सूक्ष्म जंतू त्यांचे पालनपोषण आपल्या शरीरावर करतात.

आता समजा, मनुष्याच्या स्थूलशरीरावरची कातडी बाजूला काढली तर रक्त आणि मांस यांचा चिखल दिसतो. तेथेही असंख्य सूक्ष्म जंतू आहेत. हाडांपर्यंत मोजता येणार नाहीत इतके सूक्ष्म जंतू आहेत. मनुष्याच्या स्थूलदेहावर असंख्य जीव जगतात.

प्रमाण –

हा देहो नाशिवंत मळमूत्राचा बांधा।
वरी चर्म घातले रे 'कूर्म किटकांचा' सांधा।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

रक्तामध्ये लक्षावधी पेशी आहेत. काही पेशी जन्मतात, काही मरतात. हे जीवच आहेत. असे म्हणतात की एक कप चहा पिल्याने सहा पांढऱ्या पेशी मरतात. चांगल्या आणि वाईट अशा दोन प्रकारच्या पेशी असतात. जेव्हा आपण चालतो, खातो, बोलतो तेव्हा लाखो जंतू जन्मतात व मरतात. चांगले आणि वाईट दोन्ही प्रकारचे जीव जन्माला येतात व मरतात. चांगला आहार घेतला, तर चांगले जंतू जन्मतात. वाईट पदार्थ खाल्ले, तर वाईट जंतू तयार होतात. त्यामुळे शरीरात रोग तयार होतात. मनुष्याचे शरीर म्हणजे असंख्य जीव. मनुष्य असंख्य जीवांचे पालन–पोषण करतो. शरीरात अपायकारक जंतू वाढले की रोग तयार होतो. डॉक्टरांकडे जावे लागते. औषध घेतल्याने ते सूक्ष्म जंतू मरतात. तब्येत चांगली ठेवायची असल्यास च्यवनप्राशसारखे औषध घेतले, तर चांगले जंतू तयार होतात.

तसेच, पृथ्वी म्हणजे मोठा जीव. पृथ्वीवर असंख्य जीव आहेत. अन्न–पाण्यावर ते जगतात. काही जीव जन्मतात, काही मरतात. उष्णता खूप वाढली, तर काही जीव मरतात. मनुष्य हुशार आहे. स्वतःच्या स्वार्थापोटी जमिनीत, पाण्यात, वातावरणात त्यांना प्रदूषित करणारे पदार्थ टाकतो. पृथ्वीचे अन्न बिघडते, तर मग पृथ्वी जगेल काय? पृथ्वीवरचे जीव जगतील काय? जमिनीवर, पाण्यात, आकाशात मोजता येणार नाहीत, इतके जीव आहेत.

त्याप्रमाणे, अनंत कोट ब्रह्मांड मिळून तत्‌चे स्थूलशरीर आहे. त्यातील आपण एक छोटासा अंश आहोत. असंख्य जंतू कोणावर अवलंबून आहेत? त्वम्‌च्या शरीरावर अवलंबून आहेत. त्याप्रमाणे, अनंतकोट ब्रह्मांड तत्‌वर अवलंबून आहे. त्वम् वाटेल तेव्हा खातो, बोलतो, चालतो तेव्हा लाखो जंतूंची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होत असते. म्हणजे त्वम् वाटेल

तेव्हा उत्पत्ती, स्थिती, प्रलय करतो.



स्थूलदेहधारी प्रत्येक त्वम्‌ला सूक्ष्मदेहसुद्धा आहे. तसेच, सृष्टीतील सर्व त्वम्‌ची सूक्ष्मशरीरे एकत्र केली, तर ते समष्टी सूक्ष्मशरीर. समष्टी सूक्ष्मशरीर म्हणजे तत्‌चे सूक्ष्मशरीर.

सृष्टीतील सर्व त्वम्‌च्या कारणदेहांची समष्टी म्हणजे तत्‌चे कारणशरीर, त्याला माया असे म्हणतात. आता कारणदेह म्हटले म्हणजे अज्ञान असेल असे वाटते. परंतु, तत्‌ला ज्ञान आहे. त्वम्‌सारखा तत् अज्ञानी नाही. म्हणून तत्‌च्या कारणदेहाला कारणदेह असे न म्हणता महाकारणदेह म्हणावे. कारणाचे कारण म्हणजे महाकारण. सापेक्षित अविद्या कनिष्ठ आणि माया श्रेष्ठ.

अविद्या ही त्वम्‌ची उपाधी आहे. माया ही तत्‌ची उपाधी आहे. माया शुद्ध सत्त्वगुणी असल्यामुळे तत्‌ला ज्ञान आहे. पण, ते स्वरूपभूत नाही. अविद्या एक जीवाला आवृत्त करते. अनंतकोट ब्रह्मांड ज्याचा स्थूलदेह आहे, त्या तत्‌ला माया आवृत्त करते. तत्‌च्या कारणदेहाला महाकारण म्हणावे. त्वम् प्रयत्न करीत करीत महाकारणापर्यंत जाऊ शकतो. मायेवर जो चैतन्याचा आभास अभिमान धरतो, त्या आभासाला ईश्वर असे म्हणतात. स्थूल, सूक्ष्म, कारण अशी त्वम्‌ची तीन शरीरे आहेत. स्थूल, सूक्ष्म, महाकारण अशी तत्‌ची तीन शरीरे आहेत. त्वम्‌च्या स्थूलशरीरावर, सूक्ष्मशरीरावर आणि कारणदेहावर अभिमान धरणाऱ्या चैतन्याच्या आभासांना अनुक्रमे विश्व, तैजस आणि प्राज्ञ असे म्हणतात. प्राज्ञ म्हणजे प्रकर्षेण अज्ञ म्हणजे तीव्र अज्ञान. जो साधक कारणावर म्हणजे जीवावर जातो त्याला अज्ञानाची तीव्रतेने जाणीव असते. परंतु, तुम्ही तर स्थूलदेहावर म्हणजे विश्व अभिमानी आहात. जीवावर जाणे सोपे नाही. परंतु, जीवावर आल्याशिवाय वेदांताचे फल मिळत नाही.

जन्ममरण चक्र किती भयानक असते? ते लक्षात घ्या. एखादा मनुष्य मेला आणि त्याचे प्रेत तसेच ठेवले, तर लगेच त्याच्या शरीरातले असंख्य वाईट जंतू त्याला खायला सुरुवात करतात. काही दिवसात केवळ हाडे शिल्लक राहतात. ती हाडे जमिनीत पुरली, तर तेथेही जंतू त्यांना खायला सुरुवात करतात. कदाचित् लाखो वर्षांनंतर हाडेही राहत नाहीत.

ईश्वर हा अकर्ता, अभोक्ता आहे. तो काहीही करत नाही. 'तो अकर्ता आहे' हे कसे समजावून घ्यावे? तुमच्या शरीरावर असंख्य जंतू आहेत. प्रत्येक क्षणाला हजारो जंतू जन्मतात, हजारो टिकतात, हजारो मरतात. पण, त्याबद्दल तुम्हांला काहीच जाणीव नसते, कर्तेपणा नसतो. मी जंतू मारले किंवा मी जंतू निर्माण केले असा अभिमान नसतो. त्याचप्रमाणे, अनंतकोट ब्रह्मांडामध्ये असंख्य जीव आहेत. त्यांच्यापैकी किती जन्मले, किती मेले याबद्दल तत् अकर्ता, अभोक्ताच आहे. कुठे सृष्टी झाली, कुठे टिकली, कुठे प्रलय आला हे सर्वच तत्‌ला माहीत नसते. त्याबद्दल तो अकर्ता आहे आणि म्हणूनच अभोक्ता आहे.

ईश्वर काही करत नाही. जीवांचे काय होते आणि काय नाही, याचा विचार तो करत नाही. जीवच म्हणतो, 'ईश्वराने माझे वाटोळे केले' किंवा 'ईश्वराने माझ्यावर कृपा केली'. जीव कर्ता, भोक्ता, गुणाधीन असल्यामुळे, तेच आरोप तो ईश्वरावर करतो. ईश्वर जीवाला

तारत नाही किंवा मारत नाही, ईश्वर करतच नाही, मग, तो 'चांगले करतो' किंवा 'वाईट

करतो' असे काही म्हणण्याचा प्रश्नच येत नाही. ईश्वर जीवाच्या कर्मात दखल देत नाही.

पंढरपूरला असलेली श्रीविठ्ठलाची मूर्ति ही उपलक्ष्याचे उपलक्षण आहे. श्रीविठ्ठल कमरेवर हात ठेवून आणि डोळे मिटून उभा आहे. जणू काही आपल्याला सांगत आहे, 'जीवांनो, तुमच्या चांगल्या–वाईट कर्मांबद्दल मला माहीत नाही. तुमचे कर्तृत्व–भोक्तृत्व मी घेत नाही'. तर, मग आपल्या चांगल्या वाईटासाठी जबाबदार कोण? आपणच आपले चांगले–वाईट करतो. विज्ञानवादी शिकवितो की तुम्ही अन्न, धन, मान मिळवा. साधू शिकवितात, 'वैराग्यवान व्हा'. दोघांमध्ये विसंगती आहे. परंतु, ईश्वर काही म्हणत नाही. ईश्वर दोन्हीचे कर्तृत्व घेत नाही. म्हणून तो अकर्ता.

जो कर्तेपणा घेतो, त्याला भोगावे लागते. सोडीयम व क्लोरीन एकत्र केले तर मीठच होणार. क्रिया तशीच प्रतिक्रिया. भिंतीवर डोके आपटले तर डोके फुटणार. त्याचप्रमाणे, पाण्यावर डोके आपटले, तर पाणी बाजूला सरकणार. जसे कर्म तसे फळ. सात्त्विक अन्न खाल्ले, तर शरीर नीट राहिल. तामसी अन्न खाल्ले, तर रोग होईल. विचित्र कर्म केले, तर पुढे डुकराचा जन्म मिळतो. चांगले कर्म केले, तर स्वर्गात देवाचे शरीर मिळते.

जीव हा कर्ता–भोक्ता आहे. अकर्ता, अभोक्ता असा तत् आहे. त्वम्ने तत्चा विचार का करायचा? तसे पाहिले तर त्वम्पदाचा लक्ष्यार्थ कळला, तर तत्पदाची गरज नाही. पण, त्वम्ला खोड जडली आहे – तत्च्या वाच्यार्थाच्या मागे लागण्याची. तत्चा व्याप प्रचंड आहे. त्वम् त्यातल्या वस्तू भोगू इच्छितो, जाणू इच्छितो. इथे गडबड होते. त्वम् फसत जातो. पृथ्वीवरील अनेक पदार्थांचे, जीवांचे ज्ञान मिळविण्याच्या मागे लागतो. पुढे चंद्र, सूर्य, तारे, ग्रह या मायाकार्याचेच ज्ञान मिळविण्याच्या मागे लागतो. जीवांचे चौऱ्यांशी लाख प्रकार आहेत. विज्ञानवादी माणसाला आतापर्यंत अंदाजे काही लाख जीवांचा शोध लागला असेल. असंख्य कल्प शोध घेण्यात घालवली, तरी तत्मधील संपूर्ण पदार्थ व जीवांची माहिती मिळविता येणार नाही. माया अचिंत्य आहे. सध्या तुम्ही तत् आहात, त्वम् आहात की नवरा, बायको इत्यादी आहात? अरे! यात गुंतू नका. मायाकार्याचे मूळ माया आहे. मायाकार्यात गुंतलेला जीव म्हणजे काय? तत्त्व म्हणजे काय? हे कळत नाही.

तुम्ही एक कुटुंब चालविता त्यानेच फुगून गेला आहात. त्याप्रमाणेच, स्वर्गातील इंद्र देखील स्वत:ला श्रेष्ठ समजतो. तत्पद का कळून घ्यावे? तत्पद कळून घेतल्यावर मायाकार्य म्हणजे काय? हे समजेल आणि त्यातील पदार्थांच्या मागे लागण्यात काही अर्थ नाही हे कळेल. कोणी विचारतो, 'काय गरज आहे तत्पदाचा अभ्यास करायची?'. नको करू. तुझी फजिती होईल. एक विचार 'घर, बायको, पोरं' आणि दुसरा 'अनंत कोट ब्रह्मांड' यांपैकी कोणता विचार श्रेष्ठ?

मरण येण्याच्या आत मीमांसा करून तात्पर्य निश्चय करायला हवा. मरण निश्चित आहे. मरण आले की गणगोत कामाला येणार नाही. कितीही अन्न, धन, मान कमविले, तरी ते संसार चक्रातून सोडवू शकत नाहीत. संसारामध्ये जीव गुंतवायचा नाही. अन्यथा पुढे हाल

होणार. संसारात रमू नका. 'गोतावळा'मधील गोत म्हणजे 'गोत्यात' घालणारे आणि 'आवळा' म्हणजे 'आवळून टाकणारे'. पण, तुम्हाला साधूसंत आवडत नाहीत. गोतावळा आवडतो. बंधन तोडावे असे वाटत नाही. अविद्येमुळे अडकला आहात. त्यावर उपाय म्हणजे साधूसंतांचा संग आणि महावाक्याचा विचार करणे. गोतावळ्याचा संग करणे नव्हे.

या चिंतनात आपण तत्‌चे तीन देह आणि संबंधीत तीन चैतन्याभास यांचा विचार केला. आता, पुढे तत्‌ला जहताजहती लक्षणा वापरून त्याग कशाचा आणि स्वीकार कशाचा करायचा यावर विचार करू.

*****

## चिंतन क्रमांक ५०

## तत्च्या वाच्यार्थातील जीवाला महावाक्यश्रवणाची गरज

जन्ममरणाचा फेरा चुकविणे या हेतूने 'तत्त्वमसि' महावाक्याचा आपण अभ्यास करीत आहोत. तत्त्वमसि महावाक्याचा विचार पूर्णत्वास गेला की तो फेरा राहात नाही. जगामध्ये ग्रंथ आणि त्यातील वाक्यांची कमतरता नाही. परंतु, तत्त्वमसि हे महावाक्य आहे. त्याच्या विचाराने व्यवहारासह परमार्थ संपतो.

पूर्वी त्वम्पदाचा विचार करताना व्यष्टी स्थूल, सूक्ष्म आणि कारणप्रपंचाचा अभ्यास केला होता. व्यष्टी पातळीवर 'देहांचा व्यतिरेक करून 'मी'चा स्वीकार आणि 'मी'चाच अन्वय करणे' हे आपण पाहिले. सर्व त्वम्‌ची स्थूलशरीरे एकत्र केलीत, तर त्या शरीराला समष्टी स्थूलशरीर म्हणतात. तेच तत्चे स्थूलशरीर आहे. या शरीरावर जो चैतन्याचा आभास अभिमान ठेवतो, त्याला 'विराट' असे म्हणतात. सृष्टीतील सर्व जीवांचे सूक्ष्मदेह एकत्र धरले, तर त्या शरीराला समष्टी सूक्ष्मशरीर म्हणतात. तेच तत्चे सूक्ष्मशरीर आहे. या सूक्ष्मशरीरावर जो चैतन्याचा आभास अभिमान धरतो, त्या आभासाला 'हिरण्यगर्भ', 'सूत्रात्मा' अथवा 'प्राण' असे म्हणतात. सर्व जीवांचे कारणदेह एकत्र केले, तर त्या देहाला तत्चा कारणदेह न म्हणता तत्चा महाकारणदेह म्हणावे. तत्‌ला कारणदेह नाही. त्वम्‌च्या दृष्टीने तत्‌ला महाकारणदेह आहे. त्वम्‌ला कारणदेह आहे. तत्‌ला महाकारणदेह आहे. तत्च्या महाकारणदेहाला माया असे म्हणतात. मायेवर जो चैतन्याचा आभास अभिमान धरतो त्याला 'ईश्वर' अथवा 'अव्याकृत' असे म्हणतात.

याप्रमाणे, तत्चे तीन देह म्हणजे समष्टी स्थूलदेह, समष्टी सूक्ष्मदेह आणि महाकारणदेह म्हणजे माया. सर्व जीवांच्या महाकारणदेहांची समष्टी म्हणजे तत्चा महाकारणदेह हा विचार योग्य नाही.

जहताजहती लक्षणेत वाच्यार्थ्याचा त्याग आणि लक्षार्थ्याचा स्वीकार करायचा असतो. आता तत्‌ला जहताजहती लक्षणा वापरू.

सर्व सृष्टी हे तत्चे शरीर आहे. त्याला शरीराचा वीट आला पाहिजे. त्वम्‌ला जसे स्वतःचे शरीर नीट राहावे, प्रपंच नीट चालावा असे वाटते, त्याचप्रमाणे तत्‌ला असे वाटते की समष्टी प्रपंच नीट चालावा म्हणून तत् कारभारात आहे. भक्तांचे कल्याण करावे, दुष्टांचे दमन करावे असे त्याला वाटते. तत्‌ला स्थूलप्रपंचाबद्दल वैराग्य आले पाहिजे. स्थूलप्रपंचाचा त्याग करणे म्हणजे स्थूलप्रपंचात न रमणे.

त्वम्च प्रगती करीत करीत तत् झालेला असतो. तो एकदेशी नसतो. म्हणून, त्याला शिव म्हणतात. तो ब्रह्म नसतो. म्हणून, तो जीवच आहे. जीवाची ही सर्वोत्कृष्ट अवस्था आहे. त्यापुढे जर तो गेला तर ब्रह्मच होय.

प्रमाण –



म्हणौनि ब्रह्मेशानापरौतें । वाढणें नाहीं जीवातें ।
तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं ।।२०३।। अध्याय १५

– श्रीज्ञानेश्वरी

आपला, म्हणजे त्वम्‌चा उद्धार होणे सोपे आहे. तत्‌ला बोध करणे कठीण आहे. पुण्याधिक्यामुळे तो शिव झाला. पंतप्रधान पंतप्रधान का झाले? त्यांच्या पुण्यामुळे. इंद्र इंद्रपदावर का आहे? त्याच्या पुण्यामुळे.

तुम्हांला प्रपंचाचा वीट कुठपर्यंत येत नाही? जोपर्यंत प्रतिकूलता येत नाही तोपर्यंत. दुःखे कोसळली, तर संसाराचा वीट येतो. दुःख सरले की पूर्वीप्रमाणे संसाराचा गाडा पुढे रेटतो. मरेपर्यंत पुरेल एवढ्या अन्नाची व्यवस्था जीव करतो. परंतु, धन कितीही कमविले तरी कमीच वाटते. प्रपंचाचा वीट आला नाही, तर वैराग्य येईल काय? तत्‌ला देखील वीट येतो. त्याला पण वैताग येतो.

प्रमाण –

त्यागुनि कैलास सर्वही संपत्ती । स्मशानांत वस्ती रुद्र करी ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

कैलास आणि सर्व संपत्ती त्यागून रुद्र स्मशानात वस्ती का करतो? सृष्टीतील घटनांचा त्याला त्रास होतो. जीवाचा व्यवहार मर्यादित असतो आणि त्याला सुख, दुःख होतात. तत्‌चा व्यवहार व्यापक असतो. श्रीमंत माणसाकडे मोठा बंगला, गाड्या पाहून कोणाला वाटेल की तो सुखी असतो. पण, आतली अवस्था वेगळी असते. पृथ्वीवर जीवापुढे अनेक प्रश्न असतात. त्याचप्रमाणे, कैलासात अनेक समस्या आहेत. शंकर तपाला बसण्याची तयारी करतात, तेव्हाच कोणी त्यांच्याजवळ येऊन स्वतःच्या समस्या सांगतो. देवलोकांमध्ये कुठे भांडण झाले, राक्षसांनी देवांवर हल्ला चढविला इत्यादी व्यापक पातळीवरचे प्रश्न तत्‌ला असतात. कधी इंद्र त्यांच्याकडे येतो आणि म्हणतो, ''मला वाचवा. कोणी माझी सत्ता घेऊ पहात आहे''. तत् जेथे राहतो तेथे अनेक अडचणी आहेत. आपली दुःखे वेगळी, त्यांची वेगळी. आपले अन्न वेगळे, त्यांचे वेगळे. आपले शरीर वेगळे, त्यांचे वेगळे.

कैलासातील अनेक समस्यांनी हैराण होऊन शंकर स्मशानात जाऊन बसतात. शक्यतो स्मशानात मानव किंवा देव येत नाहीत. त्यामुळे तत्‌ला त्रास होत नाही, निवांतपणे राहू शकतो.

जेव्हा तत् स्थूलप्रपंचाला वैतागतो तेव्हा तो सूक्ष्मप्रपंचावर येतो. विवेकाने स्थूलप्रपंचाबद्दल उपरती निर्माण झाली की तो सूक्ष्मप्रपंचावर येतो. तेथे तो ध्यान करतो.

त्यांना जर सांगितले की, 'ध्यान करू नका', तर ते ऐकत नाहीत. तत् सूक्ष्मप्रपंचालाही

विटला तर महाकारणावर म्हणजे मायेवर येतो.

त्वम्ला जशी अविद्या, तशी तत्ला माया. माया म्हणजे 'स्व'चे अज्ञान. अविद्या आणि माया दोन्ही प्रकृतीचेच अंग आहेत. आपले सत्त्व मलिन. तत्चे सत्त्व शुद्ध. माया म्हणजे 'स्व'चे विस्मरण. का बरे रुद्र ध्यान लावून बसतो ? तो शोधत राहतो. त्याला स्वस्वरूपाबद्दल संशय आहे. स्वस्वरूप माहीत नाही.

प्रमाण –

**कासया कारणें ब्रह्म शोधावया । आलों कोठूनियां माझा मीचि ।।**

**– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा**

माया तत्ला अडचणीत आणते. मायेचा संबंध आला की तत्ला सृष्टीची उत्पत्ती, स्थिती, प्रलय करावेत असे वाटते.

त्वम्चे हाल कसे झाले ? त्वम् हा निरुपाधिक ब्रह्मच होता. त्याला अनादीकाळापूर्वी 'स्व'चे विस्मरण झाले. त्याने कारणदेह स्वीकारला आणि 'मी अज्ञानी' असे मानू लागला. तेथेच थांबला नाही. पुढे 'मी अज्ञानी कसा असेल ?' याचा शोध लावण्यासाठी सूक्ष्मदेहाचा आणि पुढे स्थूलदेहाचा स्वीकार केला आणि संसारात फसला. सच्चिदानंदरूप असलेल्या त्वम्ला अनादीकाळापूर्वी ज्या क्षणाला स्वतःच्या सच्चिदानंदरूपाचे विस्मरण झाले, त्याच क्षणाला असत्, जड, दुःख हे प्रतिस्पर्धी तयार झाले. मग, त्वम्ने सत्ता, ज्ञान आणि सुख शोधण्यासाठी तीन देहांचा स्वीकार केला. त्वम्ची धडपड उच्च सत्ता, ज्ञान आणि सुख मिळविण्यासाठी आहे. याच प्रयत्नात त्वम्च पुढे तत् या पदाचा अधिकारी होतो.

तत्ची अवस्था कशी आहे? समष्टी पातळीवर व्यापक सुख मिळविण्याच्या प्रयत्नात कोणी इंद्र होतो. वेगवेगळ्या देवांकडे विशिष्ट लोक असतात. स्वर्गलोक इंद्राकडे, वैकुंठ विष्णूकडे इत्यादी. देवांची आपापसात भांडणे होतात. सत्ता प्राप्त करण्यासाठी प्रचंड धडपड असते. इंद्राला वाटत राहते की त्याला विष्णू होता आले तर बरे होईल. लक्ष्मी पाय चेपेल, शेषनागावर लोळायला मिळेल. वाटले तर कोणावर सुदर्शन चक्र फेकून त्याला संपविता येईल. कोण्या देवाचे पुण्य संपले की त्याला लाथ घालून तेथून त्याची हकालपट्टी करण्यात येते. त्या देवाचा पुनर्जन्म कुठे आणि कोणत्या रूपात होईल, हे सांगता येत नाही. तुम्ही चुकूनही कोणत्याच देवलोकात जाऊ नका. तत्चे हाल वाईट आहेत. त्वम्च्या वाच्यार्थापेक्षा तत्च्या वाच्यार्थाचे वाईट हाल आहेत.

तत् मोठा म्हणून त्वम् त्याला घाबरतो. तत्ची सत्ता, त्याचे ज्ञान, त्याचे सुख मोठे म्हणून त्वम्ला त्याची भीती वाटते. जो साधक निःस्पृह आहे, तो तत्ला घाबरत नाही. ज्या लोकांमध्ये सकाम भाव आहे, ज्यांना भौतिक सत्ता, ज्ञान सुखाची लालसा आहे, ते तत्ला घाबरुन शरण राहतात.

ज्ञानमार्गी साधक देखील तत्कडून परमार्थासाठी काहीतरी अपेक्षा ठेवतो. 'माझी बुद्धी नीट कर' असे तत्ला विनवितो. त्यामुळे, सच्चिदानंदाची प्राप्ती होईल असे वाटते. बुद्धीसारख्या अनात्म पदार्थाकडून आत्म्याची प्राप्ती होईल काय? अविद्या जीवाला स्व-स्वरूप कळू देत नाही. माया शिवाला स्व-स्वरूप कळू देत नाही. दोन्ही मूर्ख. एक मोठा मूर्ख. एक छोटा मूर्ख. पण, दोघांचा बाप एकच आहे.



माया शिवाला फिरवते. या महाकल्पातील सृष्टीचा शिव वेगळा. पुढील महाकल्पातील सृष्टीचा शिव निराळा असेल. परत दोन सृष्टींमध्ये एकत्व नाही. सतत बदल म्हणून, तो जीवच आहे. तत्ला जेव्हा हे लक्षात येईल तेव्हा तो सद्गुरूंकडे धाव घेईल.

प्रमाण –

जीवपणाचेनि त्रासें । यावया आपुलिये दशें ।।
शिवही मुहूर्त पुसे । जया जोशियातें ।।२४।। प्रकरण २

– श्रीअमृतानुभव

तत् जीवन्मुक्तांकडे येईल काय? जसे देशाचा पंतप्रधान जीवन्मुक्तांकडे कशाला येईल? तुम्ही साधूकडे जाता, पण काही काम असेल तरच. तुम्ही तत्ला कृपाळू, दयाळू म्हणता. तुम्ही स्वतःचेच धर्म त्याच्यावर आरोपित करता. तुमच्यापैकी कोणी तत्कडे गेले, तर तुमचे काहीही भले होणार नाही. तत् आणि त्वम्च्या वाच्यार्थात एकी होऊ शकत नाही. त्वम् वाच्यार्थात मरतो. तत्ही वाच्यार्थात मरतो.

मरताना तुम्ही काय म्हणून मरावे? तत् म्हणून? स्थूलदेह आणि त्याचे धर्म घेऊन? सूक्ष्मदेह आणि त्याचे धर्म घेऊन? तुम्हांला तर असे वाटते की मेल्यानंतर तुमचा फोटो तरी राहावा. एक पिढी तुमचा फोटो ठेवेल. पुढची पिढी तुमचा फोटो फेकून देईल. तुमच्याजवळ तुमच्या आजोबांचा फोटो आता आहे का? तुम्हांला फुगण्याचे काय कारण आहे? तुम्ही मेल्यावर जन्ममरणाचे चक्र कायम राहणार याची तुम्हांला भीती आहे की नाही? जेथे तत्च स्वतःला सावरू शकत नाही, तेथे त्वम् तरी काय करू शकणार?

तत्ने शहाणे व्हावे. त्याने माया सोडावी. पण, तो माया सोडू शकत नाही. समजा, त्याने काही करायचे नाही असे ठरविले, तर एखादा भक्त धावत येतो. 'शेतात पिक उगवत नाही' असे रडगाणे गातो. काही वेळात दुसरा कोणी येऊन म्हणतो, 'पाणी नाही, गंगा खाली आणा'. हे सर्व पाहून लक्षात येते की तत्ला त्रास जास्त, त्वम्ला त्रास कमी. ज्याच्याकडे काहीच नाही, त्याला त्रास नाही. ज्याच्याकडे पुष्कळ संपत्ती, त्याला त्रास जास्त. जितका व्याप तितका संताप.

तत्ने मायेचा स्वीकार करू नये. तत्ने मायेला विशेषणावरून उपाधी करावी आणि पुढे उपलक्षण करावे. नंतर, मायेला उपलक्षण म्हणूनही ठेऊ नये. पण, तत् तसे करतो का? नाही.

माया तत्‌ला विशेषण असेल तर काय प्रकार घडतो? श्रीविष्णू वैकुंठात बसले आहेत, लक्ष्मी पाय चेपत आहे. श्रीविष्णूंना जर पृथ्वीवर जावे असे वाटले, तर लक्ष्मी त्यांना जाऊ देत नाही. जायचे असेल, तर रूप बदलून जावे लागते. श्रीविष्णूंनी पृथ्वीवर अवतार घेतला, तर लक्ष्मीसुद्धा अवतार घेते.



जगत् हे तत्‌चे शक्तिप्रदर्शन आहे. तुमचे घरदार हे तुमचे म्हणजे त्वम्‌चे शक्तिप्रदर्शन आहे. त्याचप्रमाणे, शक्तीच्या सहाय्याने तत् जगताची निर्मिती करतो. तत् माया या विशेषण अथवा उपाधीने जगत् चालवितो. त्याच्यासाठी माया ही विशेषण अल्पकाळ असते आणि उपाधी म्हणून बहुकाळ असते. माया ब्रह्माच्या ज्या भागावर आरोपली, त्या भागाला जगत् म्हणतात.

माया संबंधाने ब्रह्माला शिव ही संज्ञा प्राप्त झाली. तत्‌च वाच्यार्थाने शिव होय. जर, तत् मायेत रमला नाही, 'माया असली काय किंवा नसली काय' असे झाले, तर शिव हा शिव राहत नाही. ब्रह्म होतो. मायेचे खरे स्वरूप काय? माया–जी नाही ती. मग, कोण आहे? ब्रह्म आहे.

खरेतर, ब्रह्माची शक्ती ब्रह्मापासून भिन्न नसते. कार्यामुळे भिन्न वाटते. परंतु, सर्वांचे लक्ष कार्यावर. ब्रह्म राहिले बाजूला. एखाद्याने कार्य केले नाही, तर कारण लक्षात येणार नाही. भगवान श्रीज्ञानदेव महाराजांनी भिंत उडविली, रेड्यामुखी वेद वदविले. म्हणूनच, बहुतांश लोक त्यांना मानतात. लोक शक्तीचा विचार कार्य पाहून करतात. तो एक क्विंटल वजन उचलतो, तो चांगला आहे. हा वीस किलो वजनही उचलू शकत नाही, हा मेंगळट आहे. अमूक विद्यार्थी हुशार आहे. अमूक विद्यार्थी 'ढ' आहे. अशाप्रकारे, कार्य आणि शक्तीवर लक्ष ठेऊन बोलणाऱ्या लोकांची संख्या खूप जास्त आहे. कारणाकडे कमी लोकांचे लक्ष असते. जो त्वम् स्थूलप्रपंचातच गुंतलेला आहे, त्याच्यापेक्षा जास्त शक्तिशाली, सूक्ष्मप्रपंचावर असलेला त्वम् असतो. कोणी जर वृत्तीला माघारी फिरवून अंतःकरणापर्यंत घेऊन गेला, तर तो शक्तिशाली होतो. तो पाण्यावर चालू शकतो, हवेत उडू शकतो, वाघावर स्वार होऊन हाती साप धरू शकतो.

ब्रह्माच्या जेवढ्या अंशावर अभिमान ठेवणार तेवढ्या प्रमाणात शक्तिशाली होणार. ब्रह्माच्या एक अंशावर म्हणजेच एक चतुर्थांश भागावर अभिमान धरून बसला, म्हणून तो तत् झाला. हीच माया. त्वम्‌चा संबंध अविद्याकार्याशी, तत्‌चा संबंध माया कार्याशी. समजा, साधकाने स्थूलदेहाचा अभिमान सोडला आणि सूक्ष्मावर गेला. पुढे कारणातून निघाला आणि महाकारणावर गेला. म्हणजे त्वम् प्रगती करीत करीत तत्पदाचा फक्त अधिकारी झाला. अशीच प्रगती करीत असताना एखादा साधक विचार करतो, 'आता मी लोक कल्याणासाठी अन्नछत्रे चालविन, जलाशये तयार करीन'.

प्रमाण –



नगरेंचि रचावीं । जळाशयें निर्मावीं ।
महावनें लावावीं । नानाविधें ।।२३३।। अध्याय १४

– श्रीज्ञानेश्वरी

एवढेच नव्हे, तो विश्वमित्राप्रमाणे नवीन सृष्टी तयार करण्यासाठी संकल्प करू शकतो. एखादा साधक संकल्प करतो, 'मी महाराज आहे. मी शंभर मठ बांधेन, हजारो शिष्य गोळा करीन'.

त्वम् आणि तत्ला अविद्या आणि माया दोन्ही अडकवतात. ऊसाचे कांडे रस काढण्याच्या यंत्राच्या दोन चाकातून काढल्यावर ऊसाचा रस निघून जातो आणि चिपाड उरते. त्याप्रमाणे, माया आणि अविद्या या दोन चाकांमध्ये हे दबतात आणि संसार बंधन कायम राहते. तत् वाच्यार्थात मरतो आणि त्वम्ही वाच्यार्थात मरतो.

मग, तत्साठी उपाय काय? त्यानेसुद्धा जहताजहती लक्षणेचा वापर केला पाहिजे. मायेचा त्याग आणि ब्रह्माचा स्वीकार. त्याच्यासाठी माया उपलक्षण ठरावी. परंतु, जेवढ्या अंशावर माया तेवढेच ब्रह्म का? नाही. ब्रह्म त्याच्याही पलीकडे आहे. केवळ १/४ भाग एवढेच ब्रह्म नाही. पुढे ३/४ भागसुद्धा ब्रह्म आहे. त्या अनुभवासाठी तत्ने उपलक्षणच नष्ट करावे. मायाच ठेऊ नये.

सनकादिक मुनी साक्षात ब्रह्मरूप झाले. त्यांना अविद्या किंवा माया नाही. साधकांबद्दल अशा संतांना कळवळा आहे. म्हणून, ते परंपरेने साधकांना बोध करतात.

प्रमाण –

तुम्ही सनकादिक संत । म्हणवितां कृपावंत ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

सर्वकाही खुंटवायची आशा निर्माण झाली पाहिजे. वाढविण्याची नाही. अविद्येकडे, मायेकडे लक्ष देऊ नये. ब्रह्माकडे लक्ष द्यावे.

मनुष्य मोजता येणार नाहीत इतके पदार्थ घरात साठवून ठेवतो. तळघरामध्ये पदार्थ, वरच्या मजल्यावर पदार्थ. काय काय सांगावे. पण तरीही, समजा शेजाऱ्याला एखादे भांडे उसने दिले, तर काही दिवसानंतर त्याच्या घरी जाऊन ते भांडे परत घेऊन येतो. निरिच्छ पाहिजे. त्याग करण्यासाठी वैराग्य पाहिजे.

तुम्हांला तत्चा अभ्यास पटकन सांगितला. तत्ही अडकलेला आहे म्हणून, तुम्ही तत्ला शिव्या द्याव्यात काय? शिव्या द्यायचे काही कारण नाही. मी हे सर्व तत्विषयी वैर भावाने कधीही बोलत नाही. माझा तत्, त्वम्बद्दल द्वेषभाव नाही. जीव एकीकडे प्रपंचामध्ये गुंततो आणि दुसरीकडे शिवालाच सर्वकाही मानून बसतो. म्हणून, या अज्ञानावर आघात

करण्यासाठी, माझ्याकडून काही ठिकाणी परखड भाषा वापरली जाते. त्यामागे कोणाचा अपमान करावा हा हेतू कधीच नसतो. ही मीमांसा आहे. मीमांसा म्हणजे पूज्य विचार.



पंतप्रधान त्याच्या जागेवर. शिव त्याच्या जागेवर. तुम्ही तुमच्या जागेवर आणि मी माझ्या ठिकाणी योग्य आहे. जीव पुनर्जन्म होऊन मुंगी बनून धान्य वेचणार. त्याचप्रमाणे, शिवदेखील पुनर्जन्म होऊन कीटक बनून धान्य वेचणार असेल, तर मग जीव व शिव यांत फरक काय? तसे पाहिले, तर शिवाचे काम सोपे आहे. महाकारणावरून वर ब्रह्मावर जाणे म्हणजे एकच पायरीचा प्रवास आहे. जीवाचा प्रवास सापेक्ष कठीण आहे. तो वर किंवा खाली जाऊ शकतो. जीवाने कारणावर व महाकारणावर सावध राहावे. जीव आणि शिव दोघांनाही प्रपंचाचा वीट यावा.

समजा, मठाच्या आतमध्ये छोटा घट आहे. आकाश घटात, मठात आणि मठाच्या बाहेरही आहे. बरं! हे जाणण्यासाठी घट आणि मठ फोडावेत काय? त्याचप्रमाणे ब्रह्म जीवात, शिवात व सर्वत्र आहे. जीव–चैतन्य, शिव–चैतन्य हे एक ब्रह्मचैतन्यच आहेत, हे 'असि' पदाने कळते. हे तत्त्वमसि महावाक्याचे सार आहे. जीव–चैतन्य, शिव–चैतन्य आणि ब्रह्म–चैतन्य हे एकच आहेत असा लक्ष्यार्थ 'असि'पदाने साधतो. असिपदाचा विचार झाल्यानंतरच जहताजहती लक्षणा पूर्णत्वास जाते. जीव, शिव व ब्रह्म यांची मीमांसा येथे केली आहे. 'शिवाचा राग, जीवांचा द्वेष' अशाप्रकारे किंवा अन्य कुठल्याही प्रकारे राग–द्वेष केलेला नाही. राग–द्वेष गेले, तरच असिपदाने लक्षिलेल्या ब्रह्म पदावर जाता येईल.

प्रमाण –

**तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।**
**मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ।।२७१।। अध्याय ३**

– श्रीज्ञानेश्वरी

पुढे 'असि' पदाची मीमांसा करू.

*****

## चिंतन क्रमांक ५१
## तत्त्वमसि महावाक्याचा लक्ष्यार्थ – १

'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास आपण जन्ममरणाच्या चक्रातून सुटण्याच्या उद्देशाने करीत आहोत. आपण महावाक्यातील तत्, त्वम्, असि या तीन पदांचा अभ्यास पृथकपणे पूर्वी केला. 'असि'पदाने तत् आणि त्वम् यांच्या वाच्यार्थ्याचे ऐक्य होत नाही हे जाणले. त्यानंतर, त्वम्पदाचा लक्ष्यार्थ आणि तत्पदाचा लक्ष्यार्थ पाहिला. महावाक्याच्या लक्ष्यार्थाचा निर्णय होण्यासाठी 'असि'पदाचा उपयोग कसा होतो? ते आजच्या चिंतनात पाहूया.

तत्त्वमसि महावाक्यातील 'असि' म्हणजे 'आहेस'. 'ते तू आहेस'. तत्, त्वम्, असि. खरेतर, पूर्ण महावाक्यच विचारात घ्यायचे असते. केवळ त्वम् असि किंवा केवळ तत् असि असे विचारात घेऊन चालणार नाही. इतकी चिंतने का सांगितली? तुम्हांला त्वम् आणि तत् यांचा स्पष्ट बोध व्हावा म्हणून विस्तार करून सांगितले. तत् आणि त्वम् कळले असेल, तर मग 'असि'पद नेमके काय दाखवते हे कळेल. नुसते 'असि' या पदाने कोणताही निश्चय होत नाही. 'असि'ने काय घ्यावे हे समजण्यासाठी प्रथम त्वम् आणि तत् संबंधी अभ्यास करणे आवश्यक आहे.

वाच्यार्थाने विचार करताना तत् म्हणजे शिव आणि त्वम् म्हणजे जीव, या पद्धतीने अभ्यास केला. काही लोक तत् म्हणजे ब्रह्म आणि त्वम् म्हणजे जीव असा अर्थ लावतात. खरेतर, तत् म्हणजे ब्रह्म असा अर्थ घेऊ नये, तत् म्हणजे शिव. हा अकर्ता, अभोक्ता असून जीव हा कर्ता, भोक्ता आहे. जगामध्ये किती पदे आहेत? जीव, शिव आणि ब्रह्म असे तीन पदे जगात आहेत. जगात चौथे पद नाही. 'असि' म्हणजे अस्तित्व. वाच्यार्थ घेतला, तर 'शिव जीव आहे' असा अर्थ लागतो. म्हणजे शिव हा जीव ठरेल. हा विचित्र निर्णय होईल. कारण, दोघांचे धर्म भिन्न असल्यामुळे वाच्यार्थात एकी होत नाही.

समजा, एकेकाळी जो राजा होता तोच पुढे गोसावी झाला. मुकुट, भरजरी कपडे, अंगावर दागिने असा राजाचा पेहराव होता. वाढलेल्या जटा, मळलेले कपडे असे रूप गोसाव्याचे आहे. राजा म्हणजे तत्. गोसावी म्हणजे त्वम्. राजाची उंची, डोळ्यांची ठेवण इत्यादी शरीराची लक्षणे ज्या मनुष्याने भूतकाळी पाहिली असतील, त्याच मनुष्याने वर्तमान काळातल्या गोसाव्याच्या शरीराच्या लक्षणांसोबत पूर्वी पाहिलेली लक्षणे तंतोतंत जुळतात असे लक्षात घेतल्यावर तो जो राजा होता, तोच हा गोसावी आहे, या निर्णयावर येईल. हा योग्य निर्णय आहे.

समजा, एखाद्या मनुष्याने पूर्वी केवळ राजालाच पाहिले. परंतु, त्याच्या मूळ शरीराकडे लक्ष नव्हते. आता, त्याच मनुष्यासमोर गोसावी उभा आहे. राजाच्या शरीराच्या

खाणाखुणा मनुष्याला माहीत नसल्यामुळे, गोसाव्याचा योग्य निर्णय लावण्यास त्याला अडचण येईल.


समजा, एखाद्या मनुष्याने पूर्वी राजाला पाहिले होते आणि त्याच्या शरीरावरच्या खाणाखुणाही पाहिल्या होत्या. आता, त्याच मनुष्यासमोर गोसावी उभा आहे. परंतु, मनुष्याने गोसाव्याच्या शरीराच्या खाणाखुणा तपासल्या नाहीत. त्यामुळेही, योग्य निर्णय लावण्यास अडचण येईल.

तात्पर्य – साधकाला जर तत्‌चा लक्ष्यार्थ माहीत नसेल, पण त्वम्‌चा लक्ष्यार्थ माहीत आहे, तर मग असिपदाने योग्य निर्णय लागत नाही. त्याचप्रमाणे, साधकाला तत्‌चा लक्ष्यार्थ माहीत असेल, पण त्वम्‌चा लक्ष्यार्थ माहीत नसेल, तरीही असि पदाने योग्य निर्णय लागत नाही.

परंतु, ज्या मनुष्याने पूर्वी राजाच्या शरीराच्या खाणाखुणा पाहून लक्षात ठेवल्या आणि वर्तमानकाळी त्याच मनुष्याने गोसाव्याच्या शरीराशी त्या खाणाखुणा जुळवून पाहिल्या, तर तो योग्य निश्चय करेल. त्याचप्रमाणे, साधकाने विचार करून तत्‌चा लक्ष्यार्थ शोधला व त्वम्‌चाही लक्ष्यार्थ शोधला, तर 'असि'पदाने एकत्व साधेल. तरच, त्याचा ठाम निश्चय होईल. त्याला संशय राहणार नाही.

या कारणांसाठी साधकाने तत् आणि त्वम् या दोन्ही पदांचे चिंतन करून 'असि'ने लक्ष्यार्थाचा निश्चय करावा. केवळ तत्‌चा अभ्यास किंवा केवळ त्वम्‌चा अभ्यास केला, तर फसगत होईल.

आता तुम्ही म्हणाल, 'एकवेळ आम्हांला त्वम् पदाचा परिचय आहे. कारण 'मी कर्ता–भोक्ता', 'मी सुखी–दुःखी', 'मी अज्ञानी' असे प्रत्यय आम्हांला येत राहतात. परंतु, तत् संबंधी तेवढा परिचय नाही. पण, तुम्ही तर म्हणता की तत् संबंधीही स्पष्ट बोध असावा लागतो. मग काय करावे? यावर उपाय काय?'

यावर उपाय हाच की श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ महापुरुषांवर नितांत श्रद्धा असावी. अशा महापुरुषांना तत्‌चा यथार्थ परिचय असतो. तत्‌संबंधी त्याचप्रमाणे त्वम्‌संबंधी जे निरूपण ते करतात, त्यावर अनन्य विश्वास हवा.

महापुरुषांवर अनन्य विश्वास ठेवणे सोपे की अवघड? त्या आधी असे विचारायला हवे की अमूक महाराज हे महापुरुष आहेत की नाहीत हे कसे ओळखावे? महापुरुषांबद्दल तुमची कल्पना अशी असते की ते चांगले वागतात, प्रेमळ आहेत. पांढरे, भगवे कपडे घालतात, टिळा लावतात, माळा धारण करतात इत्यादी. समजा, एक महाराज पांढरा शर्ट आणि धोतर घालून आहेत आणि दुसरे महाराज भगवे वस्त्र घालून आहेत. तर, तुम्ही कोणासमोर झुकाल? फारच कठीण प्रश्न आहे. खरंच, महापुरुषांना ओळखणे अवघड गोष्ट आहे. बाह्य पेहराव पाहून त्यांना ओळखता येत नाही. ज्या मनुष्याने अनंत जन्मांमध्ये वेदविहित कर्मे निष्काम भावाने केली आहेत, तो महापुरुषांना सहजच ओळखतो. ईश्वरकृपा, शास्त्रकृपा आणि श्रीगुरूकृपा असा क्रम आहे. ईश्वरकृपेने मनुष्य परमार्थ करू लागतो.

ईश्वरकृपेने पुढे त्याला शास्त्रांचे अध्ययन करण्याची गोडी लागते. परंतु, शास्त्र कोणते वाचायचे हे कळले पाहिजे. शास्त्रातून त्वम् कळण्यापर्यंत साधक प्रगती करू शकतो. शास्त्रकृपा झाल्यानंतर सद्गुरू भेटावेत व परमार्थाचा बोध त्यांनी करावा, असे साधकाला वाटते. प्रसन्न झालेले श्रीगुरू सांगतात, 'त्वम्चे जे मूळ तेच तत्चे मूळ आहे'.

पूर्वजन्मीचे उत्कृष्ट अदृष्ट असलेले उत्तम अधिकारी स्वबळावर तत्, त्वम् पदार्थ शोधन करून श्रीगुरुंच्या प्रथम भेटीतच तात्पर्य निश्चय करतात. परंतु, असे अधिकारी दुर्मिळ असतात.

मूळ स्वरूपाचा अभ्यास असेल, तर तत् त्वम्मध्ये एकी साधते. वाच्यार्थात एकत्व जुळत नाही. असि पदाने तत् आणि त्वम्मध्ये एकरूपता सापडली पाहिजे. महावाक्य 'तत् त्वम असि' असे आहे. म्हणून तत् आणि त्वम् दोन्ही विचारात घ्यावे लागतील. कोणी म्हणेल, 'तत् आणि त्वम् यांच्या मूळ स्वरूपाचे अस्तित्व जर एकच आहे, तर मग त्वम्चेच मूळ शोधावे'. पण, असे नाही.

अवकाश ज्याचे स्वरूप आहे, त्याला आकाश म्हणतात. आकाशाला पाणी भिजवू शकत नाही. अग्नी जाळू शकत नाही. समजा, तुम्हांला घटाकाश माहीत आहे. पण, महाकाश माहीत नाही. घट हा मठात ठेवला आहे. तरी दोघांमध्ये ऐक्य आहे, हे लक्षात येऊ शकत नाही. एखाद्याने घटाकाशाचे महाकाशाशी ऐक्य साधले तरी, घटाकाशाचा मठाकाशाशी भेद शिल्लक राहतो. हे योग्य नाही. त्याचप्रमाणे, त्वम्चे ब्रह्माशी एकत्व साधले, पण, शिवाशी ऐक्य साधले नाही, तर ते योग्य नव्हे.

त्वम्चे मूळ स्वरूप शोधण्यासाठी काय करावे लागेल? अज्ञानाच्या संबंधाने जे अधिष्ठान ब्रह्म आहे, त्याला जीव म्हणतात. त्वम्चे अज्ञान वजा केले तर तो कोण आहे? त्वम्चे अज्ञान तुम्ही वजा केले का? खाली कोण राहते? अधिष्ठान ब्रह्म राहते. ते अधिष्ठान कसे आहे? याचा विचार करून निश्चय करावा. तुम्ही अज्ञानी होते की अधिष्ठान होते? तुम्ही अज्ञान घालविले की अधिष्ठान लोपविले?

तुम्ही शोध घेतला नाही, म्हणून तुम्हांला अधिष्ठान माहीत नाही. 'असि' शब्द तीन ठिकाणी लावावा. 'त्वम् असि', 'तत् असि' आणि 'तत् त्वम् असि'. त्वम्चे अधिष्ठान असि म्हणजे अस्तित्व आहे. अधिष्ठान कसे आहे? 'असि' आहे. कलंकित, कर्ता, भोक्ता असे नाही. कलंकित, कर्ता, भोक्ता इत्यादी त्वम्चे वाच्यार्थ आहेत. तसेच, अधिष्ठान निष्कलंक, अकर्ता, अभोक्ता असे नाही. निष्कलंक, निष्प्रपंच, अकर्ता इत्यादी हे तत्चे वाच्यार्थ आहे. 'असि' म्हणजे द्वंद्वरहित 'आहे'. हेच तत्, त्वम्चे यथार्थ स्वरूप आहे.

एखाद्याने आपल्याला विचारले, 'त्वम् कसे आहे?'. तर, आपण गप्प बसावे. तो परत विचारेल, 'कसे आहे?'. तरीही, आपण गप्पच रहावे. तो विचारेल 'त्वम् कर्ता आहे का?'. आपण म्हणायचे 'नाही'. मग, तो विचारेल 'त्वम् कर्ता नाही का?'. आपण म्हणायचे, 'असि'. मग, तो विचारेल 'त्वम् अकर्ता आहे का?'. आपण म्हणायचे, 'नाही'. तो विचारेल, 'त्वम् अकर्ता नाही का?'. आपण म्हणावे 'असि'. केव्हा 'नाही' व केव्हा 'असि' उत्तर द्यावे,

हे कळले पाहिजे.



त्वम् हा कर्ता नसून कर्ता आहे व तोच त्वम् कर्ता असून कर्ता नाही. तुम्ही कशाला असि म्हणता? कर्ता असि? अकर्ता असि? ज्यांना 'असि' कळते ते अधिष्ठान असतात. 'असि'च्या मागे–पुढे काही लावू नये. कर्ता, अकर्ता 'असि'वर आरोपलेले आहेत, हे लक्षात ठेवावे.

'असि' म्हणजे ब्रह्म. तत् आणि त्वम् हे ब्रह्मच आहेत. अस्तित्व तत्चे नाही आणि त्वम्चेही नाही. कर्ता आणि अकर्ता यांचे अस्तित्व नाही. तत् नाही आणि त्वम् नाही. मग काय आहे? कर्ता, अकर्तादि धर्मांचा त्याग आणि केवळ 'असि'चा स्वीकार. कर्ता आणि अकर्ता दोन्ही नाही. मग, जे उरते ते कर्ता–अकर्ता नाही. एवढेच म्हणता येते. विचार करून तत् आणि त्वम्च्या धर्मांचा त्याग करणे याला 'अतद्व्यावृत्ती' असे म्हणतात. अतद् म्हणजे ते नाही. 'ते नाही', 'ते नाही' अशा विचाराने सर्व धर्मांचा त्याग करीत करीत शोधावे. मग, शेवटी 'असि' वर येतो.

केवळ त्वम् घालवून 'असि'वर जाणे हा शेवट नाही. तत्च्या 'असि'सोबत त्वम्चा 'असि' जुळवावा लागेल. असे केले नाही, तर, तुम्ही तत्च्या वाच्यार्थात म्हणजे अकर्ता, अभोक्ता या निर्णयावर याल आणि पुढच्या कल्पात तुम्हांला सृष्टी चालविण्याचा अधिकार येईल. जन्ममरणाचे चक्र कायम राहिल.

प्रथम त्वम्ला 'असि'रूप करा. त्यागण्यायोग्य शेवटचा धर्म त्वम्चा कोणता? अज्ञान हा त्वम्चा त्यागण्यायोग्य शेवटचा धर्म आहे. अज्ञान सोडले पाहिजे. स्वतःला नवरा किंवा बायको समजणे हे तर एकदम खालची गोष्ट म्हणजे स्थूलदेहाच्या धर्मात अडकणे झाले. आहे का तुम्हांला नवरा, बायको? हेच खरे! असे तुम्हांला वाटते. यमाने ठोका दिला तर नवरा, बायको राहणार नाहीत. प्रपंचाचे कर्ते–भोक्तेपण घेऊ नये. त्वम्चे 'असि' कळून घ्या आणि तत्च्या 'असि' सोबत जुळवून असिरूप व्हा.

तुम्ही तोंडाने काय बोलता, मनामध्ये काय आहे या गोष्टींना किंमत नाही. तुमच्या जीवावर काय आहे, त्याला किंमत आहे. समजा, तुम्ही घरामध्ये तुमच्या मुलांसोबत खेळत आहात. तेवढ्यात तुमच्या घरी महाराज आले. तुम्ही तोंडाने म्हणता, 'महाराज, तुम्ही आलात! बरे झाले!'. कदाचित्, तुमच्या मनामध्ये तसाच भाव आहे. परंतु, तुमच्या जीवावर तुमचा मुलगाच राहतो. हे फार वाईट. जीव प्रपंचातून काढायला हवा. स्थूल, सूक्ष्म, कारणदेह आणि त्यांच्या धर्मांचा त्याग जीवाने करावा. परमार्थ जीवाने करायला सांगितले आहे. अज्ञानाच्या त्यागापर्यंत प्रगती करणे आवश्यक आहे. एखादा मनुष्य खूप पवित्र झाला, म्हणजे स्थूल आणि सूक्ष्मदेहधर्मांचा त्याग घडलेला असेल, तरी त्या मनुष्यामध्ये अपूर्णतेची भावना राहिल. त्याच्या जीवाला कमतरतेची रुखरुख लागेल. उणीव वाटणारच. मी काही मोठे महाराज पाहिलेत की ज्यांनी आयुष्यभर तपस्या केली. तरीपण, त्यांना उणीव वाटतच होती. असे का होते? मूळ अज्ञान कळले नाही. घालविले नाही म्हणून उणीव राहते. 'स्व'चा निःसंदेह निश्चय झाला, तरच उणीव जाते. तेव्हा काही करण्यासारखे अथवा प्राप्त

करण्यासारखे राहत नाही.



काही साधक घरादाराचा त्याग करतात. आश्रमात राहण्याचीपण त्यांना स्पृहा नसते. ते अत्यंत विरक्त असतात. तरीपण ते शास्त्राभ्यास करतच राहतात. त्याचे कारण म्हणजे अज्ञान कायम असल्यामुळे उणीव जाणवते. माझ्यामुळे शास्त्र की शास्त्रामुळे मी? हेच त्यांना कळत नाही.

काही साधकांना सूक्ष्मदेहातील उत्पातांमुळे उणीव वाटते. त्यांना क्रोध येत असेल, तर प्रेमाची उणीव वाटते. चंचलता असेल, तर शांततेची उणीव वाटते. बाह्य प्रापंचिक पदार्थांचा त्याग जेव्हा होतो तेव्हा स्थूलदेहाचे अस्तित्व लक्षात येते. विचार करून 'स्थूलदेह मी नाही' असे पटले की सूक्ष्मदेहाच्या धर्मांवर येतो. त्यावरून लक्ष हटले, तर सूक्ष्मदेहावर येतो. त्यानंतर, कारणदेहावर म्हणजे अज्ञानावर येतो. जहताजहती लक्षणेचा वापर करून अज्ञानाला विशेषणाहून उपाधी आणि उपाधीवरून उपलक्षण करावे. पुढे अज्ञान या उपलक्षणाचाही त्याग करावा. मग, त्वम्‌चे अस्तित्व लक्षात येते. अस्तित्व लक्षात आलेल्या व्यक्तीला जर कोणी विचारले, 'सांग काय आहे?'. हा उत्तर देतो 'असि'. त्याने जर विचारले, 'आहे की नाही?'. हा परत उत्तर देतो. 'असि' येथपर्यंत प्रगती तुम्हांला करावीच लागेल. केवळ 'कृपा होईल' असा विचार करून स्वस्थ बसून राहिल्याने काहीही होणार नाही. मृत्यू कोणत्याही क्षणाला आपल्यावर झडप घालू शकतो. याची तीव्र जाणीव ज्या साधकाला आहे तो स्वस्थ बसून राहणार नाही.

पुढे, तत्‌चा अभ्यास आवश्यक आहे. अन्यथा साधकाची फसगत होते. केवळ त्वम्‌पदाचा विचार करून 'असि'पदावर असलेल्या साधकाला जर कोणी विचारले, 'कर्ता आहेस का?' तो उत्तर देतो 'नाही'. पुढचा प्रश्न 'अकर्ता आहेस का?' या प्रश्नाला तो 'हो' उत्तर देतो. म्हणजे, त्या साधकाचा तत्‌च्या वाच्यार्थाचा निश्चय होईल, लक्ष्यार्थाचा नाही. याचे कारण असे की अकर्ता, अभोक्ता, निष्प्रपंच, निर्विकार इत्यादी सर्व तत्‌चे वाच्यार्थ आहेत. फसगत का झाली? तत् माहीत नाही म्हणून. या कारणासाठी साधकाने श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, दयाळू महापुरुषांना शरण जावे. ते तत्‌चे 'असि' लक्षात आणून देऊन, त्वम्‌च्या 'असि'सोबत ऐक्याचा निश्चय करून देतात.

प्रमाण –

**एक हरि आत्मा जीव शिव सम। वायां तूं दुर्गमा न घालीं मन।।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज हरिपाठ

खरेतर, जगामध्ये एकच पद आहे आणि ते म्हणजे 'असि'. 'असि' म्हणजे 'ब्रह्म'. जीव ब्रह्म आहे आणि शिवदेखील ब्रह्मच आहे. जीव शिव सम. म्हणजेच त्वम् तत् असि. ब्रह्मैक्य, अस्तित्व हाच खरा विषय आहे. शास्त्रात सांगितले आहे – 'तत् त्वम् असि'. सद्‌गुरूपण तेच सांगतात.

श्रीगुरूंच्या कृपेस पात्र असा शिष्य हवा. जो शिष्य अज्ञानाचा स्वीकार करीत नसून, तत्च्या वाच्यार्थालाही बळी पडत नाही, असा शिष्य श्रीगुरूंच्या कृपेस पात्र असतो. जो शिष्य घरादाराचा त्याग करतो, परंतु, आश्रमादि प्रपंचात गुंततो, तो सात्त्विक व्यवहार करतो. असा शिष्य कृपेस पात्र नसतो. ज्याला त्वम्पद आणि तत्पद दोघांच्या वाच्यार्थ्याची ओढ नाही. तो कृपेस पात्र आहे.

तत् आणि त्वम् या दोघांचा वाच्यार्थ अनिर्वचनीय अर्थात मिथ्या आहे. त्यांच्या लक्ष्यार्थाचेच 'अस्तित्व' खरे आहे. तेच ब्रह्म आहे.

प्रमाण –

**सगुण निर्गुण दोन्ही विलक्षण । ब्रह्म सनातन विठ्ठल हा ।।**

**– श्री संत तुकाराम महाराज गाथा**

व्यष्टी, समष्टी प्रपंच मृगजळवत् आहे, असे ज्याला कळले तो कर्तेपणा अथवा अकर्तेपणा घेणार नाही. अशा शिष्याला, श्रीगुरूंनी वैखरी वाणीने बोध करण्याचीही गरज पडत नाही. श्रीगुरूंनी शिष्याच्या मस्तकावर हात ठेवला की त्याचक्षणी तो कृतार्थ होतो.

तुम्ही स्वतःला 'राम देशपांडे' असे समजू नका. प्रगती करीत जीवावर जरी आले, तरी जीवावर राहू नका. जीवावर राहणे म्हणजे अज्ञानी राहणे. जीवाच्या 'असि'त्वावर येणे गरजेचे आहे. स्थूल, सूक्ष्म, कारणप्रपंचांमध्ये गुंतू नका. अज्ञानापर्यंतच्या धर्मांतून जीव काढा. तसे केले नाही तर तुमची राखरांगोळी होईल. हा शाप नव्हे. तुम्ही प्रपंचात राहिले, तर तुम्हांला यम घेऊन जाणार आणि येथे तुमच्या स्थूलदेहाला लोक अग्नी देतील आणि राख होईल. त्वम्च्या असिवर या. मग, तत्च्या असि सोबत एकरूपता साधा. पुढच्या चिंतनात पुन्हा असिपदाचा विचार करू.

*****

## चिंतन क्रमांक ५२
## तत्त्वमसि महावाक्याचा लक्ष्यार्थ – २

आपण जन्ममरणाचा फेरा चुकविणे या उद्देशाने 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास करीत आहोत. महावाक्याचा अभ्यास केल्याने त्या फेऱ्यातून मनुष्य वाचतो. महावाक्याचा योग्य अभ्यास होणे अवघड आहे. शास्त्रामध्ये महावाक्याचे सविस्तर विवेचन आढळत नाही. हा बोध गुप्त आहे. हा बोध सत्शिष्याला दिला जातो. हा गुह्यतम् बोध आहे. महावाक्याचे निरूपण श्रवण करण्याचा अधिकार सगळ्यांना नसतो. केवळ श्रवण करून होणार नाही. पचनी पडते की नाही हे पहावे लागेल. 'पचन होईल की नाही' असा विचार न करता, जर कोणी विविध खाद्य पदार्थ खात राहिला, तर काय होणार? रोग होणार. श्रवण केल्यानंतर ते वक्त्याच्या मनोगताप्रमाणेच कळायला हवे, पटायला हवे, अंगी बाणायला हवे.

'असि' पद काय दाखविते हे मागील चिंतनात अभ्यासले. असि म्हणजे आहेस. ते तू आहेस. राजा गोसावी आहे आणि गोसावी राजा आहे. असा अभ्यास केला होता. राजा आणि गोसावी यांची बाह्य चिन्हेच पाहिली, तर असिपदाने ऐक्य साधत नाही. राजा गोसावी नाही. राजा गोसावी असूच शकत नाही. गोसावी राजा असूच शकत नाही. वाच्यार्थात एकी होत नाही. किंमत कोणाला? राजा, गोसावी की असिला? ते तू आहेस. ते पण आहे आणि तू पण आहे, असे म्हणता येत नाही. असे केल्यास दोन शिल्लक राहतात. म्हणून, हे वेदांताचे फल नाही. दोन राहू नये. ऐक्याचा निश्चय पाहिजे. तत् आणि त्वम्चे धर्म विरुद्ध असल्यामुळे वाच्यार्थात एकी होत नाही. म्हणून, तत् आणि त्वम् यांचा लक्ष्यार्थ शोधावा लागतो.

त्वम्पदाच्या लक्ष्यार्थच्या निश्चयासाठी व्यष्टी स्थूल, सूक्ष्म, कारणप्रपंचांचा त्याग, त्याचप्रमाणे, पुढे महाकारणाचा त्याग व आत्म्याचा स्वीकार कसा करावा, हे मागील अनेक चिंतनांमध्ये पाहिले. अविद्या विशेषण असेल, तर तिला उपाधी ठरवावी व पुढे उपलक्षण ठरवावे. नंतर, उपलक्षणही ठेवू नये आणि स्वीकार आत्म्याचा करावा. त्वम्चा लक्ष्यार्थ ही अनुभवण्याची गोष्ट आहे. जेव्हा अविद्या उपलक्षण होते, तेव्हा कूटस्थाचा अनुभव येतो. कूटस्थ हे त्वम्चे लक्ष्यार्थ आहे. असा पूर्वी विचार केला. अस्तित्व कूटस्थाचे आहे. भूत, वर्तमान, भविष्यकाळात न बदलणारा केवळ कूटस्थच आहे. व्यष्टी कारण, सूक्ष्म, स्थूलदेहांच्या संबंधाने आत्म्यालाच कूटस्थ अशी संज्ञा प्राप्त झाली आहे. कूटस्थ म्हणजे आत्मा. त्वम्पदलक्ष्य आत्म्याला तिन्ही काळात असि शब्दाने संबोधले जाते. अविद्या अनादी–सान्त आहे. अविद्या काल होती, उद्या नसणार. याच्या पुढची सूक्ष्म गोष्ट अशी की अविद्या सादी–सान्त आहे. म्हणून, जीव सादी–सान्त आहे. पुढचे, सूक्ष्म आणि स्थूलप्रपंचही सादी–सान्त म्हणजे 'उत्पत्ती, स्थिती, प्रलय'वान आहेत. कूटस्थ एकमेव अनादी अनंत असून तोच 'असि'मध्ये बसतो.

कूटस्थावर यायचे असेल, तर प्रवास 'असि' रूपाने करावा लागेल. तो अनुभवाचा विषय आहे. कूटस्थावर फसविता येत नाही. फसवणूक चालत नाही. 'कूटस्थ आहे' असे सिद्ध करावे. कूटस्थ कसा आहे? कूटस्थ अनादी अनंत आहे. अस्तित्व हीच त्याची खरी खूण आहे. 'होता' किंवा 'होईल', असे नाही. तो 'आहे'. साधकांना वाटते, 'पूर्वी मी देव नव्हतो, आता देव आहे असे कळले' किंवा 'पूर्वी माझी वागणूक विचित्र होती, आता महाराजांनी सांगितले, ते तू आहेस, पुढे परमार्थ घडेल आणि तसे कळेल'. अशा विचारांना अजीबात थारा देऊ नका. ते तू होशील की ते तू आहेस? 'ते तू आहेस' असे महावाक्य आहे. हे केव्हा लक्षात येईल? काल आपण कूटस्थ नव्हतो, महाराजांनी आता बोध केला, आज कूटस्थ झालो, असे आहे काय? आज कूटस्थ नाही, उद्या होणार. असे आहे काय? जगातील सर्व लोकांना 'असि'चा बोध नाही. अनुभवाच्या आधारे 'तिन्ही काळी मी कूटस्थच आहे' असे सिद्ध करता आले पाहिजे. फक्त बोलून होणार नाही. 'कूटस्थ असि' असे शास्त्र सांगते. त्वम् हा कूटस्थच आहे. तुम्ही मधल्या अवस्थेत आहात. धड संसारिक नाही आणि सिद्ध नाही.

तत्च्या स्वरूपाचाही विचार करणे गरजेचे आहे. तत् म्हणजे ईश्वर. या तत्चे स्वरूप ब्रह्म आहे. ब्रह्म कसे असते? जसे कूटस्थ तसे ब्रह्म असते. आपण त्वम्ला कूटस्थ ठरवावे, सद्गुरू ब्रह्म सांगतात. दोन्ही जुळली की 'असि'. अन्यथा, साधकाचा बंध कायम राहतो. त्वम्-तत् एकरूपता साधली नाही, तर 'असि' शब्दाला किंमत नाही. 'असि'ने एकरूपता साधायची. घटाकाश आणि मठाकाश जसे एकच, तसे कूटस्थ आणि ब्रह्म एकच. अशा निश्चयाशिवाय गत्यंतर नाही. दोघांचे स्वरूप एक असेल, तर कूटस्थ आणि ब्रह्म एक असा निर्णय होतो. तसा शोध घ्यावा लागेल.

'अनादी अनंत' यात केवळ ब्रह्म बसते. अनादी म्हणजे काय? अनादी म्हणजे उत्पत्ती झालेलीच नाही. अनादी शब्दाचा दुसरा अर्थ म्हणजे कधी उत्पत्ती झाली हे सांगता येत नाही. उत्पत्तीरहित हा अनादी शब्दाचा जास्त योग्य अर्थ ब्रह्माला लागू पडतो. उत्पत्तीच नाही, तर अंतचा प्रश्नच नाही. अनंत म्हणजे शेवट नसलेला. उत्पत्ती नाही आणि म्हणूनच शेवट नाही. असे केवळ एक ब्रह्मच आहे. केवळ ब्रह्माचीच सत्ता आहे. काही काळ सत्तावान, काही काळ असत्तावान असे नाही. एकमेव ब्रह्म तिन्ही काळी सत्तावान आहे. स्वर्गलोक, पृथ्वीलोक, पाताळ आणि त्यातील सर्व पदार्थ क्षणाक्षणाला बदलतात. तिन्ही काळी राहत नाहीत. ते सर्व ब्रह्म या अधिष्ठानावर आरोपित आहेत.

त्वम्-तत्च्या वाच्यार्थ्याची सत्ता नाही. लक्ष्यार्थ अधिष्ठान सत्तावान आहे. ब्रह्माची अनादी, अनंत ही लक्षणे केवळ कूटस्थाशी जुळतात. वाच्यार्थ जुळत नाही. कूटस्थाचा शोध घेऊन तेथपर्यंत पोहचले, तर कूटस्थाचे अस्तित्व आणि सत्ता कळेल. शास्त्र, सद्गुरू यांवर नितांत श्रद्धा आणि दृढ विश्वासाच्या आधारे ब्रह्माची सत्ता लक्षात घ्या. त्या सत्तेवर जगत् आहे. ती सत्ता कधीही बदलत नाही. पंतप्रधानाची सत्ता काही काळ असते. पृथ्वी कायम पृथ्वी राहिल काय? महाप्रलय झाला की पृथ्वी राहत नाही. ज्या अधिष्ठानावर सृष्टीची

उत्पत्ती, स्थिती, प्रलय होतो त्या अधिष्ठानाला ब्रह्म म्हणतात. उत्पत्ती, स्थिती, प्रलयावर जो अभिमान ठेवतो, त्याला ईश्वर म्हणतात. यात गटांगळ्या खाऊन जो पिळवटून निघतो, त्याला जीव असे म्हणतात. जर, ब्रह्मसत्ताच काढून घेतली, तर माया आणि मायाकार्य राहत नाही, ईश्वर राहत नाही. म्हणून, ब्रह्मच श्रेष्ठ आहे. समष्टीने अधिष्ठानाचा शोध घेणे अवघड आहे. व्यष्टीने शोध घेणेही सोपे नाही. त्यासाठी विचार करण्याची क्षमता पाहिजे.



सध्या तुमचे स्थूलशरीर कुठे आहे सांगा? या इमारतीमध्ये दुसऱ्या मजल्यावर, घरात, फरशीवर अंथरलेल्या सतरंजीवर तुमचे स्थूलशरीर आहे. सतरंजी हे तुमच्या स्थूलदेहाचे अधिष्ठान नाही. का नाही? अधिष्ठानाची व्याख्या काय आहे? ज्याच्या जाण्याने ती वस्तू राहत नाही, ते त्या वस्तूचे अधिष्ठान असते. पंचीकृत पंचमहाभूते काढून टाकली, तर स्थूलशरीर राहत नाही. म्हणून, स्थूलदेहाचे अधिष्ठान पंचीकृत पंचमहाभूते आहेत. स्थूलदेहाला सत्ता कोणाची? पंचीकृत पंचमहाभूतांची की राम देशपांडेंची. राम देशपांडे हे नाम स्थूलदेहावर आरोपित आहे. शरीराला अग्नी देईपर्यंत नाम आणि वर्णाचा निश्चय ठाम राहतो. असे का होते? कारण, महाराजांचे चिंतन एक तास असते आणि दिवसातल्या बाकी तेवीस तासांमध्ये वृत्तीवर भलतेच विषय असतात.

सूक्ष्मदेहाला अपंचीकृत पंचमहाभूतांची सत्ता आहे. अपंचीकृत पंचमहाभूतांचे अधिष्ठान अविद्या आहे. अविद्येचे उत्पत्तीस्थान काय? 'स्व' म्हणजेच 'मी'वर अविद्या उत्पन्न होते. अज्ञानाचा आश्रय 'मी'. 'मी'वर अज्ञानाची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होतात. अज्ञानाचा प्रलय करून कूटस्थाचा निश्चय करावा. उत्पत्ती, स्थिती, प्रलय म्हणजेच संसार आणि मनुष्याचे लक्ष संसाराकडे जाते, म्हणून चक्र कायम आहे. कूटस्थावर लक्ष ठेवणे गरजेचे आहे. 'मी कूटस्थ' असा विवेक होणे सोपी गोष्ट नाही. अविद्येची उत्पत्ती मी केली, तिची स्थिती मी केली आणि तिचा नाश मीच केला. कुठे केला? मजवरच केला. असा ज्याचा अनुभव, तो कूटस्थनिश्चयवान असतो. कूटस्थाचे अस्तित्व त्यालाच कळते. हा व्यष्टी पातळीवरचा विचार झाला.

जगत् कसे निर्माण झाले? ब्रह्मावर आरोपित असलेल्या मायेतून सत्त्व, रज, तम हे तीन गुण निर्माण होतात. त्रिगुणांपासून अपंचीकृत पंचमहाभूतांची निर्मिती आणि अपंचीकृत पंचमहाभूतांपासून पंचीकृत पंचमहाभूते तयार होतात. पंचीकृत पंचमहाभूतांपासून समष्टी स्थूलप्रपंच तयार झालेला आहे. ज्यावर मायेची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होतो त्याला ब्रह्म म्हणतात. सृष्टीच्या उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय या कार्यावर अभिमान ठेवणाऱ्या देवतांना अनुक्रमे ब्रह्मदेव, विष्णू आणि शंकर असे म्हणतात. त्यांखाली वरुण, इंद्रादि अनेक देवता आहेत. मायेची उत्पत्ती, स्थिती, प्रलय हे ज्यावर आरोपित आहे, तेथे दृष्टी जाईल तेव्हा ब्रह्म कळेल. सत्ता ब्रह्माचीच आहे. मायेची सत्ता नसते, तर अपंचीकृत पंचमहाभूते आणि पंचीकृत पंचमहाभूतांची सत्ता असेल का?

जे चैतन्य मायेशी संगत करते, मायावी असते, त्याला ईश्वर म्हणतात. जे चैतन्य मायासंबंधविरहीत असते त्याला ब्रह्म म्हणतात. ब्रह्माच्या आश्रयाला राहून माया जगताची

उत्पत्ती करते. तेव्हा तो अभिमान धरतो, म्हणून ईश्वर ठरतो. उत्पत्तीचा अभिमान ज्याला असतो त्याला ब्रह्मदेव म्हणतात. ब्रह्मदेवाने तो अहंकार सोडला, तर तो ब्रह्मच आहे. जगताच्या स्थिती आणि प्रलयासंबंधी विष्णू आणि शंकर यांचे तसेच आहे.



एक वर्तुळ काढून त्याचे चार समान भाग करावेत. सबंध वर्तुळाच्या ठिकाणी ब्रह्म घ्यावे. चार समान भागांपैकी एका भागावर माया घ्यावी. या एवढ्या एक चतुर्थांश हिश्यातच जगत् आणि जगताची उत्पत्ती, स्थिती, प्रलय होतो त्यालाच ईश्वर म्हणायचे. त्यालाच तत् पद वाच्यार्थ म्हणायचे. या हिश्यावर तत्चे अभोक्ता, अकर्ता, सर्वज्ञता इत्यादी धर्म चालतात.

'माया करते' हे ज्याला ठामपणे कळते तो ईश्वर होतो. स्थूल, सूक्ष्मदेहांना मी समजून 'मी करतो', असा ज्याचा निश्चय तो जीव असतो. 'अविद्या आणि माया यांचे अधिष्ठान ते मी' असा ज्याचा निर्णय असतो तो ब्रह्म होतो.

जो मृगजळामध्ये साळी, केळी लावण्यात दंग आहे, त्याला 'सूर्यामुळे मृगजळ दिसते', असे सांगून काही उपयोग नाही. मृगजळ हे सूर्यावर आहे. मृगजळ नाही म्हणावे, तर ते दिसते. मृगजळ आहे म्हणावे तर, जेव्हा सूर्यप्रकाश नसतो तेव्हा ते राहत नाही. 'आहे, नाही' एकाच ठिकाणी एकत्र राहू शकत नाहीत. म्हणून, मृगजळ 'विलक्षण' आहे. मृगजळ सूर्यावर आहे. सूर्य खरा की मृगजळ खरे ? मृगजळाच्या पाठीमागे जो धावतो त्याला सांगावे, 'बाबा रे! मृगजळ खोटे आहे'. मानलेच तर दिसतेकाळी आहे. तसे पाहिलं तर, 'मृगजळ नाहीच' असे सांगावे.

ज्याप्रमाणे, मृगजळाचे असणे–नसणे सूर्यावर अवलंबून आहे, त्याप्रमाणे, कर्ता–भोक्ता इत्यादी त्वम्चे धर्म आणि अकर्ता–अभोक्ता इत्यादी तत्चे धर्म ज्यावर आरोपलेले आहेत, त्याला ब्रह्म म्हणतात. तत्, त्वम् लक्ष्यार्थ ब्रह्म हे 'असि' शब्द दाखवतो. असि म्हणजे ब्रह्म. ब्रह्म म्हणजे कूटस्थ. हे एकच आहे. तत्, त्वम्, ब्रह्म. ते तू ब्रह्म. 'एक हरि आत्मा जीव शिव सम.' हरि म्हणजे ब्रह्म. तो एक आहे. तोच आत्मा आहे. तोच जीवाचा आणि शिवाचा लक्ष्यार्थ असल्याने ते दोघेही सम म्हणजेच एक आहेत. 'तत् त्वम् ब्रह्म', 'जीव शिव सम', 'तत् त्वम् कूटस्थ' अशाप्रकारे 'असि' शब्दाने लक्ष्यार्थाचा निश्चय होतो.

ते तू ब्रह्म. 'ते' बहुवचन, 'तू' एकवचन. 'ते' म्हणजे काय ? ते म्हणजे मोबाईल, ते म्हणजे फूल, ते म्हणजे ग्रंथ. काय काय घेता येईल, ते ते घे. जळ, स्थळ, काष्ठ, पाषाण हे सर्वच 'ते' अंतर्गत येते. अनंतरूप, अनंतवेष हे 'ते'मध्ये बसतात.

प्रमाण –

अनंतवेषे अनंतरूपे देखिले म्यां त्यासी ।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

जेवढे काही 'ते'मध्ये बसते 'ते' असि. तू 'असि'. 'तू' 'ते' असि. ते तू ब्रह्म. मोबाईल, फूल इत्यादी पदार्थांवर दृष्टी पडल्याबरोबर, 'ते' ब्रह्मच असा अनुभव हवा.

तत्त्वमसिचा शेवट म्हणजे 'जीव शिव सम'. योग्य शास्त्र, सद्गुरूंच्या सहाय्याने अभ्यास केल्यास, शेवट ते तू यांच्या एकीवर होतो. तत् आणि त्वम् यांचे अधिष्ठान एकच आहे, हे 'असि'ने दिसते. तत् आणि त्वम् यांच्या वाचार्थ्यांचा त्याग आणि लक्ष्यार्थांचा 'असि'ने दर्शविलेल्या अधिष्ठानाचा स्वीकार करावा.



असा प्रवास करत 'जीव शिव सम' या निर्णयावर येऊन परमार्थ संपवा. महावाक्य अनुभवात आले, तरच संसारचक्र सुटून मनुष्यजन्माचे सार्थक होईल.

*****

## चिंतन क्रमांक ५३

## तत्त्वमसि महावाक्याचा लक्ष्यार्थ – ३

आपण जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या हेतूने 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास करीत आहोत. शास्त्र आणि सद्गुरूंच्या सहाय्याने तत्त्वमसि महावाक्याचा विचार जन्ममरणाच्या चक्रातून बाहेर निघण्यासाठी एकमेव उपाय आहे. ज्या शास्त्रामध्ये या महावाक्याचे निरूपण आहे, त्या शास्त्रग्रंथाचा आधार घेऊन विचार करणे व सद्गुरूंना शरण राहणे हे साधकाचे कर्तव्य आहे.

लक्ष्यार्थाने तत् आणि त्वम् यांच्या एकत्वाचा निर्णय असिपदाने होतो. तत् आणि त्वम् अधिष्ठानावर आरोपित आहेत. सत्ता कोणाची? तत्ची सत्ता नाही, त्वम्चीही सत्ता नाही. जो मनुष्य तत्, त्वम्च्या वाच्यार्थ्यात रमतो, तो चक्रातून बाहेर निघू शकत नाही. अनंत कल्पांपासून असंख्य जन्म होण्याचे कारण म्हणजे वाच्यार्थात रमणे. श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, दयाळू महापुरुषांच्या आशीर्वादाने जीव चक्रातून सुटतो. स्थूलप्रपंचात रमणे जसे बंधन दृढ करते, त्याचप्रमाणे स्वर्गातील देवादिकांना शरण राहिल्यानेही तसेच होते. असंख्य जन्मांपासून मनुष्य देवांना शरण राहतो. मनुष्य हा देवांचा पशू झाला आहे. परंतु, ब्रह्म म्हणजेच खरा देव. या देवाला शरण राहिले पाहिजे. पण, मनुष्य तत् वाच्यार्थातल्या देवांना शरण राहतो. कोण्या मनुष्याला या गोष्टी जरी समजल्या, तरी या देवाचा नाद सोडण्याची त्याची हिम्मत होत नाही. तो घाबरतो. सकाम भाव आणि संसार उध्वस्त होण्याच्या भीतीमुळे तो देवांना सोडत नाही.

संसारबंधन कायम राहण्याची दोन कारणे आहेत. स्त्री, पुत्रादि पदार्थांच्या मोहात मनुष्य पडतो आणि त्यांना आपल्या मोहात पाडतो. दुसरे कारण म्हणजे मनुष्य देवादिकांच्या मोहात पडतो आणि ते मनुष्याच्या मोहात पडतात. चिंतने ऐकूनही जर तुम्ही या दोन भावनांचा त्याग करणार नसाल, तर काही उपयोग नाही. त्याप्रकारे गुंतलेले राहिले, तर पुढे कुत्रा, मांजरादिकांचा जन्म मिळणार. नाही तर पुण्य जोडत राहिल्याने मनुष्य मृत्यूनंतर देवयोनीला प्राप्त होतो. म्हणजे जीव संकुचित–विकसित होतो. कोणी म्हणतो, 'आम्हांला हे माहिती नव्हतं'. माहिती झाले तरी उपयोग नाही. कारण, तुम्ही तुमच्या वृत्तीत सुधारणा करीत नाही.

यावर एकच उपाय आहे. त्वम् आणि तत्चा वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ कळून घेणे. जहती लक्षणा वापरून प्रपंच त्याग करणे व अजहती लक्षणा वापरून आत्म्याचा स्वीकार करणे. राजा आणि गोसावी यांचा त्याग करून त्यांच्या अधिष्ठानाचा स्वीकार करणे. असि म्हणजे अस्तित्व. तत्, त्वम् वाच्यार्थ ज्या असिवर आरोपित आहे, त्या सत्तेचा स्वीकार करावा. तत्, त्वम् म्हणजे ते तू. ते म्हणजे ईश्वर की असि या पदाने ब्रह्म? तू म्हणजे जीव की असि या पदाने ब्रह्म? असिच स्वीकार करण्यायोग्य आहे. तत्, त्वम्चा वाच्यार्थ स्वीकार

करणे योग्य नाही. प्रथम त्वम्ची ओळख हवी. प्रथम स्वतःची ओळख धड पाहिजे. ही पहिली पायरी. दुसरी पायरी म्हणजे तत्ची ओळख व तिसरी पायरी म्हणजे असि कळून घेणे. तुम्ही स्वतःला कोण समजता? 'मी स्वतःला त्वम् समजतो', असे तुम्ही बोलता. परंतु, तुमच्या आचरणाने तुम्ही भलतेच विपरीत काहीतरी सिद्ध होता. मग, उपयोग नाही. जो साधक यथार्थपणे त्वम्पदावर आहे, त्याला तत् कळण्याचा अधिकार येतो. पुढे तत्, त्वम् ऐक्य 'असि' पदाने साधायचे असते.



नदीच्या एका तीरावरून पलीकडच्या तीरावर जाण्यासाठी पूलाचा उपयोग होतो. नदीच्या अलीकडे जमीन असते, मधे पूलाच्या रूपाने जमीन असते व पलीकडल्या तीरावर सुद्धा जमीन असते. तीन ठिकाणी जमीन असेल, तर या तीरावरून त्या तीरावर जाता येते. इकडचा तीर म्हणजे त्वम्, पूल म्हणजे असि आणि पलीकडचा तीर म्हणजे तत्. त्वम् हे असि आहे. तत् हे असि आहे. असि हे असि आहेच.

पण, हा सिद्धांत अनुभवात उतरला आहे काय? नाही. मग, शोध घ्यावा लागेल. शोध कशाने घ्यायचा? राम देशपांडेंने शोध करायचा नाही. त्वम्ने शोध करायचा. तुम्ही त्वम्वर आलात काय? कसे आलात? ऐकून की शोध करून? शोध कधी करणार? जो स्थूल, सूक्ष्मप्रपंचांना चिकटून राहतो तो त्वम्वर येत नाही. त्या प्रपंचांशी तादात्म्य ठेवले, तर त्वम् होणार नाही. पूर्वी तुम्ही त्वम्च होता, पण आता त्वम् राहिले नाहीत. स्त्री, पुरुष, नवरा, बायको इत्यादी बनून राहिलेले आहात. त्वम् झाले तर तत् आणि असिचा अभ्यास करता येईल. असि सांगण्यासाठी खरेतर मी इथे बसलेलो आहे. परंतु, तुमच्या आचरणात त्वम्च दिसत नाही म्हणून त्वम् सांगावे लागत आहे.

असि म्हणजे सत्ता. कोणाची सत्ता? सत्ता त्वम्ची आहे काय? खरे उत्तर 'नाही' असे आहे. परंतु, तुम्हांला तर असे वाटत असते की 'आपलीच सत्ता असावी, मी म्हणेल तेच खरे, त्याने असे वागायला पाहिजे, माझे इतर लोकांनी ऐकले पाहिजे' अशी तुमची वृत्ती आहे. काही महाराजांनाही तसेच वाटते. तुमच्या किंवा महाराजांच्या म्हणण्याप्रमाणे लोक वागत नाहीत. तरी हट्ट कायम ठेवता? हा हट्ट सोडावा. ज्याची सत्ता त्याचे अस्तित्व असते. राम देशपांडेंची सत्ता नाही, तर मग त्यांचे अस्तित्व का मानावे? काही जण म्हणतात, 'आमची म्हणजे राम देशपांडेंची सत्ता व्यवहारमात्र आहे'. खरेच तसे आहे की स्वतःला फसवतोय? त्वम्च्या वाच्यार्थाची सत्ता मानायची ठरली तर कशी मानावी? नाममात्र मानावी – व्यवहारमात्र मानावी. व्यवहारात 'मीच' अशी वृत्ती राहिली तर अहंकार बळावतो व मनुष्य गाळात जातो. पुढे ममत्वामुळे आणखी गाळात जातो. अरे, बाबांनो! जेथे त्वम्चीच सत्ता नसते तेथे सूक्ष्मदेहाची सत्ता असेल काय? जेथे सूक्ष्मदेहाचीच सत्ता नसते तेथे स्थूलदेहाची अथवा बाह्य पदार्थांची सत्ता असेल काय? व्यष्टी स्थूल, सूक्ष्म, कारणप्रपंचांची सत्ता नाही. पण तसे वाटते. जे वाटते ते खरे असतेच, असे नाही. प्रपंचांचे अस्तित्व नाही. परंतु, दिवसभर तुम्हांला कोणाचे अस्तित्व जाणवते? देहाचे अस्तित्व जाणवते. कोणामुळे कोण? माझ्यामुळे देह की देहामुळे मी? बोलबाला कोणाचा? सूक्ष्मदेह आणि स्थूलदेहाचे अस्तित्व वाटते.

म्हणून त्यांचेच अस्तित्व नटलंय.



घरातील लहान मुलांचे कौतुक घरातील इतर सदस्य करतात. त्या मुलाच्या सुख–दुःखात त्यांना त्यांचे सुख–दुःख वाटते. मुलगा आजारी पडला, तर 'आपणच आजारी पडलो', असे घरातील लोकांना वाटते. प्रत्येक आई–बापाला वाटते की त्यांचे मूल बोर्डाच्या परिक्षेत पहिले आले पाहिजे. या देहामध्ये मनुष्य त्याचप्रमाणे रमतो. देहाचे सुखदुःख हे आपलेच सुखदुःख वाटते. देह आजारी पडला म्हणजे 'आपणच आजारी पडलो', असे वाटते. अनंत जन्मांपासून आपण अस्थिर झालेलो आहोत, असे वाटते. आठवड्यातून एकदा चिंतन ऐकल्याने मुक्त होणार नाही. अनंत जन्मांच्या संस्कारांचा साठा चित्तामध्ये आहे. त्यातून बाहेर पडण्यासाठी अथक परिश्रम घ्यावे लागतील. गंजलेल्या तलवारीला धार लावण्यासाठी कशावर घासायला पाहिजे? गुलाबाच्या पाकळ्यांवर की सहाणेवर? तलवार गुलाबाच्या पाकळ्यांवर घासली तर पाकळ्या कापल्या जातील. सहाणेवर घासली तर तिला धार लागेल. संस्कारांचा जोर प्रचंड असल्यामुळे असिचा स्वीकार होत नाही. म्हणून, तेवढ्याच प्रचंड प्रमाणात परमार्थाचा बोध दृढ करून घ्यावा लागेल. बोध बुद्धीनेच ऐकला तर तर्क लढवाल. बोध कानानेच ऐकला तर व्यान वायूप्रमाणे शरीरात सर्वत्र पसरेल आणि नंतर अपान वायूप्रमाणे शरीराच्या बाहेर निघून जाईल. म्हणून, बोध जीवाने ऐका. त्यासाठी प्रथम जीवावर या.

तुम्ही देहाला इथे घेऊन आले की देह तुम्हांला इथे घेऊन आला? परमार्थात विचार हेच शस्त्र आहे. परंतु, त्याचा उपयोग तुम्ही अन्न, धन, मान कमविण्यासाठी करत आला आहात. चिंतनाचा कालावधी एक तासाच्या पुढे गेला तर देह म्हणतो, 'आतापर्यंत मी तुझे ऐकले, आता तू माझे ऐक'. त्याच्याप्रमाणे तो तुम्हांला वागवतो. त्याचे अस्तित्व दाखवून देतो. तुम्ही सूक्ष्मदेहाला डिवचलं तर तो तुम्हांला त्याचे अस्तित्व दाखवून देतो. तुम्ही परमार्थ करता तो कार्यातच. म्हणजे, स्थूल, सूक्ष्मप्रपंचात करता. ही शिकवण वेदांत ग्रंथांची नाही. वेदांताचे ग्रंथ महाराजांकडून सोडवून घ्यावेत. अस्तित्व स्थूल, सूक्ष्मदेहांचे की जीवाचे? तुम्ही तर पार बाहेरच्या पदार्थात मरता. तुम्हांला प्रयत्नाने जीवावर यावे लागेल. तेथून पुढे महाराजांचे काम आहे. तीन देहांचे अस्तित्व व्यवहारमात्र आहे. त्यांना त्यांच्या ऐपतीप्रमाणे ठेवावे. ते वरचढ झाले तर अडचण येते. एखाद्याने जर ठरविले, मी डोळ्याने एकसारखे रूपच पाहत राहिल, तर त्याचे हाल होतील, डोळे मिटतील. त्यामुळे अति करू नये.

व्यवहारात गणित सोडवताना आपण 'क्ष' या अक्षराचा स्वीकार करतो. पुढे 'क्ष'चा त्याग करतो. उदाहरणार्थ – रामाचे वय किती? असे एखादे गणित असते. ते सोडविण्यासाठी आपण 'क्ष' हे अक्षर घेतो. उत्तर मिळाल्याबरोबर 'क्ष' चा त्याग करतो.

अनंत कल्पांपूर्वी आपण 'असि' होतो. केव्हातरी 'अविद्या' मानली आणि जीव झालो. मी कोण? याचा शोध लावण्यासाठी सूक्ष्मदेह आणि त्यांच्या धर्मांचा स्वीकार करून त्यात फसलो. पुढे स्थूलदेहाचा स्वीकार केला. तेथेच न थांबता पुढे घरदार मानायला लागलो. बायको मानलेली आहे की खरी आहे? तुम्ही घरी जाऊन म्हणा बरे! की 'बायको

मुले खरी नाहीत, मानलेली आहेत'. मग बघा काय होते. मानलेले खरे नाहीत, हे तुमच्या

आचरणात पाहिजे. मानलेल्या, कल्पिलेल्या पदार्थांचा खरे उत्तर मिळवून त्याग करायला हवा.

अविद्या कळली नाही, तर जीव म्हणजे काय कळणार नाही. जीव कळला नाही, तर असि कळणार नाही. मग, कूटस्थ म्हणजे काय हे कळेल का? कूटस्थ हा अनुभवाचा विषय आहे.

प्रमाण –

कैसें बोटानें दाखवूं तुला। पाहें अनुभव गुरूच्या मुला।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

देहाला व्यवहारमात्र मानायचे. देहाचे चोचले पुरवायचे नाहीत. देहामुळे मी नाही. मी ठरविणार काय करायचे ते. मला वाटले तर देहाला बसवीन. देहाला व्याधी झाली तर मला वाटले तर औषधे देईन.

पुढे सूक्ष्मदेहातील असंख्य उत्पातांमुळे मी आहे असे वाटते. मी चांगला, पुण्यवान किंवा मी वाईट, पापी असे वाटते. याच अस्तित्वाचा परिचय तुम्हांला अनंत जन्मांपासून आहे. व्यवहारातील दुःखे घालविण्यासाठी तुम्ही महाराजांकडे जाता, त्याचसाठी परमार्थ करता. सुख–दुःख आरोपित धर्म आहेत. 'ते माझे नाहीत' असे पटले, तर तेथून परमार्थाला सुरूवात होते. बंध–मोक्ष हे जीवाचे धर्म आहेत. जो जीवावर येईल त्यालाच बंध–मोक्ष धर्म असतात. स्थूल–सूक्ष्मप्रपंचातील सुखदुःखांना जो किंमत देत नाही तो जीवावर येतो.

समजा, एखाद्या कार्यालयाकडून तुम्हांला एक प्रमाणपत्र मिळवायचे आहे. मुख्याधिकारी, कारकून, चपराशी अशा अनेक व्यक्ती विविध पदांवर कार्यरत असतात. तुम्ही अर्ज दिल्यानंतर तुमच्या प्रमाणपत्रावर सही कोण करतो? मुख्याधिकारी सही करतो. सत्ता त्याची असते. कारकून प्रमाणपत्र तपासतात, पण शिक्का मुख्याधिकाऱ्याचा मारतात. मधले लोक निमित्त आहेत. केवळ शिक्का असूनही चालत नाही. मुख्याधिकाऱ्याची सही हवी. तुमचे प्रमाणपत्र तुम्हांला चपराशी आणून देतो. त्याच्या सही शिक्क्याला किंमत नाही. तसा अधिकारच त्याला नाही. कारकून, चपराशी यांची सत्ता नाही.

स्थूलदेह हा चपराशी आहे. सूक्ष्म आणि कारणदेह हे मधले लोक आहेत. त्यांची सत्ता मानायची ठरली, तर व्यवहारमात्र मानावी. तशी त्यांची सत्ता नाहीच. सत्ता असिची आहे. असिचाच शिक्का, सही महत्त्वाचे आहेत. स्थूलदेहाने, डोळ्याने देव दिसत नाही. सूक्ष्मदेहानेही देव दिसत नाही. जर कारकूनाने खोटे शिक्के बनवून प्रमाणपत्रांवर सह्या केल्या, तर कधी ना कधी तो कचाट्यात सापडेल.

परिचित असलेल्या पाहुण्यासोबत त्याचा मित्र तुमच्या घरी आला, तर तुम्ही पाहुण्याला जास्त किंमत देता. त्याच्या मित्राला नाममात्र किंमत देता आणि चहापाणी

दोघांनाही देता. पण, खरी किंमत परिचित पाहुण्याला देता. तसे, स्थूलदेह व्यवहारमात्र आहे, असे साधकाने जाणावे. स्थूलदेहाला अन्न-पाणी द्यायचे. परंतु, त्याला त्याच्या ऐपतीत, त्याच्या लायकीप्रमाणे ठेवायचे. समजा, बायको मेली आणि हा तिच्यासाठी दहा वर्ष रडतच बसला, तर हे योग्य आहे का? बाहेरच्या पदार्थांना अवास्तव किंमत दिली, तर साधकाचे वाटोळे होते. माझे हे बोल तुम्ही ऐकून आचरणात आणले नाहीत, तर तुम्हांला यम खाईल. एक तर यम राहिल किंवा माझा बोध राहिल.

अस्तित्व स्थूलदेहाचे की असिचे हे कसे कळावे? स्थूलदेह असिमुळे हालतो. स्थूलदेहामध्ये असि नखशिखांत व्याप्त आहे. पण, तुम्ही असिला किंमत देताना दिसत नाहीत. असे का झाले? देहाला किंमत देत आला आहात म्हणून. आई-वडिलांना एक मुलगा आणि एक मुलगी असेल, तेव्हा एकाकडे लक्ष दिले, तर दुसरीकडे कमी, असे होते. दोघांकडे सारखे लक्ष राहत नाही. शक्यतो मुलाकडे पारडे जास्त झुकलेले दिसते.

स्थूलदेह आणि असि दोघांवर सारखे लक्ष ठेवणे शक्य नाही. देहाचे व्यवहार असिमुळे, पण तुमचे लक्ष देहावर. असि की देह नाशिवंत? जे नाशिवंत आहे, तिकडे तुमचे लक्ष आहे. घरातील शहाणा कर्ता मनुष्य प्रथम कुटुंबातील सदस्यांची व्यवस्था करतो आणि नंतर पाहुण्यांची. त्याप्रमाणे, शहाण्या साधकाने प्रथम असिनंतर स्थूलदेहावर लक्ष द्यावे.

तसेच, सूक्ष्मदेहातील कामक्रोधादिकांकडे तुमचे लक्ष की असिकडे लक्ष? रात्रंदिवस तुम्ही कशाची ना कशाची चिंता करीत असता. 'अनंत बुद्धींचे अनंत तरंग'. हे तरंग नित्य नवीन असतात आणि त्यांचा पाठपुरावा मनुष्य करीत राहतो. कशाची ना कशाची उणीव वाटत राहते. म्हणून, विरुध्द धर्म वाढविण्याच्या पाठीमागे लागतो. स्वभावात दुष्टपणा असेल, तर एखादा मनुष्य ठरवितो, 'मी स्वतःमध्ये दया वाढविणार'. दया वाढवून वाढवून कुठपर्यंत वाढविणार? मुलेबाळे, शेजारी, प्रांत, राज्य, देश, संपूर्ण सृष्टी येथपर्यंत दया वाढविण्यात मग्न असलेल्या माणसाच्या पायाखाली दबून एखादी मुंगी मेली, तर मग कुठे गेली दया? पोट भरण्यासाठी भाजीपाला कापला, तर मग कुठे गेली दया? हे फारच कठीण झाले. तरीसुद्धा, जी माणसे कमी-अधिक प्रमाणात दयाळू असतात, ती समाजात उठून दिसतात. लोक त्यांना श्रेष्ठ म्हणतात. परंतु, या दयाळू माणसांना, दुष्टपणा-दया हे विरुध्द धर्म ज्या असिवर आरोपित आहेत त्या असिची माहिती कुठे आहे? याचा अर्थ असा नाही की दुष्टपणा, लोभ, मोह इत्यादी आसुरी संपत्ती जतन करावी. स्थूल, सूक्ष्मप्रपंचातील द्वंद्व धर्मांवर काट मारून, जो अविद्येला उपलक्षण ठरवतो, तो कूटस्थ होतो. साक्षी हा कूटस्थरूपच आहे. कावळा बसलेले देवदत्ताचे घर. लक्ष जर देवदत्ताच्या घरावरच असेल, तर खऱ्या अर्थाने कावळा उपलक्षण ठरतो. त्याचप्रमाणे, जेव्हा अविद्या उपलक्षण ठरते, तेव्हा कूटस्थ म्हणजे असि आणि असि म्हणजे कूटस्थ असा निश्चय होतो.

सिद्ध कोणाला करायचे? स्वतःला सिद्ध करायचे. परंतु, तो निश्चय शास्त्र आणि सद्गुरूंच्या वचनांशी तंतोतंत जुळला पाहिजे. प्रपंचांचा व्यतिरेक करीत करीत अविद्येला उपलक्षण ठरवून कूटस्थ व्हायचे. हे जीवाला शिकवायचे. कूटस्थाला शिकवायचे नाही.

कारण कूटस्थ हे जाणणेरूप चैतन्य आहे. कूटस्थ काही करीत नाही. कूटस्थाच्या दृष्टीने प्रपंच नावाची गोष्टच नाही. कूटस्थाला काही शिकविण्याचा प्रश्नच येत नाही. जीवाने अविद्येचा व्यतिरेक करावा. स्थूल, सूक्ष्मदेहांना अस्तित्व कूटस्थाचे आहे. सत्ता कूटस्थाचीच आहे.



काहीजण या जगताला गणपती, सूर्य इत्यादी देवतांची सत्ता मानतात. या देवतांची सत्ता नाही. घरदाराची पण सत्ता नाही. माती ते ब्रह्मदेवापर्यंत कोणाचीच सत्ता नाही. ब्रह्मदेवाच्या बापाची सत्ता आहे. म्हणजेच, कूटस्थ–ब्रह्माची सत्ता आहे.

काहीजण म्हणतात, 'महाराज आम्ही त्या देवता वगैरे मानत नाही'. पण, हेच लोक घर, बायको, पोरात गुंतलेले राहतात. असे लोक नरकाला जातात. ते लोकच त्यासाठी जबाबदार आहेत.

अस्तित्व कोणाचे? त्वम्‌चे अस्तित्व नाही. तसेच तत्‌चेही अस्तित्व नाही. तत् म्हणजे शिव. ब्रह्मदेव, विष्णू, शंकर यांना ब्रह्माची सत्ता आहे. व्यष्टीने ज्याला कूटस्थ म्हणतात, त्यालाच समष्टीने ब्रह्म म्हणतात. श्रीएकनाथ महाराज म्हणतात, 'ब्रह्मदेव, विष्णू, शंकर हे माझे अंश आहेत. त्यांचे अस्तित्व माझ्यावर म्हणजे ब्रह्मावर आहे'. ब्रह्म कोण? ते तसे लक्षात येत नाही. प्रपंचांचे अस्तित्व मानणे सोडाल, तर ते प्राप्त होईल. ज्याला ब्रह्मप्राप्ती होते त्याला प्रपंच राहत नाही. तत्, त्वम् वाच्यार्थाचा त्याग झाला तरच एकत्व निश्चय होईल. कूटस्थ आणि ब्रह्म स्वरूपाने एक आहेत. ब्रह्म कर्ता आहे की अकर्ता? कर्ता म्हणावे, तर कर्ता हा त्वम्‌चा वाच्यार्थ आहे. ब्रह्म अकर्ता असे म्हटले, तर अकर्ता हा तत्‌चा वाच्यार्थ आहे. ब्रह्म कर्ता आहे आणि ब्रह्मच अकर्ता आहे. म्हणजेच, कर्ता–अकर्ता असलेले त्वम्–तत् ब्रह्मच आहेत.

जो काहीही करत नाही आणि जो सगळे करतो ते ब्रह्म. सगळे करूनही तो काहीच करत नाही, असे पद कूटस्थच. परंतु, हे एवढे सोपे नाही. त्या मार्गाने तुम्ही वाटचाल करीत नाही, हा मार्ग तुमच्या आचरणात नाही. म्हणून हे अशक्य वाटते. त्वम् सदैव कर्त्यात बसतो. तत् सदैव अकर्त्यात बसतो. कूटस्थ हे कर्ता, अकर्ता दोन्हीत बसते.

*****

## चिंतन क्रमांक ५४
## व्यावहारिक, प्रातिभासिक आणि पारमार्थिक सत्ता

आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या चक्रातून सुटण्याच्या उद्देशाने करीत आहोत. विवेक, वैराग्य, षट्‌संपत्ती आणि मुमुक्षत्व ही वेदांतशास्त्राच्या साधकाची बहिरंग साधने आहेत. ही साधने ज्या साधकामध्ये अंगीभूत आहेत त्याला श्रवण, मनन, निदिध्यासन आणि तत्–त्वम् पदार्थ शोधन ही अंतरंग साधने करण्याचा अधिकार येतो. तत्, त्वम् पदार्थ शोधन ही सर्वांत अंतरंग साधना आहे. आपल्या चिंतनाचा विषय तोच आहे. त्वम् वाच्यार्थाचा त्याग करताना प्रथम स्थूलप्रपंच, सूक्ष्मप्रपंच आणि नंतर अविद्या त्याग असा क्रम आहे. अविद्येला उत्तरोत्तर विशेषण, उपाधी, उपलक्षण ठरवित त्याग करणे हा क्रम आहे. मंद अधिकार असलेल्या साधकाला क्रमाक्रमाने अद्वैत वेदांताच्या मार्गावर चालावे लागते. मुंगी हळुहळू गंतव्यस्थानी जाते. परंतु, पक्षी सरळ झाडावरील फळाचा स्वाद घेतो. त्याप्रमाणे, उत्तम अधिकारी सरळ तात्पर्य निश्चय करतात.

प्रमाण –

**देखैं उत्प्लवनासरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा ।**
**सांगैं नरु केवीं तैसा । पावे वेगा ।।४१।। अध्याय ३**

– श्रीज्ञानेश्वरी

आपला अधिकार काय हे विचार करून ज्याने त्याने त्याचे साधन ठरवावे. संसारातील विचित्र गोष्टींमध्ये अडकून पडल्याने वेदांतशास्त्राचा अधिकार येत नाही. म्हणून, सावध असावे. साधक ही भूमिका योग्यपणे वठवली पाहिजे.

तत्‌चा विचार का करावा ? उद्या तत् झालो तर काय करायचे ? तत् हे देखील एक पद आहे. तत्‌च्या वाच्यार्थाचा त्याग करण्यापूर्वी तत्‌चा वाच्यार्थ म्हणजे काय? हे कळून घ्यावे लागते. त्वम् आणि तत् यांच्या वाच्यार्थांची एकी असिपदाने होत नाही. मागील चिंतनांमध्ये तत् आणि त्वम् यांचा लक्ष्यार्थ 'असि'पदाने कसा जुळतो हे पाहिले. असि म्हणजे अस्तित्व, सत्ता. व्यावहारिक, प्रातिभासिक आणि पारमार्थिक अशा तीन सत्ता मानण्यात आल्या आहेत. पारमार्थिक सत्ता केवळ एका ब्रह्माचीच आहे. चिंतनाचा विषय पारमार्थिक सत्ता आहे. ईशनिर्मित पदार्थाची व्यावहारिक सत्ता आहे. चौदा भुवनातील पदार्थ व्यावहारिक सत्तेत येतात. प्रातिभासिक पदार्थ हे प्रतितीमात्र म्हणजे भासलेले असतात. स्वप्न आणि मनोराज्य हे प्रातिभासिक असतात. त्याचप्रमाणे, दोरीच्या ठिकाणी मंद अंधकारात साप भासणे, शिंपल्याच्या ठिकाणी चांदीचा भास होणे, स्थाणूच्या ठिकाणी पुरुषाचा भास होणे ही

प्रातिभासिक पदार्थांचीच उदाहरणे आहेत.



तुमची धडपड व्यावहारिक सत्तेसाठी आहे. ज्याच्याकडे सत्ता असते तो काय करतो? त्याला आवडेल त्याप्रमाणे, तो जे सांगेल त्याप्रमाणे इतरांनी वागायचे असे त्याला वाटते. व्यावहारिक सत्ता कशी ओळखायची? ज्या मनुष्याची अशी वृत्ती असते की 'मी सांगतो तेच बरोबर आहे. घरातील लोकांनी माझे ऐकलेच पाहिजे'. असा मनुष्य व्यावहारिक सत्तावान असतो. यातून बाहेर पडले, प्रपंच त्याग झाला, तर मग असिपर्यंत पोहचणे शक्य होईल.

सत्तेबद्दल महाराजाला काय वाटते? ही सत्ता जर व्यावहारिक वाटत असेल, तर 'लोकांनी माझ्या म्हणण्याप्रमाणे चालावे' असे त्यांना वाटते. त्यांच्याप्रमाणेच लोक आचरण करतील काय? काही जणांची महाराजांवर श्रद्धा असते. जोपर्यंत श्रध्दा राहिल तोपर्यंत ते लोक 'महाराज म्हणतील ती पूर्व दिशा' असे मानतील. परंतु, महाराजांनी त्यांच्या मनाविरुद्ध काही केले किंवा बोलले, तर श्रद्धा ढासळते. मग, तेच लोक महाराजांचे दोष पाहतात आणि इतर लोकांना सांगत सुटतात, 'महाराज फसवे आहेत'. महाराज व्यावहारिक सत्तेत असतील आणि त्यांच्या म्हणण्याप्रमाणे लोकांनी आचरण केले, तर महाराजांना सुख होईल. महाराजांना त्यांनी मानले नाही, तर महाराजांना दुःख होईल. महाराज आणि साधक दोन्ही व्यावहारिक सत्तेतले असल्यामुळे दोघेही डुबतील. तीन प्रकारच्या सत्तेचा अभ्यास नसल्यामुळे साधकांची व महाराजांची अशी अवस्था होते.

प्रातिभासिक सत्ता म्हणजे काय? **'आगन्तुकदोषजन्य प्राततिकः'** – आगंतुक दोष म्हणजे प्रमातृ, प्रमाण आणि प्रमेय दोष. कावीळ रोग, डोळ्यातील मोतीबिंदू, निद्रा अशा आगंतुक दोषांनी युक्त असलेल्या अविद्येचे जे कार्य ते प्रातिभासिक असते. निद्रादोषसहित अविद्येने स्वप्नात विविध दृष्य दिसतात. कावीळ रोग झालेल्या मनुष्याला सर्व वस्तू पिवळ्या दिसतात. ही प्रतिभासिकतेची उदाहरणे आहेत. प्रातिभासिक म्हणजेच प्रातितीक म्हणजेच प्रतितीमात्र. केवळ दिसण्यापुरते. रज्जू–सर्पातील सर्प कोणत्या दोषाने दिसतो?

तुम्ही अभ्यास करत नाही. म्हणून या प्रश्नाचे उत्तर देऊ शकत नाही. अभ्यास करण्यासाठी तुम्हांला वेळ मिळत नाही. 'हा काय करतो?', 'तो कसा?', 'अनेक कामे पडली आहेत', यातच तुम्ही गुरफटलेले असता. तुम्ही ऐकतच नाही. म्हणून वारंवार सांगावे लागते.

मंद अंधकार या दोषाने दोरीच्या ठिकाणी सर्पाचा भास होतो. सर्प हा मुळात प्रातिभासिक पदार्थच आहे. परंतु, पूर्वी त्याच सर्पाला सत्य समजत होता. म्हणजे व्यावहारिक सत्तेला महत्त्व देत होता. सत्यत्व देत होता. अविद्या या दोषामुळे जगत् भासते असा निश्चय ज्याचा होतो, तेव्हाच त्याच्यासाठी जगत् प्रातिभासिक ठरते. ही गोष्ट सर्वसामान्य मनुष्याला कळणे अवघड आहे. जे वेदांतशास्त्राप्रमाणे साधना करतात त्यांनाही यावर विश्वास बसत नाही. 'जगत् प्रातिभासिक आहे' असे शेकडो वेळा श्रवण करूनही जगत् सत्यत्वाचा भ्रम जात नाही. व्यावहारिक सत्ता म्हणजे असि नाही. प्रातिभासिक सत्ता म्हणजेही असि नाही. असि

म्हणजे पारमार्थिक सत्ता.



जगत् सत्य का वाटते? जगतामध्ये रमतो म्हणून. ज्यामध्ये रमतो ते खरे वाटते. चित्रपटगृहात चित्रपट पाहता पाहता लोक इतके रमतात की काही जण हसतात, रडतात. मध्यांतर झाल्यावरच भानावर येतात. चित्रपट पाहण्यात रमलेले असल्यामुळे चित्रपटातील दृश्य खरे वाटतात. दैनंदिन जीवनात हेच लोक असंख्य पदार्थांत गुंतलेले असतात. कोणाला वाटते रमावे आणि कोणाला वाटते की रमू नये? समजा, घरामध्ये दूरचित्रवाणी संच सुरू आहे. त्या संचासमोर म्हातारे, तरुण, तान्हे मूल असे कुटुंबातील सदस्य बसले आहेत. प्रत्येक सदस्याच्या दूरचित्रवाणीसंचाकडे पाहण्यामध्ये भिन्नत्व असते. तान्ह्या मुलाला दूरचित्रवाणी संच कळत नाही. म्हणून, तो रममाण होत नाही. अत्यंत वृध्द मनुष्यालाही दूरचित्रवाणी संचाबद्दल काहीही रस वाटत नाही. या दोघांना त्याचा उपयोग नाही. परंतु, या दोघांच्या मधले, म्हणजे लहान, तरुण आणि प्रौढ सदस्यांना दूरचित्रवाणी संचावरील कार्यक्रम पाहण्यात रस असतो. त्याप्रमाणे, मूर्ख मनुष्याला आणि सिद्ध महात्म्यांना व्यावहारिक सत्तेबद्दल काही वाटत नाही. मधल्या लोकांना व्यवहार करण्यात रस वाटतो. वाढदिवसाचा कार्यक्रम, लग्न समारंभ, मयतीचा कार्यक्रम अशा प्रसंगी उपस्थित राहण्याचा आग्रह या लोकांना जास्त असतो. तान्ह्या मुलाचे तसे नसते. त्याचप्रमाणे, फार म्हातारा मनुष्य विचार करतो, 'काय जायचे असल्या कार्यक्रमांना?' तो रममाण होत नाही. मनुष्य व्यावहारिक सत्तेमध्ये कसा रमतो? मनुष्याचा जन्म झाल्यानंतर बाराव्या-तेराव्या दिवशी बारशाच्या निमित्ताने त्याचे कान फुंकण्यात येतात - 'रममाण हो!' अरे ! असंख्य धर्मांमधून बाहेर केव्हा पडणार? जगामध्ये रममाण होऊ नका. तुमचे कान चुकीचे फुंकले आहेत. सावध व्हा.

तुम्ही जर व्यावहारिक सत्तेत रमले नाही, तर जगत् तुम्हांला भासलेले दिसते. चित्रपटगृहात चित्रपट पाहत असताना, मनुष्य जर रमला नाही, तर अस्वस्थ होतो. जागच्या जागी हालतो, इकडे-तिकडे बघतो. त्याचप्रमाणे, तुम्ही या जगरूपी मोठ्या चित्रपटामध्ये रमले नाहीत, तर इकडे-तिकडे धावणे आपोआप कमी होईल. व्यावहारिक सत्तेतला रस गेला, तर ती सत्ता त्या मनुष्याला राहत नाही. मग, त्याला जगत् प्रातिभासिक वाटू लागते. हळुहळू जगत् प्रातिभासिक आहे, या निर्णयावर तो येईल.

समजा, चित्रपट पाहण्यात एखादा मनुष्य रंगून गेला आहे. त्याचे लक्ष चित्रपटातून विचलित करायचे असेल, तर त्याला अत्यंत आवडणारा पदार्थ - जसे समोसा, पॉपकॉर्न त्याच्या हातात ठेवायचे. चित्रपटातून त्याचे लक्ष हटेल. त्याचप्रमाणे, संसारात अडकलेल्या मनुष्याला भगवंत म्हणजे काय? आणि भगवंतप्राप्तीचे महत्त्व वारंवार सांगितले, तर तो संसारातून विचलित होतो. समजा, संसारात छान रमला आहे. मध्येच महाराज घरी येतात आणि पंचीकरण, श्रीज्ञानेश्वरी ग्रंथाचे निरूपण करतात. मग, हळुहळू परमार्थ आवडेल. पण, बाकीचे लोक भलतेच शिकवितात. स्वर्ग, पृथ्वी, पाताळ यांपैकी तुम्ही पृथ्वीवरील पदार्थांमध्येच रममाण झालेले आहात. स्वर्ग तर दूरची गोष्ट आहे. कोणी जर तुम्हांला म्हटले

एक मोठा बंगला फुकट देतो, तर, लगेच तुम्ही त्याच्या पाठीमागे जाल. संसारातील फालतू गोष्टींना भुलण्यापेक्षा स्वर्ग बरा.

जगताची सत्ता प्रातिभासिक आहे. हे ज्याला कळले तो सापेक्षित श्रेष्ठ आहे. परंतु, जग प्रातिभासिक वाटणे हा सुद्धा दोषच आहे. तो दोष ओळखला पाहिजे. उजेड आला की सर्प जातो आणि दोरीचा निश्चय होतो. वारा थांबला की लाटा समुद्ररूप होतात. दोष कसा घालवावा ही एक कला आहे.

स्थूलदेह व्यावहारिक सत्तेत येतो. सूक्ष्मदेह प्रातिभासिक सत्तेतला आहे. जीवाची सत्ता कोणती? कूटस्थाचे व्यष्टी अज्ञानात पडलेले प्रतिबिंब म्हणजे जीव. हे प्रतिबिंब भासलेले की खरे? जीव हा देखील प्रातिभासिक सत्तेतील आहे. शिव देखील प्रातिभासिक सत्तेतील आहे. कूटस्थाची सत्ता पारमार्थिक आहे. परंतु, त्याची तुम्हांला गरज वाटत नाही. कारण तुम्ही व्यावहारिक, प्रातिभासिक सत्तेत रमला आहात. व्यावहारिक सत्तेवरून एखाद्याचे लक्ष हटले, तरी पुढे प्रातिभासिक सत्तेतील सूक्ष्म, कारण, महाकारणदेह ओलांडायचे आहेत. हे तीन देह कसे आहेत? त्यांचे धर्म कोणते? हे कळून घेतले पाहिजे. ज्या दोषांने हे तीन देह भासले, ते दोष नाहिसे केले की ते तीन देह राहत नाहीत.

जेव्हा तुम्ही सूक्ष्मदेहाचा विचार करता तेव्हा तो कसा करता? मनाच्या संकल्प-विकल्पात रमता. काम, क्रोध, लोभ, मत्सर यात रमता, याला जीवपणा म्हणतात. सूक्ष्मदेहाच्या मन या एकाच अवयवाच्या धर्मांनी तुमची वाट लावली आहे. तर, मग बाकीच्या अवयवांच्या धर्मांनी तुमची काय अवस्था होईल? समजा, क्रोध आला. क्रोध प्रातिभासिक की व्यावहारिक? क्रोधाला सत्यत्व दिले, तर तो व्यावहारिक ठरतो. मनाची सत्ता प्रातिभासिक की व्यावहारिक? स्थूल आणि सूक्ष्मदेहांना सत्यत्व दिल्यामुळे तुमच्यासाठी हे देह व्यावहारिक सत्तेतील आहेत. या दोन देहावरचे सत्यत्व गेले, तर कारणदेह म्हणजे अज्ञान सत्य वाटू लागते. जीवाला सत्यत्व दिले, तो व्यावहारिक ठरला की पुढचे सूक्ष्म, स्थूलदेहही सत्य वाटतात. जीवाला व्यावहारिक सत्ता नाही. त्याच्याठायी सत्यत्व नको. जीव टिकून राहावा, असे मनुष्याला वाटते. मनुष्य जीव कोणालाही देत नाही. पण, सद्गुरूंना तोच हवा असतो.

प्रमाण –

जीवू घेतलिया उर्णे । चार्लो नेदिसी साजर्णे ।
भृत्यु उरे स्वामीपणें । तेहि नव्हे ।।३९।। प्रकरण २

– श्रीअमृतानुभव

एकवेळ मनुष्य इतर पदार्थ देईल, पण दुसऱ्याला स्वतःचा जीव देणार नाही. कारण जीवावर सत्यत्व आहे. जीव जाईल अशी भीती सर्वांना वाटते. जमीन आपली राहावी म्हणून ७/१२ या कागदावर नाव नीट लिहून घेतो. घर आपले राहावे म्हणून कर्ज काढतो. घरदार

जाण्यापेक्षा जीव जाण्याची जास्त भीती मनुष्याला वाटते. जीव जाईल ही भीती अतिशय तीव्र असते आणि जीव गेल्याशिवाय राहत नाही. मनुष्याचा जीव स्थूल आणि सूक्ष्मप्रपंचामध्ये गुंतलेला जरी असला, तरी तो स्वतःच्या जीवाबद्दल जागरूक असतो. जीवाला जपून ठेवतो. जीवाला तो स्वतःच अतिशय प्रिय आहे. त्यासाठी, मनुष्य बायको, पोरांनाही दूर लोटतो. जीव सर्वात लबाड, त्याला प्रातिभासिक ठरविणे कठीण.



'जीव गेला तरी चालेल. पण, परमार्थ करीनच' अशी वृत्ती पाहिजे. चिंतनाची वेळ होत आहे. तेवढ्यात जोरात पाऊस पडू लागला, तर तुम्ही चिंतनाला येणार नाहीत. चिंतनासाठी जीव देणे तर दूरची गोष्ट. माझ्या चिंतनाचे श्रवण करून उद्धार होणार असा निश्चय असेल, तर पाऊस पडत असला तरी तुम्ही चिंतन ऐकण्यासाठी पोहचले पाहिजे. जीव नाहिसा करणे म्हणजे परमार्थ.

मनुष्य इतर वस्तू देतो. पण, जीव राखून ठेवतो. जीवाला सत्यत्व दिले, त्यात रमले, म्हणून तुमच्यासाठी जीव व्यावहारिक सत्तेतला ठरला. जीव प्रातिभासिक आहे हे प्रथम जाणा व तसा निश्चय करा. जो जीवात रमत नाही, तो स्थूल–सूक्ष्मप्रपंचामध्ये रमत नाही. परंतु, शिवात रमू शकतो.

शिव सुध्दा प्रातिभासिकच आहे. मनुष्य त्याला व्यवहारात आणतो. ईश्वर कोण? कसा? हे माहिती नसलेला मनुष्य फक्त 'ईश्वर आहे' अशा भावनेने त्याच्यामध्ये रमतो. जो ईश्वरामध्ये रमतो, त्याचा जीव राहतो. जो साधक ईश्वरात रमत नाही, त्याचा जीव टिकत नाही. अनंतकाळापासून जीव का टिकून आहे? जीव जाऊ नये व स्थूल, सूक्ष्मप्रपंचात रमायला मिळावे, म्हणून जीव ईश्वराला शरण राहतो आणि म्हणून जीव टिकून आहे. जो निःस्पृह, फकीर आहे, त्याचे ईश्वर काही वाईट करू शकत नाही. त्वम्‌ने तत्‌च्या वाच्यार्थात रमू नये. ईश्वर हा शंख, चक्र, गदा, पितांबरधारी आहे असे लोक समजतात. मनुष्याला त्याची भीती वाटते. 'तो माझे घरदार उध्वस्त करेल', अशी भीती मनुष्याला वाटते. खरेतर, ईश्वर भीती दाखवित नाही. मनुष्यच त्याला भीतो. त्यासाठी 'प्रपंचातील पदार्थाबद्दल वासना' हे कारण आहे. ज्याला घर असले काय किंवा नसले काय याबद्दल काही वाटत नाही, त्याचे घर हिसकावले, तर 'हिसकावून घे', अशी वृत्ती असते. जीवाला कर्मानुसार फल मिळण्यास ईश्वर निमित्त आहे. उपादान नाही. तो काही करत नाही. 'प्राणीकर्मसापेक्ष जगत् उत्पत्ती', असा सिद्धांत आहे. ईश्वर भीतीदायक नाही. ईश्वराचा बाप शोधा. ईश्वराचा बाप परमेश्वर. तोच खरा आहे. असा कोण आहे की जो जीवाचा नाश करण्यासाठी जगतो? जीव राहावा म्हणून मनुष्य जगतो की जीवाचा नाश व्हावा म्हणून मनुष्य जगतो? जीव राहावा असे ज्याला वाटते त्याला परमार्थाचा उपयोग नाही. प्रपंचाला प्रातिभासिक ठरवले, तर परमार्थ साधतो. तसेच, जीव भासलेला आहे, प्रातिभासिक आहे हे कळले तर प्रगती होते. अविद्येच्या कल्पनेने जीव झाला आहे.

प्रत्येकाचे घरदार टिकते की नाही? टिकवण्याचा प्रयत्न करतो. टिकणार नाही ही काळ्या दगडावरची रेघ आहे. टिकविण्याचा हट्ट का? स्त्रीचे सौंदर्य टिकणार का? पण, ती

सौंदर्य टिकविण्याचा प्रयत्न करते. तीच स्त्री म्हातारी झाली, जर्जर झाली की 'काय

टिकवायचे सौंदर्य' असा विचार करते. हे शरीर एक दिवस कोलमडणार आहे. त्याच्यावर काय रडावे? जीव टिकविण्याचा प्रयत्न जर आपण करू तर 'असि' कळेल काय? त्वम् राहावा असे ज्याला वाटते तो व्यावहारिक सत्तेतच आहे. मग, पाप-पुण्यादि धर्म चिकटतात. स्थूलप्रपंच, सूक्ष्मप्रपंच, जीव आणि शिव हे सर्व भासलेले आहेत, भ्रम आहे, असा ठाम निश्चय पाहिजे. कूटस्थाची पारमार्थिक सत्ता आहे, असा साधूसंतांचा अनुभव आहे आणि आपलाही तसाच अनुभव असावा. तत्, त्वम् वाच्यार्थात रमणे बंद केले, तर व्यावहारिक आणि प्रातिभासिक सत्ता राहणार नाहीत. मग, तत् आणि त्वम् यांच्या पारमार्थिक सत्तेकडे लक्ष जाईल. याचा विचार मनुष्य देहातच करता येतो. पुढे कुत्रा, मांजरादिकांचा देह मिळाल्यावर विचार करण्याचा प्रश्नच नाही. नियमाने मनुष्य देहातच परमार्थ करून सिद्ध होता येते.

प्रमाण –

याची देही याची डोळा। भोगी मुक्तीचा सोहळा।।

– श्री संत तुकाराम महाराज क्षेपक अभंग

पारमार्थिक सत्ता कोणाची आहे? व्यष्टीने कूटस्थाची आहे. समष्टीने ब्रह्माची पारमार्थिक सत्ता आहे. असिने तत्, त्वम् यांच्या पारमार्थिक सत्तेच्या एकीच्या निश्चय होतो. छोट्या भांड्यात स्वच्छ पाणी, मोठ्या भांड्यातही स्वच्छ पाणी. दोन्ही पाणी एकत्र केले तर भिन्न वाटत नाही. नाही केले तरी ते एकच आहे. तत्, त्वम्चा लक्ष्यार्थ एकच आहे. त्यांची पारमार्थिक सत्ता सापडते. दोघांची सत्ता एकच. ते आणि तू एकच आहे. मी आणि तू एकच आहोत. प्रातिभासिक आणि व्यावहारिक सत्तेचा खेळ एका पारमार्थिक सत्तेवर सुरू आहे. याची अनोळख जोपर्यंत राहिल, तोपर्यंत सुटका नाही.

प्रपंचाची सत्ता व्यावहारिक नसून प्रातिभासिक, प्रातिभासिक नसून पारमार्थिक आहे. असा निर्णय जो लावेल त्याचाच परमार्थ संपेल. त्याला 'असि' कळेल. पारमार्थिक सत्ता म्हणजे परमपूज्य सद्गुरू.

*****

## चिंतन क्रमांक ५५
## मुख्य सामानाधिकरण्यसंबंध

'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास करण्याचा हेतू जन्ममरणाच्या चक्रातून सुटणे हा आहे. आपण फेऱ्यात अडकलो आहोत हे साधारणपणे कोणाच्या लक्षात येत नाही. कोणी लक्षात आणून दिले, तरी असा बोध जास्त काळ जीवावर राहत नाही. विसर लवकर पडतो. चक्रातून बाहेर पडणे अवघड गोष्ट आहे. शास्त्राभ्यास होत नाही. सद्‌गुरूंना जीव शरण जात नाही. विरुद्ध दिशेने वाटचाल करणाऱ्या लोकांच्या संगतीत जास्त काळ जातो. काहीजण शास्त्राभ्यास करतात, पण थोडा वेळ. शास्त्राभ्यासाची वेळ हळुहळू वाढविली पाहिजे. 'असि'चा पक्का निश्चय होईपर्यंत शास्त्राभ्यास आणि श्रीगुरु शरणागती आवश्यक आहे.

तत्त्वमसि महावाक्याचा विचार करीत असताना आपण तत् आणि त्वम् पदांचा वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ पाहिला. आता 'असि'चा विचार करीत आहोत. 'असि' म्हणजे 'आहे'. म्हणजेच, 'नाही'चा प्रश्नच नाही. 'आहे' हे पद त्रिकाळ म्हणजे भूत, वर्तमान, भविष्यकाळ दाखविते. 'असि' म्हणजे अस्तित्व म्हणजे सत्ता. 'असि' हे पारमार्थिक सत्ता दाखविते. मागील चिंतनात व्यावहारिक, प्रातिभासिक, आणि पारमार्थिक या तीन सत्तांचा थोडक्यात विचार केला होता. व्यावहारिक सत्ता केव्हा तयार होते ?

तुम्ही घरी अभ्यास करता की नाही ? गृहपाठ करून आला असाल, तर वर्गपाठ ऐकण्याचा फायदा होईल. केवळ चिंतनांचे श्रवण केल्याने होणार नाही. घरी गेल्यावर शास्त्राभ्यास केला पाहिजे. अभ्यास केवळ महाराजांनीच करायचा आणि आपण केवळ श्रवण करायचे, अशी वृत्ती नसावी. अभ्यास करीत राहिले की सिद्धांत दृढ होतो. तुम्ही म्हणता की तुम्हांला संसाराच्या जबाबदाऱ्या असतात. जबाबदाऱ्या संपत नसतील, तर मग अवघड आहे. तसे पाहिले तर जबाबदाऱ्या मरेपर्यंत संपतच नाहीत. तुम्ही रोज आठ तास झोपत असाल, तर सहा तासच झोपत जा आणि उरलेल्या दोन तासात शास्त्राभ्यास करा.

महावाक्याचा विचार संबंधत्रयाने करण्यात येतो. त्यातील विशेषण–विशेष्यभाव संबंध, लक्ष्य–लक्षणभाव संबंध यांचा वापर आपण पूर्वी महावाक्याला केलेलाच आहे. आता, सामानाधिकरण्य संबंधाने महावाक्याचा विचार करू.

सामानाधिकरण्य हा वेदांतातील पारिभाषिक शब्द आहे. हा शब्द व्यवहारात सहज वापरत नाहीत. ही परिभाषा शास्त्रांमध्ये आढळते. ती परिभाषा साधूसंतांनी तयार केली. पारिभाषिक शब्द आणि त्यांचे अर्थ माहीत नसल्यामुळे परमार्थ यथार्थपणे कळत नाही. एखाद्याला आपण सांगितले, 'पाणी आण' पण, त्याने जेवण आणून दिले तर ? एकाला मराठी बोलता येते आणि दुसऱ्याला इंग्रजी बोलता येते, अशा दोन व्यक्ती एकत्र आल्या, तर व्यवहार करणे कठीण होते. 'आत्मा' हा पारिभाषिक शब्द आहे. त्याचा योग्य अर्थ बहुतेकांना माहीत

नसल्यामुळे, 'आत्म्याला शांती मिळो' असे वाक्य व्यवहारात वापरतात. आत्मा शांतच आहे, त्याला काही मिळविणे अथवा न मिळविणे नाही. म्हणून, शांत–अशांत असा प्रश्न नाही. काही जण म्हणतात, 'त्याचा आत्मा स्वर्गात गेला'. आत्मा कुठे येत–जात नाही. पारिभाषिक शब्दांचा अर्थ माहीत नसल्याने अशा अडचणी येतात. साधकाला पारिभाषिक शब्द गरजेपुरते तरी माहीत पाहिजेत. त्याने बोध दृढ होण्यास मदत होते. बाहेरील प्रांतातला मनुष्य महाराष्ट्रात राहण्यास येतो, तेव्हा तो गरजेपुरते मराठी पटकन शिकतो. त्यामुळे व्यवहार नीट करता येतो.

आतापर्यंत आपण पारिभाषिक शब्दांचा जास्त वापर न करता सरळ सोप्या मराठीत शब्दार्थसहित चिंतने श्रवण करीत आलो आहे. कधी कधी आपल्याला असे वाटते की पारिभाषिक शब्द आपल्याला कळले. पण, खरेतर ते नीटसे कळलेले नसतात. ब्रह्म, विशेषण, विशिष्ट, उपहित, उपलक्ष्य यांसारख्या शब्दांचे अर्थ केवळ ऐकल्याने कळणार नाहीत. सोबत शास्त्राभ्यास पाहिजे. त्यावर सतत विचार केला पाहिजे. मग, त्यातला गूढार्थ कळत जातो.

'समानाधिकरण' हा शब्द संस्कृत भाषेतला आहे. अधिकरण म्हणजे सत्ता, असि, अधिष्ठान. समान म्हणजे एकच. समान आणि अधिकरण हे शब्द एकत्र केल्यावर 'समानाधिकरण' हा शब्द तयार होतो. समानाधिकरण भाव म्हणजे समान सत्तेचा भाव. 'समान सत्ता' असा अर्थ केल्याने काय दिसते? ज्याअर्थी समान हा शब्द आहे, त्याअर्थी एकच पदार्थ विचारात घेऊन चालणार नाही. 'याची सत्ता समान'. पण कोणाशी? 'हा त्याच्याप्रमाणे समान'. कोणाप्रमाणे? म्हणून, कमीत कमी दोन पदार्थ विचारात घ्यावे लागतील. 'ही स्त्री समान' एवढेच म्हटल्याने कोणाशी समान हे कळत नाही. एकच पदार्थ घेतला, तर अर्थ जुळत नाही. समान शब्द आला की दोन अथवा दोन पेक्षा जास्त पदार्थांचा विचार करावा लागतो. एकच पदार्थ घेतला, तर 'समान सत्ता' असे म्हणण्याची गरज नाही. मागील अनेक चिंतनांमध्ये आपण तत्, त्वम् या दोन पदांचा अभ्यास केला. दोन पदांच्या सत्तेचा विचार सुरू आहे. दोघांची सत्ता समान आहे की नाही याचा शोध सुरू आहे.

**(येथे चिंतन क्रमांक –२५ मधील संदर्भ वाचावा.)**

'समानाधिकरण' दोन प्रकारचे असते. एक मुख्य समानाधिकरण आणि दुसरे बाध समानाधिकरण. बाध समानाधिकरण यास गौण समानाधिकरण असेही म्हणतात. मुख्य समानाधिकरणामध्ये सत्ता समान असते. सत्ता संबंधी विचार आपण मागील चिंतनात केला आहे. पारमार्थिक, प्रातिभासिक व व्यावहारिक अशा तीन सत्ता आहेत.

वरील दोन समानाधिकरण समजून घेण्याच्या पूर्वी सामानाधिकरण्य संबंध म्हणजे काय? हे समजून घेतले पाहिजे. समजा, एखादी स्त्री सुगरण आहे. ती उत्तम स्वयंपाक करते. पण, तिला गॅस सिलेंडर वापरता येत नसेल तर? सिलेंडर मधून गॅस बाहेर येण्यासाठी बटन कसे फिरवावे? भांडे कुठे ठेवावे? गॅस कसा पेटवावा? हे जर त्या सुगरण स्त्रीला माहीत नसेल, तर पुढचे कार्य म्हणजे स्वयंपाक करणे होणार नाही. त्याप्रमाणे, प्रथम

सामानाधिकरण्य संबंध म्हणजे काय हे माहीत पाहिजे. मग, पुढे त्याचा सूक्ष्म विचार करता येईल.


**'विभिन्नविभक्तिराहित्ये सति अभेदेन एकार्थबोधजनकत्वं समानाधिकरणत्वम्'.**

याचा अर्थ – वेगवेगळ्या विभक्ति नसून अभेदाने एकाच अर्थाचा बोध करणे म्हणजे समानाधिकरणत्व. 'काळा घट' या उदाहरणामध्ये 'काळा' हा वर्ण म्हणून प्रवृत्त झाला आहे. 'घट' हा शब्द निमुळता गळा, मोठे पोट अशा आकाराचा पदार्थ या निमित्ताने प्रवृत्त झाला आहे. ज्या दोन शब्दांचे एक अधिकरण असते, त्या दोन शब्दांना 'समानाधिकरण' शब्द म्हणतात व त्यांच्या संबंधाला 'सामानाधिकरण्य' म्हणतात. 'काळा' व 'घट' या दोन शब्दांचे 'घट' हे एकच अधिकरण आहे. म्हणून ते दोन शब्द समानाधिकरण व त्या दोन शब्दांचा संबंध हा सामानाधिकरण्य संबंध आहे. काळा आणि घट हे वेगळे शब्द जरी असले तरी 'काळा घट' हे दोन्ही शब्द 'एका घटाचा' बोध करून देतात.

समानाधिकरण म्हणजे समान सत्ता. मुख्य समानाधिकरणामध्ये दोन अथवा दोन पेक्षा अधिक पदार्थांची व्यावहारिक सत्ताच पाहिजे किंवा दोन पेक्षा अधिक पदार्थांची प्रातिभासिक सत्ताच पाहिजे अथवा दोन किंवा दोन पेक्षा अधिक पदार्थांची पारमार्थिक सत्ताच पाहिजे. असे असेल तर त्यास मुख्य समानाधिकरण म्हणतात.

दोन पदार्थ समान सत्तेतील असतील, तर मुख्य समानाधिकरण सिद्ध होते. ईशनिर्मित पदार्थांची व्यावहारिक सत्ता असते. व्यावहारिक सत्तेतील कोणतेही दोन पदार्थांचे उदाहरण घ्या. 'गोडी' ही साखर आणि गूळ यांच्यामध्ये समान असते. घटाकाश आणि महादाकाश हे दोन पदार्थ कोणत्या सत्तेतील आहेत? दोघांची एक व्यावहारिक सत्ताच आहे, त्या दोघांमध्ये येथे मुख्य सामानाधिकरण्य संबंध आहे.

प्रातिभासिक सत्ता म्हणजे काय हे माहीत आहे का? समजा, रोज श्रीज्ञानेश्वरीच्या शंभर ओव्या वाचतो म्हणजे परमार्थात एक पाऊल पुढे टाकतो. परंतु, दिवसभर तीव्रतेने व्यवहार करतो, म्हणजे परमार्थात दहा पाऊले मागे जातो. काय निष्कर्ष निघतो? विचार करा. कांजी घुसळली तर लोणी निघत नाही. दही घुसळले तर नवनीत प्राप्त होते. तसेच, पारिभाषिक शब्द घुसळले, तर आत्मा प्राप्त होतो. अभ्यास करा.

उपरणे आणि सदरा यात सत्ता कोणाची? सत्ता तंतूची आहे. तंतू जर काढले, तर सदरा आणि उपरणे राहणार नाहीत. दोन्ही पदार्थ व्यावहारिक असून त्यांच्यामध्ये मुख्य सामानाधिकारण्य संबंध आहे. सदरा आणि उपरणे हे वेगळे जरी असले, तरी त्यांचे अधिकरण एक तंतू आहे. सदरा आणि उपरणे यांचे मुख्य समानाधिकरण आहे व त्या दोघांचा संबंध मुख्य सामानाधिकरण्य संबंध आहे. उपरणे याचे कार्य वेगळे. सदऱ्याचे कार्य वेगळे. उपरणे हे खांद्यावर अथवा गळ्याभोवती घालतात व सदरा अंगावर चढवितात. उपरणे आणि सदरा यांचे कार्य भिन्न जरी असले तरी सत्ता समान आहे.

घटाकाश लहान, मठाकाश मोठे. घटात कमी वस्तू मावतात. मठात शेकडो वस्तू मावतात. घटात पाणी भरतात, मठात पाणी भरत नाहीत. घट आणि मठ यांच्या कार्यात भेद

जरी असला तरी त्यांची एक व्यावहारिक सत्ताच आहे.


**'आगन्तुक दोष सहकृत अविद्याकार्यत्वम्'** नेत्रदोष, कावीळ, निद्रा इत्यादी आगंतुक दोषांनी युक्त असलेले अविद्येचे पदार्थ हे प्रातिभासिक असतात. प्रातिभासिक पदार्थ हा दिसण्यापुरताच असतो.

प्रातिभासिक सत्ता असलेले दोन पदार्थ सांगा? मृगजळ पिण्याचे आहे की भासलेले आहे? भासलेले पाणी आहे. मृगजळाची प्रातिभासिक सत्ता आहे. स्थाणू-पुरुष हे दुसरे उदाहरण आहे. मंद अंधारात दूर अंतरावरून जर कोणी एखाद्या उभ्या ओंडक्याकडे पाहिले, तर एक मनुष्य उभा आहे असा भास होतो.

रज्जू-सर्प दृष्टांतातील सर्प हासुद्धा प्रातिभासिक पदार्थ आहे. स्वप्न हे प्रातिभासिकच असते. स्वप्नामध्ये कधी कोणाला बायको, मुलेबाळे, नातलग, घर इत्यादी अनेक पदार्थ दिसतात. त्या सर्व पदार्थांची एक प्रातिभासिक सत्ताच असते. त्या सर्व पदार्थांचा आपापसात मुख्य सामानाधिकारण्य संबंध आहे.

शाळेत मुलांना गणित शिकविण्यात येते. गणिताचे मास्तर गणितातील नियम शिकवितात. घात काढताना दोनाचा चौथा घात म्हणजे २ × २ × २ × २ याप्रकारे काढायचा, असा एक नियम आहे. घात सोडविण्याचे सूत्र जर विद्यार्थ्यांला माहिती असेल, तरच तो गणित सोडवू शकेल.

त्याचप्रमाणे, परमार्थाचे गणित अचूकपणे सोडवायचे असेल, तर काही नियम माहिती पाहिजेत. अन्यथा नापास होतो. कोणता देह कोणत्या सत्तेतला आहे, याची ओळख पाहिजे. स्थूलदेह हा व्यावहारिक सत्तेतला आहे. सूक्ष्मदेह हा प्रातिभासिक सत्तेतला आहे. जीव? जेव्हा, कारणदेहाशी साक्षीचा संबंध येतो, तेव्हा जीव ही संज्ञा येते. कारणशरीराची सुद्धा प्रातिभासिक सत्ता आहे. शिव? महाकारणदेहाशी साक्षीचा संबंध येतो, तेव्हा शिव ही संज्ञा येते. महाकारणदेह सुद्धा प्रातिभासिक सत्तेतला आहे. हे नियम माहिती पाहिजेत. ब्रह्म आणि कूटस्थ यांना सोवळ्यात ठेवायचे असते. हा आणखी एक नियम आहे. सतत श्रवण केल्याने हे नियम माहिती होतात आणि लक्षात राहतात. या नियमांचे पालन केल्याने साधकाचा बोध चुकत नाही व सिद्धांत पक्का होतो.

जीव हा प्रातिभासिक का? जो पदार्थ संभ्रमात असतो तो प्रातिभासिक असतो. भगवान श्री आद्य शंकराचार्य आपल्याला बोध करतात **'जीवो ब्रह्मैव नापरः।'** जीव हा ब्रह्मच आहे. पण, आपल्याला तसे वाटत नाही. आपल्याला जीव ब्रह्म वाटत नाही. म्हणून, जीवाविषयी आपल्याला संभ्रम आहे. हा अनुभव नसल्यामुळे, जीव रस घेऊन व्यवहार करीत राहतो.

संभ्रम म्हणजे काय? एका ठिकाणी काही स्त्रिया जमल्या होत्या आणि पुरणपोळी कशी बनवायची यावर चर्चा करत होत्या. एक जण म्हणाली, 'पुरणपोळी लाटायची आणि पाण्याने भरलेल्या परातीत सोडायची'. दुसरी स्त्री म्हणाली, 'तसे नाही. पुरणपोळी लाटायची आणि कढईतल्या उकळत्या तेलात सोडायची'. प्रत्येक स्त्री पुरणपोळी

बनविण्याची वेगवेगळी पद्धत सांगू लागली. त्यामुळे माहिती नसलेल्या स्त्रीला संभ्रम निर्माण

झाला.

जोपर्यंत जीव व्यवहारात रमतो तोपर्यंत त्याला संभ्रम कळत नाही. 'मी आणि माझे'च्या प्रभावाखाली तो कार्यात मग्न राहतो. त्याच्यासाठी सत्ता ही व्यावहारिकच ठरते. व्यवहारात रमणे म्हणजे जीवपणा.

पुढे जर तो हुशार झाला तर जीवावर येतो. त्याला संभ्रम कळतो. तेव्हा त्याच्यासाठी सत्ता प्रातिभासिक ठरते. पुढे जर शास्त्र, सद्गुरू कृपेने संभ्रम गेला, तर पारमार्थिक सत्तेचाच निश्चय होतो.

बायको, पोरांना तुम्ही तुमची मानता की नाही? धन, संपत्ती तुमची मानता की नाही? जर, महाराजांनी तुम्हांला सांगितले की तुम्ही संभ्रमात आहात, तर तुम्ही म्हणता 'नाही'. तुम्ही संभ्रमात आहात हे तुम्हांला पटलेले नाही. म्हणून तुम्ही व्यावहारिक सत्तेतच आहात. 'माझेच आहे' हे तुमचे दृढ आहे. 'जमीन माझी आहे' असे म्हणतो. परंतु, संत आपल्याला सांगतात, 'सब भूमी गोपाल की'. तुमच्याने व्यावहारिक सत्ताच सोडवत नाही, तर पुढच्या दोन सत्तापर्यंत पोहोचण्याचा प्रश्नच येत नाही.

संत सांगतात, 'प्रपंच तुमचा नाही', 'तुम्ही प्रपंच नाही'. परंतु, त्यांचे वचन तुम्ही कसे ऐकता? 'प्रपंच माझा नाही' असे केवळ वैखरीने बोलण्याने उपयोग होत नाही. बुद्धीचा निश्चय सुद्धा तोच असावा आणि हृदयापासून तेच वाटावे.

एकच जगत् तीन सत्तेत कसे काय? पदार्थ एकच, पण तीन प्रकारे त्याचा निश्चय होतो. व्यवहाराला सत्यत्व दिल्याने संभ्रम कळत नाही, तेव्हा व्यावहारिक सत्ता. संभ्रम कळतो, तेव्हा प्रातिभासिक सत्ता आणि संभ्रम जातो, तेव्हा पारमार्थिक सत्ता.

संभ्रम घालविणे म्हणजे परमार्थ. आपण संभ्रमात आहोत याची जाणीवच ज्याला नाही, त्याच्यासाठी संभ्रम घालविण्याचा प्रश्नच नाही. जगातील बहुसंख्य लोकांची हीच अवस्था आहे. पोटभर जेवलेल्या किंवा न जेवलेल्या मनुष्याला बळेच, नको असलेले अन्न खाऊ घातले, तर त्याला उलटी होते. त्याप्रमाणे, व्यवहारात रमलेल्या मनुष्याला म्हणजे व्यावहारिक सत्तेतल्या मनुष्याला, जर हा परमार्थाचा बोध सांगितला, तर तो बोध ऐकून उलटी करतो.

'हा देह माझा नाही' हे दृढ करा. त्यानंतर संभ्रम घालविण्याचा प्रश्न येतो. तुम्ही संसार करता, आळंदी, पंढरीला जाता. का? संभ्रमात आहात म्हणून. तुम्ही येथे चिंतन श्रवणासाठी का येता? संभ्रमात आहात म्हणून. तुमचा संभ्रम गेला, तर तुम्ही येथे श्रवणासाठी येणार नाही. मी व्यावहारिक सत्तेतले काहीही सांगत नाही. व्यावहारिक आणि प्रातिभासिक सत्तांशी माझा तीळमात्रही संबंध नाही. मी 'नित्यशुद्धबुद्धमुक्त' स्थितीचे वर्णन करण्यासाठी येथे आलो आहे.

पारमार्थिक सत्तेतील दोन पदार्थांची उदाहरणे सांगा? सुवर्ण–अलंकार हे पारमार्थिक सत्तेतील नाहीत. पारमार्थिक सत्ता समजावून सांगण्यासाठी सुवर्ण–अलंकार हा

व्यावहारिक दृष्टांत आहे. जीव हा पारमार्थिक सत्तेतला नाही. अन्यथा जीव आणि जीवपणा घालविण्यास शास्त्रांनी का सांगितले असते ?


कूटस्थ आणि ब्रह्म याच दोन पारमार्थिक सत्तेतील वस्तू आहेत. दोन वस्तू का म्हटले ? कार्यभेदाने दोन आहेत. व्यष्टी प्रपंचाचे अधिष्ठान म्हणजे कूटस्थ. समष्टी प्रपंचाचे अधिष्ठान म्हणजे ब्रह्म. यांची सत्ता एक पारमार्थिक सत्ताच आहे.

सदरा आणि उपरणे यांचा कार्यात भेद असला, तरी तंतू हे दोघांमध्ये समान आहे. सदरा आणि उपरणे यांचे मुख्य समानाधिकरण असून, त्या दोघांचा संबंध मुख्य सामानाधिकारण्य संबंध आहे.

त्याचप्रमाणे, व्यावहारिक सत्तेतील सुवर्ण-अलंकार यांमध्ये मुख्य सामानाधिकारण्य संबंध आहे. प्रातिभासिक सत्तेतील, स्वप्नातील सर्व पदार्थांचा मुख्य सामानाधिकरण्य संबंध आहे.

कूटस्थ आणि ब्रह्म हे दोन शब्द कार्यभेदाने वेगळे जरी वाटले, तरी दोघांची सत्ता एक पारमार्थिकच असल्यामुळे, त्यात मुख्य समानाधिकरण आहे व दोघांचा संबंध मुख्य सामानाधिकरण्य संबंधच आहे.

या चिंतनात मुख्य समानाधिकरण म्हणजे काय हे जाणून घेतले. पुढील चिंतनात गौण समानाधिकरण म्हणजेच बाध समानाधिकरण यावर विचार करू.

*****

## चिंतन क्रमांक ५६
## बाध सामानाधिकरण्यसंबंध

आपण जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या उद्देशाने 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास करीत आहोत. अनेक वेळा सांगूनही बहुतेक लोकांना ते त्या फेऱ्यात अडकेलेले आहेत हे लक्षात येत नाही. बहुजन्मांपासून करत आलेल्या बऱ्या–वाईट कर्मांचा प्रभाव प्रबळ आहे. त्यामुळे, जन्ममरण चक्राचा विचार येत नाही. तो विचार आला, तरी जास्त काळ टिकत नाही. तत्त्वमसि हे वेदातील महावाक्य आहे. त्याचा अभ्यास करणे अवघड गोष्ट आहे. शास्त्रात महावाक्याचे निरूपण अल्प शब्दातच केले आहे. तुमच्यापैकी कोणाला जन्ममरणाचा फेरा चुकवायचा आहे? भूक लागलेली नसेल, तर जेवण देण्याचा प्रश्न नाही. ज्याअर्थी तुम्ही येथे येता, त्याअर्थी तुम्हांला ते हवे असे गृहीत धरावे लागते.

बहुतेकजण ओळखीमुळे अथवा लाजेखातर परमार्थ करतात. 'आता परमार्थात तर पडलो, बाहेर निघताही येत नाही.' मग, अशा परिस्थितीत परमार्थ करण्याचे नाटक करावे लागते. इकडे संसार करणेही आवडते. ही वाईट स्थिती आहे. एखादा मनुष्य परमार्थ करत नसेल, तर एक वेळ बरे. समजा, तो नरकात जातो. परंतु, जो मनुष्य परमार्थ करण्याचे नाटक करतो, तो दुप्पट खोल नरकात जातो. तुम्ही परमार्थात पडले आहात. आता माघारी फिरून जमणार नाही. आता तुम्ही, 'परमार्थ सोडून देईल आणि व्यवहारच करीन' असा प्रयत्न जरी केला, तरी व्यवहारात नीट रमता येणार नाही. कोणत्या ना कोणत्या कारणाने तुम्ही परमार्थ करायला सुरूवात केली आहे. परमार्थ करण्याची सवय होत आहे. त्यामुळे, परमार्थ यांत्रिक पद्धतीने होत आहे. 'परमार्थ करतो आहे, चालले आहे', अशी अवस्था नसावी.

परमार्थ करणाऱ्या मनुष्याला दिवसभरात कमीतकमी एक क्षण जन्ममरणाच्या चक्रातून सुटण्याची तीव्र इच्छा व्हावी. दुसऱ्या दिवशी त्याला ती इच्छा दोन क्षण व्हावी. 'थेंबे थेंबे तळे साचे' या म्हणीप्रमाणे वर्षभरात एकाच दिवशी अंदाजे तिनशे क्षण इतक्या वेळपर्यंत चक्रातून निघण्याची तीव्र आस असावी. सोबतच, तत्त्वमसि महावाक्याचे निरूपण महाराजांकडून ऐकावे. परंतु, परमार्थ म्हणजे केवळ श्रवण करणे नाही, शोध आहे. शोध करणे म्हणजे तत्त्वाचे अनुसंधान करणे. सद्गुरू व शास्त्र आपल्याला बोध करतात, 'ते तू आहेस'. परंतु, सध्या तुमचा तसा निश्चय नाही. सध्या, जेथे आहात तेथून पुढे प्रगती करायची आहे.

साधकाने सिद्ध महापुरुषांच्या, श्रीगुरूंच्या बाह्य व्यवहाराचे अनुकरण करू नये. समजा, सद्गुरू एकादशी करीत नाहीत, म्हणून, 'मी एकादशी करणार नाही', असा विचार साधकाने केला तर तो गाळात जाईल. जो सिद्ध नाही, त्याला अधिकारानुरूप साधन घ्यावे लागेलच. एखादा साधक एकादशीचे व्रत कदाचित् पाळत नसेल. परंतु, दिवसातून दहा तास शास्त्राभ्यास करीत असेल. म्हणजे कोणते ना कोणते साधन करतो हे चांगले आहे. पैलतीरी

पोहचायचे असेल आणि मध्येच नाव सोडून दिली तर बुडणार. साधनच्युत होणे अगदी सोपे आहे. साधनारूढ होणे कठीण आहे. जो साधक मध्येच साधना सोडून देतो, स्वतःला भ्रमाने सिद्ध समजतो, त्याचा मनुष्यजन्म वाया जातो.



तत्त्वमसि निरूपण केवळ ऐकल्याने आपले काम होणार नाही. पचनी पडले पाहिजे. हे महावाक्य आहे. साधकाने स्वतःसाठी कोणती साधना योग्य आहे? हे श्रीगुरुंना विचारावे. श्रीगुरुंच्या आज्ञेप्रमाणे त्याने साधना केल्यास तो 'साधनातीत' होतो. एखादा मुलगा दुसऱ्या वर्गात शिकत आहे आणि मध्यातच त्याने पुस्तक वाचणे सोडून दिले, अभ्यास करणे सोडून दिले, तर तो तिसरीत जाऊ शकणार नाही. उलट, तल्लख बुद्धीचा एखादा मुलगा दुसऱ्या वर्गातून सरळ चौथ्या वर्गात जातो, परिक्षेत उत्तम श्रेणीत उत्तीर्ण होतो. परंतु, असे विद्यार्थी दुर्मिळ असतात. परमार्थात उत्तम अधिकाऱ्यांची संख्या फार कमी असते. त्यांना साधना करावी लागत नाही. इतर साधकांनी श्रीगुरुंना शरण जाऊन स्वतःसाठी कोणते साधन योग्य आहे, ते जाणून घेऊन तसे आचरण करावे. एका वेळेस एकच साधन घ्यायचे असते. दुसऱ्या शहरापर्यंत प्रवास करायचा असेल, तर एक तर विमानाने जा किंवा सायकलने जा. दोन्ही साधने एकाच वेळेस घेता येणार नाहीत. योगमार्ग धरला असेल, परंतु, दररोज देवघरात देव खंगाळतो. काय उपयोग? तुम्ही फसू नये, असे मला वाटते, म्हणून हे सर्व तुम्हांला सांगत आहे. मी एक तास सांगतो. परंतु, दिवसातील बाकीचे तेवीस तास तुम्ही कसे घालवता? यावर विचार करा. फेऱ्यात अडकायचे नाही हे तुम्ही ठरवायचे. मृत्यू हा सतत पाठपुरावा करत आहे, हे लक्षात घ्या. सावध व्हा.

तत्, त्वम्, असि यांचा एकत्रित अभ्यास करून लक्ष्यार्थाचा निर्णय लावत आहोत. कमीत कमी दोन अथवा दोनपेक्षा जास्त पदार्थांची सत्ता एकच असेल, तर त्या सर्व पदार्थांचा आपापसात मुख्य सामानाधिकरण्य संबंध असतो. मुख्य आणि बाध असे दोन प्रकार समानाधिकरणाचे आहेत. मागील चिंतनात मुख्य समानाधिकरण यावर विचार केला.

दोन अथवा जास्त पदार्थांची एक व्यावहारिक सत्ताच असेल किंवा दोन अथवा जास्त पदार्थांची एक प्रातिभासिक सत्ताच असेल किंवा दोन पदार्थांची एक पारमार्थिक सत्ताच असेल तर त्यांच्यामध्ये मुख्य समानाधिकरण असते. घटाकाश व मठाकाश यांचे एक स्वरूप आहे व ते म्हणजे अवकाश. दोघांची एकच व्यावहारिक सत्ता आहे. त्यांच्यामध्ये मुख्य सामानाधिकरण्य संबंध आहे. स्वप्नातील स्त्री, पुरुष हे भासलेले, अनिर्वचनीय, प्रातिभासिक आहेत. स्वप्नातील पदार्थांचा आपापसात मुख्य सामानाधिकारण्य संबंध आहे. कूटस्थ व ब्रह्म यांची पारमार्थिक सत्ता आहे. त्यांच्यामध्ये मुख्य सामान्यधिकरण्य संबंध आहे.

आता, आपण बाध समानाधिकरण म्हणजे काय ते पाहू. दोन पदार्थांची सत्ता वेगवेगळी असेल, तर त्यांच्यामध्ये बाध समानाधिकरण असते व त्या पदार्थांचा बाध सामानाधिकारण्य संबंध असतो. दोन पदार्थांची सत्ता वेगळी असे म्हटले की व्यावहारिक–प्रातिभासिक, व्यावहारिक–पारमार्थिक, प्रातिभासिक–पारमार्थिक अशा तीन जोड्या असू शकतात. **(येथे चिंतन क्रमांक –२५ मधील संदर्भ वाचावा.)**

दोरी आणि त्यावर भासलेला सर्प, हे उदाहरण घेऊ. दोरी ही पंचीकृत

पंचमहाभूतांपासून बनलेली आहे. दोरीची सत्ता व्यावहारिक आहे. सर्प भासण्याच्या आधी तेथे सर्प नव्हता. कंदीलाच्या प्रकाशात दोरी दिसल्यावर सर्प राहणार नाही. मधल्या काळात सर्प भासला. सर्प हा दिसण्यापुरता आहे. या कारणासाठी सर्पाची सत्ता प्रातिभासिक ठरते. दोरी अणि सर्प यांची सत्ता भिन्न आहे. एवढेच नाही, तर दोरी आणि सर्प यांचे कार्यही भिन्न आहे. दोरी आणि सर्प यांचे बाध समानाधिकरण असून, दोरी आणि सर्प यांचा संबंध बाध सामानाधिकरण्य संबंध आहे.

जी दोन पदे भिन्न सत्ता व भिन्न स्वरूप असलेल्या दोन पदार्थांचे ऐक्य दाखवितात, त्यांचे बाध समानाधिकरण असते. ज्या वस्तूचा बाध होऊनच दुसऱ्या वस्तूशी अभेद होतो, त्या वस्तूंचे बाध समानाधिकरण असते. सर्पाचा बाध झाल्यावरच त्याचा दोरीशी अभेद होतो.

मंद अंधकारात दूर अंतरावर लाकडाच्या उभ्या ओंडक्याकडे पाहिले, तर त्या ओंडक्याच्या ठिकाणी एक पुरुष आहे, असा भास होतो. हे स्थाणू पुरुषाचे उदाहरण आहे. स्थाणू म्हणजे लाकडाचा उभा ओंडका. हा ओंडका व्यावहारिक सत्तेतील आहे. त्यावर पुरुषाचा भास होतो. पुरुष हा प्रातिभासिक सत्तेतील आहे. स्थाणू आणि पुरुष यांची सत्ता वेगळी आणि स्वरूपही वेगळे आहे. या दोन पदार्थांचे ऐक्य वाटते. स्थाणू आणि पुरुष यांच्यातील संबंध बाध सामानाधिकरण्य संबंध आहे. पुरुषाचा बाध झाल्यावर, त्याचे स्थाणूशी ऐक्य होते.

मृगजळ जमिनीवर भासते. मृगजळ हे प्रातिभासिक सत्तेतील आहे व जमीन ही व्यावहारिक सत्तेतील आहे. दोन भिन्न सत्तावान पदार्थ ऐक्य दाखवितात. मृगजळ आणि जमीन यांचा संबंध हा बाध सामानाधिकरण्य संबंध आहे. बाध समानाधिकरण म्हणजेच गौण समानाधिकरण. प्रातिभासिक सत्ता आणि पारमार्थिक सत्तेतील, एक एक पदार्थाचे उदाहरण, बाध समानाधिकरणाचे देता येईल काय? जीव आणि ब्रह्म हे उदाहरण देता येते. ब्रह्माला बिंब समजले, तर जीव प्रतिबिंब ठरतो. ब्रह्माची सत्ता कोणती? जीवाची सत्ता कोणती? जीवाची सत्ता प्रातिभासिक आहे. ब्रह्माची सत्ता पारमार्थिक आहे. प्रतिबिंब भासलेले असते. त्यात दोष असतात.

तुमची बायको प्रातिभासिक की व्यावहारिक? बायकोला प्रातिभासिक ठरवा. मग, तिचा दोष कळतो. बायकोला नीट स्वयंपाक करता येत नाही, हा प्रातिभासिक दोष नव्हे, तो व्यवहारातील दोष आहे. जगताचा दोष जोपर्यंत कळत नाही, तोपर्यंत जगत् गोड वाटते. जगत् प्रातिभासिक ठरले, तर ते कडू वाटते. जग पारमार्थिक ठरले, तर गोड वाटत नाही आणि कडूही वाटत नाही.

शेजारी राहणारी मुलगी याला दादा म्हणत होती. तिच्याशीच त्याचे लग्न झाले. त्यानंतर, ती मुलगी त्याला नवरा समजू लागली. भाव बदलला. पूर्वी दादा, आता पती. मुलगा तोच, भाव बदलला. त्याचप्रमाणे, जगताविषयीचा भाव बदलत जातो.

ब्रह्म पारमार्थिक सत्तेतले आहे. जीवाची सत्ता प्रातिभासिक आहे. ज्यात दोष तो

प्रातिभासिक ठरतो. प्रथम तर प्रातिभासिक, म्हणजे दोष कळतच नाही. दोष कळला, तर दोष घालवत बसतो. पूर्वी वाईट वागणूक होती. आता चांगला वागण्याचा प्रयत्न करतो. पूर्वी पँट–शर्ट घालायचा. आता धोतर घालू लागला. टिळा, माळा धारण केल्या, आळंदीला जाऊ लागला, यालाच लोक परमार्थ म्हणतात. प्रातिभासिक पदार्थांचा दोष काढावा का? आरशासमोर उभा राहिला. याचा उजवा हात आरशात डावा दिसू लागला. 'हात सरळ करीन' असा निर्णय त्याने केला, तर हात सरळ होईल का ?

रज्जूवर सर्प भासलेला आहे. खरा नाही. परंतु, 'सर्पाचे दात पाडीन. सर्पाचे विष काढून शोध करीन की विषाच्या एका थेंबामुळे किती माणसे मरतात'. असा निर्णय कोणी घेतला, तर तो वेडेपणा ठरेल.

त्याचप्रमाणे काम, क्रोधादिक हे सूक्ष्मदेहाचे धर्म भासलेले आहेत. त्यांचे उपादान म्हणजे सूक्ष्मदेह हाच मुळात प्रातिभासिक आहे. परमार्थ करणारा मनुष्य त्या धर्मांमध्ये बदल करीत बसतो. ज्या जीवावर सूक्ष्मदेह आणि त्यांचे धर्म आधारलेले आहेत, तो जीव देखील प्रातिभासिकच आहे. परमार्थ करणारे म्हणतात, 'संतांनी तर सांगितले आहे की चांगले व्हा'.

प्रमाण –

मन हे मोगरा अर्पुनी ईश्वरा । पुनरपी संसारा येणे नाही ।।

– श्री संत तुकाराम महाराज हरिपाठ

हीच संतांची गुंडी आहे. संतांकडून हेच घेण्यायोग्य आहे. कोणी परमार्थ करणारा मनुष्य म्हणतो, 'माझे मन वाईट आहे'. मग, भगवान श्रीतुकाराम महाराज सांगतात, 'मन पवित्र कर'. जसा प्रश्न तसे उत्तर. जसा भाव तसा हरि. एखादा मनुष्य भुकेने तळमळतोय आणि कोणी येऊन त्याला म्हटले, 'ब्रह्म म्हणजे काय, याचे निरूपण तुला सांगतो'. तर, तो भुकेला मनुष्य ते ग्रहण करू शकेल काय ?

पुष्कळ साधक वेदांताचे श्रवण करतात आणि इकडे मात्र देह धर्मांमध्ये बदल करीत राहतात. श्रवण करतात पारमार्थिक सत्तेचे, परंतु, प्रातिभासिक सत्तेत बदल करीत राहतात. अशाने वेदांताचा अनुभव येणार नाही. असा साधक कदाचित् वेदांत बोलेल, परंतु, त्याला वेदांत अवगत होणार नाही. वेदांत आचरणात हवा.

वेदांताच्या सिद्धांताप्रमाणे महाराज जर वागले, तर तुम्ही महाराजांना शिव्या द्याल. त्यांच्यावरचा तुमचा विश्वास पूर्णपणे ढासळेल. शुष्कपत्राला ज्याप्रमाणे वारा इकडे–तिकडे फिरवतो, त्याप्रमाणे, प्रारब्ध साधूंच्या देहाला चालवित असते आणि प्रारब्ध हे बरे–वाईट कसेही असू शकते. परंतु, त्यांच्या स्थूल व्यवहाराचे आचरण साधकाने करू नये. दृढ, प्रयत्नपूर्वक दृढ, निःसंदेह, अपरोक्ष अनुभवावर यावे. तुम्हांला ज्ञानमार्गावर चालायचे आहे. शास्त्र, सद्गुरू यांच्या सांगण्याप्रमाणे आचरण केले, तर पुढे जाल.

प्रातिभासिक पदार्थांमध्ये दोष सहजच असतो. दोष निघत नाही. दोष काढताच येत

नाही. पारमार्थिक वस्तूत कोणताही दोष नसतो. मनुष्य गुंतलेला का आहे? व्यावहारिक पदार्थांमध्ये दोष आहे, हे कळत नाही म्हणून. 'पुष्कळ पैसे कमवावेत' असे मनुष्याला का वाटत असते? पैसा प्रातिभासिक आहे हे कळले नाही म्हणून. पैसा, जमीन प्रातिभासिक आहेत, हे केव्हा कळेल? जेव्हा तुम्ही ते साधूला दान कराल तेव्हा कळेल. एका क्षणात कळेल. पोराच्या नावावर केले, तर कळणार नाही. जगत् का सुरू आहे? दोष कळत नाही म्हणून सुरू आहे. सूनेला तिची सासू कदाचित् प्रातिभासिक असेल. परंतु, त्याच सूनेला तिची स्वतःची आई ही व्यावहारिक असते.

कूटस्थ हे बिंब आणि त्याचे प्रतिबिंब म्हणजे जीव. प्रतिबिंबात दोष असतातच. कूटस्थ हे पारमार्थिक सत्तेतले आणि जीव प्रातिभासिक सत्तेतला. सत्ता भिन्न असल्यामुळे कूटस्थ आणि जीव यांच्यामध्ये बाध समानाधिकरण म्हणजे गौण समानाधिकरण आहे. जीवाचा बाध झाल्यावर त्याचा कूटस्थाशी अभेद असा निश्चय होतो. विचार करून चार देहांचा संबंध काढला, तर जीव जीव राहत नाही. आरसा नाही, तर प्रतिबिंब नाही. आरशामुळे प्रतिबिंब. याही पुढची सूक्ष्म गोष्ट म्हणजे बिंबच नसेल, तर प्रतिबिंबाचा प्रश्नच नाही. बिंब हे प्रतिबिंबाला अधिष्ठान आहे. बिंब आणि प्रतिबिंब यांचा गौण सामानाधिकरण्य संबंध आहे.

घटाकाश आणि मठाकाश यांना एक आकाशच अधिष्ठान आहे. त्यांची सत्ता समान आहे. आरशाच्या दृष्टांतात असे नाही. प्रतिबिंब भासलेले आहे. जेव्हा भासते तेव्हा, दोषांसकट भासते. घटाकाश मठाकाश त्यांच्यात दोष नाही. आरशातले दोष प्रतिबिंबात येतात. आरसा मळलेला असेल, तर प्रतिबिंब मलिन दिसते. आरसा अंतर्वक्र, बहिर्वक्र असेल तर प्रतिबिंब वाकडे–तिकडे दिसते. साधारणपणे प्रतिबिंबाचे अधिष्ठान आरसा आहे असे वाटते. परंतु, तसे नाही. ज्याच्याशिवाय आरोपित पदार्थ राहत नाही, त्यास अधिष्ठान असे म्हणतात. बिंब नसेल, तर प्रतिबिंब नाही. बिंब हे प्रतिबिंबाचे मुख्य अधिष्ठान आहे. आरसा हे गौण अधिष्ठान आहे. आरशाच्या ऐवजी पाणी घेतले तरी चालते. कारण पाण्यातही प्रतिबिंब दिसते. या दृष्टांतात एक मुख्य व एक गौण अधिष्ठान आहे. म्हणून, बाध समानाधिकरण म्हणतात. घट–मठ दृष्टांतात दोन्ही पदार्थांत आकाश हे एकच मुख्य अधिष्ठान आहे. म्हणून ते मुख्य समानाधिकरण आहे.

बाध म्हणजे काय? बाध करणे म्हणजे खंडित करणे. पदार्थ खंडित कसा करायचा? पदार्थ असून नसणे म्हणजे बाध. पलीकडल्या घरातील लोक आपल्या ओळखीचे जरी असले, तरी त्यांच्या घरातील व्यवहाराशी आपले घेणेदेणे नसते. ते असूनही नाहीत. त्यांच्याबद्दल आपला बाधनिश्चय असतो. बाध करणे म्हणजे नाश करणे नव्हे. मडक्याला फोडले आणि चुरा केला, तर त्याला मडक्याचा नाश असे म्हणतात. मडके घरात ठेवले, परंतु, त्याच्यात गुंतला नाही, तर त्याला बाध म्हणतात. मडके असून नाही.

काही पदार्थांचा सहज बाध असतो. काही पदार्थांचा प्रयत्नाने बाध करावा लागतो. अमेरिका, मंगळ, प्लुटो इत्यादी ग्रह, उल्का यांचा बाध आपल्या दृष्टीने सहजच आहे. अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष यांच्यासोबत आपण जेवत नाही. बाध करण्याची गरज नाही. सहज बाध

आहे. अप्राप्त पदार्थाचा त्याग सहजच असतो. जे बाधितच आहेत त्यांचा बाध करीत बसावे काय?


मूल जन्माला आले की आई–बाप आणि नातलग त्याला शिकवितात, 'ही तुझी आई, हा तुझा भाऊ'. मुलाच्या दृष्टीने नातलगांचा बाध असतो. परंतु, नातलग मुलाला नात्यागोत्यांची वारंवार जाणीव करून देऊन मुख्य समानाधिकरणाचा निश्चय करून देतात. त्यामुळे, मुलगा नातलगांना खरे समजतो.

आई, बाप, बायको, पोरे, धन, संपत्ती इत्यादी सर्वच जगत् मिथ्या आहे. साधकाने या जगताला बाधित करावे. मिथ्या ठरवावे.

प्रमाण –

धन दारा पुत्र जन। बंधु सोयरे पिशून ।।
सर्व मिथ्या, हे जाणून। शरण रिघा देवासी ।।

– श्री संत नामदेव महाराज गाथा

जगत् दिसते पण नसते. दोरीवर सर्प दिसतो, परंतु, प्रत्यक्षात नसतो. मृगजळाचे तसेच आहे. सूर्यामुळे मृगजळ दिसते. मृगजळ दिसू नये, म्हणून कोणी सूर्याला थांबवण्याचा प्रयत्न केला, तर वेडेपणा ठरेल. देह मिथ्या आहे. परंतु, काही साधक असा हट्ट धरून बसतात की, 'मनाचा नायनाट करीन'.

जगत् हा गंमतीशीर पदार्थ आहे. ते ब्रह्मावर आरोपित आहे. 'माझी बायको, मुले. माझी संपत्ती' असा लोकांचा भाव जाणून हसू येते. त्यांना मिथ्या ठरविण्यासाठी सद्गुरूंची कृपा हवी. नटासारखे राहा. तुमचा मुलगा तुम्हांला बाप समजतो. परंतु, 'तो तसे समजतो. मी नाही. माझा त्याच्याशी संबंध नाही', अशी वृत्ती असावी. बायको असावी की नाही? असली तर असू दे, नसली तर नसू दे. असली नसली तरी फरक पडत नाही. बायको असेल तर असून नाही या प्रकारे राहा. अशी वृत्ती ठेवण्याचा प्रयत्न करा. कारण, बायको आपोमत बाधित होत नाही. अमेरिकेचा बाध सहज आहे. स्वर्ग देखील आपोमत बाधित आहे. परंतु, मनुष्य पुण्य करण्याचा हट्ट धरून स्वर्गप्राप्ती करण्याच्या मागे लागतो. स्वर्ग बाधित असताना, त्याला मुख्य समानाधिकरण करू पाहतो.

आजी मेली. बरे झाले. नाश होऊन बाध झाला. परंतु, हा आजीचा फोटो टांगतो आणि रडत बसतो. समजा, घरातील एखादी व्यक्ती हरवली. 'हरवला रे' असे म्हणून वर्षानुवर्षे शोक करीत बसतो. हरविलेल्या व्यक्तीला शोधावे काय? हरवला तरी शोधायचे नाही. बाधितच होता, हरवला आहे, बरे झाले.

दुकानामध्ये पुष्कळ पदार्थ असतात. दुकानदाराची वृत्ती अशी असते की, 'हे पदार्थ माझे नाहीत. ते विकण्यासाठी ठेवलेले आहेत. पदार्थ जितक्या लवकर खपतील तितके बरे'. दुकानदाराच्या दृष्टीने दुकानातल्या पदार्थांचा बाध असतो. परंतु, एखादा ग्राहक येतो आणि

दुकानातील काही पदार्थ त्याला आवडतात. म्हणजे ते पदार्थ त्याच्यासाठी मुख्य ठरतात. ग्राहक एवढ्यावरच थांबत नाही, 'आमचा दुकानदार' अशी वृत्ती ठेऊन दुकानदारालाही मुख्य ठरवितो!



काही पदार्थांचा तसेच व्यक्तींचा बाध प्रयत्नपूर्वक करावा लागतो. आई, बाप, बायको प्रयत्नाने बाधित करावे लागतात. काही लोक, त्यांच्यासाठी 'पैसा बाधित आहे' असा आव आणतात. 'बँकेत पैसे आहेत, परंतु, नुसते पडलेले आहेत'. नुसते म्हणतो की खरेच तसे आहे? अमेरिकेत कोणी दुसऱ्याला एखादा पदार्थ विकला आणि भारतातल्या मनुष्याने 'माझ्या दृष्टीने त्या पदार्थाचा बाध आहे' असे समजले तर बाधित नसते. समजा, एखाद्याची संपत्ती गेली आणि त्याबद्दल त्याला तीळमात्र काही वाटले नाही, तर मग संपत्ती त्याच्यासाठी बाधित ठरते. 'बायको गेली, काही न वाटणे', तर बाधित. आजी गेली 'ठीक आहे', तर बाधित.

पदार्थाचा बाध झाल्यावर, ज्यावर तो पदार्थ आरोपित होता, तेथे तो पदार्थ जातो. 'बायको ही बायको नाही' असे ठरविले, तर जेथून ती आली ते ती ठरते. म्हणजे, कोणाची तरी मुलगी ठरते. स्त्रीवर बायको, मुलगी हे धर्म आरोपित आहेत. बायको आणि मुलगी यांचे एकच अधिष्ठान म्हणजे स्त्री.

त्याप्रमाणेच, 'जीव हा जीव नाही' असा निश्चय झाल्याबरोबर ब्रह्मनिश्चय होतो. देहाधिष्ठानामुळे जीव ही संज्ञा प्राप्त झाली. मूळात जीव हा ब्रह्मच होता. ब्रह्म हे बिंब जीव या प्रतिबिंबाचे मुख्य अधिष्ठान आहे. अविद्या म्हणजे कारणदेह हे गौण अधिष्ठान आहे. गौण पदार्थांचा बाध करता येतो.

मुखाचा व्यवहार करण्यासाठी आरसा घेतला जातो. उदाहरणार्थ – गंध लावणे. मुखाचे प्रतिबिंब आरशात दिसते. त्या प्रतिबिंबाला कोणी गंध लावत नाही. बिंबाला म्हणजे ग्रिवास्थ मुखालाच गंध लावतो. बिंबाला खरे मानतो. प्रतिबिंब दिसत असते. परंतु, त्याच्याशी व्यवहार करत नाही. प्रतिबिंबाला खोटे समजून बिंबालाच गंध लावतो. म्हणून, प्रतिबिंबाचा बाध ठरतो. येथे बाध समानाधिकरण सहज आहे. बिंब हे प्रतिबिंबाचे अधिष्ठान आहे.

त्याचप्रमाणे, जीवाशी व्यवहार न करता लक्ष केवळ ब्रह्माकडेच हवे. जीव असूनही नाही. व्यवहार ब्रह्माशीच. हेच बाध समानाधिकरण. बाध प्रतिबिंबाचा करायचा असतो. प्रतिबिंबाचा बाध केला, तर ब्रह्मनिश्चय होतो. परंतु, असे दिसून येते की जगातील बहुतेक लोकांच्या दृष्टीने बिंबाचा म्हणजे ब्रह्माच्या बाधाचा निश्चय आहे. त्यामुळे, त्यांना जगत् सत्य वाटते आणि त्यामुळे व्यवहारात गुंतलेले आहेत.

आरशाच्या ठिकाणी चार देह घ्यावे. बिंबाच्या ठिकाणी ब्रह्म व प्रतिबिंबाच्या ठिकाणी जीव समजावा. आरशावर धुळ असली तर प्रतिबिंब मलिन वाटते. परंतु, प्रत्यक्षात मलिन नसते. तर, मग आरसा साफ करीत बसावे का? आरशाला सत्यत्व दिले तर आरसा साफ करीत बसतो. म्हणजे, लक्ष आरशाकडे आणि प्रतिबिंबाकडे आहे. बिंबाकडे लक्ष नाही. येथे तर प्रतिबिंबाचा बाध ठरविण्याचा विषय सुरू आहे. आरशाला सत्य समजले, तर प्रतिबिंब हे सत्य

वाटणारच. आरसा आणि प्रतिबिंब मलिन असले, तरी बिंब सदैव स्वच्छच असते.


चार देहांमुळे जीव आणि जीवत्व आहे. जीवाला सत्यत्व दिले, तर ब्रह्मनिश्चय होणार नाही. जीवाला बाधित केले, तर ब्रह्मनिश्चय होतो. जीव आणि ब्रह्म यांचे बाध समानाधिकरण आहे. कूटस्थ आणि ब्रह्म यांचे मुख्य समानाधिकरण आहे. चार देहांमध्ये बदल करीत गेला, तर ब्रह्मरूप होतो काय? नाही. चार देहांना बाधित करावे. जीव हे प्रतिबिंबित चैतन्य आहे. त्याचा बाध करावा.

रज्जूच्या ठिकाणी सर्प दिसला. सर्पाचा नाश कसा करणार? काठीने? मृगजळाची गंगा पार करण्यासाठी किती मोठी होडी लागेल?

प्रमाण –

एऱ्हवीं दोरीचिया उरगा । डांगा मेळवितां पैं गा ।
तो शिणुचि वाउगा । केला होय ।।२५१।। अध्याय १५
तरावया मृगजळाची गंगा । डोणीलागीं धांवतां दांगा– ।
माजीं वोहळें बुडिजे पैं गा । साच जेवीं ।।२५२।। अध्याय १५

– श्रीज्ञानेश्वरी

समजून घे की सूर्यामुळे मृगजळ भासते. मंद अंधकार या दोषामुळे दोरीच्या ठिकाणी सर्प भासतो. दोष काढ. बिंब सदैव स्वच्छच असते. हे लक्षात घे. चार देह आणि त्यातील प्रतिबिंब मलिन जरी असले, तरी त्याचा किंचित्‌ही परिणाम बिंबावर होत नाही.

अनेक महाराज देह स्वच्छ ठेवण्याच्या बाबतीत दक्ष असतात. त्यांच्या वागण्यात, बोलण्यात सात्त्विकता दिसून येते. लोक अशा महाराजांना मुक्त समजतात. व्यवहारात चार देह मलिन असोत किंवा नसोत, फरक पडत नाही. ब्रह्म हे सदैव स्वच्छच आहे. म्हणून, चार देह बाधित ठरवावीत. पहिले बाध नंतर समानाधिकरण. बाध ठरल्यावर, 'जीव म्हणजेच ब्रह्म' असा निश्चय होतो. 'तत त्वम् असि', 'ते तू आहेस'. ते म्हणजे ब्रह्म आणि तू म्हणजे कूटस्थ. कूटस्थ व ब्रह्म यांमध्ये मुख्य सामानाधिकरण्य संबंध आहे. जीव व ब्रह्म यांमध्ये बाध सामानाधिकरण्य संबंध आहे.

आता, आपण कूटस्थ की जीव? एकदम दिल्ली गाठता येत नाही. मधे काही शहरे लागतात. 'मी ब्राह्मण आहे', असे वाटत असेल, तर प्रयत्नाने बाध करावा लागेल. ती वृत्ती सहजपणे जात नाही. पदार्थांचा नाश करून बाध करावा का? आईला मुलाचा बाध करायचा असेल, तर मुलाचा वध केल्याने, 'माझा मुलगा' हा भ्रम जाणार नाही. 'नाश न करता नाश' म्हणजे बाध. 'दिसत असूनही नाही' म्हणजे बाध. बाध समानाधिकरण करण्यास सुरुवात करा. बायको, पोरे इत्यादी बाह्य पदार्थांचा बाध करीत करीत जीवापर्यंत या. तेव्हा जीवाचा बाध केल्यास आत्मनिश्चय होईल.

*****

॥ ॐ तत् सत् ॥



## चिंतन क्रमांक ५७

## शरीर तसेच आभासांचा व्यतिरेक आणि चैतन्याचा अन्वय

आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या हेतूने करीत आहोत. फेऱ्यात अडकल्यापासून अनंत जन्म झाली. मायाकार्यात अडकल्याने फेऱ्याचा विसर पडला. चक्रातून बाहेर पडायचे सुचत नाही. महावाक्याचा विचार करीत राहिल्यास चक्रातून सुटतो. सर्वसाधारणपणे दुसऱ्यांच्या सांगण्याने किंवा अनुकरण म्हणून मनुष्य परमार्थ करू लागतो. शेजाऱ्याकडे गाडी आहे असे पाहून हा देखील तशी गाडी घेण्याच्या मागे लागतो. कोणी श्रीज्ञानेश्वरी वाचतो, आळंदी–पंढरीची वारी करतो. ते पाहून हा त्याचे अनुकरण करू लागतो. व्यवहारात आणि परमार्थात दुसऱ्यांचे अनुकरण करणे ही मनुष्याची प्रवृत्ती आहे. परंतु, अनुकरण करण्यासाठी स्वतःकडे आवश्यक ते गुणधर्म आहेत की नाही याचा सहसा विचार होत नाही. फेरा जोपर्यंत सुटत नाही तोपर्यंत सावध असावे. 'मी मुक्त आहे' असा निर्णय आपल्या मनाने आपणच करू नये. श्रीगुरुंचे वाक्य, शास्त्र वाक्य यांच्याशी आपली युक्ती तंतोतंत जुळली पाहिजे. तेव्हा जीवन्मुक्तिचा यथार्थ निश्चय होतो.

तत्त्वमसि महावाक्यातील तत् आणि त्वम् पदातील ऐक्यनिश्चयासाठी लक्षणावृत्तीने विचार केला. जहती, अजहती आणि जहताजहती म्हणजे भाग–त्याग लक्षणा अशा तीन लक्षणांचा वापर महावाक्य विचारासाठी केला. जहताजहती लक्षणेने प्रपंचाचा त्याग आणि ब्रह्माचा स्वीकार होतो. केवळ ऐकल्याने मुक्त होत नाही. परमार्थ श्रवण केल्याने कोणाला वाटू लागते की तो मुक्त आहे. परंतु, बाह्य पदार्थांमुळे अस्थिर होतो. काही काळाने स्थिर झाल्यावर परत स्वतःला मुक्त समजू लागतो. ऐकणे, कळणे, पटणे, वठणे आणि अनुभवात येणे या पायऱ्या चढत गेला, तर परमार्थाचा शेवट होतो. तत्–त्वम् पदार्थ शोधन पूर्णत्वास गेले पाहिजे.

संबंधत्रय म्हणजे तीन संबंध. विशेषण–विशेष्यभाव संबंध, लक्ष्य–लक्षणभाव संबंध आणि सामानाधिकरण्यसंबंध असे तीन संबध आहेत. पूर्वी आपण विशेषण–विशेष्यभाव संबंधाने, लक्ष्य–लक्षणभाव संबंधाने तत्त्वमसि महावाक्याचा विचार केला. याच्या अंतर्गत आपण जहती लक्षणा, अजहती लक्षणा आणि जहताजहती लक्षणांचा अभ्यास केला आणि मागील दोन चिंतनात मुख्य सामानाधिकरण्य संबंध व बाध सामानाधिकरण्य संबंधाने तत्त्व निश्चय केला. तेव्हा, व्यावहारिक, प्रातिभासिक व पारमार्थिक सत्ता यांचा विचार केला होता.

आता, आपण तत्त्वमसि महावाक्याचा विचार लोखंड व अग्नी या दृष्टांताच्याद्वारे करणार आहोत.

समष्टी स्थूलदेह, समष्टी सूक्ष्मदेह आणि महाकारणदेह असे तत्चे तीन देह आहेत. ब्रह्मचैतन्य या तीन देहात, लोखंडात अग्नीने प्रवेश करावा, तसे अनुस्यूत होते. तेव्हा या

प्रत्येक देहात आलेल्या चैतन्याभासाला तीन नावे येतात. समष्टी स्थूलदेहावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याला विराट किंवा वैश्वानर म्हणतात. समष्टी सूक्ष्मदेहावर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्याला हिरण्यगर्भ, प्राण किंवा सूत्रात्मा म्हणतात. मायेवर अभिमान ठेवणाऱ्या चैतन्यास ईश्वर किंवा अव्याकृत म्हणतात. स्थूल, सूक्ष्म आणि कारण असे त्वम्‌चे तीन देह आहेत. कूटस्थचैतन्य या तीन देहात, लोखंडात अग्नीने प्रवेश करावा, तसे अनुस्यूत होते.

स्थूलदेहातील चैतन्याच्या आभासाला विश्व, सूक्ष्मदेहातील चैतन्याच्या आभासाला तैजस व कारणदेहातील चैतन्याच्या आभासाला प्राज्ञ असे म्हणतात. हा व्यष्टी पातळीवरील म्हणजे एका जीवाचा विचार झाला.

अशाप्रकारे, दोन्ही ठिकाणी तीन भाग आहेत. चैतन्य, देह व देहात अनुस्यूत चैतन्याभास. लोखंड व अग्नी या दृष्टांतात तीन भाग धरता येतील. अग्नी, लोखंड व अग्नियुक्त लोखंड.

**(येथे चिंतन क्रमांक –२५ मधील तत्त्वमसि महावाक्य निरूपण प्रक्रिया–२ पाहावे.)**

लोहार अग्नीने लोखंड तापवतो. लोखंड लाल होऊ देतो. त्यानंतर, लोहार लोखंडावर घणाने घाव घालतो. त्यामुळे, लोखंड गरजेप्रमाणे वाकडे–तिकडे होते. अग्नीला मात्र धक्का लागत नाही. लोहार लोखंडाला हवे तसे रूप देऊ शकतो. लोखंडाचा गोळा हवा असेल, तर घणाने तप्त लोखंडावर घाव घालून गोळा तयार करतो. पूर्वी लोखंडाचा गोळा होता, त्याची थाळी बनवता येते. त्याला आवश्यकता वाटली तर सळई तयार करतो. लोखंडामधील अग्नीला नाम–रूप नाही. अग्नीने लाल केलेल्या लोखंडाला वेगवेगळा आकार दिला की लोखंडाचा आकार बदलतो. परंतु, अग्नीचा आकार बदलत आहे असे वाटते. पण, अग्नीला काही झाले नाही. नाम–रूप लोखंडाचे बदलले.

अन्वय–व्यतिरेक न्यायाचा आपण उपयोग करू. लोखंड आणि अग्नी यांपैकी कोणाचा अन्वय आणि कोणाचा व्यतिरेक करायचा? लाल झालेल्या लोखंडावर घाव घालताना, लोहाराचे लक्ष अग्नीकडे असते की लोखंडाकडे? त्याचे लक्ष लोखंडाकडे असते. म्हणजे तो लोखंडाचा स्वीकार करतो. लोहार कशाचा व्यतिरेक करतो आणि कशाचा अन्वय करतो? लोहार लोखंडाचा अन्वय करतो आणि अग्नीचा व्यतिरेक करतो. लोखंडाचा गोळा तापवतो तेव्हा आदी, मध्ये, अंती लोखंडाचाच निश्चय त्याचा असतो. त्याला लोखंड आणि अग्नी दोन्ही माहिती असतात. परंतु, त्याला लोखंडाचा विसर पडत नाही. तो स्वीकार लोखंडाचाच करतो, कारण त्याला अग्नीशी घेणेदेणे नसते. त्याला लोखंडावर प्रक्रिया करायची असते.

अनंत वर्षांपूर्वी तीन देह आणि त्यांच्या तीन अभिमानी चैतन्याचे तादात्म्य झाले. आता, देह आणि चैतन्य यांचा विवेकच करता येत नाही. लोहार लोखंडाचा गोळा तापवतो. परंतु, कधीही त्याला अग्नीचा गोळा समजत नाही. हे लोखंड आहे असाच त्याचा विवेक असतो. असा विवेक असताना अग्नीला तो सदैव लोखंडापासून वेगळं समजतो. आज आपल्याला कशाची ओळख आहे? चैतन्य? देह? की देहयुक्त चैतन्य?

दृष्टांतातील लोखंड म्हणजे सिद्धांतात तीन जड देह आणि अग्नी म्हणजे चैतन्य.

सिद्धांतात, आपल्याला चैतन्याशी घेणेदेणे आहे. तीन जड देहांशी नाही. हे बारकाईने लक्षात घ्यावे. आपण मी कशाला समजतो? चैतन्य, अविद्या आणि जीव यांपैकी आपण कशाला मी म्हणजे त्वम् म्हणतो? त्वम् म्हणजे देह की चैतन्य? मिश्रित पदार्थाला त्वम् म्हणतात. चैतन्य आणि अविद्या यांच्या मिश्रणाला जीव म्हणजे वाच्यार्थाने त्वम् म्हणतात. सध्या आपल्याला नक्की काय पाहिजे? त्वम् पाहिजे की देह पाहिजे की चैतन्य पाहिजे? आपले लक्ष चैतन्यावर असावे. देह किंवा मिश्रित पदार्थ 'त्वम्'वर नसावे.

दृष्टांत – लोखंड + अग्नी = अग्नियुक्त लोखंड
सिद्धांत – तीन देह + चैतन्य = चैतन्ययुक्त देह

लोहाराला लोखंडाचा संबंध अग्नीशी करावा लागतो. लोखंड तापवले नाही, तर लोखंडाला वेगवेगळे आकार देता येणार नाहीत. त्याप्रमाणेच, चैतन्य आणि देह वेगळे केले, तर देहाचे कार्य होण्याचा प्रश्नच नाही. चित् आणि जड एकत्रित असेल तर कार्य होते. नुसते चैतन्य किंवा नुसते जड यांमुळे कार्य होऊ शकत नाही.

चैतन्याच्या संबंधाने शरीरांमध्ये जे नाम–रूपात्मक बदल होतात ते चैतन्याचे वाटतात. परंतु, ते तसे अजीबात नाही. चैतन्य अग्नीप्रमाणे असंग आहे. श्रीरामचंद्रांच्या देहाचे विशिष्ट रूप आहे. त्यावर 'राम', 'क्षत्रिय' हे आरोपित धर्म आहेत. तसेच, सृष्टीतील सर्व नाम–रूपे ही देहांची आहेत. चैतन्याला नाम–रूप नाही. अधिक चैतन्याशिवाय देह कार्य होत नाही.

प्रमाण –

**देवा नाहीं रूप देवा नाहीं नांव। देवा नाहीं गाव कोठे कांही।**

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

अग्नीचा अन्वय लोखंडात कसा होतो? अग्नीवर नाम–रूपाचे आरोप होतात. परंतु, नाम–रूपांचा दोष न घेता, अग्नीचा लोखंडात अन्वय असतो. लोखंडात अग्नीचा अन्वय आणि अग्नीत लोखंडाचा व्यतिरेक असतो. तसे, देहातील चैतन्यावर नाम–रूपाचे आरोप होतात. परंतु, नाम–रूपांचा दोष न घेता, चैतन्याचा देहात प्रवेश असतो. 'देहात चैतन्याचा अन्वय आणि चैतन्यात देहाचा व्यतिरेक' हा सिद्धांत आहे. परंतु, जीव अनंत जन्मापासून देहाच्या नाम–रूपांना दृढपणे चैतन्याचे समजत आलेला असल्याकारणाने सिद्धांत निश्चय होत नाही. कितीही वेदांत ऐकला, तरी 'मी ब्राह्मण', 'मी स्त्री', 'मी पुरुष' असेच सर्वजण समजतात. परंतु, हे निघाले पाहिजे. अन्यथा, मनुष्य जन्माचे सार्थक होत नाही.

अन्वय आणि व्यतिरेक दोन्ही करावे. केवळ अन्वय किंवा केवळ व्यतिरेक करायचा नसतो. 'केवळ लोखंड' किंवा 'केवळ अग्नी', असे विचारात घेऊन चालणार नाही. केवळ अग्नी घेतला, तर मग आकार देण्याचा प्रश्न नाही. केवळ लोखंड घेतले, तर आकार देता येणार नाही. चैतन्य, जड यांचा अन्वय–व्यतिरेक जो करेल, त्याला चैतन्य आणि देह यांचा अध्यास लक्षात येतो. ज्याप्रमाणे, लोखंड लालबुंद नसताना, अग्नीमुळे तसे वाटते व अग्नीला नाम–रूप नसताना लोखंडाचा आकार व नाम त्याला मिळाल्यासारखे वाटते. त्याचप्रमाणे, देह सत्‌रूप, चिद्‌रूप, आनंदरूप नसताना चैतन्यामुळे तसे वाटतात व चैतन्य नाम–रूपात्मक नसताना देहांची नाम–रूपे त्यालाच आल्यासारखे वाटते, यालाच 'अन्योन्य–अध्यास' असे म्हणतात.



परंतु, 'मी चैतन्य' हे साधारणपणे कोणाला माहिती नाही. आपण स्वतःला 'मी विश्वाभिमानी', असे तरी समजतो का? स्वतःला 'मी सूक्ष्मदेह' असेही समजत नाही. जीव समजणे ही तर पुढची गोष्ट आहे.

लोखंडाचा गोळा लाल होईपर्यंत तापवला आणि तो एखाद्याला दाखवून विचारले, 'सांग हे काय आहे?' तर तो काय उत्तर देईल? अग्नी, लोखंड की अग्नियुक्त लोखंड? कशाचा अन्वय आणि कशाचा व्यतिरेक हे त्याला कळावे.

जड–चैतन्य यांचा अन्वय–व्यतिरेक करण्याचा अधिकार केव्हा येतो? जोपर्यंत स्वतःला स्त्री, पुरुष, चांगला, वाईट इत्यादी समजतो, तोपर्यंत अधिकार येणार नाही. त्वम् पदावर आलो, तर जड–चैतन्य अन्वय–व्यतिरेक विचार करण्याचा अधिकार येतो.

जीव काही ना काही करीत राहतो. जीवकार्य बदलत राहते. लोहार तप्त लोखंडावर घाव घालून तलवार, कुऱ्हाड, थाळी अशा वेगवेगळ्या आकाराच्या वस्तू तयार करतो. त्याप्रमाणे, जीव अनंत काळापासून कुत्रा, मांजर, डुक्कर, मनुष्य असे विविध आकार घेत राहतो. का? कशासाठी? हे त्याला माहीत नाही. लोहाराचे लक्ष त्याला अपेक्षित असलेल्या लोखंडाच्या रूप आणि नामाकडे असते. परंतु, अपेक्षित नसलेल्या देहांच्या नाम–रूपाकडेच मनुष्याचे लक्ष राहिले, तर त्याला चैतन्य आकळता येणार नाही.

कोण त्वम्‌पदावर आहे? हे कसे ओळखावे? जो साधक चैतन्य आणि देहांचा सारासार विचार करतो, तो त्वम्‌पदावर असतो. ज्याचे लक्ष केवळ स्थूलदेहाकडे आहे, तो त्वम् नाही. त्याला चैतन्य म्हणजे काय हे माहीत नाही. ज्याचे लक्ष सूक्ष्मदेहाकडे आहे, तो देखील त्वम् नाही. सर्वसाधारणपणे मनुष्य कोणत्या देहाचा विचार करतो? स्थूलदेहाचा. पुढे जाऊन काही लोकांचे लक्ष सूक्ष्मदेहाकडे जाते. मन शांत, पवित्र ठेवण्याचा ते प्रयत्न करत असतात. स्थूल, सूक्ष्म, कारण हे देह आणि चैतन्य यांचा जो एकत्रित विचार करतो, तो खरा त्वम् असतो. त्वम् केव्हा? स्थूलदेहामध्ये चैतन्य आहे, असा विचार करतो तो त्वम्. सूक्ष्मदेहात चैतन्य आहे, असा विचार करतो तो त्वम्. कारणदेहात चैतन्य आहे, असा विचार जो करतो तो त्वम्.

'हा चैतन्य चालतो' असे कोणी म्हणताना ऐकले का? लोकांना माहितीच नाही की

चैतन्य म्हणून काही आहे. देह दिसतो, चालतो, बोलतो. लोक देह पाहतात, चैतन्य नाही. देहाला सत्य समजतात. 'चैतन्य नाही' असे पुष्कळ लोक म्हणतात. जे थोडे लोक त्याचा विचार करतात, त्यांचीही बुद्धी कुंठित होऊन जाते.



तत्त्वमसि महावाक्य अन्वय-व्यतिरेक न्यायाने सोडविण्यासाठी प्रथम त्वम् म्हणजे काय ? हे लक्षात घ्या. त्यानंतर कळेल की कशाचा अन्वय आणि कशाचा व्यतिरेक करायचा ? ते त्वम् ठरविण्यासाठी साधकाने सुरुवात कशी करावी ? प्रथम स्थूलदेह आणि चैतन्य यांचा विचार करावा. त्यानंतर, सूक्ष्मदेह आणि चैतन्य. त्यानंतर, कारणदेह आणि चैतन्य यांचा विचार करू लागला की त्वम् ठरतो. चैतन्य आणि अविद्या यांचे मिश्रण म्हणजे त्वम्.

पुढे तत्चाही विचार करायला पाहिजे. याच पद्धतीने तत्चा अभ्यास कसा करायचा ? तत् संबंधी अन्वय-व्यतिरेक कशाचा करायचा ? तत्चे तीन देह अधिक तीन अभिमानी चैतन्य आणि ब्रह्म यांचा एकत्रित अभ्यास करून कशाचा अन्वय आणि कशाचा व्यतिरेक करायचा ? हे कळेल.

इकडे त्वम्चे स्थूलशरीर पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनले आहे, तिकडे तत्चे समष्टी स्थूलशरीरही पंचीकृत पंचमहाभूतापासून बनले आहे. इकडे त्वम्चा सूक्ष्मदेह अंपचीकृत पंचमहाभूतांपासून बनला आहे, तिकडे तत्चा समष्टी सूक्ष्मदेह देखील अपंचीकृत पंचमहाभूतांपासून बनला आहे. तत् आणि त्वम् यांच्यामध्ये एक गोष्ट समान आहे. ती कोणती ? चैतन्य समान आहे. चैतन्याचा अन्वय इकडे, त्याचप्रमाणे तिकडेपण आहे. त्वम्चा स्थूलदेह छोटा, तत्चा मोठा. म्हणून, काय झाले ? असू दे. दोन्हीकडे एकच चैतन्य आहे. लाल तापवलेला लोखंडाचा मोठा गोळा आणि लाल तापवलेला लोखंडाचा छोटा गोळा, दोन्हीमध्ये एक अग्नी समान आहे. तत् व त्वम् पदार्थाचा आकार आणि कार्य वेगळे असले, तरी त्यात एक चैतन्यच आहे. तापविलेल्या लोखंडाच्या गोळ्याला तलवार, कुऱ्हाडीचे पाते, भाला असे विविध आकार देता येतात. त्यांची कार्ये वेगळी जरी असली, तरी त्यांच्यामध्ये एकच अग्नी आहे.

खरेतर, तत् आणि त्वम् एकच आहेत. दोघांचे देह वेगळे दिसतात. परंतु, ते दोघे स्वरूपतः वेगळे असतात असे नाही. घटाकाश मठाकाश दिसतात वेगळे, पण असतात एक. तसे तत्, त्वम् हे एक आहेत.

प्रमाण –

जीवा शिवा भिन्न भेदू नाही । विचारूनी तू पाही हृदयामाजी ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

'तत् त्वम् एकच' असा निश्चय झाला की विषय संपला. 'असि' हे तत्, त्वम् यांचे एकत्व दाखवते. व्यष्टीने चैतन्याचा अन्वय व तीन देहांचा व्यतिरेक आहे. समष्टीनेही चैतन्याचा अन्वय व तीन देहांचा व्यतिरेक आहे. पदार्थांचे आकार आणि कार्य भिन्न जरी

असले, तरी आत एक चैतन्य आहे. पुरुष, भिंत, मोबाईल यांचे आकार आणि कार्य वेगळे, परंतु सर्वांमध्ये एक चैतन्य आहे.



एखादा साधक त्वम्‌वर येऊन थांबला, तर उपयोग नाही. त्वम्‌वर आल्याशिवाय तत्‌चा विचार करण्याचा अधिकार येत नाही. कोणी तत्‌वर जाऊन पोहचला, तरी उपयोग नाही. तीन देहांचा व्यतिरेक आणि चैतन्याच्या अन्वयाचा निश्चय हवा, याला परमार्थ म्हणतात.

पण, हे करणार कसे? मनुष्याची दृष्टी सहसा स्थूलदेहाकडे, स्थूलप्रपंचाकडे असते. दृष्टी देहकार्यावर असते. तो असा विचार करीत बसतो की श्रोत्रेंद्रिय श्रेष्ठ की नेत्रेंद्रिय श्रेष्ठ? मन की बुद्धी श्रेष्ठ? तो कार्यातील भिन्नतेला सत्यत्व दिल्याने अडकलेला आहे. कार्य ज्याच्यामुळे होते, त्यावर दृष्टी नाही. चैतन्याकडे म्हणजे कारणाकडे लक्ष नाही. कारणावरच लक्ष राहिले, तर कार्यात लक्ष राहत नाही. पंखा श्रेष्ठ की ट्युबलाईट श्रेष्ठ? श्रेष्ठ, कनिष्ठ नाही. हिवाळा असेल, तर पंखा कनिष्ठ आणि अंधार असेल, तर ट्यूबलाईट श्रेष्ठ. लोक असा विचार करीत राहतात की त्वम् श्रेष्ठ की तत् श्रेष्ठ? हा त्वम् श्रेष्ठ की तो त्वम् श्रेष्ठ? प्राणी आणि पदार्थ यांच्या कार्याकडे बहुतेक लोकांची दृष्टी असते, म्हणून कर्मबंधन कायम राहते. चांगले–वाईट कर्म करीत, त्याच्यातच गुंतून राहिल्याने बंध कायम राहतो.

महापुरुषांचे वचन आणि शास्त्र यांच्या प्रमाणाने, आपण आपला निर्णय पक्का करावा आणि शांत बसावे. यासाठी काय करावे लागेल? प्रथम जीवावर या. परंतु, शिव होऊ नका. पुढे जीव राहू नका. जीवावर आले, तर परमार्थ पदरात पाडता येईल. 'एक हरि आत्मा जीव शिव सम' या निश्चयावर या. समत्व हाच शेवट. हे समत्व आचरणात असणे, याला परमार्थ म्हणतात.

*****

## चिंतन क्रमांक ५८

## ब्रह्म–तटस्थ व स्वरूप लक्षणांचा अधिक विचार – १

आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या उद्देशाने करीत आहोत. आपल्याला आपल्या जन्माची वेळ ठाऊक आहे. परंतु, मरण्याची वेळ ठाऊक नाही. श्रेष्ठ योगी महापुरुषांना त्यांचा मरणकाळ कळतो. त्यावेळी ते त्यांच्या जीवाला ब्रह्मरंध्रातून बाहेर काढून परलोकी जातात. सर्वसामान्य लोकांचे तसे नसते. मृत्यू केव्हाही येऊ शकतो – बालवयात, तारुण्यात, उतार वयात. ही गोष्ट ज्याच्या पक्की लक्षात राहते, तो परमार्थ करतो. तीर्थयात्रा, देवदर्शन, ब्रह्मरंध्रातून जीव बाहेर नेणे या गोष्टींना परमार्थ समजू नये. ही परमार्थासाठीची पूर्व तयारी आहे. वेदांतशास्त्राप्रमाणे जो महावाक्याचे अनुसंधान सतत करतो, त्याचा परमार्थ खरा. परमार्थाच्या नावाखाली असणारे इतर मार्ग म्हणजे पूर्व साधना होत. शेवट 'तत् त्वम् असि'च आहे.

याठिकाणी बऱ्याच दिवसांपासून आपण तत्त्वमसि महावाक्याचा विचार करीत आहोत. आपण संबंधत्रयाने महावाक्याचा विचार आतापर्यंत केला. सुरुवातीला विशेषण–विशेष्यभाव संबंधाने महावाक्याचा विचार केला. त्यानंतर लक्ष्य–लक्षणभावसंबंधाने आणि पुढे सामानाधिकरण्यसंबंधाने महावाक्याचा लक्ष्यार्थ पाहिला. मागील चिंतनात त्वम्‌चे तीन देह, तीन आभास आणि तत्‌चे तीन देह, तीन आभास यांचा विचार करून, अन्वय कशाचा व व्यतिरेक कशाचा करावा ? ते पाहिले.

लक्ष्य आणि लक्षण या पारिभाषिक शब्दांचे अर्थ माहिती असणे गरजेचे आहे. ज्याचे लक्षण सांगितले जाते, त्याला लक्ष्य म्हणतात. लक्ष्य म्हणजे काय ? लक्ष्य म्हणजे ध्येय. 'गंधवती पृथ्वी' हे उदाहरण घेऊ. येथे पृथ्वी ही लक्ष्य आहे. गंधत्व हे पृथ्वीचे लक्षण आहे. लक्षण म्हणजे काय ? जो धर्म लक्ष्यामध्येच राहतो व लक्ष्याला सोडून दुसरीकडे कोठेही राहत नाही, त्या धर्माला लक्षण म्हणतात. विषयपंचकापैकी एक म्हणजे गंध. गंध हे लक्षण पृथ्वी या लक्ष्याला सोडून अन्यत्र कोठेही राहत नाही. अमूक एक लक्षण, लक्ष्याचे लक्षणच आहे असे केव्हा ठरते ? लक्षण ठरण्यासाठी नियम कोणता ? ज्या धर्मामध्ये अतिव्याप्ती, अव्याप्ती व असंभव हे तीन दोष नसतात, तेच लक्ष्याचे लक्षण ठरते.

तटस्थलक्षण आणि स्वरूपलक्षण असे लक्षणाचे दोन प्रकार आहेत. तटस्थ लक्षण कशाला म्हणायचे ? जे लक्षण लक्ष्याचे स्वरूप नसते, लक्ष्यामध्ये शेवटपर्यंत राहत नाही व लक्ष्याला अन्य पदार्थांपासून वेगळे करून दाखविते, ते तटस्थ लक्षण होय. 'दंडी पुरुष' हे उदाहरण घेऊ. पुरुष या लक्ष्याचे 'दंड' हे लक्षण आहे. दंड हा पुरुषाला इतर दंडरहित पुरुषांपासून वेगळे करून दाखवतो. म्हणून, दंड हे पुरुषाचे तटस्थ लक्षण आहे. लक्ष्याचा बोध होईपर्यंतच तटस्थलक्षणाचा उपयोग असतो. लक्ष्य कळल्यावर, मग तटस्थलक्षणाचा

उपयोग राहत नाही. लक्ष्य कळेपर्यंत तटस्थ लक्षण लक्ष्यात राहिले की पुरे.


स्वरूप लक्षण म्हणजे काय ? जे लक्षण लक्ष्याचे स्वरूपच असते, लक्ष्यामध्ये नेहमी असते आणि लक्ष्याला इतर सर्व पदार्थांपासून वेगळे दाखविते, त्याला 'स्वरूपलक्षण' म्हणतात. 'गालावर तीळ असलेला मनुष्य' हे उदाहरण घेऊ. 'तीळ' हा मनुष्याशी एकरूप आहे. तो त्याचे स्वरूप आहे. तीळ हे लक्षण मनुष्य या लक्ष्यात नेहमी असते. तीळ हे लक्षण, तीळवान मनुष्याला, गालावर तीळ नसलेल्या इतर पुरुषांपेक्षा वेगळे दाखविते. म्हणून, तीळ हे त्या पुरुषाचे स्वरूपलक्षण ठरते. लक्ष्याचे ज्ञान झाल्यानंतरही स्वरूपलक्षण लक्ष्यात राहते.

'सत्, चित्, आनंद' ही ब्रह्माची स्वरूपलक्षणे का आहेत ? याचा निर्णय आपल्याला लावायचा आहे. लक्ष्याचे लक्षण ठरण्यासाठी त्या लक्षणामध्ये तीन दोष नसावेत. अतिव्याप्ती, अव्याप्ती आणि असंभव हे तीन दोष ज्यात नाहीत ते 'लक्षण' ठरते. 'सत्' या लक्षणात ते तीन दोष नसतील, तर सत् हे ब्रह्माचे लक्षण ठरेल. तसेच, चित् आणि आनंद यासंबंधी निर्णय लागला, तर चित् आणि आनंद ही ब्रह्माची लक्षणे ठरतील.

सोप्या पद्धतीने सांगायचे तर 'लक्ष्य' म्हणजे जे प्राप्त करायचे आहे ते. 'लक्षण' म्हणजे ज्याच्या सहाय्याने लक्ष्य प्राप्त करायचे ते. लक्ष्य आणि लक्षण यात संबंध असतो. या चिंतनात ज्या व्याख्या आपण पाहिल्या, त्या तत्त्वमसि महावाक्याला वापरायच्या आहेत.

आपले 'लक्ष्य' काय आहे? सध्या घरदार चालविणे हे आपले लक्ष्य आहे. त्यासाठी, असंख्य लक्षणांचा उपयोग आपण सतत करतो. म्हणून, सध्या संसाराची लक्षणे ही आपली स्वरूपलक्षणे झालेली दिसतात. परंतु, शास्त्र आणि सद्गुरुंचा असा बोध नाही.

सर्वप्रथम 'त्वम्' हे आपले लक्ष्य पाहिजे. त्वम् म्हणजे जीव. त्याची लक्षणे शोधली पाहिजेत. कर्ता, भोक्ता, सुखी, दु:खी या लक्षणांवरून त्वम्ची ओळख होते का ? नाही. सूक्ष्म आणि स्थूलदेहांच्या धर्मामुळे 'जीवपणा' आहे. 'जीव' नाही.

'जी साडी नेसून असते ती स्त्री' असे स्त्रीचे लक्षण केले, तर ते योग्य ठरेल का ? नाही. कारण, काही स्त्रिया सलवार-कुरता वापरतात, काहीजणी पँट-शर्ट घालतात. सारांश, साडीवरून स्त्री ठरत नाही. आता, अजून एक उदाहरण पाहा. यात 'ब्राह्मण मनुष्य' हे लक्ष्य घेऊ. त्याची लक्षणे कोणती? ब्राह्मण कुटुंबात जन्मला म्हणून ब्राह्मण. श्रीमद्भगवद्गीतेत सांगितलेली नऊ दैवी संपत्ती आहे म्हणून ब्राह्मण. आठव्या वर्षी मुंज झाली म्हणून ब्राह्मण. अशी लक्षणे जर आपण केली, तर याचा अर्थ की आपली तटस्थलक्षणांकडेच दृष्टी आहे. ब्राह्मणाचे स्वरूपलक्षण काय ? **'ब्रह्म जानाति इति ब्राह्मण:।'** जे ब्रह्मस्वरूपात प्रतिष्ठित आहेत, त्यांना ब्राह्मण म्हणावे.

महाराजांना 'महाराज' का म्हणायचे? धोतर, शर्ट, उपरणे, माळ इत्यादी धारण केले म्हणून महाराज का ? शक्यतो आपल्या दृष्टीने तीच महाराजांची स्वरूपलक्षणे असतात. वास्तविक पाहता ती तटस्थलक्षणे आहेत. मनुष्याचे लक्ष तटस्थलक्षणांकडे सहजच जाते. समजा, येथे मी जीन्स-पँट, टीशर्ट आणि गॉगल घालून बसलो आणि कोणी नवखा मनुष्य येथे आला, तर त्याची प्रतिक्रिया काय राहिल? 'अरेरे! चुकलो. मी भलत्याच ठिकाणी

आलो' असे तो सहजच समजतात. सर्वसाधारण मनुष्य तटस्थ लक्षणांना स्वरूपलक्षणे समजून बसतो. बहुसंख्य महाराजही तसेच समजतात.



तसे पाहता तटस्थलक्षणांचा आधार घेऊन, स्वरूपलक्षणांकडे जायचे असते. परंतु, कोणी तटस्थलक्षणांनांच महत्त्व देऊ लागला तर? महाराजांची स्वरूपलक्षणे कोणती? ज्यांच्याकडे 'महाराज्य' आहे ते महाराज. 'चराचर सृष्टीचे जे अधिष्ठान' ते महाराज. तटस्थलक्षणातच अडकून कोणी राहिला, तर फसगत होते. उदाहरणार्थ – 'शरीरावर एकही कपडा न ठेवणारा साधू हा सिद्ध असतो' असे जर कोणी मानत असेल, तर तो तटस्थलक्षणांना महत्त्व देतो. म्हणून, त्याची फसगत होते.

आपल्याला त्वम्च्या लक्ष्यार्थाचा निश्चय करायचा आहे. प्रथम त्वम्च्या तटस्थलक्षणांचा आधार घेत घेत शोधावे लागेल आणि स्वरूपलक्षणांपार्यंत पोहचले की त्वम्च्या लक्ष्यार्थाचा निश्चय होतो. केवळ तटस्थलक्षणांवर अडकून राहिले, तर त्वम्चा वाच्यार्थच हाती लागेल.

वाच्यार्थ कशाला म्हणावे? जो शब्द ऐकताच त्याचा जो अर्थ सहजच मनात येतो, त्याला त्या शब्दाचा वाच्यार्थ असे म्हणतात. समजा, श्रीमद्भगवद्गीतेचा एक श्लोक दहा माणसांनी वाचला, तर प्रत्येकाच्या मनात त्या श्लोकाचा वेगवेगळा अर्थ निर्माण होईल. एका शब्दाचे अनेक वाच्यार्थ लागतात. त्यामुळे संभ्रम निर्माण होतो.

लक्ष्यार्थ कशाला म्हणायचे? ज्या शब्दाचा वेगवेगळा अर्थ निघत राहतो, तो वाच्यार्थात येतो. ज्या शब्दाचा वाच्यार्थ संभवत नाही, तो शब्द लक्षणावृत्तीने जाणण्यास योग्य असतो. उदाहरणार्थ – 'गंगेवर गौळवाडा आहे'. याचा सरळ अर्थ म्हणजे गंगा नदीच्या प्रवाहावर गवळ्याचा वाडा आहे. परंतु, हा असंभवनीय अर्थ आहे. म्हणून, हा वाच्यार्थ आहे. त्यातून अनेक अर्थ निघू शकतात. तटस्थलक्षणांवरून योग्य अर्थ लागत नाही. म्हणून, गंगा नदीच्या तीरावर गवळ्याचा वाडा आहे, असा लक्ष्यार्थ निश्चय करावा लागतो.

वेदांतशास्त्रातील कोण्या वाक्याचा एकच लक्ष्यार्थ असतो आणि तो लक्ष्यार्थ परंपरेने केवळ श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ महापुरुषांना अवगत असतो, इतर लोकांना नसतो. म्हणून, शास्त्रार्थ कळून घेण्यासाठी त्यांना शरण राहावे लागते.

तर मग, त्वम्चा लक्ष्यार्थ कसा शोधायचा? तटस्थलक्षणांचा शोध घेत घेत एके ठिकाणी शोध संपतो. तेव्हा स्वरूपलक्षणे कळतात. 'मी कर्ता–भोक्ता', 'मी सुखी दुःखी', 'मी अज्ञानी' हे सर्व त्वम्ची तटस्थलक्षणे आहेत. ते सर्व वाच्यार्थ आहेत. त्वम्चा लक्ष्यार्थ काय? **'जीवो ब्रह्मैव नापरः'** जीव हा ब्रह्मच आहे, हा त्वम्चा लक्ष्यार्थ आहे.

पुढे तत् पदार्थ आहे. तत्ची तटस्थलक्षणे कोणती? सर्वज्ञ, अकर्ता, अभोक्ता, निष्प्रपंच इत्यादी. यांचा शोध घेत घेत स्वरूपलक्षणांपर्यंत पोहचता येते. तत्चा लक्ष्यार्थ ब्रह्मच आहे. **'योगक्षेमं वहाम्यहम्!'** ही ईश्वराची प्रतिज्ञा, तत्चे तटस्थलक्षण की स्वरूप लक्षण? ते तत्चे तटस्थलक्षण आहे. जगताची 'उत्पत्ती, स्थिती, प्रलय' ही तत्ची तटस्थ लक्षणे आहेत.

सत्, चित्, आनंद ही ब्रह्माची स्वरूपलक्षणे आहेत. 'सच्चिदानंद' ही एकमेव ब्रह्माचीच लक्षणे ठरतात. अतिव्याप्ती, अव्याप्ती आणि असंभव हे तीन दोष सत्, चित्, आनंद या लक्षणामध्ये नाहीत, म्हणून त्यांचा ब्रह्माची स्वरूपलक्षणे म्हणून स्वीकार करता येतो.

अतिव्याप्ती म्हणजे काय? लक्ष्यामध्ये राहत असून, अलक्ष्यामध्येही राहणारे जे लक्षण ते अतिव्याप्त असते. 'जिला शिंगे असतात तिला गाय म्हणतात' हे वाक्य विचार करण्यासाठी घेऊ. येथे गाय लक्ष्य असून, शिंग असणे हे लक्षण आहे. परंतु, बकरा, रेडा, म्हैस यांनाही शिंगे असतात. या उदाहरणात बकरा, रेडा, म्हैस हे अलक्ष्य आहेत. अलक्ष्यामध्ये देखील शिंग असल्यामुळे हे लक्षण अतिव्याप्त होते. म्हणून, शिंग असणे या गायीच्या लक्षणांवर अतिव्याप्ती दोष येतो.

अव्याप्ती दोष कशाला म्हणायचे? जेव्हा लक्षण लक्ष्याच्या काही भागात असते व बाकीच्या भागात नसते, तेव्हा त्या लक्षणावर अव्याप्ती दोष येतो. 'अंगावर तीळ असलेला तोच मनुष्य' हे उदाहरण घेऊ. या ठिकाणी मनुष्य हे लक्ष्य आहे आणि अंगावर तीळ हे लक्षण आहे. अंगावर तीळ म्हटले की नक्की कुठे? असा प्रश्न येतो. एखाद्या मनुष्याच्या गालावर तीळ असतो. परंतु, इतर अवयवांवर कुठेही तीळ नसतो. आता, 'अंगावर तीळ' लक्षण आहे. परंतु, तीळ तर केवळ गालावरच आहे. म्हणजे, लक्ष्य जो पुरुष त्याच्या काही भागावर आहे, इतर भागावर नाही. म्हणून 'अंगावर तीळ' या लक्षणात अव्याप्ती दोष येतो.

तिसरा दोष म्हणजे असंभव. असंभव म्हणजे शक्यच नाही. उदाहरणार्थ – 'शिंगे असलेला ससा'. सशाला शिंगे असूच शकत नाहीत. म्हणून, 'शिंगे असलेला ससा' या लक्षणावर असंभव हा दोष येतो.

ज्या लक्षणात अतिव्याप्ती, अव्याप्ती आणि असंभव हे तीन दोष नसतात, तेच खऱ्या अर्थाने लक्षण ठरते. त्यानुसार, 'सत्' हे ब्रह्माचे लक्षण आहे काय? येथे ब्रह्म हे लक्ष्य आहे. एकमेव ब्रह्म हेच सत् आहे. इतर पदार्थ सत् नाहीत. इतर कोणताही पदार्थ सत् नसल्यामुळे त्यावर अतिव्याप्ती हा दोष येत नाही. ब्रह्माचा काही अंश सत् व उर्वरित सत् नाही असे नाही. म्हणजे सत् हे लक्षण काही भागावरच आहे असे नाही. म्हणून, ब्रह्म या लक्ष्याच्या 'सत्' या लक्षणावर अव्याप्ती दोष येत नाही. केवळ ब्रह्मच आहे, जगत् नाही या कारणामुळे ब्रह्माच्या अस्तित्वावर असंभव हा दोष येत नाही. या सर्व कारणांमुळे सत् हे ब्रह्माचेच लक्षण ठरते.

आता, चित् हे ब्रह्माचे लक्षण कसे ठरते हे बघू. चित् म्हणजे जाणणे. एकमेव ब्रह्मामुळेच जाणणे होते. त्यामुळे, चित् या लक्षणावर अतिव्याप्ती दोष येत नाही. ब्रह्माचा काही अंश चित् आणि काही भाग जड असे नसते. या कारणासाठी चित् या लक्षणावर अव्याप्ती दोष येत नाही. उलट, देहाच्याबाबतीत काही जड काही चेतन असे वाटते. नख, केस कात्रीने कापले, तर दुखत नाहीत, म्हणून जड वाटतात आणि हात–पाय हे अवयव चेतन वाटतात. चित् या लक्षणावर असंभव हा दोष येत नाही. या कारणांमुळे चित् हे ब्रह्माचेच लक्षण ठरते.

ब्रह्माव्यतिरिक्त अन्य काहीच आनंदरूप नाही. ब्रह्म हे काही भागानेच आनंदरूप आहे असे नाही. आनंद या लक्षणावर असंभव हा दोषही येत नाही. म्हणून, आनंद हे ब्रह्माचेच लक्षण ठरते.

शास्त्रांनी हेच सांगितले आहे व संतांचा बोध देखील तोच आहे. ही आपल्यासाठी सध्या फक्त माहिती आहे. यावर आपल्याला शोध घ्यावा लागेल आणि ब्रह्माची लक्षणे दृढ आणि निःसंदेहपणे जाणावी लागतील. ही अनुभवाची गोष्ट आहे. जेव्हा आपल्याला 'सत् चित् आनंद' ही लक्षणे सापडतील, तेव्हाच त्यात तीन दोष नाहीत हे कळेल. लक्षणे दोषरहित ठरली, तर लक्ष्यार्थ सापडतो. श्रुतीमाता ब्रह्माची स्वरूप लक्षणे अशी सांगते 'सत्य, ज्ञान, अनंत – ब्रह्म'.

प्रमाण –

सत्य ज्ञानानन्त गगनाचे प्रावर्ण । नाही रूप वर्ण गुण जेथे ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

ज्या ठिकाणी गुण, रूप, वर्ण आहेत, त्या ठिकाणी अतिव्याप्ती, अव्याप्ती आणि असंभव या तीन दोषांपैकी एक दोष, दोन दोष अथवा तिन्हीदोष येतात. ब्रह्माशी गुण, रूप, वर्ण यांचा तीळमात्र संबंध नसल्यामुळे सत्, चित्, आनंद ही ब्रह्माची लक्षणे ठरतात. काही साधकांना सरळच सत्, चित्, आनंद या स्वरूपलक्षणांचा विचार करणे जमत नाही. म्हणून, त्यांनी तटस्थलक्षणांपासून सुरुवात केली तरी चालेल.

*****

## चिंतन क्रमांक ५९
## ब्रह्म–तटस्थ व स्वरूप लक्षणांचा अधिक विचार – २

आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाचा फेरा चुकविण्याच्या उद्देशाने करीत आहोत. मागील चिंतनात आपण सत्, चित्, आनंद ही ब्रह्माची लक्षणे ठरतात हे पहिले. सर्वांना सत्, चित्, आनंद या स्वरूपलक्षणांचा विचार करणे शक्य होईल असे नाही. म्हणून, त्यांनी तटस्थलक्षणांपासून सुरूवात करावी.

समजा, बाणेरमध्ये एका व्यक्तीचा शोध घ्यायचा आहे. आता त्याची लक्षणे सांगणे आवश्यक आहे. तरच, त्याला शोधता येईल. म्हणून, 'पायजामा घातलेला बाणेर रहिवासी' असे लक्षण प्रथम केले, तर काय होईल? पायजामा घातलेले शंभर लोक गोळा होतील. म्हणजे, येथे अतिव्याप्ती दोष आला. हरकत नाही. त्या माणसाची आणखी काही लक्षणे सांगायची आणि शोध घ्यायचा. हळुहळू दोष कमी कमी होत जातील. शेवटी त्या मनुष्याची स्वरूपलक्षणे कळून लक्ष्य सापडेल. म्हणजे, तो मनुष्य सापडेल.

जे लक्षण लक्ष्यामध्ये शेवटपर्यंत राहत नाही, त्याला तटस्थलक्षण म्हणतात. लक्ष्य कळेपर्यंत तटस्थ लक्षण लक्षात राहिले की पुरे. जे लक्षण लक्ष्यात नेहमी असते व लक्ष्याचे ज्ञान झाल्यावरही लक्ष्यात राहते, त्याला स्वरूपलक्षण म्हणतात. ज्या लक्षणात दोष सापडतो ते लक्षण तटस्थलक्षणात टाकायचे. संत, महात्मे सांगतात, पंढरीला जाऊन विठोबा पाहा. जेथे नाम, रूप ते तटस्थलक्षण असते. विठोबाच्या मूर्तिला रूप आणि नाम असल्यामुळे, ती मूर्ति तटस्थलक्षण आहे. पुढे असे कळले पाहिजे की विठ्ठल हे सच्चिदानंदस्वरूप ब्रह्मच आहे.

उपवर मुलीचा फोटो तरुण लग्नायोग्य मुलाला दाखवितात. मुलगा फोटोला हार घालीत नाही. फोटोशी लग्न लावीत नाही. किती दिवस आपण विठोबाला प्रतिमेपर्यंतच मर्यादित समजणार? किती दिवस आपण तटस्थलक्षणांमध्येच अडकून राहणार? असे चालेल का? लक्ष्य तर दूरच आहे. सत् हे केवळ ब्रह्माचे स्वरूपलक्षण आहे. 'हा मनुष्य सत्य बोलतो' अथवा 'ही स्त्री सत्य आहे', ही वाक्ये चुकीची आहेत. सत् हे केवळ ब्रह्माचे स्वरूप लक्षण आहे. त्या लक्षणांत तीन दोष नाहीत. ते लक्षण ब्रह्ममध्ये नेहमी असते. एखादी स्त्री ब्रह्मरूप झाली असेल, तर ती स्त्री ज्ञानी, असे म्हणण्याची गरज नाही. केवळ ब्रह्मच सत्‌रूप, चिद्‌रूप, आनंदरूप आहे. बाकी कोणीही नाही.

ब्रह्मावर सर्व प्रपंच आरोपित आहे. जे चालताना दिसते ते खरे की खोटे? विषय सत्य आहेत की नाही? संसार सत्य आहे का? परमार्थ करणेच जेथे भ्रम ठरतो, तेथे संसार करणे भ्रम ठरणार नाही का? आणि लोक तुम्हांला शिकवित राहतात, 'संसार चांगला करा'. त्यामुळे हा विचार करतो, 'नातेवाईकांकडे लाखो रुपये आहेत, मी करोडो रुपये कमवीन'.

‘एक एकर जमीन आहे, वाढवून दहा एकर करीन.’ महाराज विचार करतात, ‘मी दहा गावात जाऊन कीर्तन करीन’.



आता, तुम्ही विचाराल की चिंतनांमध्ये ‘मी महाराजांचे उदाहरणं का देतो?’. कदाचित् श्रोत्यांपैकी जर कोणी एक महाराज झाला, तर तो कोणत्या ठिकाणी फसू शकतो हे मी दृष्टांत देऊन सांगत असतो. संभाव्य चुका कळल्या, तर महाराज सावध होईल. या कारणासाठी महाराजांचे उदाहरण देतो. महाराजांचा अपमान करावा, द्वेष करावा असा उद्देश मुळीच नसतो.

तटस्थलक्षणांचा अभ्यास करीत करीत स्वरूपलक्षणांपर्यंत प्रगती करावी आणि तेथून स्वरूप गाठावे. असा क्रम लक्षात घेऊन अवतार महापुरुषांनी विठ्ठलमूर्ति, नाम, जप इत्यादी तटस्थलक्षणांना मान्यता दिलेली आढळते. परंतु, तटस्थलक्षणांमध्येच रममाण होऊ नये. प्रतिकोपासनेवरून अहंग्रहोपासनेपर्यंत प्रगती केली पाहिजे. पुढे, अहंग्रहोपासनेत अडकून राहू नये. स्व–स्वरूपाचा निश्चय होऊन उपासनाही संपावी. सर्व साधनातीत व्हावे.

एक दृष्टांत पहा. हरिश्चंद्र कळमकर बाणेरमध्ये राहतात. एका नवख्या व्यक्तीला त्यांच्या घराचा पत्ता ‘महाराष्ट्र’ एवढाच सांगितला. पुढचे काहीच सांगितले नाही. आता समजा ती व्यक्ती त्यांचा शोध घेऊ लागली. महाराष्ट्रातल्या एकूण एक जिल्ह्यामध्ये तपास केला. एकूण एक शहरात, एकूण एक तालुक्यात तपास केला. तर, खूप कष्ट झाले. शेवटी बाणेर येथे बालेवाडी फाट्याजवळ विंडसर रेसिडेंसी नावाच्या इमारतीमध्ये कळमकर सापडले. त्या व्यक्तीचे अनेक दिवस विनाकारण वाया गेले. विनाकारण खूप त्रास झाला.

त्याप्रमाणे, तटस्थलक्षणांवरून स्वरूपलक्षणांकडे जाणे हे अत्यंत कष्टदायक आहे. त्यासाठी वेळही भरपूर लागते. कळमकरांच्या घराची स्वरूपलक्षणे त्या व्यक्तीला सुरुवातीलाच सांगण्यात आली असती, म्हणजे त्याला योग्य पत्ता दिला असता, तर त्याला कळमकरांचे घर लगेच सापडले असते.

शास्त्र आणि संत भगवंताचे वर्णन कसे करतात? ‘भगवंत गुणवान, रूपवान आहे, तो षडैश्वर्य संपन्न आहे’. पंढरपुरचा विठोबा ‘काळा, कमरेवर हात, पितांबर नेसलेला, मुकुट घातलेला’ त्याला संत देव असे म्हणतात.

प्रमाण –

**सुंदर तें ध्यान उभे विटेवरी। कर कटावरी ठेवूनिंया।।**
**तुळशीहार गळां कासे पितांबर। आवडे निरंतर हेंचि ध्यान।।**

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

संतांनी कोणती लक्षणे सांगितली? विष्णू सहस्त्रनामामध्ये हजार नावे सांगितली आहेत. संतांनी अशाप्रकारची तटस्थलक्षणे सांगितली आहेत, तेथून स्वरूपलक्षणांवर जायचे असते. परंतु, साधक अनेक जन्म तटस्थलक्षणांमध्ये अडकून राहतो. संतानी फक्त

तटस्थलक्षणेच सांगितली असे नसून, त्यांनी स्वरूपलक्षणेही सांगितली आहेत.


प्रमाण –

सत्य तू सत्य तू सत्य तू विठ्ठला ।
का गा हा दाविलां जगदाकार ।।

– श्री संत तुकाराम महाराज गाथा

सत्‌रूप, ज्ञानरूप, आनंदरूप ही लक्षणे शोधली पाहिजेत. तेच ब्रह्म. ब्रह्म म्हणजेच 'असि'. त्वम्‌चा लक्ष्यार्थ असि आहे. तत्‌चा लक्ष्यार्थही असि आहे. असे जुळविले की तत्–त्वम् एकत्व निश्चय होतो.

व्यवहारात दोन माणसे 'एक'च असू शकत नाहीत, कारण त्यांची लक्षणे भिन्न सतात. समुद्राच्या पाण्यावर मोठी लाट आणि छोटी लाट असते. आपले लक्ष लाटांकडे असेल, तर लाटा या पाण्याचे तटस्थलक्षण ठरतात. पाण्याकडून पाहिले, तर लाटा स्वरूप लक्षण ठरतात. सोन्याच्या अलंकारांकडे कुठून पाहतो ? सोने पाहतो की अलंकार पाहतो ? अलंकारदृष्टी असेल, तर तटस्थलक्षणाकडेच लक्ष आहे, असे ठरते. एकत्व सिद्ध होत नाही. सुवर्णदृष्टी असेल, तर अलंकारात सर्वत्र एकच सोनं आहे. म्हणजे, स्वरूप लक्षणाकडे दृष्टी आहे. म्हणून, एकत्व निश्चय होतो.

तत् आणि त्वम् यांच्या तटस्थलक्षणांचा विचार पूर्णत्वास गेल्यावर जो वाच्यार्थ लागतो तो, 'ईश्वर जीव आहे' किंवा 'जीव ईश्वर आहे' असा लागतो. हा असंभवनीय वाच्यार्थ आहे. जेव्हा वाच्यार्थ असंभवनीय असतो, तेव्हा स्वरूपलक्षणांचा विचार करावा लागतो. तेव्हा एकत्व साधते. या कारणांसाठी स्वरूपलक्षणांचा विचार करावा.

एक मनुष्य अमेरिकेत राहतो. बाणेर येथे विंडसर रेसिडेंसीमध्ये राहणाऱ्या हरिश्चंद्र कळमकर ह्यांची भेट तो अमेरिकेत राहणारा मनुष्य घेऊ इच्छितो. त्याला कळमकरांच्या घराचा सविस्तर पत्ता देण्यात येतो. त्या आधारे तो मनुष्य अमेरिकेतून भारतात, महाराष्ट्रात, पुणे शहरात येऊन, बाणेर येथे कळमकरांना भेटतो. हा व्यवहार योग्य ठरतो.

परंतु, एखादी व्यक्ती विंडसर रेसिडेंसी, बाणेर येथेच राहते आणि त्या व्यक्तीला, समजा, हरिश्चंद्र कळमकरांना भेटायचे आहे, ती व्यक्ती विंडसर रेसिडेंसीमधून बाहेर निघाली. महाराष्ट्रामध्ये सर्व जिल्ह्यांमध्ये कळमकरांचा शोध घेतला. पूर्ण भारत देश फिरली आणि शेवटी विंडसर रेसिडेंसी, बाणेर येथेच त्याला कळमकर भेटले. 'अरे! सापडले. मला किती त्रास झाला' अशी ती व्यक्ती म्हणते. हा व्यवहार वेडेपणाचा ठरतो.

त्याप्रमाणे, मनुष्य स्वतः ब्रह्मरूप असतानाही, तसा निर्णय लावण्यासाठी व्यवहार व पुढे परमार्थात प्रचंड धावपळ करतो.

प्रमाण –

जगत्र धावताहे सैरा म्हणोनि धावसी । थोर कष्टलासी वायावीण ।।

– श्री संत ज्ञानदेव महाराज गाथा

'बारा वर्षांपासून मी तपस्या करतोय', असे एखादा म्हणतो. तुम्ही वेदांतशास्त्राचे श्रवण किती वर्षांपासून करीत आहात? शोधायला तुम्हांला पुष्कळ वेळ लागत आहे. का? तुम्ही सगळीकडे शोधत आहात. परंतु, तत्त्व कुठे आहे तेच कळत नाही. स्वतःच्याच शोधासाठी, स्वतःकडे लक्ष न देता बाहेर कुठेतरी आहे, असे समजून अनेक ठिकाणी फिरून येण्यासारखे हे आहे.

कळकमरांचा सविस्तर पत्ता अमेरिकेतल्या मनुष्याला दिला, तर शोध घेत घेत तो कळमकरांना भेटतोच. त्याप्रमाणे, जे साधक सरळ स्वरूपलक्षणांचा विचार करू शकत नाहीत, त्यांनी प्रथम तटस्थलक्षण जाणून घ्यावीत. पुढे, त्या साधकाला सद्गुरू स्वरूप लक्षणे सांगून ऐक्य साध्य करून देतात.

प्रमाण –

मनुष्य देहाचेनि ज्ञाने । सच्चिदानंद पदवी घेणे ।

एवढा अधिकार नारायणे । कृपावलोकने दिधला ।।३३०।। अध्याय ९

– श्री संत एकनाथ महाराज भागवत

मनुष्य देहाचे ज्ञान प्राप्त करा. 'सच्चिदानंद' ही पदवी घ्या. असा अधिकार फक्त मनुष्याला आहे. राम देशपांडे ही पदवी घेऊनच राहू नका. त्याच्या पुढे जाण्याचा प्रयत्न करा. आता, जे साधक सच्चिदानंद पद प्राप्ती करण्याच्या मार्गात असतात, त्यांना संसारी लोक 'हा नालायक आहे' असे म्हणतात. कोणी नालायक म्हटले, म्हणून आपण नालायक ठरतो का?

सभोवतालचे लोक आपल्याला स्थूल–सूक्ष्मदेहाच्या धर्मांची आठवण करून देत असतात. ते धर्म आपलेच आहेत असे सर्वजण आपल्याला शिकवितात. आपण प्रयत्नपूर्वक स्थूल–सूक्ष्मदेह धर्मांचा त्याग करावा. 'तू राम, प्रेमळ, क्रोधिष्ट इत्यादी आहेस' असे जरी आपण शिकलो असलो, तरी या गोष्टींना सत्यत्व देऊन, आपण जगत राहिलो, तर आपण मुक्त होऊ शकत नाही.

तटस्थलक्षणांचा विचार करून स्वरूपलक्षणांवर येणे, याला परमार्थ असे म्हणतात. त्वम्च्या तीन देहांचा विचार करून, तटस्थलक्षणे कोणती? हे पाहावे. तत्च्या तीन देहांचा विचार करून, तत्ची तटस्थलक्षणे कोणती? ते बघावे. तत्त्वमसि महावाक्यात, 'असि'ने तत्–त्वम्चा वाच्यार्थ जुळत नाही. तेव्हा लक्ष्य–लक्षणभाव संबंधाचा विचार करावा. तत्–त्वम् दोघांची स्वरूपलक्षणे बघावीत. तेव्हा ऐक्य सापडते.

तटस्थलक्षणांपासून ते स्वरूपापर्यंतचा प्रवास करायचा आहे. ब्रह्मनिश्चय होईपर्यंत पाणी पिणार नाही – असा निश्चय आपण करावा काय ? हे जरा अतिच होईल. 'अति अथवा अल्प' असे काही करू नये. युक्तीने राहावे.



प्रमाण –

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ।।१७।। अध्याय ६

– श्रीमद्भगवद्गीता

आता, तटस्थलक्षणांपासून सुरूवात करायची. म्हणजे मूर्ति, प्रतिक येथून सुरूवात करायला पाहिजे असे नाही. स्थूल, सूक्ष्म, कारणप्रपंचाचे तटस्थलक्षण प्रथम जाणून घ्या. त्यानंतर, स्वरूपलक्षणांवरून स्वरूप निश्चय करा.

*****

## चिंतन क्रमांक ६०

## तत्त्वमसि महावाक्य विचाराचा उपसंहार

आपण 'तत्त्वमसि' महावाक्याचा अभ्यास जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटण्याच्या उद्देशाने करीत आहोत. तत्त्वमसि महावाक्याचा विचार विशेषण–विशेष्यभाव संबंध, लक्ष्य–लक्षणभाव संबंध आणि सामानाधिकरण्य संबंध या संबंधत्रयाने केला. तत्त्वमसि हे महावाक्य छोटे दिसते आणि त्याचा अर्थ सोपा असेल असे वाटते. परंतु, महावाक्य अंगी बाणण्यासाठी बराच कालावधी लागतो. अनेक जन्म लागतात. महावाक्याच्या अर्थासंबंधी एक जरी शंका शिल्लक राहिल, तरी उद्धार होत नाही. केवळ श्रवण केल्याने होईल, शास्त्राभ्यासाची गरज नाही असे आपल्याला वाटते. आपण फक्त श्रवण केल्याने स्वतःला मुक्त मानतो. परंतु, खरी अवस्था काय आहे? कधी आपल्याला 'मी मुक्त आहे' असे वाटते, तर कधी 'मी बंधनात आहे' असे वाटते. मुक्ती खंडित नसते.

समजा, गाढ झोपेत असलेल्या एखाद्या स्त्रीला रात्री तीन वाजता कोणी उठवले, तर ती जागी झाल्याबरोबर 'मी पुरुष आहे' असे समजणारच नाही. 'मी स्त्री आहे' हा तिचा भाव अत्यंत दृढ आहे. क्षणभर देखील 'मी स्त्री' या समजूतीचा तिला विसर पडत नाही. त्याचप्रमाणे, तत्त्वमसिचा लक्ष्यार्थ निःसंदेहपणे आणि दृढपणे अनुभवात पाहिजे. श्रवणाच्या पुढे कळणे, पटणे, वठणे, वृत्तीवर बाणणे आणि आचरणात येणे या पायऱ्या आहेत. हा प्रवास करून गंतव्यस्थानी पोहोचण्यासाठी जे करणे गरजेचे आहे ते करा. महावाक्याचा अभ्यास करा.

प्रमाण –

**तरी अविद्येचिया निदा । विश्वस्वप्नाचा हा धांदा ।**
**भोगीत होता प्रबुद्धा । अनादि जो ।।४०३।। अध्याय १८**
**तो महावाक्याचेनी नांवें । गुरूकृपेचेनि थांवें ।**
**माथां हातु ठेविला नव्हे । थापटिला जैसा ।।४०४।। अध्याय १८**

**– श्रीज्ञानेश्वरी**

सर्वप्रथम स्वतःची अवस्था काय आहे? याचा विचार करावा. जगातील बहुसंख्य लोक अविद्येमुळे, स्वस्वरूपाच्या ठिकाणी झोपलेले आहेत. विश्व हे स्वप्न आहे. नवरा, बायको हे स्वप्नवत् आहेत की खरे आहेत? स्वप्नामध्ये बायको दिसते. संपत्ती पण दिसते. स्वप्न जोपर्यंत दिसते, तोपर्यंत त्या पदार्थांचे महत्त्व वाटते. जागा झाला की त्या पदार्थाला अजीबात किंमत राहत नाही. जागा झाल्यावरही, जर कोणी स्वप्नपदार्थांना किंमत देत

असेल, तर त्याला स्वप्न कळलेले नाही, असे ठरते. जग तुम्हांला सत्य वाटते का? मग, जग हे स्वप्न आहे हे तुम्हांला कळलेले नाही.

विश्व कसे आहे? त्याची प्रचीती येण्याचे चार प्रकार आहेत – नश्वर, स्वप्नवत्, रज्जू–सर्पवत् आणि चौथे म्हणजे वंध्यापुत्रवत्.

विश्व हे नश्वर आहे. याचा विचार पूर्वी आपण केलेला आहे. विश्व हे स्वप्नवत् आहे, असे अवतार महापुरुष आणि शास्त्र सांगतात. कारण काय? कधीपासून आपण जगाला सत्य समजत आलो आहोत? अनादीकाळापासून सत्यत्व आहे. आपल्याला आपल्या जग सत्यत्वाच्या समजूतीत बदल करावाच लागेल. एकदम जमत नसेल, तर वारंवार अभ्यास करावा लागेल. विचार करावा लागेल. मरेपर्यंत अभ्यास आणि विचार करीत राहावा. विश्वाला सत्यत्व देण्याला मान्यताच नाही.

विश्व हे स्वप्न आहे असा ज्याचा निर्णय आहे, त्याच्यासाठी, महावाक्याचा अभ्यास आहे. जो जगाला सत्य समजतो, त्याला महावाक्याचा उपयोग नाही.

'महावाक्याचिनावे' – 'नाव' म्हणजे होडी. संसारसागर पार करण्यासाठी महावाक्यरूपी होडी घ्यावी. 'सद्गुरूकृपेचेनि थावे' म्हणजे तरून जाणे हे सद्गुरूंच्या कृपेशिवाय होणार नाही. साधक शास्त्र वाचायला सुरूवात करतो. पुढे, त्याला सद्गुरू भेटल्यावर त्यांच्या कृपेने शास्त्राचा लक्ष्यार्थ कळतो. महावाक्यावर शास्त्राचा शेवट होतो. शास्त्राचा, वेदाचा अंत म्हणजे वेदांत म्हणजे उपनिषदे.

'सद्गुरूकृपेचेनि थावे' – काय होते? सद्गुरूंच्या कृपेने जागा होतो. अविद्या निद्रेतून जागा होण्यासाठी दोनच पर्याय आहेत – 'महावाक्य' विचार आणि सद्गुरूकृपा. साधक शास्त्र आणि सद्गुरूकृपेने मुक्त होतो. महावाक्याचा अभ्यास खूप महत्त्वाचा आहे. या कारणांसाठी अनेक महिन्यांपासून आपण महावाक्याचा अभ्यास करीत आहोत. त्याचे शेवटी फल काय मिळणार? **'जीवन्मुक्त स्थितीचा निश्चय'**.

एखादा मुलगा पहिल्या वर्गात आहे. त्याने जर असा विचार केला की मी दहावी पास झालो आणि त्याने शाळा शिकणे सोडून दिले तर? दहावी शिकून जो परिक्षेत पास होईल, तो माध्यमिक शाळा शिकला असे असते. कोणी शिकावे? मास्तराने की विद्यार्थ्याने? मास्तर फळ्यावर कौतुक म्हणून लिहितात आणि विद्यार्थ्यांना म्हणतात, 'बघा मी एकदाच हे फळ्यावर लिहिणार आहे. तुम्ही मात्र तुमच्या वहीत हे दहा वेळा लिहा'. कोण्या साधकाला जर सांगितले, 'श्रीज्ञानेश्वरी हा ग्रंथ पन्नास वेळा वाच'. तर, तो महाराजांना उलट प्रश्न विचारतो की 'तुम्ही वाचला का? पन्नास वेळा?' कोणाला जर सांगितले, 'पंचीकरण ग्रंथ वाच'. तर, तो म्हणतो, 'मी अमृतानुभवाचा अभ्यास करतोय'. आपल्या मनाप्रमाणे प्रयत्न केल्याने परमार्थ अवघड होऊन बसतो.

जन्माला आल्यापासून महावाक्याचाच विचार आणि सद्गुरूंचीच कृपा कशी मिळवावी? यासाठी प्रयत्न केला पाहिजे. परंतु, आपण संसार केला. सध्या आपण जागे नाहीत, विश्वस्वप्नाच्या धांदलीत आहोत. व्यवहारात कधी तुमची धांदल झाली आहे का?

सकाळी जागे होण्यापासून ते रात्री झोपेपर्यंत, जन्मल्यापासून ते मरणापर्यंत पळणे सुरू आहे, उड्या मारणे सुरू आहे. कोणत्याही क्षेत्रामध्ये उड्या मारतो. 'मी इंजिनियर बनणार', 'मी वकील बनणार'. 'ती पराठे करते काय? मी थालीपीठ करीन, मी पावभाजी बनविण्यास शिकेन'. सर्वत्र धांदलच सुरू आहे. अनुकरण करणे सुरू आहे. 'त्याच्याकडे गाडी आहे, स्वतःचे घर आहे. मी देखील त्या गोष्टी मिळविणार.'

जगत् स्वप्नवत् आहे. हे आपल्या अनुभवात नाही. जगत् सत्य नसून नश्वर आहे, नश्वर नसून स्वप्नवत् आहे, असे निर्णय, उत्तरोत्तर लावावे लागतील. सद्गुरूंच्या कृपेने अविद्येची निद्रा जाते.

'महावाक्य' समजण्यासाठी शास्त्राभ्यास केला पाहिजे. महावाक्य निरूपण ऐकून बरे वाटणे वेगळे आणि महावाक्याचा अर्थ कळणे वेगळे. महावाक्याचा अर्थ आचरणात येईपर्यंत प्रगती केली पाहिजे. तेव्हा अविद्यानाश होईल आणि तेव्हाच जन्ममरणाचा फेरा चुकेल.

एक तास चिंतन ऐकण्यापुरताच परमार्थ मर्यादित ठेऊ नका. महाराज जे निरूपण सांगतात, ते जर तुमच्या मनाला पटत नसेल, तर महाराज आपल्यावर अधिकार गाजवतात, आपल्याला चालवितात असे आपल्याला वाटेल. आपल्या अंतःकरणावर दाब आल्यासारखे वाटेल. महावाक्याचे निरूपण ऐकणे आपल्याला पेलवत नसेल, तर दुसरे काहीतरी अधिकारानुरूप योग्य साधन करा. मात्र, नियमित अभ्यास करणार नसाल, तर येथे येऊ नका.

जगत् सत्य का वाटते? जगत् नश्वर आहे असे लक्षात आले असते, तर ते सत्य वाटले असते का? ग्रंथात ठेवलेले हे फूल कसे आहे? नाशिवंत आहे. सत्य म्हणजे काय ते पाहू. भूत, वर्तमान, भविष्य तिन्ही काळात ज्यात बदल होतच नाही, जो तिन्ही काळात राहतो त्याला सत्य म्हणतात. परंतु, फुलाच्या संबंधी आपल्याला काय लक्षात येते? कळीच्या रूपाने फुलाचा उगम होतो. नंतर, फुलाची संपूर्ण वाढ होते, हळुहळू फूल कोमजते, त्याच्या पाकळ्या गळून पडतात. अशाप्रकारे, फुलाची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय होतो. फूल हा पदार्थ नाशिवंत आहे. त्याचप्रमाणे, जगत् नाशिवंत आहे.

याहीपुढे, जगत् हे स्वप्नच आहे, असा निर्णय व्हावा. त्यासाठी स्वप्न अवस्थेचा सूक्ष्म अभ्यास पाहिजे. निद्रादोषयुक्त अविद्येमुळे स्वप्न अवस्था येते. त्यावेळेस, वृत्ती अंतःकरणामध्ये आतल्या आत कार्यरत असते. जोपर्यंत स्वप्न प्रचीती असते, तोपर्यंत ते खरे वाटते. जागे झाल्यावर खोटे वाटते. स्वप्नदृश्य अजीबात स्थिर नसते, पटकन वेगाने बदलते. आता एक राजा दिसतो, लगेच त्याला शिंगे आहेत असे दिसते. स्वप्नदृश्य हे अप्रस्तुत, असंबद्ध, अस्थिर आणि विचित्र असते. कशाचा कशाशी संबंध नसतो. स्वप्न अवस्था ही अशी असते.

खरेतर, जगत्ही तसेच आहे. जगतामध्ये सर्व असंबद्ध आहे. परंतु, आपण संबंध प्रस्थापित करतो. लग्नाच्या आधी मुलगा मुलगी एकमेकांना ओळखत नव्हते. संबंध दृढ

कोणी केला? काय संबंध आहे? 'संबंध नाही' हे यम आपल्याला कळवून देईल.

महाराजांच्या सांगण्याप्रमाणे आपण आचरण करणार का? असंबंध असलेल्या जगतामध्ये, प्रत्येकजण संबंध जुळवितात आणि ते दृढ करीत राहतात. 'मी या घरात राहतो, हे घर माझे आहे', असे म्हणतो. मेल्यावर तसे राहिल काय? यम संबंध तोडेल. सावरासावर करायला वेळच देणार नाही, एकदम ठोका देईल. सावध व्हा.

स्वप्नात काहीही दिसते. याचे पाय त्याला, त्याचे डोके याला. जगत् तसेच आहे. पुढच्या क्षणाला काय होईल, हे सांगताच येत नाही. स्वप्न तसेच असते. व्यवहारात मनुष्य संकल्प करीत राहतो. 'मी इंजिनियर बनणार', 'माझा मुलगा परिक्षेत पहिला येणार', 'यावर्षी पीक चांगले होईल'. केव्हा काय होईल? हे ज्या अवस्थेत सांगताच येत नाही, त्या अवस्थेला स्वप्न अवस्था म्हणतात. स्वप्नाचे नियम जागृतीला लागू पडतात. सगळे संबंध खंडित होणार आहेत. मग, हट्ट का? हट्ट योग्य नाही. मनुष्य संबंध टिकवण्याचा हट्ट धरतो आणि यम ते खंडित करतो. संबंध करायचा असेल, तर शास्त्र, सद्गुरूंचा करा. आपण जर, शास्त्र, सद्गुरू यांना शरण जाणार नाही, तर यम आपल्याला सोडणार नाही.

जगत् कसे आहे? स्वप्न आहे. आता हे तुम्ही फक्त ऐकत आहात. जेव्हा केव्हा तुम्हांला हे कळेल, पटेल, बाणेल, आचरणात येईल, तेव्हा तुमचा, 'स्वप्न जसे तसेच जगत्' असा निर्णय होईल. त्यावेळी बायको, मुले, संपत्ती आली – गेली, तरी काही वाटणार नाही.

प्रमाण –

**तरी गेलियाची से न करी। न पवतां चाड न धरी।**
**जो सुनिश्चळु अंतरीं। मेरु जैसा ।।१९।। अध्याय ५**

– श्रीज्ञानेश्वरी

तेव्हा 'महावाक्य' ऐकण्याचा अधिकार येतो. म्हणून, सगळ्यांशी संबंध न तोडता तोडून टाका. कारण, स्वप्नात सर्वच असंबंध असते. सगळे संबंध स्थूलाने, सूक्ष्माने, कारणाने तोडा. कोणी म्हणेल, 'मी संबंध मनाने तोडेन'. ठीक आहे. सूक्ष्माने तर सूक्ष्माने तोड. पण, खरेच तसे कर हं! स्वतःला फसवू नको. फसवणूक केलीस, तर तूच फसशील. त्याहीपेक्षा, जीवाने त्याग करणे श्रेष्ठ, अशा साधकाला महावाक्याच्या श्रवणाचा अधिकार येतो.

अनेक साधकांना महावाक्याचा बोध ऐकल्यानंतर गळी उतरत नाही. सद्गुरूंच्या कृपेची आवश्यकता असते. महावाक्यासंबंधी शास्त्रातील वाक्ये वाचता येतील. पाठ होईल, बोलता येईल. महाराज तयार होतील. परंतु, उपयोग नाही. एखादा महाराज चाळीस तास ग्रंथाचा अभ्यास करतो आणि नंतर एक तास लोकांसमोर बोलतो. लोक म्हणतात, 'केवढे श्रेष्ठ महाराज!' पण, याचा उपयोग नाही. साधकाने महावाक्याचे संबंधत्रयाने श्रवण केले, मनन, निदिध्यासनही केले, तरी उपयोग होत नाही. जमीनीची मशागत केली, बीज पेरले,

झाडे मोठी झाली. परंतु, फूल, फळ लागत नाही. त्यासाठी पोषक वातावरण पाहिजे. वसंत ऋतूचे आगमन झाले की फुले, फळे लागतात.

प्रमाण –

जी बनकरु झाडें सिंपी जीवेंसाटीं । पाडूनि जन्में काढी आटी ।
परि फळेंसि तैंचि भेटी । जैं वसंतु पावे ।।१६९।। अध्याय १०

– श्रीज्ञानेश्वरी

त्याच नियमाप्रमाणे, महावाक्य फलीभूत होण्यासाठी सद्गुरुंची कृपा पाहिजे. ती कशी मिळते? सेवेने सद्गुरुंची कृपा होते. साधकांनी पुष्कळ शास्त्राभ्यास जरी केलेला असेल, तरी सद्गुरूकृपेशिवाय शास्त्रसेवा फलीभूत होत नाही.

सद्गुरूसेवा कशी करायची? हे भगवान श्रीज्ञानदेव महाराजांनी सांगितले आहे.

प्रमाण –

तरी तनुमनुजीवें । चरणासीं लागावें ।
आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ।।१६७।। अध्याय ४

– श्रीज्ञानेश्वरी

सद्गुरुंचे 'श्रीचरण' तीन प्रकारचे आहेत. ते म्हणजे 'स्थूल, सूक्ष्म, कारण'. सद्गुरुंच्या स्थूल श्रीचरणांची सेवा कशी करायची? त्यांच्या पावलांवर पाणी अर्पण केल्यावर, तेच पाणी प्यायचे. बरे! सद्गुरुंच्या श्रीचरणांना चिखल लागला असेल, तर त्यावर पाणी सोडून ते पिणार का? स्वच्छ असलेलेच पाय धुऊन प्यावेत काय? श्रीचरणांवर आपला माथा टेकवणे, हा देखील स्थूल सेवेचा प्रकार आहे. स्थूल सेवा विविध प्रकारे असू शकते.

एक वेळ स्थूल पद्धतीने सेवा करणे सोपे आहे. पण, सूक्ष्म सेवा अवघड आहे. सद्गुरुंचे सूक्ष्म श्रीचरण कुठे राहतात? मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांना अंतःकरण चतुष्टय म्हणतात. सद्गुरुंच्या बुद्धीमध्ये जे येईल, त्याप्रमाणे साधकाने राहणे ही सूक्ष्माने सेवा करणे होय. श्रीगुरुंच्या मनातील संकल्प विकल्प जाणून त्याप्रमाणे आचरण करणे, ही एक श्रेष्ठ सेवा आहे.

प्रमाण –

तैसें स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परमसेवा ।
येर तें गा पांडवा । वाणिज्य करणें ।।९१३।। अध्याय १८

– श्रीज्ञानेश्वरी

सद्गुरूंचा मनोभाव कळेल कसा? त्यांचा मनोभाव ओळखणे सोपे की अवघड? साधक जोपर्यंत स्वत:चे मन सद्गुरूंच्या मनाशी एकरूप करणार नाही, तोपर्यंत सूक्ष्म पद्धतीने सेवा करू शकणार नाही.

सद्गुरूंची सेवा 'कारण'देहाने, म्हणजे, जीवाने करणे अत्यंत अवघड आहे. मनुष्याचा जीव कोणाशी जोडलेला असतो? बायको, पोरं, संपत्ती यांवर जीव जडलेला असतो. समजा, जीव सद्गुरूंकडे गेला, तर तो सद्गुरूंच्या स्थूलदेहाकडे अथवा सूक्ष्मदेहाकडे जाईल. परंतु, सद्गुरूंच्या जीवाशी आपला जीव एकरूप करणे अत्यंत कठीण आहे. दोन मित्रांमधील मैत्री खरी केव्हा समजावे? एका मित्राने काहीही केले, तरी त्याचा दुसरा मित्र सहन करतो. मुलाने काहीही केले तरी, त्याच्या आईचा जीव त्याच्यात राहतो. मुलाने बरे–वाईट काहीही केले, तरी आईचा जीव त्याच्यातून बाजूला जात नाही. आपला भाव सद्गुरूंविषयी असाच आहे का? सद्गुरूंचा बाह्य व्यवहार जर शिष्याला आवडत नसेल, सद्गुरूंच्या स्वभावामध्ये शिष्य दोष पाहत असेल, तर कोणत्याच प्रकारे सेवा करणे जमत नाही. उलट तो शिष्य सद्गुरूंपासून दूर जातो.

आता, तुम्ही विचाराल 'ज्यांना मी सद्गुरू समजतो ते फसवे असतील, भोंदू असतील, तर मग कसे?' तो जर भोंदू असेल, तर तो नरकाला जाईल. तुम्ही कशाला चिंता करता? तुम्ही स्वत:चा भाव शुद्ध ठेवा आणि निष्ठेने सेवा करीत राहा. ईश्वरकृपेने पुढे योग्य सद्गुरू मिळतील.

पण, सद्गुरू खरोखरच सिद्ध असतील आणि तुमच्याकडून त्यांचा अपमान, अवहेलना झाली, तर तुमचे प्रचंड नुकसान होईल. पुढचे हजारो जन्म परमार्थ करणे सुचणार नाही, प्रचंड कष्ट भोगत राहाल. सद्गुरू निरंकुश असतात. म्हणून, आपल्याकडून अपराध होऊ नये. सद्गुरू, साधूसंत यांना नावे ठेऊ नये. खरेतर, कोणालाच नावे ठेऊ नये. 'चिंतन सांगतात म्हणून ते साधू' असा काही नियम नाही. नेमके साधू कोण हे सहजासहजी ओळखता येत नाही. म्हणून, शुद्ध भाव ठेऊन साधकाने सेवा करीत राहावे. हृदयामध्ये जीव राहतो. तेथे सद्गुरूंचे श्रीचरण आहेत. सद्गुरूंच्या जीवाशी जीव मिळाला की काम झाले.

'अगर्वता करावे। दास्य सकळ।।' गर्व येतो की नाही? या हाताने केलेली सेवा, त्या हाताला कळली नाही पाहिजे. सद्गुरूंची सेवा करताना तीळमात्र गर्व नसावा. 'सेवा केली' हे पुढच्या क्षणाला विसरले पाहिजे. जर लक्षात राहिले, तर गर्व शिल्लक आहे असे समजावे. काही जणांना तर, वर्षानुवर्ष 'मी सेवा केली' अशी आठवण राहते. त्यांचा तसा भाव त्यांना पुढचे हजारो जन्ममरणरूपी गाळात घालणार आहे. काहीजण तर असे बोलूनच दाखवितात की 'आम्ही होतो म्हणून सद्गुरू राहू शकले', 'आमच्या घरातून त्यांच्यासाठी शिधा जात होता', 'आम्ही त्यांच्यासाठी आश्रम बांधला'. आपल्यामुळे सद्गुरू की सद्गुरूंमुळे मी आहे? जे काही चालेले आहे, ते सद्गुरूंमुळे चालले आहे. परंतु, लोक विचित्रपणे का वागतात? त्यांच्या लक्षात या गोष्टी येत नाहीत. 'मागील वर्षी सद्गुरूंना कपडे आम्हीच दिले होते'. हा तर गर्वाचा कळस आहे. मग, काय गती होणार सांगा? 'सेवा केली' असे जीवात,

मनात आणि बोलण्यात येऊ नये. सेवा केल्याबरोबर ती विसरावी. मग, गर्व येईल का?

महाराजांना कोणी फूल अर्पण केले, तर ते लगेच विसरतात. परंतु, समजा तुम्ही महाराजांच्या नावावर एक लाख रुपये केले, तर ही गोष्ट तुम्ही आयुष्यभर विसरणारच नाही. परंतु, तुमच्या मुलीच्या लग्नात तुम्ही पाच लाख रुपये सहजपणे खर्च करणार आणि त्याबद्दल तुम्हांला काहीच वाटणार नाही. लोकांना गर्वाने सांगत सुटाल, 'मुलीच्या लग्नात पाच लाख रुपये खर्च केले'. गर्व निघतच नाही. काढणार कोण? काही जणांचा गर्व वाढतच जातो.

दास्य म्हणजे काय? दास्य आणि गुलाम यांच्यामध्ये फरक आहे. दास, गुलाम आणि नोकर यांची वृत्ती आणि त्यांना मिळणारी वागणूक भिन्न असते. विशिष्ट कालावधीसाठी पैसे घेऊन काम करतो त्याला नोकर म्हणायचे. नोकरीचा कालावधी संपला की तो घरी निघून जातो. मग, त्याचा मालकाशी काही संबंध नसतो. गुलाम कसा असतो? मालक त्याला एकदाच विकत घेतो. वर्षानुवर्षे त्याला मालक सांगेल त्याप्रमाणे कामे करावी लागतात. त्याने ऐकले नाही, तर मालक त्याला चाबकाने फोडतो, लाथा मारतो. गुलामाला अत्याचार सहन करावे लागतात. दास कसा असतो? गुलाम आणि नोकर दोघांप्रमाणे दासाची वृत्ती असते. तो नोकराप्रमाणे राबतो आणि गुलामाप्रमाणे अत्याचार सहन करतो. पण, तरीही स्वतःला गुलाम किंवा नोकर समजत नाही.

एक खरी घटना सांगतो. एक महाराज शिष्यांसोबत बग्गीत बसून त्यांच्या साधकांच्या घरी जायचे. गाव जवळ आले की महाराज एका शिष्याच्या डोक्यावर स्वतःचे पादत्राणे ठेऊन, त्याला बग्गीतून खाली उतरवून द्यायचे. शिष्याला त्याच्या श्रीगुरूंचे पादत्राणे डोक्यावर घेऊन बग्गीच्या मागे पळावे लागत असे. महाराज याप्रमाणे त्याचा अपमान करीत त्याला फिरवायचे, गुलामाप्रमाणे वागवायचे. त्यामागे, श्रीगुरूंचा उद्देश हा की शिष्याचे कल्याण व्हावे. खऱ्या अर्थाने शिष्य असेल, तर तशी वागणूक सहन करेल. सद्गुरूंची चांगली, वाईट कृत्ये समसमान ज्याला वाटतात, त्याच्याबद्दल सद्गुरूंनी स्तुतीपर अथवा निंदात्मक वचने बोलली, तरी ती समसमान वाटतात, त्या शिष्याला दास म्हणतात. नोकर + गुलाम = दास.

ज्या क्षणाला श्रीगुरूंची तनु, मनु, जीवे प्रकर्षाने सेवा घडेल, त्याच क्षणाला शिष्य कृतार्थ होईल. पुढच्या क्षणापासून सेवा करण्याची गरज पडणार नाही. सद्गुरूंनी तत्त्वमसि महावाक्याचा उच्चार केल्याबरोबर, असा शिष्य मुक्त होतो. अविद्येच्या निद्रेतून जागा होतो. त्याला विश्व हे स्वप्न राहत नाही. विश्व हे ब्रह्मच होते. तो निरंकुश होतो. त्याला वेदविधी उरत नाही. व्यावहारिक आणि पारमार्थिक कोणतेही कर्तव्य त्याला शिल्लक राहत नाही. कर्तव्याभाव स्थितीत तो जीवन्मुक्त (अथवा श्रेष्ठ असल्यास विदेहमुक्त या दशेवरही) उर्वरित आयुष्य जगतो.

अशाप्रकारे, येथे तत्त्वमसि महावाक्याचा आपला विचार संपलेला आहे.

*****

पुंडलिक वरदा हरि विठ्ठल ।
श्रीज्ञानदेव तुकाराम ।
पंढरीनाथ भगवान की जय ।
माऊली श्रीज्ञानेश्वर महाराज की जय ।
जगद्गुरू श्रीतुकाराम महाराज की जय ।
सद्गुरूनाथ भगवान की जय ।
।। हरिः ॐ तत् सत् ।।

॥ ॐ तत् सत् ॥

जयजय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ ।
जन्मजराजलदजाळ । प्रभंजन ॥१॥

जयजय देव प्रबळ । विदळितामंगळकुळ ।
निगमागमद्रुमफळ । फलप्रद ॥२॥

जयजय देव सकळ । विगतविषयवत्सल ।
कलितकाळकौतूहल । कलातीत ॥३॥

जयजय देव निष्कळ । स्फुरदमंदानंदबहळ ।
नित्यनिरस्ताखिलमळ । मूळभूत ॥४॥

जयजय देव स्वप्रभ । जगदंबुदगर्भनभ ।
भुवनोद्भवारंभस्तंभ । भवध्वंस ॥५॥

जयजय देव निश्चल । चलितचित्तपानतुंदिल ।
जगदुन्मीलनाविरल । केलिप्रिय ॥६॥

जयजय देव विशुद्ध । विदुदयोद्यानद्विरद ।
शमदममदनमदभेद । दयार्णव ॥७॥

जयजय देवैकरूप । अतिकृतकंदर्पसर्पदर्प ।
भक्तभावभुवनदीप । तापापह ॥८॥

जयजय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय ।
निजजनजित भजनीय । मायागम्य ॥९॥

जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्यकल्पतरो ।
स्वसंविद्द्रुमबीजप्ररो । हणावनी ॥१०॥

# परिशिष्ट

## पारिभाषिक शब्दांच्या संक्षिप्त व्याख्या

**अजहल्लक्षणा (अजहत् लक्षणा) :–** ज्या लक्षणेत वाच्यार्थाचा स्वीकार केला जातो, तिला 'अजहत् लक्षणा' म्हणतात. 'तांबडा धावतो' हे अजहत् लक्षणेसाठी उदाहरण दिले जाते. तत्त्वमसि महावाक्याचा विचार करण्यासाठी या लक्षणेचा वापर करण्यात येतो.

**अतिव्याप्ती :–** हा लक्षणेचा एक दोष आहे. लक्ष्यामध्ये राहत असून अलक्ष्यामध्येही आढळणारे जे लक्षण ते 'अतिव्याप्त' लक्षण होय. ब्रह्माचे सत्, चित्, आनंद या लक्षणांचे परिक्षण करण्यासाठी अतिव्याप्तीचा वापर होतो.

**अर्थवाद :–** महावाक्य निरूपणासाठी सहा लिंगांचा वापर करण्यात येतो. त्यापैकी एक लिंग म्हणजे अर्थवाद. प्रतिपाद्य विषयाची (म्हणजे ब्रह्म) स्तुती म्हणजे 'अर्थवाद'.

**अर्थापत्ति :–** विषयांचे ज्ञान होण्यास उपयोगी पडणाऱ्या साधनास प्रमाण म्हणतात. एकूण सहा प्रमाणं आहेत. त्यापैकी एक अर्थापत्ति प्रमाण आहे. कार्यज्ञानाने कारणाची कल्पना करणे म्हणजे अर्थापत्ति प्रमाण. उदाहरणार्थ– देवदत्त दिवसा जेवताना दिसत नाही तरी तो धष्टपुष्ट होत आहे. म्हणजे तो रात्री जेवत असला पाहिजे.

**अदृष्ट :–** परमार्थात प्रगती व्हावी या उद्देशाने केलेल्या वेदविहीत कर्मांचे फळ. संचितातून येणारा हा प्रारब्ध कर्माचा भाग होय.

**अद्वैत :–** दोन किंवा त्याहून अधिक नाही. एकमेव अद्वितीय असे ब्रह्मचैतन्यच आहे.

**अधिष्ठान :–** ज्यावर आरोप होतो त्याला 'अधिष्ठान' म्हणतात. उदाहरणार्थ – रज्जू या अधिष्ठानावर सर्पाचा आरोप केला जातो. ब्रह्म या अधिष्ठानावर जगत् आरोपित आहे.

**अध्यस्त :–** अधिष्ठानावर ज्याचा आरोप होतो त्याला 'अध्यस्त' असे म्हणतात.

**अध्यास :–** आत्म्याच्या धर्मांचा आरोप अनात्म्यावर व अनात्म्याच्या धर्मांचा आरोप आत्म्यावर असे सत्यत्वाने समजणे म्हणजे 'अध्यास'.

**अनादी :–** 'अनंत कालापासून सुरू असणे' हा अनादी शब्दाचा गौण अर्थ आहे. 'सुरूवातच नाही' हा अनादी शब्दाचा मुख्य अर्थ आहे. ज्याला आदी नाही, ज्याची उत्पत्ती नाही तो अनादी.

**अनिच्छा प्रारब्ध :–** प्राप्त जन्मी ज्या प्रसंगी इच्छेविरुद्ध कर्मफलभोग होतो, त्यास 'अनिच्छा प्रारब्ध' असे म्हणतात.

**अनित्य :–** सतत परिर्वतनशील म्हणजे 'अनित्य'.



**अनिर्वचनीय :–** जो पदार्थ 'आहे' म्हणता येत नाही आणि 'नाही' असेही म्हणता येत नाही, त्यास 'अनिर्वचनीय' असे म्हणतात. अनिर्वचनीय पदार्थ मिथ्या असतो. व्यष्टीने चार देह आणि समष्टीने सृष्टी अनिर्वचनीय आहे.

**अनुपलब्धी :–** सहा प्रमाणांपैकी एक प्रमाण म्हणजे अनुपलब्धी प्रमाण होय. ज्या ठिकाणी पदार्थ नसतो त्याठिकाणी त्या पदार्थाच्या अभावाचा निश्चय असतो, त्याला 'अनुपलब्धी प्रमाण' म्हणतात.

**अनुमान :–** सहा प्रमाणांपैकी एक अनुमान प्रमाण होय. उदाहरणार्थ– दूर एखाद्या ठिकाणाहून धूर निघत आहे असे दिसल्यास तेथे अग्नि आहे असे अनुमान केले जाते.

**अन्नमयकोश :–** पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेल्या स्थूलदेहाला 'अन्नमयकोश' म्हणतात.

**अन्योन्याध्यास :–** एका पदार्थाचे धर्म दुसऱ्यावर आणि दुसऱ्याचे धर्म पहिल्यावर प्रतीत होणे यास 'अन्योन्याध्यास' असे म्हणतात.

**अन्वय :–** जेथे कार्य असते तेथे कारणाने नियमाने राहणे म्हणजे 'अन्वय'. महावाक्य निरूपणात अन्वयाचा वापर होतो. तत्त्वमसि महावाक्य निरूपणामध्ये प्रपंचात आत्म्याचा अन्वय सिद्ध करायचा असतो. अनुवृत्त वस्तू एक व नित्य असते.

**अपरोक्ष :–** अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष. अंतःकरणवृत्ती विशिष्ट चैतन्याने शब्द, स्पर्श, रूप, रस अथवा गंध या विषयांचा अनुभव येणे म्हणजे अपरोक्ष.

**अपरोक्षज्ञान :–** 'आत्मा निर्विकार ब्रह्म असून तेच माझे स्वरूप आहे' असे प्रत्यक्ष ज्ञान म्हणजे अपरोक्षज्ञान.

**अपान :–** प्राणाच्या पाच प्रकारांपैकी एक म्हणजे अपान वायु. मल–मूत्र विसर्जन करण्यास अपान वायु सहाय्यक होतो.

**अपूर्वता :–** महावाक्य निरूपणासाठी ज्या सहा लिंगांचा वापर करण्यात येतो त्यांपैकी एक म्हणजे अपूर्वता. प्रतिपाद्य विषय (म्हणजे ब्रह्म) कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय न होणारे असते, याला 'अपूर्वता' म्हणतात.

**अपौरुषेय :–** पुरुषाने न तयार केलेले वेद अपौरुषेय आहेत म्हणून दोषरहित आहेत. वेद मनुष्याला अत्यंत विश्वसनीय आणि प्रमाणरूप आहेत.

**अपंचीकृत पंचमहाभूते :–** पाच महाभूते जेव्हा त्यांच्या शुद्ध, अमिश्र रूपात असतात, तेव्हा त्यांना 'अपंचीकृत पंचमहाभूते' म्हणतात.

**अभिज्ञारूप प्रत्यक्ष :–** पदार्थ प्रत्यक्ष समोर असून चिदाभासासह अंतःकरणवृत्तीने व्यापल्यामुळे कळतो, ह्यास 'अभिज्ञारूप प्रत्यक्ष' असे म्हणतात.



**अवस्था :–** विशिष्ट काळासाठी प्रपंचाची प्रतिती असणे अथवा अप्रतिती असणे म्हणजे अवस्था. अवस्था ही परिवर्तनशील असते. जाग्रती, स्वप्न, सुषुप्ती, मूर्च्छा आणि मरण या जीवाच्या पाच अवस्था आहेत.

**अविद्या :–** आत्म्याचे अज्ञान. 'मी मलाच जाणत नाही' असा सत्य निश्चय म्हणजे अविद्या.

**अव्यक्त :–** जगताच्या सर्व नामरूपांची अत्यंत सूक्ष्म अवस्था.

**अव्याप्ती :–** हा लक्षणेचा एक दोष आहे. जे लक्षण लक्ष्याच्या काही भागात राहते व काही भागात राहत नाही ते लक्षण अव्याप्ती दोषाने युक्त असते.

**असत् :–** जे नसतेच त्याला असत् म्हणतात. वंध्यापुत्र, खपुष्प आणि शशशृंग हे असत् पदार्थांचे उदाहरण आहेत.

**असाधारण :–** जो धर्म एखाद्या पदार्थामध्ये ओतप्रोत राहतो आणि तोच धर्म इतर कोणत्याही पदार्थात राहत नाही, अशा धर्मास 'असाधारण धर्म' असे म्हणतात.

**असंभव :–** हा लक्षणेचा एक दोष आहे. असंभव म्हणजे शक्यच नसणे. जे लक्षण लक्ष्यामध्ये राहणे शक्यच नाही, त्यास 'असंभव' म्हणतात. ब्रह्माच्या सत्, चित्, आनंद या लक्षणांच्या परिक्षणासाठी या लक्षणाचा वापर केला जातो.

**असंभावना :–** 'ब्रह्म नाही. ब्रह्म असूच शकत नाही' अशा प्रकारच्या निश्चयाला असंभावना असे म्हणतात. मनुष्याला ब्रह्मज्ञान होण्यास एक प्रतिबंध म्हणजे असंभावना.

**अहं :–** अहं म्हणजे 'मी'. निरुपाधिक 'मी' आणि आध्यासिक 'मी' असे अहंचे दोन प्रकार आहेत.

**अहंकार :–** सूक्ष्मदेहातील अंतःकरणाची एक वृत्ती. प्राणी–पदार्थ–परिस्थिती यांच्याशी 'मी व माझे' असा संबंध जोडणे म्हणजे अहंकार.

**अंडज :–** चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या जीवांचे वर्गीकरण जरायुज, अंडज, उद्भिज्ज आणि स्वेदज असे केलेले आहे. अंड्यातून निर्माण होणाऱ्या जीवांना 'अंडज' म्हणतात.

**आनंदमयकोश :–** व्यष्टीने कारणशरीराच्या ठिकाणी अतिशय आनंदाचा प्रत्यय येत असल्यामुळे आणि त्याने कोशाप्रमाणे आत्म्याला झाकलेले असल्यामुळे त्याला 'आनंदमयकोश' म्हणतात.

**आध्यात्मिक :–** 'आत्म्याशी संबंधीत' म्हणजे आध्यात्मिक.

**आभास :–** अंतःकरणात प्रतिबिंबित होऊन परावर्तीत होणारा आत्म्याचा (चिद्‌चा) प्रकाश म्हणजे 'आभास' अथवा 'चिदाभास' होय. आभासाचा शब्दशः अर्थ म्हणजे 'निश्चितपणे भासलेले'. परावर्तीत प्रकाश हा आत्म्याचा मूळ प्रकाश नसून भासलेला आहे.


**आरंभवाद :–** 'जगत् अणूंपासून बनलेले आहे' हे आरंभवादचे मत आहे. वैशेषिकदर्शन आणि न्यायदर्शन आरंभवादी आहेत.

**आवरण :–** अज्ञानाच्या ज्या शक्तीमुळे अपरिछिन्न आत्मा झाकला गेल्यासारखा वाटतो, त्या शक्तीला 'आवरण' असे म्हणतात.

**आस्तिक :–** जे लोक वेदाचे प्रमाण श्रद्धापूर्वक मानतात, त्यांना 'आस्तिक' असे म्हणतात.

**आश्रमसन्यास :–** पुत्रेषणा, वित्तेषणा आणि लोकेषणा यांचा त्याग करून जो साधक केवळ श्रवणमननादि साधन घेऊन राहतो, त्यास 'आश्रमसन्यास' म्हणतात.

**इदं :–** इदं म्हणजे 'हे'.

**इच्छाप्रारब्ध :–** प्राप्त जन्मी ज्या वेळी स्वेच्छेने कर्मफलभोग होतो, त्यास 'इच्छाप्रारब्ध' म्हणतात.

**ईश्वर :–** ब्रह्म, माया आणि मायेतील ब्रह्माचा आभास असे तीन मिळून ईश्वर.

**ईश्वरसाक्षी :–** ब्रह्माचा प्रकाश मायेवर पडतो. मायेला स्पर्श होण्याच्या पूर्वीपर्यंतच्या ब्रह्मप्रकाशाला 'ईश्वरसाक्षी' असे म्हणतात.

**उत्तरमीमांसा :–** 'वेदांतशास्त्र' शब्दाची व्याख्या पाहावी.

**उदान :–** प्राणांच्या पाच प्रकारांपैकी एक म्हणजे उदान. उदान वायू कंठात राहतो आणि उचकी निर्माण करतो.

**उद्भिज्ज :–** चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या जीवांचे वर्गीकरण जरायुज, अंडज, उद्भिज्ज आणि स्वेदज असे केलेले आहे. वृक्ष, वेली अशा बीजापासून जमिनीतून वर येणाऱ्या जीवांना 'उद्भिज्ज' असे म्हणतात.

**उपक्रमोपसंहार :–** महावाक्य निरूपणासाठी ज्या सहा लिंगांचा वापर करण्यात येतो, त्यांपैकी पहिले लिंग म्हणजे 'उपक्रमोपसंहार'. आरंभी विषयाचे प्रतिपादन करणे म्हणजे उपक्रम आणि शेवटी त्याच विषयाने सांगता करणे म्हणजे उपसंहार.

**उपनिषद् :–** वेदाचा अंतिम भाग म्हणजे 'उपनिषद्' म्हणजेच वेदांत.

**उपपत्ती :–** महावाक्य निरूपणासाठी सहा लिंगांचा वापर करण्यात येतो त्यांपैकी सहावे लिंग म्हणजे उपपत्ती. प्रतिपाद्य विषय दृष्टांताच्या सहाय्याने समजावून सांगणे म्हणजे 'उपपत्ती'.

**उपमान :–** विषयाचे ज्ञान होण्यास उपयोगी पडणाऱ्या साधनास प्रमाण म्हणतात. एकूण सहा

प्रमाणांपैकी एक म्हणजे उपमान प्रमाण. पूर्वी न पाहिलेल्या पदार्थाबद्दलचे वर्णन ऐकून आणि नंतर तो पदार्थ पाहिल्यावर त्या पदार्थाला तसे ओळखणे म्हणजे उपमान प्रमाण. उदाहरणार्थ – पूर्वी न पाहिलेल्या गवयाचे (गायीसारखा प्राणी) मित्राकडून वर्णन ऐकून आणि नंतर तो पदार्थ जंगलात अचानक पाहिल्यावर, हाच तो गवय आहे असे ज्ञान होते.



**उपरती :–** षट्संपत्ती म्हणजे सहा संपत्ती. षट्संपत्ती हे अद्वैत वेदांताच्या साधकासाठी गरजेचे असलेले लक्षण आहे. सहा संपत्तीमधील एक म्हणजे उपरती. मनाने बाह्य विषयांवरील पकड सोडणे व विषयांचे चिंतनही सोडणे म्हणजे उपरती.

**उपलक्षण :–** कार्याशी अन्वयी नसणारे, व्यावर्तक आणि काळनिरपेक्ष अशा पदार्थाला 'उपलक्षण' म्हणतात.

**उपलक्ष्य आणि उपलक्षित :–** उपलक्षण ज्याचा निर्देश करते, त्याला 'उपलक्ष्य' म्हणतात. उदाहरणार्थ – कावळा ज्या घरावर बसलेला आहे ते देवदत्ताचे घर. येथे कावळा उपलक्षण आहे. देवदत्ताचे घर हे उपलक्ष्य आहे. उपलक्षणासह उपलक्ष्याला 'उपलक्षित' म्हणतात. कावळा बसलेले देवदत्ताचे घर हे उपलक्षित आहे.

**उपवेद :–** आयुर्वेद, धनुर्वेद, गंधर्ववेद आणि अर्थवेद हे चार उपवेद आहेत.

**उपधेय आणि उपहित :–** उपाधी ज्याचा निर्देश करते त्याला उपधेय म्हणतात. उदाहरणार्थ – हातात दंड असलेला पुरुष. येथे दंड ही उपाधी आणि पुरुष हे उपधेय आहे. उपाधीसह उपधेय म्हणजे उपहित. उदाहरणामध्ये 'दंडासह पुरुष' म्हणजे उपहित.

**उपादानकारण :–** ज्या कारणाचा कार्यात प्रवेश असून ज्याच्याशिवाय कार्य राहत नाही, त्याला 'उपादानकारण' म्हणतात.

**उपादेय :–** उपादान कारणापासून झालेले कार्य. उदाहरणार्थ – माती या उपादान कारणापासून झालेला घट हे उपादेय आहे.

**उपाधी :–** कार्याशी अन्वयी नसणारे, व्यावर्तक आणि वर्तमान अशा पदार्थाला 'उपाधी' म्हणतात.

**उपासना :–** उपास्य वस्तूजवळ चिंतनाने जाऊन त्या वस्तूकडे दीर्घकाळ अखंड प्रवाहाप्रमाणे लक्ष लावणे म्हणजे 'उपासना'.

**करण :–** कार्याचे जे असाधारण कारण ते करण. चक्षु, श्रोत्र इत्यादी इंद्रियांना करण म्हणतात.

**कर्म :–** देह, इंद्रिये, इंद्रियांच्या देवता, प्राण आणि जीव ह्यांच्या सहाय्याने जी क्रिया होते, त्या क्रियेच्या पोटातून जे तयार होते त्याला कर्म असे म्हणतात. नित्य, नैमित्तिक, काम्य आणि प्रायश्चित्त ही वेदविहीत कर्मे आहेत.

**कर्मेंद्रिय :–** हात, पाय, वाचा, मलद्वार आणि मूत्रद्वार ही कर्मेंद्रिय आहेत. यांचे सूक्ष्मरूप सूक्ष्मदेहामध्ये असते व यांचेच स्थूलरूप स्थूलदेहावर दिसून येते.

**कर्माचे प्रकार :–** संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण हे तीन कर्माचे प्रकार आहेत.

**कल्प :–** काळ मोजण्याचे मोठे परिमाण. एक कल्प म्हणजे ४.३२ अब्ज वर्ष.

**काम्यकर्म :–** पृथ्वीवरील भौतिक पदार्थ प्राप्त करण्याच्या उद्देशाने अथवा स्वर्गप्राप्तीच्या इच्छेने केलेले वेदविहीत कर्म.

**कारणदेह :–** ज्यामुळे आत्मा कळत नाही, तसेच सूक्ष्मदेह आणि स्थूलदेह यांचे जे कारण आहे, त्या देहाला 'कारणदेह' किंवा 'अविद्या' असे म्हणतात.

**कार्यकारण :–** व्यष्टीने, अविद्या हे कारण आणि सूक्ष्मदेह व स्थूलदेह हे कार्य होय. तसेच, समष्टीने माया हे कारण आणि समष्टी सूक्ष्मदेह व समष्टी स्थूलदेह हे कार्य होय.

**कारणाध्यास :–** कारणदेह (म्हणजेच अविद्या) आणि आत्मा यांच्या परस्पर अध्यासाला 'कारणाध्यास' म्हणतात.

**कार्याध्यास :–** स्थूल–सूक्ष्मदेह, त्यांचे धर्म आणि आत्मा यांच्या परस्पर अध्यासाला व्यष्टीने 'कार्याध्यास' म्हणतात.

**कूटस्थ :–** व्यष्टी अज्ञानाचे अधिष्ठान चैतन्य म्हणजे 'कूटस्थ'.

**क्रियमाण कर्म :–** वर्तमानकाळी जे कर्म केले जाते, त्यास 'क्रियमाण कर्म' म्हणतात.

**चित् :–** चित् म्हणजे ज्ञान/जाणणे. चित् हे ब्रह्माचे स्वरूपलक्षण आहे.

**चित्त :–** सूक्ष्मदेहातील अंतःकरणपंचकापैकी एक म्हणजे चित्त. चित्त हे अनंत जन्मांचे संस्कार साठवण्याची जागा होय.

**चिदाभास :–** आभास शब्दाची व्याख्या पाहावी.

**छंद :–** सहा वेदांगांपैकी एक अंग म्हणजे छंदशास्त्र. वेदातील ऋचांना/मंत्रांना वृत्त असते. वृत्तांचा अभ्यास सांगणारे शास्त्र म्हणजे छंदशास्त्र.

**जगत् :–** सृष्टीतील सर्व नामरूपांची समष्टी म्हणजे जगत्.

**जड :–** जे स्वतःला आणि इतरांना जाणू शकत नसून जे जाणण्यासाठी अन्याची गरज असते, त्याला 'जड' म्हणतात. व्यष्टीने तीन देह आणि तीन आभास जड आहेत. समष्टीने तीन देह आणि तीन आभास हेही जड आहेत.

**जरायुज :–** चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या जीवांचे वर्गीकरण जरायुज, अंडज, उद्भिज्ज आणि स्वेदज असे केलेले आहे. मनुष्य, गाय इत्यादी ज्या जीवांचा जन्म गर्भाशयातून होतो, त्यांना 'जरायुज' म्हणतात.

**जहल्लक्षणा (जहत् लक्षणा) :–** ज्या लक्षणेत वाच्यार्थाचा संपूर्ण त्याग केला जातो तिला 'जहल्लक्षणा' म्हणतात. 'गंगेवर गौळवाडा' हे जहल्लक्षणेसाठी उदाहरण दिले जाते. तत्त्वमसि महावाक्याचा विचार करण्यासाठी या लक्षणेचा वापर करण्यात येतो.

**जाग्रत (जागृती) :–** ज्या अवस्थेत जीवाच्या स्थूल शरीराची हालचाल होऊन पंचीकृत पंचमहाभूतात्मक पदार्थांचे भान असते, त्या अवस्थेला 'जाग्रत' असे म्हणतात.

**जिज्ञासू :–** परमार्थ यथार्थपणे कळावा या उद्देशाने जो मनुष्य शास्त्राध्ययन करतो व साधूंना परमार्थविषयक शंका विचारतो, त्याला 'जिज्ञासू' म्हणतात.

**जीव :–** कूटस्थ चैतन्य, व्यष्टी अज्ञान आणि व्यष्टी अज्ञानातील कूटस्थाचा आभास असे तीन मिळून जीव.

**जीवन्मुक्ति :–** 'आत्मा ब्रह्मरूप आहे' असा निःसंदेह, दृढ, अपरोक्ष आणि सहज निश्चय म्हणजे जीवन्मुक्ति स्थिती.

**जीवसाक्षी :–** कूटस्थाचा प्रकाश व्यष्टी अज्ञानावर (कारण देहावर) पडतो. कारण देहाला स्पर्श करण्यापूर्वीपर्यंतचा जो चैतन्यप्रकाश, त्यास 'जीवसाक्षी' म्हणतात.

**ज्योतिष :–** सहा वेदांगांपैकी एक अंग म्हणजे ज्योतिष. कोणते वैदिक कर्म कोणत्या काळी व किती कालापर्यंत करावीत हे सांगणारे शास्त्र म्हणजे ज्योतिष.

**तटस्थलक्षण :–** लक्ष्याच्या स्वरूपात अंतर्भूत न होणारे, लक्ष्यासोबत शेवटपर्यंत न राहणारे आणि लक्ष्याला इतर पदार्थांपासून वेगळे करून दाखविणारे जे लक्षण, ते 'तटस्थलक्षण' होय. सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय ही ब्रह्माची तटस्थलक्षणे आहेत.

**तत् :–** तत् या संस्कृत शब्दाचा सरळ अर्थ म्हणजे 'ते'. तत् म्हणजे वाच्यार्थाने ईश्वर आणि लक्ष्यार्थाने ब्रह्म.

**तत्त्वमसि :–** सामवेदातील महावाक्य.

**तत् त्वम् पदार्थशोधन :–** तत् आणि त्वम् या पदांच्या वाच्यार्थाचा व लक्ष्यार्थाचा विचार करणे.

**तमोगुण :–** ज्या गुणाच्या अधिक्याने मनुष्याला वेदाने ज्यांना निषिद्ध कर्मे म्हटली आहेत, ती करण्याची प्रवृत्ती होते तो तमोगुण.

**तितिक्षा :–** शीतोष्ण, मानापमान, सुख–दुःख इत्यादी द्वंद्वधर्म आक्रोशाशिवाय सहन करणे म्हणजे तितिक्षा. वेदांतशास्त्राच्या अधिकार लक्षणातील षट्संपत्ती पैकी एक.

**तुरीय :–** तुरीय या शब्दाचा सरळ अर्थ म्हणजे चौथे. स्थूलदेह, सूक्ष्मदेह आणि कारणदेह या देहातील अनुक्रमे विश्व, तैजस आणि प्राज्ञ या तीन चैतन्याभासांच्या अपेक्षेने चौथे म्हणजे तुरीय. तुरीय म्हणजे आत्मा. तुरीय हे तीन देह आणि त्यांच्या तीन आभासांचे अधिष्ठान आहे.

**तूलाविद्या (तूल अविद्या) :–** सूक्ष्म–स्थूल या कार्यप्रपंचातील पदार्थांचे अज्ञान म्हणजे 'तूल

अविद्या'. ब्रह्मविद्या वगळता इतर सर्व विद्या म्हणजे तूल विद्या. तूल विद्याच प्राप्त करण्याच्या मनुष्याच्या आग्रहामुळे संसारबंधन दृढ होत जाते.

**तेज :–** पंचमहाभूतांपैकी एक महाभूत म्हणजे अग्नि. अग्नि म्हणजेच तेज.

**तैजस :–** स्वप्नावस्थेतील आत्म्याच्या आभासाला 'तैजस' म्हणतात.

**त्वम् :–** त्वम् या संस्कृत शब्दाचा सरळ अर्थ म्हणजे 'तू'. त्वम् म्हणजे वाच्यार्थाने जीव आणि लक्ष्यार्थाने आत्मा.

**दम :–** शब्दस्पर्शादि विषयांकडे धाव घेणाऱ्या अंतःकरणवृत्तीला आवरणे म्हणजे दम. वेदांतशास्त्रात गती होण्यासाठी साधकाला आवश्यक असलेल्या अधिकार लक्षणांतील षट्संपत्ती (सहा संपत्ती) पैकी एक म्हणजे दम.

**दृष्टीसृष्टीवाद :–** वेदांतशास्त्राची एक प्रक्रिया. जेव्हा पदार्थाची प्रतिति होते तेव्हाच तो पदार्थ युगपत् उत्पन्न होतो. पदार्थाची प्रतिति नसते तेव्हा तो पदार्थ नसतोच. प्रथम ज्ञान आणि ज्ञानासोबतच पदार्थ असतो. हा दृष्टी–सृष्टीवादाचा सिद्धांत आहे.

**धर्मशास्त्र :–** चार वर्ण आणि चार आश्रमातील लोकांचे आचरणविषयक नियम मनुस्मृती, आपस्तंबस्मृती इत्यादी ग्रंथात दिलेले आहेत, याला 'धर्मशास्त्र' म्हणतात.

**नरक :–** (१) यमनगरीतील पापी लोकांना यातना भोगण्याची जागा.

(२) सैतान व दुरात्मे यांचे वसतिस्थान.

(३) ईश्वरी सहवासाचा व तज्जन्य आध्यात्मिक अनुग्रहाचा अभाव.

(४) विष्णूने मारलेला एक राक्षस.

**नास्तिक :–** वेदप्रमाण न मानता, जे लोक वेदांची निंदा करतात त्यांना नास्तिक म्हणतात.

**नित्यकर्म :–** चार प्रकारच्या वेदविहित कर्मांपैकी एक म्हणजे नित्यकर्म. स्नान, संध्यावंदन इत्यादी दररोज करण्याची कर्मे हे नित्यकर्मांतर्गत येतात.

**निदिध्यासन :–** वेदांतशास्त्राच्या साधनांपैकी तिसरे साधन. तेलाच्या अखंड धारेप्रमाणे स्वतःचे ब्रह्मरूपतापूर्वक चिंतन करणे म्हणजे निदिध्यासन.

**निमित्तकारण :–** जे कारण कार्यात अंतर्भूत न होता कार्यास उत्पन्न करते, त्यास 'निमित्तकारण' म्हणतात. 'निमित्तकारण' कार्याच्या उत्पत्तीपूर्वी निश्चितपणे असते. उदाहरणार्थ – कुंभार, चाक आणि दण्ड ही घटाची निमित्तकारणे आहेत. 'सृष्टी कशी निर्माण झाली?' याची मीमांसा करण्यासाठी निमित्तकारणाचा विचार करण्यात येतो.

**निरुक्त :–** सहा वेदांगांपैकी एक म्हणजे निरुक्त. वेदातील समानार्थी शब्दांचा कोश.

**निषिद्धकर्म :–** सुरापान, अभक्षाहार, ब्राह्मण हत्या इत्यादी जी कर्मे मनुष्याने आचरणात आणू नयेत असे वेदाने सांगितले आहे, त्यांना 'निषिद्धकर्म' म्हणतात.

**नैमित्तिककर्म :–** वेदविहीत चार कर्मांच्या प्रकारांपैकी एक म्हणजे नैमित्तिककर्म. नामकरण, अन्नप्राशन, आचार्य घरी आले असता त्यांना भोजन अर्पण करणे इत्यादी विविध निमित्ताने जी कर्मे करण्यास वेदाने सांगितले आहेत, त्यांना 'नैमित्तिककर्म' म्हणतात.

**न्यायदर्शन :–** सहा आस्तिक दर्शनांपैकी एक म्हणजे न्याय. श्रीगौतम मुनी हे न्यायदर्शनकार आहेत.

**परिच्छिन्न :–** तुकडे, नानात्व

**परेच्छाप्रारब्ध :–** प्राप्त जन्मी ज्याप्रसंगी इतर लोकांच्या इच्छेप्रमाणे कर्मफलभोग होतो, त्यास 'परेच्छाप्रारब्ध' म्हणतात.

**पाताळ(ल) :–** पृथ्वीच्या खालचा लोक. नागलोक. भूलोकाच्या खाली अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल व पाताळ हे सात लोक आहेत. त्या प्रत्येकांना पाताळ असे म्हणतात.

**पामर :–** ज्या लोकांना योग्य व्यवहार कसा करायचा हेच कळत नाही आणि परमार्थाचा गंधही नसतो अशा लोकांना पामर म्हणतात.

**परिणामवाद :–** पूर्वरूपाचा परित्याग करून रूपांतर होणे म्हणजे परिणाम. जगत् हे चैतन्याचा परिणाम आहे असा ज्या दर्शनांचा सिद्धांत असतो त्यांना परिणामवादी म्हणतात. योगदर्शन आणि सांख्यदर्शन हे परिणामवाद मानणारे आहेत.

**परोक्ष :–** अप्रत्यक्ष. एखाद्या पदार्थाबद्दल केवळ ऐकले–वाचले असेल, परंतु तो पदार्थ पाहिला नसेल किंवा जाणला नसेल, तर त्या ज्ञानास 'परोक्ष' म्हणतात.

**पाप :–** वेदाने जी कर्मे निषिद्ध सांगितली आहेत आणि जी केली असता ताबोडतोब किंवा कालांतराने दुःख भोगावे लागते ते पाप होय. वेदांतशास्त्राच्या दृष्टीने 'मी देह आहे' अशी समज असणे म्हणजे सर्वात मोठे पाप होय.

**पारमार्थिक सत्ता :–** जी सत्ता भूत–वर्तमान–भविष्य तिन्ही काळी बाधित होत नाही, तिला 'पारमार्थिक सत्ता' म्हणतात. केवळ ब्रह्मचैतन्याची सत्ता पारमार्थिक आहे.

**पूर्वपक्ष :–** जे लोक अद्वैत वेदांताच्या सिद्धांतावर आक्षेप घेऊन प्रश्न विचारतात, त्यांना 'पूर्वपक्ष' म्हणतात.

**पूर्वमीमांसा :–** सहा वैदिक दर्शनांपैकी एक म्हणजे पूर्वमीमांसा. जैमिनी मुनी हे पूर्वमीमांसा दर्शनाचे प्रणेते होत.

**प्रकृति :–** माया या शब्दाची व्याख्या पहावी. 

**प्रमा :–** प्रमाता–प्रमाण–प्रमेय त्रिपुटीद्वारे होणाऱ्या ज्ञानाला 'प्रमा' म्हणतात.

**प्रमाण :–** (१) अंतःकरणाची वृत्ती इंद्रियद्वारा पदार्थापर्यंत जाते. तेवढ्या वृत्तीतील आभासाला 'प्रमाण' म्हणतात.

(२) प्रमेचे करण –साधन म्हणजे ज्याद्वारे प्रमा होते. ते सहा प्रकारचे आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ति व अनुपलब्धि.

**प्रमाता :–** अंतःकरणातील चैतन्याच्या आभासाला 'प्रमाता' म्हणतात.

**प्रमातृभास्य :–** स्थूलशरीर आणि स्थूलशरीराबाहेरील पदार्थांचे प्रमात्याला होणारे ज्ञान म्हणजेच 'प्रमातृभास्य'.

**प्रमेय :–** बाह्य पदार्थाला चिदाभासासह अंतःकरणवृत्ती व्यापते. पदार्थाकार चिदाभासाला 'प्रमेय' म्हणतात.

**प्रत्यगात्मा :–** तुरीय अवस्थेतील आत्म्याच्या आभासाला 'प्रत्यगात्मा' म्हणतात. प्रत्यगात्मा या शब्दाचा सरळ अर्थ म्हणजे 'अत्यंत जवळ'.

**प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्ष :–** पूर्वी कधी पाहिलेला पदार्थ जेव्हा समोर असतो तेव्हा पूर्वज्ञानसंस्कारापासून जे ज्ञान होते, त्यास 'प्रत्यभिज्ञारूप प्रत्यक्ष' म्हणतात.

**प्रत्यक्षप्रमाण :–** विषयाचे ज्ञान होण्यास उपयोगी पडणाऱ्या साधनास प्रमाण म्हणतात. प्रमाण सहा असून त्यांपैकी एक म्हणजे प्रत्यक्ष. डोळे, कान इत्यादी इंद्रियांच्या माध्यमातून जे कळते, त्याला 'प्रत्यक्षप्रमाण' म्हणतात.

**प्रस्थानत्रय :–** ब्रह्मसूत्रे, दहा उपनिषदे आणि श्रीमद्‌भगवद्‌गीता यांना मिळून 'प्रस्थानत्रय' म्हणतात.

**प्राणमयकोश :–** सूक्ष्मदेहातील पाच कर्मेंद्रिय आणि पाच प्राण मिळून प्राणमयकोश.

**प्रातिभासिक सत्ता :–** प्रातिभासिक म्हणजे भासलेले. सत्ता म्हणजे अस्तित्व. तात्पुरत्या दोषामुळे जे पदार्थ केवळ दिसण्यापुरतेच खरे असतात, त्या पदार्थांना प्रातिभासिकत्व असून, पदार्थांच्या अशा अस्तित्वाला प्रातिभासिक सत्ता असे म्हणतात. उदाहरणार्थ– कावीळ आणि निद्रा या दोन दोषांमुळे अनुक्रमे पदार्थ पिवळे दिसतात आणि स्वप्न दिसते.

**प्रायश्चित्त कर्म :–** चार वेदविहित कर्मांच्या प्रकारांपैकी एक म्हणजे प्रायश्चित्त कर्म. हातून पाप घडून त्याची जाणीव होऊन त्या पापाच्या निवृत्तीकरिता मनुष्याला जी कर्मे करण्यास वेदाने सांगितले आहे, त्यांना 'प्रायश्चित्त कर्मे' म्हणतात.

**प्रारब्धकर्म :–** अनंत जन्मातील संचितातून जेवढा कर्मफलभोग प्राप्तजन्मी होतो, त्यास 'प्रारब्धकर्म' म्हणतात.

**प्राज्ञ :–** सुषुप्ती अवस्थेतील आत्म्याच्या आभासाला 'प्राज्ञ' म्हणतात.


**पंचीकृत :–** पाच भागात विभागलेले. पाच महाभूतांच्या मिश्रणाने तयार झालेले.

**फल :–** (१) महावाक्य निरूपणासाठी ज्या सहा लिंगांचा वापर करण्यात येतो त्यापैकी एक म्हणजे फल. प्रतिपाद्य विषयाचे श्रवण केल्यानंतर जे प्राप्त होणार त्यास फल म्हणतात. उदाहरणार्थ – सद्गुरूंच्या मुखातून महावाक्याचे निरूपण श्रवण केल्याने शिष्य ब्रह्मरूप होऊन त्याचा जीवनमुक्त स्थितीचा निश्चय होतो.

(२) अंतःकरणातून परावर्तीत झालेल्या आत्म्याच्या प्रकाशाला चिदाभास म्हणजेच फल म्हणतात.

**फलव्याप्ती :–** चिदाभासासह अंतःकरणवृत्ती जेव्हा पदार्थाकार होते तेव्हा चिदाभास पदार्थाला व्यापतो आणि म्हणून पदार्थाचे ज्ञान होते, त्यास 'फलव्याप्ती' म्हणतात.

**बाध :–** 'पदार्थ दिसतेकाळीही नाही' असा निश्चय म्हणजे पदार्थाचा बाध.

**ब्रह्म :–** संपूर्ण सृष्टीचे अधिष्ठान असलेले व्यापक आणि अमर्यादित चैतन्य म्हणजे ब्रह्म.

**ब्रह्मलोक :–** स्वर्गांपैकी सर्वश्रेष्ठ स्वर्ग.

**ब्रह्मदेव :–** ब्रह्मलोकी राहणारी आणि सृष्टीच्या उत्पत्तीची अभिमानी देवता म्हणजे ब्रह्मदेव.

**बंध :–** अनंतकाळापासून जीव परत परत जन्मतो आणि परत परत मरतो, याला 'बंध' म्हणतात.

**भागत्यागलक्षणा :–** जहदजहल्लक्षणा शब्दाची व्याख्या पाहावी.

**भ्रम :–** अध्यास या शब्दाची व्याख्या पाहावी.

**महाकल्प :–** ब्रह्मदेवाचे आयुष्य १ महाकल्प एवढे असते. १ महाकल्प=७२००० कल्प=३.११०४×१०[१४] पृथ्वीवरील वर्ष.

**मनन :–** सद्गुरूंचे वाक्य आणि शास्त्रवाक्य यांचा शिष्याने अंतःकरणात सतत विचार करून 'हेच योग्य आहे' असा निश्चय करणे म्हणजे मनन. मनन हे वेदांतशास्त्राचे दुसरे साधन आहे.

**मनोमयकोश :–** पाच ज्ञानेंद्रिय आणि मन मिळून मनोमयकोश.

**मन्वंतर :–** काळ मोजण्याचे मोठे परिमाण. मन्वंतराचा अधिपती मनु असतो. १ मन्वंतर = ७१महायुगे = ३०,६७,२०,००० पृथ्वीवरील वर्ष.

**महाकारणदेह :–** जीवाच्या चार देहांपैकी एक देह. महाकारणदेहाला ज्ञानदेह किंवा विद्या असेही म्हणतात.

**महावाक्य :–** वेदातील अद्वैत ब्रह्मबोधक मुख्य वाक्य. प्रत्येक वेदात एक, अशी चार वेदांमध्ये चार महावाक्ये आहेत.

**माया :–** सृष्टीतील सर्व जीवांच्या अविद्यांच्या समष्टीला माया म्हणतात.

**मिथुनीकरण :–** एकत्रीकरण. सत्य आत्मा आणि मिथ्या देह–इंद्रिये–बाह्य पदार्थ यांच्या मिथुनीकरणामुळे अध्यास होतो.

**मिथ्या :–** अनिर्वचनीय शब्दाची व्याख्या पाहावी.

**मुमुक्षत्व :–** जन्ममरण चक्र नेहमीसाठी खंडित व्हावे अशी साधकाची इच्छा. मोक्षेच्छा.

**मोक्ष :–** ब्रह्माचे अज्ञान अभावरूप ठरून ब्रह्मस्वरूपतेच्या निःसंदेह, अपरोक्ष आणि दृढ निश्चयाने जन्ममरणाचे चक्र नेहमीसाठी खंडित होणे, याला 'मोक्ष' म्हणतात.

**युगपत् :–** एकदम.

**योगदर्शन :–** पतंजलि मुनि प्रणीत सहा वैदिक दर्शनांपैकी एक दर्शन.

**रजोगुण :–** ज्या गुणाच्या अधिक्यामुळे मनुष्य संसार करण्यास आणि दांभिकपणे परमार्थ करण्यास प्रवृत्त होतो तो रजोगुण.

**रस :–** पाच विषयांपैकी एक विषय. खाद्यपदार्थांबद्दल रुचि म्हणजे रस विषय.

**रूप :–** पाच विषयांपैकी एक विषय. पदार्थांना विशिष्ट रंग आणि आकार असतो, याला रूपविषय म्हणतात.

**लय :–** कार्य तात्पुरते कारणात विलीन होणे.

**लक्षण :–** जो धर्म लक्ष्यामध्ये नियमाने राहतो व लक्ष्याला सोडून दुसरीकडे कोठेही राहत नाही, त्या धर्माला 'लक्षण' म्हणतात. तटस्थ लक्षण आणि स्वरूप लक्षण असे लक्षणाचे दोन प्रकार आहेत.

**लक्षणा :–** शब्दाची जी वृत्ती शक्य संबंध दाखविते, तिला 'लक्षणा' म्हणतात. जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा आणि जहदजहल्लक्षणा असे लक्षणेचे तीन प्रकार आहेत.

**लक्ष्य :–** ज्याचे लक्षण सांगितले जाते, त्याला 'लक्ष्य' म्हणतात.

**लक्ष्य–लक्षण संबंध :–** तत्त्वमसि महावाक्याचा लक्ष्यार्थ निश्चयासाठीची प्रक्रिया.

**लक्ष्यार्थ :–** वाक्याचा वाच्यार्थ जुळत नसल्यास लक्षणा करून अर्थाचा निश्चय करणे म्हणजे लक्ष्यार्थ.

**लिंग :–** लिंग या शब्दाचा शब्दशः अर्थ म्हणजे चिन्ह. वेदातील तत्त्वांच्या तात्पर्य निर्णयासाठी सहा लिंगांचा वापर करण्यात येतो– उपक्रमोपसंहार, अभ्यास, अपूर्वता, फल, अर्थवाद आणि उपपत्ती.

**लौकिक :–** लोकांचे प्रचलित व्यवहार.



**वर्ण :–** गुण आणि कर्मानुसार ईश्वराने मनुष्याला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांमध्ये विभागले आहे. प्रत्येक वर्णाच्या मनुष्याचे कर्तव्य धर्मशास्त्रीय ग्रंथामध्ये दिलेले आहेत.

**वाक्य :–** पदांच्या समूहाला वाक्य म्हणतात.

**वाचक–वाच्य :–** पद हे वाचक आहे आणि पदाच्या अर्थाला वाच्य म्हणतात. उदाहरणार्थ – 'अग्नि' हे वाचक आणि 'दाहकता' हे वाच्य आहे.

**वाच्यार्थ :–** शब्द ऐकताच त्याचा जो अर्थ एकदम मनात येतो, त्याला 'वाच्यार्थ' म्हणतात.

**विकल्प :–** (१) विविध पक्ष. 'अमूक विषय असा आहे की तसा आहे?' याला 'विकल्प' म्हणतात.

(२) विचित्र चुकीचे विचार.

**विद्वत्संन्यास :–** जीवन्मुक्ति शब्दाची व्याख्या पाहावी.

**विपरीत भावना :–** मनुष्य प्रत्यक्षात ब्रह्म असूनही त्याचा 'मी पापी', 'मी पुरुष', 'मी दुःखी' असा निश्चय असतो, याला 'विपरीत भावना' म्हणतात.

**विपर्यय :–** अध्यास शब्दाची व्याख्या पाहावी.

**विराट :–** समष्टी स्थूलदेहातील ब्रह्माच्या आभासाला 'विराट' म्हणतात.

**विवर्तवाद :–** पूर्वरूपाचा परित्याग न होता रूपांतराचे भान होणे म्हणजे विवर्त. रज्जू—सर्प या उदाहरणात दोरी या पूर्वरूपाचा त्याग न होता, दोरीवर सर्प भासतो. त्याप्रमाणे, जगत् हे ब्रह्मावर विवर्त आहे. विवर्तवाद हा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे.

**विवेक :–** नित्य वस्तू आणि अनित्य वस्तू यावर विचार करणे म्हणजे विवेक. वेदांतशास्त्राच्या साधनांमध्ये आवश्यक चार अधिकारी लक्षणांपैकी प्रथम लक्षण म्हणजे विवेक.

**विशेष चैतन्य :–** जीवन्मुक्त महापुरुषांना ब्रह्माचा सच्चिदानंदरूपाने अनुभव असतो. त्यास चैतन्याचे विशेष रूप म्हणतात.

**विशेषण :–** कार्याशी अन्वयी असणारे. व्यावर्तक आणि वर्तमान अशा पदार्थाला 'विशेषण' म्हणतात.

**विशेष्य आणि विशिष्ट :–** विशेषण ज्याचा निर्देश करते त्याला 'विशेष्य' म्हणतात. उदाहरणार्थ – लाल गाय. येथे लाल हे विशेषण आणि गाय हे विशेष्य आहे. विशेषणासह विशेष्य म्हणजे विशिष्ट. येथे 'लाल गाय' हे विशिष्ट.

**विशेषण – विशेष्य संबंध :–** तत्त्वमसि महावाक्य निरूपणाची एक प्रक्रिया.

**विश्व :–** व्यष्टी स्थूलदेहातील आत्म्याच्या आभासाला 'विश्व' म्हणतात.

**विष्णू :–** वैकुंठात राहणारी आणि 'मी सृष्टीतील जीवांचे पालन पोषण करतो' अशी अभिमानी देवता म्हणजे विष्णू.

**विक्षेप :–** अज्ञानाच्या ज्या शक्तिने अंतःकरण चंचल होऊन मनुष्य देह आणि बाह्य पदार्थांमध्ये गुंतते, त्या शक्तीला 'विक्षेप' म्हणतात.

**विज्ञानमयकोश :–** पाच ज्ञानेंद्रिय आणि बुद्धी मिळून विज्ञानमयकोश.

**वृत्ती :–** अंतःकरणचा अखंड प्रवाहरूपाने विकास होऊन एकदेशी राहणे याला 'वृत्ती' म्हणतात.

**वृत्तीव्याप्ती :–** अंतःकरणवृत्ती पदार्थापर्यंत जाऊन पदार्थाच्या आकाराची होऊन पदार्थावरील अज्ञानाचे आवरण दूर करते, याला 'वृत्तीव्याप्ती' म्हणतात.

**वेद :–** ईश्वराने प्रकट केलेली, व्यवहार आणि परमार्थाची बोधक, अनादी, अनंत आणि मनुष्यासाठी परम विश्वसनीय अशी शब्दराशी म्हणजे वेद.

**वेदांगे :–** वेदातील शब्दांचा उच्चार, अर्थ त्याचप्रमाणे वैदिक कर्मांच्या योग्य विधी सांगणारी सहा अंगे आहेत. शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष ही सहा वेदांगे आहेत.

**वेदांतशास्त्र :–** भगवान श्रीव्यास प्रणित ब्रह्मविद्येचे प्रतिपादन करणारे शास्त्र.

**वैराग्य :–** इहलोक ते परलोक येथील सर्व भोगसुखांबद्दल विरक्ति.

**वैश्वानर :–** विराट शब्दाची व्याख्या पाहावी.

**वैशेषिक दर्शन :–** कणाद मुनि प्रणित सहा वैदिक दर्शनांपैकी एक दर्शन.

**व्यतिरेक :–** व्यतिरेक म्हणजे अभाव. तत्त्वमसि महावाक्याचा तात्पर्य लावण्याच्या प्रक्रियेत व्यष्टीने विचार करून चार प्रपंचांचा व्यतिरेक निश्चय करायचा असतो.

**व्यान :–** पंचप्राणांपैकी एक प्राण. हा प्राण देहामध्ये सर्वत्र राहतो आणि शरीराचे सांधे हालविण्यास सहाय्यक होतो.

**व्यावहारिक सत्ता :–** सत्ता म्हणजे अस्तित्व. व्यवहारकाली ज्या सत्तेचा बाध होत नाही, परंतु, ब्रह्मज्ञानाने जिचा बाध होतो तिला व्यावहारिक सत्ता असे म्हणतात. जाग्रत अवस्थेत मनुष्याच्या स्थूलदेहासह जे पदार्थ त्यांची व्यावहारिक सत्ता आहे. ब्रह्मलोक ते पाताळ या १४ भूवनातील सर्व स्थूलदेह आणि स्थूलपदार्थ हे व्यावहारिक सत्तेत येतात.

**शम :–** बंधनकारक वासनांचा त्याग म्हणजे शम. वेदांतशास्त्राच्या साधकासाठी आवश्यक असलेल्या चार अधिकार लक्षणांपैकी हे एक लक्षण आहे. सहा संपत्तीपैकी एक म्हणजे शम.


**शब्दप्रमाण :–** विषयांचे ज्ञान होण्यास उपयोगी पडणाऱ्या साधनास प्रमाण म्हणतात. एकूण सहा प्रमाणं आहेत. त्यापैकी एक शब्द प्रमाण आहे. अत्यंत विश्वसनीय व्यक्तिकडून एखादे वाक्य ऐकल्यावर तसाच ऐकणाऱ्याचा निश्चय होणे, हे शब्दप्रमाणाने होते. वेदांतबोधक शास्त्र आणि सद्गुरू यांचे शब्द प्रमाण मानल्याने शिष्य कृतार्थ होतो.

**शंकर :–** कैलासलोकात राहणारी व 'सृष्टीचा संहार मी करतो' अशी अभिमानी देवता म्हणजे शंकर.

**शास्त्र :–** मनुष्याचे पारमार्थिक कल्याण होण्याच्या दृष्टीने व्यवहार आणि परमार्थ करण्याची विशिष्ट पद्धती वेदामध्ये आणि वेदपर ग्रंथांमध्ये दिलेली आहे, त्यांना 'शास्त्र' म्हणतात.

**शास्त्रकृपा :–** बहुकाळ निष्काम भावाने ईश्वराची सेवा केल्यानंतर शास्त्रवाक्य कळावेत असे साधकाला वाटते. शास्त्राचे अध्ययन करित असता शास्त्रवाक्यांचा योग्य अर्थ कळत जाणे, याला 'शास्त्रकृपा' म्हणतात.

**शिव :–** जो साधक प्रगती करत करत महाकारणदेहावर येऊन 'मी ज्ञानी आहे' या निश्चयावर असून सृष्टीच्या पातळीवरील व्यवहार चालविण्याचा अभिमान धरतो, त्याला 'शिव' म्हणतात. ब्रह्मदेव, विष्णू आणि शंकर या देवता शिवपदावर आहेत.

**शुद्धसत्त्व :–** सत्त्वगुणाच्या पुढिल गुण. शुद्धसत्त्वगुणी साधकासमोर सात्त्विक, राजसिक अथवा तामसिक प्रसंग घडला तरी तो त्यांच्याकडे साक्षीभावाने पाहतो, त्या घटनांमुळे विचलीत होत नाही किंवा त्या घटनांशी तादात्म्य पावत नाही. ज्या साधकामध्ये शुद्धसत्त्वगुण उपजला आहे तो ब्रह्माच्या अपरोक्षज्ञानासाठी पात्र असतो.

**सत् :–** ब्रह्माचे एक स्वरूपलक्षण. तिन्ही काळी ज्यात बदल होत नाही, त्यास 'सत्' म्हणतात. असे एक ब्रह्मचैतन्यच आहे.

**सत्ता :–** सत्ता म्हणजे अस्तित्व. व्यावहारिक, प्रातिभासिक आणि पारमार्थिक हे सत्तेचे तीन प्रकार आहेत.

**सत्त्वगुण :–** ज्या गुणाच्या प्रभावामुळे मनुष्य धर्म आणि परमार्थ करतो, त्यास 'सत्त्वगुण' म्हणतात.

**समष्टी :–** ईश्वराचे माया, समष्टी सूक्ष्मशरीर, समष्टी स्थूलशरीर आणि त्यातील तीन ब्रह्मचैतन्याचे आभास अनुक्रमे ईश्वर, हिरण्यगर्भ आणि विराट यांना मिळून समष्टी म्हणतात.

**समाधान :–** वेदांतशास्त्राच्या साधकामध्ये जी चार अधिकार लक्षणे आवश्यक असतात त्यापैकी एक म्हणजे षट्संपत्ती. सहा संपत्तीपैकी एक म्हणजे समाधान. श्रवणास अनुकूल

अशा अमानित्व, अदंभित्व इत्यादी साधनांच्या अनुशीलनाने साधकाच्या चित्ताची स्थिरता म्हणजे समाधान.

**समान :–** पंचप्राणांपैकी एक प्राण. समान वायू खाल्लेल्या अन्नाचा रस, रक्त, वीर्य, विष्ठा, मूत्र इत्यादींमध्ये विघटन करतो.

**समानाधिकरण (मुख्य) :–** जेव्हा दोन पदार्थांची सत्ता आणि स्वरूप एक असून ते दोन्ही पदार्थ एकाच अर्थाचा बोध करतात तेव्हा त्या दोन पदार्थांमध्ये मुख्य समानाधिकरण असते.

**समानाधिकरण (बाध) :–** जेव्हा दोन पदार्थांची सत्ता आणि स्वरूप भिन्न असून एका पदार्थाचा बाध होऊनच दुसऱ्या पदार्थाशी ऐक्य होते, त्यास 'बाध समानाधिकरण' म्हणतात.

**सामान्य चैतन्य :–** जगातील प्रत्येक पदार्थामध्ये 'आहे' म्हणजे 'अस्तित्व' या रूपाने राहणारे जे चैतन्य ते 'सामान्य चैतन्य' होय. 'मी आहे' किंवा 'हे काहीतरी आहे' या रूपाने प्रत्येकाला सामान्य चैतन्याची प्रतिती असते. परंतु, चैतन्याच्या चित् व आनंद या स्वरूपलक्षणांची प्रतिती नसते.

**सामीप्य :–** ईश्वराच्या उपासकाला प्राप्त होणाऱ्या चार मुक्तींपैकी एक प्रकार. मृत्युनंतर उपासकाला उपास्य देवतेजवळ राहण्यास मिळणे म्हणजे 'सामीप्य मुक्ती'.

**सायुज्य :–** उपासकाला मृत्युनंतर ईश्वराचे सृष्टी–स्थिती–प्रलय करण्याचे सामर्थ्य सोडून त्याचे इतर ऐश्वर्य प्राप्त होणे ह्यास 'सायुज्य मुक्ती' म्हणतात. वेदांतात सायुज्य म्हणजे जीवन्मुक्ति.

**सारूप्य :–** मृत्युनंतर उपासकाला उपास्य देवतेच्या रूपाची प्राप्ती होणे, ह्यास 'सारूप्य मुक्ती' म्हणतात.

**सार्ष्टि :–** सायुज्य शब्दाची व्याख्या पाहावी.

**सालोक्य :–** मृत्युनंतर उपासकाला उपास्य देवतेच्या लोकाची प्राप्ती होते, ह्यास 'सालोक्य मुक्ती' म्हणतात.

**साक्षी :–** जीवसाक्षी आणि ईश्वरसाक्षी या शब्दांच्या व्याख्या पाहाव्यात.

**साक्षीभास्य :–** सुख, दुःख, संशय इत्यादी अंतःकरणातील प्रत्ययांना साक्षी जाणतो, म्हणून त्यांना साक्षीभास्य म्हणतात.

**सांख्यदर्शन :–** वेदांवर आधारीत सहा दर्शनांपैकी एक दर्शन. सांख्यदर्शनाचे प्रणेते कपिल मुनी होत.

**सुषुप्ती :–** ज्या अवस्थेत स्वप्नप्रपंच नसतो आणि जाग्रत अवस्थेतील पदार्थ प्रतीत होत नसून शरीर निपचित पडलेले असते, त्या अवस्थेला 'सुषुप्ती' म्हणतात. सुषुप्ती म्हणजे गाढ झोप.

**सूत्रात्मा :–** समष्टी सूक्ष्मदेहातील ब्रह्मचैतन्याच्या आभासाला 'सूत्रात्मा', 'प्राण' किंवा 'हिरण्यगर्भ' म्हणतात.



**सूक्ष्मशरीर :–** अपंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेले १९ अवयवांच्या शरीराला 'सूक्ष्मशरीर' म्हणतात. ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक, प्राणपंचक आणि अंतःकरणचतुष्टय हे सूक्ष्मदेहाचे १९ अवयव आहेत.

**सृष्टिदृष्टीवाद :–** पदार्थ पाहण्यापूर्वी तो अस्तित्वात होता अशी समज, ह्यास 'सृष्टिदृष्टीवाद' असे म्हणतात. सृष्टि ही पूर्वीपासूनच असून तेच पदार्थ पाहण्यात येत आहेत. म्हणजे प्रथम सृष्टि आणि नंतर दृष्टी म्हणजे सृष्टिदृष्टीवाद. ही वेदांतशास्त्राची एक प्रक्रिया आहे.

**संकल्प :–** (१) मनाचा एक धर्म. उपलब्ध असलेल्या अनेक पर्यायांपैकी (विकल्पांपैकी) एका पर्यायावर येणे म्हणजे संकल्प.

(२) योग्य चांगला विचार

**संचितकर्म :–** चित्तामध्ये साठलेले अनंत जन्मातील असंख्य कर्मबीज म्हणजे संचितकर्म.

**संबंधत्रय :–** विशेषण–विशेष्य संबंध, लक्ष्य–लक्षण संबंध आणि सामानाधिकरण्य संबंध ह्यांना मिळून 'संबंधत्रय' म्हणतात.

**संप्रदाय :–** भगवान श्रीव्यास, ब्रह्मावतार अथवा श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ महापुरुषापासून सुरू झालेला व अद्वैत वेदांताच्याच सिद्धांताचे बोध अध्ययन, अध्यापन, प्रसार केला जातो, त्या व्यवस्थेला 'संप्रदाय' म्हणतात.

**संसर्गाध्यास :–** स्वरूपाने ब्रह्मच असलेल्या जगताला मनुष्य 'हे जगत् आहे' असे समजतो. या ठिकाणी प्रत्यक्षात 'हे' म्हणजे ब्रह्म, पण मनुष्य समजतो जगत्. ब्रह्माचा जगताशी आणि जगताचा ब्रह्माशी संबंध भासलेला आहे, त्यास 'संसर्गाध्यास' म्हणतात.

**संस्कार :–** पूर्वीच्या अनुभवांचे अंतःकरणातील सूक्ष्मरूपात असलेले ज्ञान म्हणजे संस्कार.

**स्थूलशरीर :–** पंचीकृत पंचमहाभूतांपासून बनलेल्या २५ अवयवांच्या शरीराला 'स्थूलशरीर' म्हणतात.

**स्पर्श :–** पाच ज्ञानेंद्रियांपैकी एक इंद्रिय म्हणजे त्वचा. या ज्ञानेंद्रियाच्या माध्यमातून शितोष्णादि प्रत्यय येतो, त्याला 'स्पर्श' म्हणतात.

**स्मृति :–** पदार्थ समोर नसताना केवळ त्यासंबंधीच्या पूर्वज्ञानाच्या संस्कारांपासून होणाऱ्या ज्ञानास 'स्मृति' म्हणतात.

**स्वरूपलक्षण :–** जे लक्षण लक्ष्यामध्ये नेहमी असून लक्ष्याला इतर सर्व पदार्थांपासून व्यावृत्त करते ते स्वरूपलक्षण.



**स्वेदज :–** चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या जीवांचे वर्गीकरण जरायुज, अंडज, उद्भिज्ज आणि स्वेदज असे केलेले आहे. ज्या ठिकाणी उष्णता आणि ओलावा असतो त्या ठिकाणी माशा, उवा इत्यादी कीटक तयार होतात. त्यांना 'स्वेदज' म्हणतात.

**हिरण्यगर्भ :–** सूत्रात्मा या शब्दाची व्याख्या पाहावी.

**क्षेत्र :–** व्यष्टीने जीवाच्या स्थूल आणि सूक्ष्म शरीरांना क्षेत्र म्हणतात. समष्टीने ईश्वराच्या स्थूल आणि सूक्ष्म शरीरांना क्षेत्र म्हणतात.

**क्षेत्रज्ञ :–** व्यष्टीने जीव हा क्षेत्रज्ञ आणि समष्टीने ईश्वर हा क्षेत्रज्ञ.

**ज्ञानेंद्रिये :–** ज्या इंद्रियांच्या सहाय्याने पंचीकृत पंचमहाभूतात्मक पदार्थांचे ज्ञान होते, त्यांना 'ज्ञानेंद्रिये' म्हणतात. चक्षु, श्रोत्र, त्वक्, जिव्हा आणि घ्राण हे पाच ज्ञानेंद्रिये आहेत.

**श्रद्धा :–** वेदांतशास्त्राच्या साधकासाठी आवश्यक असलेल्या चार अधिकार लक्षणांपैकी षट्संपत्ती हे एक लक्षण आहे. सहा संपत्तीपैकी एक म्हणजे श्रद्धा. साधू, संत, सद्गुरूंचे वाक्य ऐकून आणि शास्त्रवाक्यांचा अभ्यास करून 'अगदी तसेच आहे' असा दृढ विश्वास म्हणजे श्रद्धा.

**श्रवण :–** वेदांतशास्त्राचे पहिले अंतरंग साधन. सद्गुरूंचा, वेदांतशास्त्राचा बोध श्रद्धापूर्वक ऐकणे म्हणजे श्रवण.

**श्रुती :–** वेद.

**श्रोत्रिय :–** वेदाचा लक्ष्यार्थ ज्यांना कळलेला आहे त्यांना श्रोत्रिय म्हणतात. सद्गुरूंचे एक लक्षण म्हणजे श्रोत्रिय.

॥ ॐ तत् सत् ॥

## ॥ ब्रह्मीभूत सद्गुरू श्रीअनाप महाराज स्तवन ॥

ऐसा माझा स्वामी । सद्‌गुरू अनाप ।
निजखूण दाविली । श्रीगुरू ज्ञानराज ॥धृ॥

ज्ञानियांचा ज्ञानी । पूज्य जो का वंद्यस्थानी ।
भवसागराची केली आटणी । हरविले त्रिताप ॥१॥

विठ्ठल विठ्ठल मंत्र दिधला । अहं त्यागे तयास धरला ।
सोहं भावे मी हो स्मरला । ओंकाराचा जाप ॥२॥

नारायण नारायण । घडविले पारायण ।
दशम द्वारी ओणव करून । शोधला निज बाप ॥३॥

शरण शरण आलो राया । दास तुमचा पडतो पाया ।
अखंड ज्ञान तुमचे गाया । न घडो पुण्य अन् पाप ॥४॥

सद्‌गुरू स्वरूप ओंकार । ज्ञानराज केली पुकार ।
उत्तरपंथाचे दाविले द्वार । जेणे पडे उणा संसार ॥५॥

ज्योतीची ती निजज्योत । घडविली तियेची प्रीत ।
उजळविला चैतन्यदीप । नसे जयास माप ॥६॥

॥ ॐ तत् सत् ॥

# ॥ पसायदान ॥

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्येज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥१॥

जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥२॥

दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥३॥

वर्षत सकळ मंगळी । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूमंडळी । भेटो तयां भूतां ॥४॥

चलां कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥५॥

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥६॥

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥७॥

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥८॥

येथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥९॥



**ब्रह्मीभूत सद्गुरू श्रीअनाप महाराज समाधी मंदिर**

---

स यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳसर्वं तत्सत्यꣳस आत्मा तत्त्वमसि
श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविती।।

: छान्दोग्योपनिषद् ६.१६.३

---

अकर्तृत्वामुळे तो स्वतःला सत्य करतो. तो सत्याभिसंध, ज्याप्रमाणे अग्नीपरिक्षेच्या दिंव्यातून मुक्त होतो, त्याप्रमाणे जीवन्मुक्तांची पुनरावृत्ती होत नाही. अज्ञानी लोकांचा पुनः पुनः जन्म होतो. हे सर्व सद्रुप आहे, सत्य आहे, आत्मा आहे आणि हे श्वेतकेतो! 'तें तं आहेस', तेव्हा तो (श्वेतकेतु) त्याला (आत्म्याला), जाणता झाला, जाणता झाला.